

# भारताचा इतिहास



ग्यासुद्दीन तुघलक वारल्यानंतर तीनच दिवसांनीं त्याचा मुलगा महंमद तुघलक यानें स्वतःला बादशाह म्हणून घोषित केलें. चाळीस दिवसानंतर तो दिल्ली येथें आला आणि त्यानें मोठ्या थाटामाटानें स्वतःचा राज्याभिषेक करवून घेतला.

महंमद तुघलक हा विक्षिप्त व लहरी स्वभावाचा एक मनुष्य होता. तो विद्वान तर होताच, पण बुद्धिमान होता कीं माथे-फिरू, क्रूर होता कीं साधुवृत्तीचा हें सांगणें कठीण आहे. तो फार पराक्रमी होता आणि तत्वज्ञान व धर्मशास्त्र या विषयांत त्याचें असामान्य असें पांडित्य होतें हें मात्र खरें आहे.

त्याची स्वतःची राहाणी अगदीं साधी होती. त्याला व्यसन नव्हतें. त्यानें दानधर्म पण पुष्कळ केला. त्याला पांडित्य होतें, पण व्यवहारज्ञान मुळींच नव्हतें. त्यानें योज-लेल्या योजनांच्यामागें फार मोठी कल्पना असे, परंतु योजना अमलांत आणतांना मात्र त्याला कधींच यश मिळालें नाहीं. उलट राज्याचें व प्रजेचें बरेच नुकसानच झालें. कारण स्वभावानें तो तापट व आततायी होता. कोणी त्याच्या कामांत दोष काढला किंवा त्याच्या इच्छेविरुद्ध केलें तर त्याला खपत नसे. त्याच्या योजना अयशस्वी होत गेल्या तसतसा त्याचा विक्षिप्तपणा पण वाढत गेला. त्यानें प्रजेच्या हिताचीं कामें करण्याचा खूप प्रयत्न केला. परंतु तो अपकारच ठरला.

गंगा व यमुना या नद्यांच्या खोऱ्यांतील प्रदेशांत त्यानें करवाढ केली. तो प्रदेश सुपीक होता खरा, पण दुष्काळ पडला असतां त्यानें करवाढ केली आणि अधि-काऱ्यांच्या मदतीनें क्रूरपणानें कर वसूली सुरू केली. शेतकरी शेतें सोडून पळून गेले. त्यांना परत कामावर लावण्यासाठीं त्यानें नानाप्रकारचे अत्याचार केले.

१३२७ मध्यें त्यानें आपली राजधानी दिल्लीहून दौलताबाद म्हणजे देवगिरी येथें नेली. त्याच्या राज्यांत पंजाब, बंगाल, गुजरात व दक्षिणेकडील प्रदेश असल्यामुळें राज्याचें एक केंद्र म्हणून दौलताबाद येथें राजधानी करण्याची त्याची कल्पना चुकीची नव्हती. याशिवाय मंगोल जातीच्या स्वाऱ्यांची भीति कमी व्हावी हाहि हेतु त्यांत एक होता.



त्यानें दौलताबाद येथें मोठमोठ्या इमारती व रस्ते बांधले. दौलताबादला जाण्यासाठीं जे लोक तयार झाले त्यांना त्यानें धन-सहाय्य केलें. हें सर्व ठीक होतें. पण दिल्लीची प्रजा दौलताबाद येथें जाण्यास तयार नाहीं हें जेव्हां त्याला कळलें तेव्हां त्याला भयंकर राग आला. त्यानें हुकूम काढला कीं दिल्लीच्या नागरिकांनीं आपलें सामानसुमान घेऊन दौलताबादला जावें. या प्रवासांत प्रजेला किती हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या याची पुरी कल्पना आज येणें शक्य नाहीं. तरी ७०० मैलांचा पायीं प्रवास लक्षावधि प्रजेला सुखाचा झाला असेल कीं कष्टाचा हें कळणें तितकेंसें कठीण नाहीं.

सुलतानाला प्रजेच्या कष्टाची कल्पना आली तेव्हां सुलतानानें दुसरी आज्ञा काढली कीं राजधानी दौलताबादहून पुन्हां परत दिल्लीला नेण्याचें ठरलें आहे. म्हणून प्रजेला पुन्हां दिल्लीस जावें लागलें. सुलता-नाच्या या लहरी स्वभावामुळें कित्येक लोक प्राणास मुकले व सामान सुमानाची वाताहात पण झाली. प्रजा परत दिल्लीला आली. परंतु दुःखी व कष्टी होऊन. अर्धी अधिक दिल्ली ओसाड पडली व दिल्ली आपलें जुनें

वैभव घालवून बसली. पुन्हां तें वैभव येण्यास एक दीड शतक तरी लागलें.

पुढें सुलतानानें तांब्याचीं नाणीं काढलीं. ही एक मूलग्राही अशी आर्थिक सुधारणा होती. परंतु हीं नाणीं सरकारी टांकसाळींतच पाडली पाहिजेत असा कायदा नव्हता. घरोघरीं नाणी पाडण्यास परवानगी असल्या-मुळें. "प्रत्येक घरच एक टांकसाळ झालें. पाटील कुळकर्णी श्रीमंत झाले व सोनारांनीं सोन्याऐवजीं तांब्याचीं नाणीं पाडून सरकारी खजिना भरला. इतिहासकारांनीं असा उल्लेख केला आहे.

सुलतानानें आणखी एक वेडेपणा केला. त्यानें सोन्या-चांदीचीं नाणीं देऊन तांब्याचीं नाणीं विकत घ्यायला सुरवात केली. त्यामुळें खजिना रिकामा पडला व तुघलकाबाद येथें तांब्याच्या नाण्यांचे ढीग लागले.

सन १३२८-२९ मध्यें ट्रान्स अक्सि-याना येतील चगताई सरदारानें भारतावर स्वारी केली. ही स्वारी परतली. पण महंमद तुघलक यानें त्याला त्याचा पराभव करून कीं त्याला धन देऊन परतवलें हें सांगणें कठीण आहे.

भारत व चीन देशांच्या सीमेवर असलेला काराकोरम पर्वत जिंकण्यासाठीं महंमद तुघलकानें एक मोठें सैन्य पाठविलें. पण थंडीमुळें म्हणा किंवा रसद वेळेवर न पोंचल्यामुळें म्हणा, सैन्याला परत फिरावें लागलें. इतिहासकार म्हणतात कीं अवघे दहाच लोक परत आले व कांहीं इतिहास-कारांचें म्हणणें आहे कीं तीनच परतले. परंतु या स्वारीचा मुख्य हेतू पुरा झाला. त्या प्रदेशांतील लोकांनीं दिल्लीचें आधिपत्य स्वीकार केलें.





# महाभारत

धृतराष्ट्र, गांधारी कुंती वगैरेंनीं वानप्रस्था-श्रम स्वीकारल्यानंतर हस्तिनापुराचें वैभवच जणुंकांहीं हरपलें. मातेचा आधार तुटलेल्या मुलांची जी स्थिति होते ती पांडवांची झाली. कारण लहानपणा-पासून कुंतीच्या मायेचें छत्र त्यांच्यावर सतत होतें.

नागरिक व प्रजा देखील दुःखी कष्टी झाली. वृद्ध धृतराष्ट्र व गांधारी एकदम वनवासास गेलेली पाहून त्यांना दुःख होणें साहजिक होतें.

वडीलधाऱ्या मंडळींच्या अभावीं अनाथ झाल्याचा भास पांडवांना देखील होऊं लागला. अभिमन्यु व उपपांडव यांना वीरगति मिळाल्याचें दुःख होतें तें वेगळेंच. जीवनाधार एक परीक्षित मात्र होता.

प्रत्येकाला कांहीं तरी उणीव आहे असें भासे. पण बोलणार कोण ? परंतु सहदेवानें सर्वांच्या मनांतली गोष्ट सांगून टाकली. म्हणाला—"दादा ! काकांना भेटायला जावें असें तुला वाटत आहे हें मला ठाऊक आहे. आईला एकदां भेटून यावें असें सर्वांना वाटत आहे. पण कोणी बोलत नाहीं. तिला वनांत कांहीं कष्ट तर नाहीं ना निदान एवढें तरी पाहून यावें असें फार फार वाटतें.

लगेच द्रौपदी म्हणाली—"सासुबाईंची पुन्हां कधीं भेट घडेल कीं नाहीं, याची शंका मला कित्येक दिवसापासून वाटत आहे. तुम्हांला पुरुषांना काय ? राज्य-कारभारांत एकदां गर्क झालांत कीं जगांतली एक देखील गोष्ट आठवत नाहीं. पण आम्हां



स्त्रियांना आपले लोक व आपलीं माणसें या पलीकडे कांहीं दिसत नाहीं. तुम्हांला कामें असतील तर तुम्हीं आपापलीं कामें पहा, पण आम्हां बायकांना जाऊन येऊं द्या."

युधिष्ठिराचें मन देखील सर्व वडील मंडळीस भेटण्यासाठीं अधीर झालें होतें. पण तो स्वतः कसा बोलणार? सहदेव व द्रौपदी दोघांनीं बोलून दाखविल्यावर जास्त विचार करीत बसला नाहीं. वनगमनाची तयारी करण्यास त्यानें सांगितलें.

सर्वांना परमानंद झाला. सर्वांत वृद्ध कृपाचार्य, त्यांनाच सर्वांनीं पुढाकार दिला व त्यांच्या आज्ञेप्रमाणें वनगमनाची सर्व तयारी झाली. रथ, हत्ती, घोडे, उंट जें वाहन मिळालें त्यांत बसून लोक निघाले. ज्यांना हीं वाहनें नव्हतीं ते पायींच निघाले. द्रौपदी वगैरे स्त्रियांसाठीं पालख्यांची व्यवस्था करण्यांत आली. धौम्य व युयुत्सु फक्त दोघे नगराच्या रक्षणासाठीं मागें राहाले.

सर्व कुरुक्षेत्र येथें येऊन पोंचले. शतयूप धृतराष्ट्र वगैरे ज्या वनांत रहात असत तें जवळच होतें. म्हणून सर्वांनीं आपापलीं वाहनें तेथेंच सोडलीं व पायींच निघाले. द्रौपदी वगैरे स्त्रिया देखील पायींच निघाल्या.

केळ्यांच्या झाडाआड आश्रम होता. तेथें कोणीच नव्हतें. सर्वत्र सामसूम होती. परंतु पांडवांना आलेले पाहून जवळपास राहणारे ऋषी व मुनी आले. सर्व यमुनेवर स्नानास गेल्याचें त्यांनीं सांगितलें.

पांडव यमुनेवर गेले. दूर धृतराष्ट्र आंघोळ करून सूर्याला अर्घ्य देत होता. सर्वांत पुढें सहदेव धांवत गेला व त्यानें कुंतीला नमस्कार करून तिला मिठीच मारली आणि लहान मुलासारखा रडूं लागला.



कुंतीच्या डोळ्यांत प्रेमाश्रु आले व तिनें त्याला उभा करून पोटाशीं धरलें आणि गांधारीला म्हणाली—"सहदेव आला आहे!" नंतर सर्व पांडव एकामागून एक येत असलेले दिसले.

कुंती धृतराष्ट्र आणि गांधारीला वाट दाखवीत पुढें निघाली. पांडवांनीं पुढें धांवत येऊन त्यांच्या हातांतून पाण्यानें भरलेले तांबे व घागरी घेतल्या व सर्वांना घेऊन द्रौपदी वगैरे स्त्रिया आणि नागरिक वाट पहात उभे होते तेथें गेले.

युधिष्ठिरानें कोण कोण आलें आहे हें सांगितलें आणि नव्या मंडळींचा थोडक्यांत परिचय करून दिला. सर्व आप्त मंडळीं आलेली पाहून धृतराष्ट्राला आपण परत हस्तिनापुरींच पोहोंचलों असा आनंद झाला. स्त्रियांनीं आपल्या सासू-सासऱ्यांना नमस्कार केला व सर्वांनीं आश्रमांत प्रवेश केला.

जवळपासचे ऋषी व मुनी पांडवांना भेटायला म्हणून आले. धृतराष्ट्रानें त्यांची ओळख करून दिली. नंतर हस्तिनापुराची कुशल वार्ता विचारली व राज्यकारभाराविषयीं चवकशी केली. युधिष्ठिरानें सर्व माहिती सांगून वनवासाचा कांहीं कष्ट झाला



का असें विचारलें. नंतर विदुर दिसला नाहीं म्हणून त्याच्याविषयीं विचारपूस केली.

धृतराष्ट्र म्हणाला—"विदुर फार थकला आहे. रानांत सतत फिरत असतो." ऋषी मुनीं केव्हां केव्हां तो भेटतो असें सांगितलें. सुदैवानें त्याच वेळीं सर्वांना विदुर दूर कोठें तरी जात असलेला दिसला. त्याचें सर्व अंग धुळीनें भरलें होतें.

युधिष्ठिर धांवत विदुराकडे निघाला. ओरडून म्हणाला—"काका! मी आलों आहें भेटायला." आणि त्याच्या पाठीमागें








धांवत गेला. विदुर एका दाट झाडींत शिरला. मधूनमधून तो दिसे. युधिष्ठिराचा आवाज त्याच्या कानावर पडला कीं नाहीं कळलें नाहीं. त्यानें मागें वळून देखील पाहिलें नाहीं. शेवटीं एका निर्जन स्थानीं विदुर उभा असलेला दिसला. तो इतका थकला होता कीं त्याला ओळखणें देखील कठीण होतें. युधिष्ठिरानें जवळ जाऊन नमस्कार केला आणि म्हणाला—"काका! मी युधिष्ठिर!" युधिष्ठिर विदुराच्या समोर उभा होता. तेव्हां एक अद्भुत गोष्ट घडली. विदुर टक लावून बराच वेळ त्याच्याकडे पहात उभा राहिला. युधिष्ठिराला असें वाटलें कीं विदुरानें सशरीर त्याच्या शरिरांत प्रवेश केला. जणुंकाहीं दोघांचा जीव व आत्मा एक होऊन गेला. युधिष्ठिराला क्षण भर देहभान राहालें नाहीं.

थोड्या वेळानें स्वत:ला सावरून त्यानें विदुर कोठें दिसतो का पाहिलें तेव्हां त्याला विदुर एका झाडाला टेकून, डोळे मिटून निश्चेष्ट बसलेला दिसला. मृत्यूची कळा तोंडावर स्पष्ट दिसत होती.

तेव्हां युधिष्ठिराला व्यास मुनींनीं एकदां सांगितलेली गोष्ट आठवली. व्यास मुनी म्हणाले होते कीं विदुराचा आत्मा तुझ्या आत्म्यांत मिळून जाईल. त्यानें विदुराच्या देहाचा दहन-संस्कार करण्याचें ठरवून चिता रचली. त्यावेळीं आकाशवाणी झाली—"युधिष्ठिरा! याच्या शरिराचा अंत्मविधि करण्याची आवश्यकता नाहीं. ज्यानें स्वत:च्या इच्छेनें देह ठेवला त्याच्यासाठीं शोक करूं नकोस."

युधिष्ठिरानें त्या देहाला स्पर्श केला नाहीं व आश्रमांत परत येऊन घडलेलें वृत्त सांगितलें. तें ऐकून धृतराष्ट्राला आनंदच झाला. सर्व हस्तिनापुरवासियांनीं ती रात्र आश्रमांतच आनंदानें घालवली. कोणाला हस्तिपुराची आठवण देखील झाली नाहीं.






[ २१ ]

[लखू व त्याच्या दोघां साथी मित्रांना पकडण्याचा डाव ब्रह्मदंडीनें योजल्याप्रमाणें साधला. ब्रह्मदंडी व गरुडमुख सरदाराच्या अनुयायांच्या हातीं तिघे कैद झाले होते. ब्रह्मदंडी ओरडला लखूला सोडून दोघांना ठार करा. पुढें वाचा]

ब्रह्मदंडीचा आवाज लखूनें ओळखला व वळून तिकडे पाहूं लागला. समोर तिघांना घेरून उभे राहिलेल्या पंखवाल्यांना एका बाजूला व्हायला सांगून तो पुढें आला. त्याच्या रक्षणार्थ दोन्ही बाजूला जितवर्मा व शक्तिवर्मा आपापल्या तलवारी उपसून उभे होते. ब्रह्मदंडीला पाहतांच लखू त्याच्याकडे रागानें पहात त्याच्या अंगावर धांवणार इतक्यांत चार पांच पंखवाल्यांनीं त्याला धरलें व त्याच्या हातांतली आणि जयमल व गोमांग या दोघांची शस्त्रें काढून घेतलीं.

त्या तिघांना त्या असहाय व निरुपाय अवस्थेंत पाहून जितवर्मा व शक्तिवर्मा खद-खदां हंसूं लागले व म्हणाले—"बरें झालें आम्ही आपल्या तलवारी वेळेवरच पाजळ-वून घेतल्या."

इतक्यांत महाकायनें आपल्या चाबकानें दोघांच्या तलवारी ओढून घेतल्या आणि



त्यांना बजावलें—" खबरदार, कोणी यांच्या अंगाला माझ्या परवानगीशिवाय हात लावलात तर. साठ सोन्याचीं नाणीं जो काढून ठेवील त्यानें त्यांना घेऊन जावें व काय वाटेल तें करावें."

जितवर्मा व शक्तिवर्मा महाकायाच्या त्या विचित्र वागण्यामुळें डिवचलेल्या सांपासारखे चवताळून त्याच्या अंगावर धांवले व म्हणाले—" अरे ए मांसाच्या गोळ्या! पहिल्यानें तो चाबूक दूर फेंक! ते तुझे गुलाम नाहींत. होते पूर्वी, पण तूं त्यांना केव्हांच विकून टाकलें आहेस. ज्यांनीं यांना विकत घेतलें होतें, ते व्यापारी केव्हांच यमसदनास गेले आहेत."

" होय! ते मेले म्हणून त्यांना विकलेली वस्तु माझ्याकडे परत आली. तुम्हांला एवढें देखील कळत नाहीं का रे मूर्खांनो!" महाकाय दरडावून म्हणाला.

जितवर्मा व शक्तिवर्मा महाकायाला मारण्यासाठीं धांवले. पण महाकायानें दोघांना दोन्ही हातांनीं मांजर उंदराला धरतें तसें धरलें आणि गरगर फिरवून दूर फेंकून दिलें.

ब्रह्मदंडी तें सर्व इतका वेळ पहात उभा होता. त्याला इतकी चीड आली कीं त्यानें गरुडराजाकडे वळून म्हटलें—" गरुडराज! हे तिघे आपसांत कुत्र्यामांजरांसारखे भांडून स्वतः मरणार व लखू व त्याचे साथी आपल्या हातांतून निसटून पळून जाणार."

गरुडराज आपला भाला त्या तिघांकडे रोखून ओरडला—" जितवर्मा व शक्तिवर्मा सोडा त्या धटिंगणाला! हे तिघे माझे गुलाम आहेत. मी त्यांना पकडलें आहे."

गरुडराजाची ती गर्जना ऐकून दोघांनीं महाकायाला सोडलें आणि आपापल्या तलवारी घेऊन दांत ओठ चावीत एका बाजूला उभे राहिले. महाकायानें पण धांपा टाकीत आपला चाबूक उचलून घेतला आणि तो खांद्यावर टाकून करड्या नजरेनें ब्रह्मदंडीकडे पाहूं लागला.

ब्रह्मदंडी लखूजवळ गेला व त्याच्या पाठीवर प्रेमानें हात फिरवीत म्हणाला—लखू, अरे, माझ्याशीं वांकडें? मी तुझा हितैषी आहें हें, तूं वाईट संगतींत पडून—या गुरुद्रोह्याच्या नादाला लागून स्वतःचें हित व अहित कशांत आहे हें देखील विसरलास. मी तुला एक कोट्याधीश, नव्हें इहलोकाचा मालक करायला निघालों होतों, स्वतःच्या इच्छेनें नव्हें, कालभैरवाच्या आज्ञेनें. परमेश्वर कृपेनेंच पुन्हां तुझी व माझी भेट घडली आहे. अग्नि आणि वायु यांचीच जणूं ही भेट आहे. आतां आपल्या वाटेवर कोण आडवा उभा राहतो तें पाहातों."



ब्रह्मदंडीच्या त्या गोडगोड बोलण्यानें लखू खूष होण्याऐवजीं जास्त चिडला. त्यानें आपल्या पाठीवरचा त्याचा हात झिडकारून त्याला दूर लोटलें व म्हणाला—" ब्रह्मदंडी तुझ्या या फुसलावण्यानें मला भुरळ पडेल असें तुला वाटत असेल. तूं किती मोठा मांत्रिक आहेस हें मला देखील ठाऊक आहे."

ब्रह्मदंडी आपला राग पिऊन स्वतःला आवरून म्हणाला—" लखू! पुरे कर बडबड तुझी, उपकारकर्त्याला अशीच उत्तरें करतात वाटतें? तूं माझा जो अपमान केलास तो मला एवढा लागला नाहीं. पण तूं माझ्या मंत्रशक्तीचा अपमान करून स्वतः कालभैरवाचा अपमान केला आहेस हें विसरूं नकोस. पुन्हां जास्त कांहीं बोललास तर उभाचा उभा राखेचा एक ढीग होऊन





पडशील हें लक्षांत ठेव. ती राख सर्व अंगाला फांसून मी त्या मगरींच्या तलावांत बुडी मारीन आणि कालभैरवाकडे निघून जाईन. या जयमलला एकशिंगी घोडा होण्यापलीकडे मंत्रज्ञान काय आहे ?" नंतर जयमलकडे वळून म्हणाला—" या दुष्टाला, ह्या गुरुदासाला बाणांनीं व भाल्यांनीं भोसकून ठार करा व याचें प्रेत गिधाडांच्या हवालीं करा."

ब्रह्मदंडीचें वाक्य पुरें होण्यापूर्वीच जितवर्मा व शक्तिवर्मा जयमल व गोमांगला ठार करायला तलवारी घेऊन धांवले. परंतु इतक्यांत गरुडराजानें आपल्या भाल्यानें त्यांच्या हातांतल्या तलवारी खालीं जमिनीवर पाडल्या व म्हणाला—" थांबा ! थांबा !" तो पुढें म्हणाला—" या दोघांना पाहिल्या-पासून मला एक गोष्ट सुचली आहे. ह्यांचीं तोंडें गिधाडासारखीं दिसत आहेत. तेव्हां गिधाडांच्या जातीचे हे मनुष्य असावेत. आम्हां गरुडजातीची सेवा करायला हीं गिधाडेंच उपयोगी पडतील. आमच्या जातीच्या शास्त्रांत देखील लिहिलें आहे कीं या गिधाडजातीला आपले दास म्हणून वागवा व त्यासाठीं त्यांचें रक्षण करा. तर मग हे दोघे आजपासून आमचे दास झाले आहेत."

नंतर तो आपल्या अनुयायांकडे वळून म्हणाला—" या दोघांना माझ्या घरीं नेऊन यांच्यावर कडक नजर ठेवा. माझे पंख धुवून वाळवण्याचें काम यांना द्या."

गरुडराजाच्या आज्ञेनें पंखवाले अनुयायी जयमल व गोमांगला धरून घेऊन जाऊं लागले तेव्हां ब्रह्मदंडी त्यांना मध्येंच अडवून गरुडराजाला म्हणाला—" गरुडेश्वरा ! अशी घाई करूं नकोस ! तूं यांना अजून ओळखलें नाहींस ! हे तुझ्या हातावर तुरी देऊन निघून जातील. या गोष्टीचा जरा विचार कर. पळाले तर ते नुसते पळणार नाहींत तुला ठार करून पळून जातील ! माझें ऐक, आतांच्या आतां यांचें मांस गिधाडांना खायला घाल."

पण ब्रह्मदंडीचें तें बोलणें गरुडराजाला आवडलें नाहीं. तो म्हणाला—" ब्रह्मदंडी तूं लहान सहान गोष्टींची इतकी भीति मनांत बाळगतोस, मग ती भयानक दरी कशी काय जिंकणार ? पराचा कावळा करणारा काव-ळाच दिसतो आहेस तूं ! कावळ्यासारखी 'काव काव' खूप करतां येते तुला. आमच्या शास्त्रांत लिहिलें आहे कीं कावळ्याच्या जातीच्या माणसांना गिधाड जातीच्या माणसांची चाकरी करायला नेमावें. तुला या दोघांची चाकरी करायला मी नेमतों."

गरुडराजाचें तें उफराटें बोलणें ऐकून ब्रह्मदंडीच्या पायाखालची जमीनच जणूं कांहीं सरकली. हातांतली जादूची कांडी इकडे तिकडे फिरवीत व कांहीं तरी मंत्र पुटपुटत तो म्हणाला—" गरुडराजा ! तूं कालभैरवाच्या शिष्याचा असा अपमान केला आहेस. पण मला वाद घालायचा



नाहीं. तूं काय वाटेल तें कर त्या दोघांना घेऊन. मी लखूला घेऊन भयानक दरींत निघून जातों. मी तुला वचन दिलें होतें त्याप्रमाणें मनुष्यबळी देण्यासाठीं तुझ्याकडे मी मनुष्य पाठवितों. उद्यां सकाळीं आम्ही निघूं !"

" ठीक ! त्याला माझी हरकत नाहीं ! आधीं चल बरोबर !" असें म्हणत गरुड-राज निघाला. त्याच्याबरोबर इतर सर्व निघाले. लखू, जयमल व गोमांगच्या पुढें व मागें पांचपांच पंखवाले चालत होते. ब्रह्मदंडीनें हळूच महाकायाला कांहींतरी














खूण केली. तो गर्दीतून थोडा बाजूला झाला. त्याच्या जवळ जाऊन ब्रह्मदंडी त्याच्या कानांत म्हणाला–"महाकाया ! तूं वीरचूडामणी आहेस. माझें ऐक. आपण या पक्ष्यांच्या खिल्लारांत का राहणार ? उद्यां पहाटें तूं व मी जितवर्मा आणि शक्तिवर्मा लखूला घेऊन न कळत पाय काढूं या. लखूला कोठें निसटूं दिला नाहीं तर भयानक दरींतील अलोट धनराशीची मालकी आपल्या हातीं आलीच समज. पण तो जर का पळून गेला तर फुटकी कवडीदेखील आपल्या हातीं येणार नाहीं."

"या टीचभर पोराची इतकी वाखाणणी तुझ्या तोंडून ऐकून मला तरी आश्चर्य वाटतें. माझ्या मतें याची किंमत वीस सोन्याच्या नाण्यांपवढी देखील नसेल." महाकाय म्हणाला.

"वा रे वा ! तूं तरी काय बोलतोस ? अरे तूं त्याला ओळखला नाहींस वाटतें ? तो सामान्य पोर नाहीं. त्याच्या हातावर राजयोग आहे राजयोग ! त्याच्या हातावर नागमुद्रा पाहिलीस तर तुला माझ्या म्हणण्याची साक्ष पटेल. स्वतः काळभैरवानें ती मुद्रा आपल्या हातानें कोरली आहे. त्याचा अपमान होईल असें बोललास तर !" असें म्हणत ब्रह्मदंडीनें नाटकी सोंग करून आपले कान धरले व दोन्ही हातांनीं आपल्याच गालांत मारून घेतलें.

"तो ब्रह्मपुराचा राजा होईपर्यंत तुझ्या या सर्व गप्पांवर माझा विश्वास नाहीं बसणार ! मला काय, तूं काय वाटेल तें कर. तूं दिलेलें वचन मात्र तूं विसरूं नकोस ! बजावून ठेवतों." महाकाय म्हणाला.

ब्रह्मदंडी व महाकाय यांचें हें गुप्त बोलणें व त्या पूर्वीचें सर्व बोलणें श्वानकर्णीनें नेमलेले कांहीं गुप्तहेर दगडाआड बसून



एकत्र होते. लखू व त्याचे अनुयायी गरुड राजाच्या हातीं कैद झाल्यापासूनची इत्थंभूत बातमी श्वानकर्णीकडे पोंचली होती.

लखू आपल्या अनुयायांसह आग ओकणाऱ्या सिंहाच्या गुहेंत शिरला तेव्हां श्वानकर्णी व मार्जार आपल्या अनुयायांसह तेथें वाट पहात उभे होते हें आठवतच असेल. सिंह पळून गेल्याची गोष्ट त्यांना कशीतरी कळली. दोघे आपल्या अनुयायांसह गुहेंत शिरले. श्वानकर्णीला आपली पूर्वजांची गदा सांपडली. नंतर ते लखू व गोमांग यांच्या पावलांच्या खुणा पहात पहात त्यांच्या मागून निघाले. गुहेच्या पलीकडच्या दाराजवळ जाऊन त्यानें बाहेर डोकावून पाहिलें तेव्हां त्याला महाकायाच्या पायांवर लखूनें ठेवलेली तलवार व त्यानंतरचा सर्व प्रकार दिसला. समोरचा हल्ला करून त्यांना जिंकणें अशक्य आहे हें ओळखून त्यांनीं गनिमी काव्यानें आपल्या उपकारकर्त्यांना सोडविण्याचें ठरविलें.

मार्जार व श्वानकर्णी यांचें सख्य झालें व त्यांनीं लखू व त्याच्या साथी मित्रांना सोडविण्यासाठीं आपल्या सर्वस्वाचा होम करण्याची प्रतिज्ञा केली.



श्वानकर्णीनें आपल्या अनुयायांना जवळ बोलावून सांगितलें कीं काळोख पडल्यावर तुम्ही गुहेपलीकडे जा. तेथें पंखवाल्यांचे पडलेले पंख सांपडतील ते घेऊन लावून घ्या व त्यांच्याच पैकीं तुम्ही आहां असें दाखवीत तुम्ही स्वतः गरुडराज लखू व त्याच्या साथ्यांशीं कसा व्यवहार करतो हें पहात रहा व आम्हांला कळवीत रहा."

मार्जार म्हणाला–"ठीक आहे ! मी देखील एका दोघांना त्यांच्याबरोबर पाठवून देतों. आतां आपली दोघांची मिळून ही जबाबदारी आहे.

     

थोड्या वेळानें सूर्यास्त झाला. हळू हळू काळोख पडूं लागला. श्वानकर्णी व मार्जारचे अनुयायी रांगत रांगत गुहेबाहेर निघून गेले. श्वानकर्णीनें सांगितल्याप्रमाणें त्यांनीं जमिनी-वर विखुरलेले पंख लावून घेतले. ते पंख दुपारीं झालेल्या युद्धांत गळून पडलेले होते.

वाटेंत त्यांना पाहून कोणाला संशय आला नाहीं. कोणी त्यांना अडवलें पण नाहीं. ते एकामागून एक राहुटी व झोंपड्या पहात खास ब्रह्मदंडी व महा-कायाच्या राहुटीजवळ येऊन पोंचले. मशालींच्या अंधुक उजेडांत त्या दोघांना ओळखणें त्यांना तेवढें कठीण गेलें नाहीं. येथेंच कोठें तरी जवळ लखू व त्याचे साथी असणार असें अनुमान करून ते थोडे पुढें गेले. त्यांचें अनुमान खरें निघालें. एका राहुटी समोर जितवर्मा व शक्तिवर्मा तलवारी हातांत घेऊन पाहारा देत होते. आंत लखू, जयमल व गोमांग एका चटईवर बसून आपसांत कांहींतरी बोलत होते.

श्वानकर्णीचे अनुयायी निस्संकोच पुढें गेले व म्हणाले—"दूर उभे रहा एका बाजूला! गरुडराजाची आज्ञा आहे कीं आतांच्या आतां या तिघां दुष्टांना त्यांच्यासमोर हजर करावें."

जितवर्मा व शक्तिवर्मानें मशालीच्या उजेडांत त्यांचे चेहरे लक्ष लावून पाहिले व बाजूला सरकले. इतक्यांत जितवर्माला शंका आली. "हे पंखवाल्या जातीचे दिसत नाहींत! रानटी जातीचे दिसत आहेत." तो शक्तिवर्माला म्हणाला.

"मला देखील तोच संशय आला." म्हणत तो तलवार घेऊन पुढें सरसावला व म्हणाला—"कोण तुम्ही? थांबा!"

[पुढें चालू]





# चांदोबाचें स्मित

## [२]

मुलाचें नांव बद्रबसीम असें ठेवल्यानंतर त्याचा मामा म्हणजे गुल्नारचा भाऊ सालिहा त्याला उचलून घेऊन चेंडूसारखा त्याच्याशीं खेळत घरभर हिंडूं फिरूं लागला. गुल्नार व बादशाह यांच्यासमोर धांवत येऊन पाहतां पाहतां त्यानें खिडकींतून बाहेर उडी मारली आणि समुद्रांत अदृश्य झाला.

बादशाह ओरडत होता. स्वतःला आवरूं न शकल्यामुळें तो लहान मुलासारखा रडूं लागला. गुल्नारनें त्याची अनेक प्रकारें समजूत घालण्याचा प्रयत्न केला. म्हणाली—"अगदीं भिण्याचें कारण नाहीं. आपल्या मुलाच्या जिवाला थोडा देखील अपाय होणार नाहीं. त्या मुलाला नऊ महिने आपल्या पोटांत वाढवणारी मी आई स्वतः सांगत असतां तुम्हांला भिण्याचें कारणच उरत नाहीं. माझा भाऊ आपल्या भाच्याला आपल्या राज्यांत घेऊन जाऊन सुखरूप परत घेऊन येईल. आपल्या मुलाच्या अंगाला पाण्याचा एक थेंब देखील लागणार नाहीं. तो आपला दोघांचा मुलगा आहे. तुमचें रक्त त्याच्या अंगांत खेळत आहे तसें माझें देखील खेळत आहे. मला जशी पाण्याची भीति वाटत नाहीं तशी माझ्या मुलाला देखील वाटणार नाहीं." परंतु सालिहा मुलाला सुखरूप परत घेऊन येईपर्यंत राजाच्या मनाचें समाधान झालें नाहीं. सालिहा उडी मारून भाच्याला घेऊन हंसत आंत आला. म्हणाला—"मी समुद्रांत उडी मारलेली पाहून तुम्ही घाबरून गेला होता, नाहीं का?"










"पुन्हां मुलगा दृष्टीस पडेल या गोष्टीवर माझा विश्वासच बसत नव्हता!" राजा म्हणाला.

"आतां याला पाण्याचें भय उरलें नाहीं. मी स्वदेशीं जाऊन समुद्रांत राहणाऱ्या मानवजातीला आवश्यक असे सर्व मंत्र याला देऊन टाकले आहेत. आयुष्यभर जमिनीवर किंवा पाण्यांत हा स्वेच्छेनें सुखरूप हिंडूं फिरूं शकेल. तुम्ही अगदीं बेफिकीर रहा!" सालिहा म्हणाला.

गुलनारनें आपल्या मुलाला उचलून घेतलें. सालिहानें बरोबर आणलेली एक पिशवी काढली व गालिचावर अनेक अमूल्य रत्नें ओतलीं. तीं सर्व समुद्रांतलीं दुर्मीळ अशीं रत्नें होतीं. "भाच्याला आजोळ दाखवून रिकाम्या हातानें कसें आणावयाचें म्हणून घाईघाईंत जीं रत्नें मिळालीं तींच उचलून घेऊन आलों." सालिहा म्हणाला.

तीं रत्नें पाहून तर बादशाहचे डोळेच दिपून गेले. तो म्हणाला—"गुलनार! तुझ्या भावानें आणलेल्या एकेका रत्नानें माझ्या राज्यासारखीं राज्यें विकत घेतां येतील." गुलनार खालीं मान करून स्मित करून म्हणाली—"हीं आपल्या चरणधूलीच्या समोर कांहींच नाहींत. तुम्ही माझ्यावर व आमच्या कुटुंबावर जें प्रेम दाखविलें व आमचा आदर केलात त्याच्यासमोर हीं तुच्छ रत्नें काय मोलाचीं?"

बादशाहानें आपल्या मेहुण्याला प्रेमादरपूर्वक आलिंगन करून त्याचा सत्कार केला व म्हणाला—"तुम्ही सर्वांनीं कांहीं दिवस माझ्या महालांत राहून तुमच्या सहवासांत आनंदानें राहण्याचें भाग्य मला द्यावें."

सालिहा म्हणाला—"आपल्या शब्दानेंच आम्हांला किती मान मिळाला आहे. पाण्यांत राहण्याची आम्हांला संवय आहे. पाण्याबाहेर फार दिवस राहाल्यानें आम्हांला त्रास होण्याचा संभव आहे. तेव्हां आम्हांला निरोप द्यावा. आम्ही पुन्हां केव्हां तरी येऊं आपणांला भेटायला."

"तुमच्या देशांत यावें असें मला किती वाटतें! पण तें मला शक्य नाहीं." बादशाह म्हणाला. त्यानंतर गुलनारची आई, भाऊ व इतर मंडळी निरोप घेऊन पाण्यांत उतरलीं व अदृश्य झालीं.

बद्रबसीमला चवथें वर्ष लागलें. तोंपर्यंत त्याला अंगावरचेंच दूध होतें. म्हणून







समुद्रांत राहणाऱ्या मनुष्यजातीचे गुण त्याला आईच्या दुधांतूनच सहजीं मिळूं शकले. बादशाहानें त्याच्या शिक्षणाची उत्तम व्यवस्था करून दिली. त्याला पंधरावें वर्ष लागलें तोंपर्यंत शरीर सौष्ठवाबरोबर विद्या, अश्वारोहण व इतर कलेंत तो पारंगत झाला.

उतारवय येत गेलें तसें मुलाचा राज्याभिषेक करून मोकळें व्हावें असें बादशाहाला वाटूं लागलें. तो मुलाला घेऊन दरबारांत गेला आणि त्यानें त्याचा राज्याभिषेक करून टाकला. त्याच्या डोक्यावर राजमुकुट ठेवून तो स्वतः एका बाजूला उभा राहिला.

बद्रबसीमनें त्या दिवशीं स्वतः दरबाराचें सर्व काम पाहिलें. त्याची कर्तबगारी पाहून सर्व दरबारी चकित झाले. संध्याकाळीं तो आपल्या वडिलांबरोबर आईला भेटायला गेला. मुलाच्या डोक्यावर राजमुकट पाहून आईच्या डोळ्यांतून आनंदाचीं आंसवें आलीं.

एक वर्ष आनंदानें लोटलें. बादशाहानें अंथरुण धरलें आणि एका आठवड्याच्या आंत आपल्या बायकोला व आईला दुःखसागरांत लोटून तो परलोकीं निघून गेला.

एक महिनाभर राज्यांत शोककळा होती. त्यानंतर बादशाहाच्या कबरीवर एक स्मारक उभारण्याचें ठरलें.

गुलनारच्या माहेरची मंडळी गुलनारला भेटायला आलीं. बादशाहाचें प्राणोत्क्रमण एकाएकीं झाल्यामुळें त्यावेळीं हजर राहूं न शकल्याबद्दल त्यांना फार फार वाईट वाटलें.

बद्रबसीम स्वतः राज्यकारभार पाहूं लागला. तो नियमितपणें दरबारांत जाई व आपल्या वजीरांच्या सल्ल्याप्रमाणें राज्यकारभार पाही. आणखी एक वर्ष लोटलें.

एकदां सालिहा बहिणीला व भाच्याला भेटण्यासाठीं आपल्या समुद्रांतल्या राज्यांतून आला. बद्रबसीम पलंगावर झोंपलेला होता.



भावाबहिणींचें बराच वेळ बोलणें चालू होतें. सालिहा आपल्या भाच्याच्या गुणांचें वर्णन करीत होता. स्वतःची प्रशंसा चालू असतां आपण ती ऐकत आहों हें बोलणाराला कळूं नये म्हणून तो डोळे घट्ट मिटून अंथरुणावर पडून होता.

सालिहानें आपल्या भाच्याच्या लग्नाची गोष्ट आपल्या बहिणीजवळ काढली. म्हणाला—"तुझा मुलगा आतां वयांत आला आहे. वेळेवर त्याचें लग्न करून दिलेलें बरें. समुद्री राज्यांतल्याच एखाद्या राजकन्येशीं त्याचें लग्न करून द्यावें अशी माझी सूचना आहे."

"तूं अगदीं माझ्या मनांतली गोष्ट बोललास बघ. मुलाचें लग्न व्हावें याहून जास्त आनंदाची गोष्ट आणखी काय असणार? नातवाचें तोंड पाहलें कीं मनाचें समाधान होईल व मी आनंदानें डोळे मिटीन. पण मुलगी पाहिली आहेस का तूं?"

सालिहानें अनेक मुलींचीं नांवें सांगितलीं. गुलनारनें त्या मुलींचीं नांवें ऐकलीं नसलीं तरी त्यांच्या आई-बापांच्या विषयीं तिनें ऐकलें होतें. तिनें एकीच्या बापाविषयीं तर दुसरीच्या आईविषयीं



आपली नापसंती व्यक्त केली. एकीच्या कुळाविरुद्धच तिचें मत पडलें. एकूण सालिहानें सुचविलेल्या मुलींपैकीं एक देखील तिला पसंत पडली नाहीं.

"आपल्या मुलाकरितां चांगली मुलगी मिळावी हें तुझें म्हणणें मला कबूल आहे. बरें तर आणखी एका मुलीविषयीं तुझें मत सांग. पण तिच्याविषयीं मुलाच्या कानावर चकार शब्द जातां कामा नये." सालिहा म्हणाला.

गुलनारनें जवळ जाऊन पाहिलें. मुलगा स्वस्थ पडून होता. तो झोंपला आहे असें

       



समजून ती सालिहाला म्हणाली—"कांहीं हरकत नाहीं. बोल, काय सांगायचें आहे तें."

"हें पहा, एक राजकुमारी आहे. पण तिला सून करून घेणें अशक्य आहे. तिचा बाप प्राण गेला तरी या संबंधास कबूल होणार नाहीं. तिच्याशीं लग्न ठरेपर्यंत माझ्या भाच्याला या संबंधी कांहीं कळतां कामा नये.

"अरे हो, पण ती मुलगी कोण? तिच्या बापाचें नांव गांव कांहीं सांगशील कीं नाहीं?" गुलनारनें विचारलें.

"मुलीचें नांव जहानारा असें आहे. ती समुद्राचीच मुलगी आहे. तिच्यासारखी सुंदर या त्रिलोकांत मिळणें अशक्य. तिचा रंग, तिचे केस, तिचे डोळे नाक सर्व कांहीं कल्पनेबाहेर सुंदर आहे." सालिहा म्हणाला.

"नांवाला साजेल असेंच तिचें रूप आहे म्हण ना! तिला मी आपली सून करून घ्यायला तयार आहें." गुलनार म्हणाली.

"पण तिच्या बापानें कबूल केलें पाहिजे ना? तो एक राक्षस आहे. त्या राजकन्येला मागणी घालायला जो कोणी आला त्या सर्वांना मारहाण करून त्यानें त्यांचा अपमान केला. आपण मागणी घातली तर आपली काय गत होईल देवच जाणें. नुसता विचार मनांत आला तरी अंगावर शहारे उभे राहतात. म्हणूनच मी मागें पुढें करीत आहें!" सालिहा म्हणाला.

"असें असेल तर आपण देखील स्वस्थ बसून चालावयाचें नाहीं. कांहीं तरी खटपट केलीच पाहिजे." गुलनार म्हणाली.

त्यांचें संभाषण संपत आलें होतें. त्याच वेळीं बद्रबसीम जागा झाल्यासारखें त्यांना वाटलें. म्हणून दोघें गप्प बसलीं. परंतु त्यांना नको होतें तेंच झालें. कारण बद्रबसीमनें त्यांचें बोलणें ऐकलें होते. जहानाराला भेटण्यासाठीं त्याचें मन उतावीळ झालें. पण त्यानें मनांतली गोष्ट कोणाला सांगितली नाहीं. आईजवळ किंवा मामा-जवळ तो कांहींच बोलला नाहीं. परंतु रात्रंदिवस जहानाराचा विचारच त्याच्या मनांत घोळत असे व त्या काळजीनें तो भ्रमिष्टासारखा वागूं लागला.

एकदां पहाटे तो उठला व आपल्या मामाला जागा करून म्हणाला—"मामा,





        





समुद्रकांठीं फिरायला जावें असें वाटत आहे. तुम्ही येतां का?'' सालिहाबरोबर निघाला. दोघे समुद्रकांठीं येऊन पोंचले. बराच वेळ ते समुद्र किनाऱ्यावर वाळूंत चालत होते. परंतु बद्रबसीम मामाजवळ कांहीं एक बोलला नाहीं. सालिहानें पण त्याला कांहीं विचारलें नाहीं. बद्रबसीम एका खडकावर बसून जहानाराचें नांव घेऊन तिच्या विरहामुळें रडत एक विरगीत म्हणूं लागला.

तें गीत ऐकून सालिहा म्हणाला—"सर्व त्या अल्लाची मर्जी! म्हणजे तुझ्या आई-जवळ मी जें कांहीं बोललों तें सर्व तूं ऐकत होतास. त्या मुलीविषयीं तिच्या बापाकडे आम्हीं निरोप देखील पाठविला नाहीं व तूं आपलें हृदय तिच्या हवालीं करून मोकळा झालास? मला याबद्दलच फार वाईट वाटत आहे.''

"तिच्याशिवाय मला हें जिणें व्यर्थ वाटूं लागलें आहे.'' बद्रबसीम म्हणाला.

"तरमग चल घरीं. आपल्या आईला जाऊन सांग. समुद्रराजाकडे जाऊं या मागणी घालायला!'' सालिहा म्हणाला.

"मी आईजवळ याविषयीं कांहीं एक बोलणार नाहीं. ती या गोष्टीस कधींच कबूल होणार नाहीं. त्या समुद्रराजाचें वर्णन तुम्ही जसें केलें आहे तसें तें खरें असेल तर त्या नर राक्षसाकडे ती मला स्वतः होऊन कशी पाठवील? मला तिचा स्वभाव चांगला ठाऊक आहे.'' बद्रबसीम म्हणाला. त्यानें मामाजवळ हट्ट केला कीं समुद्रराजाकडे तावडतोब जाऊं या आणि आईला कळण्यापूर्वी परत येऊं या.

सालिहा तरी काय करणार? अल्लावर भरोसा ठेवून दोघांनीं समुद्रांत उडी मारली. सालिहानें त्याला स्वरक्षणासाठीं म्हणून एक अंगठी दिली.

सालिहा प्रथम आपल्या घरीं घेऊन गेला. नातवाला पाहून आजीला व आजोळच्या इतर मंडळींना फार आनंद झाला. आजीनें नातवाला जवळ ओढून कुरवाळून विचारलें—"बाळ, तूं एकटा आलास, आईला कां नाहीं बरोबर घेऊन आलास? तिची तब्येत वगैरे ठीक आहे ना?''

"तिनें सर्वांना सलाम सांगितला आहे आजी!'' बद्रबसीमनें एक थाप मारली.

बद्रबसीमला राजवाडा दाखविण्यासाठीं त्याची मावशी व इतर स्त्रिया निघून गेल्यावर सालिहानें घडलेलें वृत्त वर्णन करून आईला सांगितलें.

आई त्याला खूप रागावली. म्हणाली—"तूं या गोष्टीस कबूल कसा झालास? अत्याचारी समुद्रराजाचा स्वभाव तुला माहीत नाहीं का? तुम्ही दोघें तो झोंपला होता तेथें बोलत कसे बसलात हेंच मुळीं मला कळत नाहीं. एवढे मोठे झालांत पण साध्या गोष्टी तुम्हांला कळूं नयेत म्हणजे आश्चर्य आहे.''

"तूं म्हणतेस तें सर्व खरें आहे, आई! पण जें झालें त्या विषयीं राग काढीत बसण्यांत काय अर्थ आहे? पुढें काय करावें



हें सांग! समुद्रराजाला मुलगा नापसंत पडण्याचें काय कारण आहे, सांग! रूपानें तुझा नातू त्या मुलीला योग्य आहे कीं नाहीं? त्याचें कुळगोत पण थोर आहे. तो स्वतः एका साम्राज्याचा अधिकारी आहे. मी समुद्रराजाला हा संबंध त्यानें कबूल करावा अशी त्याची समजूत खात्रीनें घालूं शकेन. मीच आपल्या भाच्याच्या वतीनें मागणी घालायला जाणार आहें. कांहीं मारहाण झालीच तर ती मलाच सहन करावी लागेल व मला चुकी केल्याबद्दल शिक्षापण मिळेल.'' सालिहा म्हणाला.

त्यानें दोन मोठमोठ्या पिशव्या रत्नांनीं भरून त्या गुलामांच्या खांद्यावर टाकल्या व समुद्रमार्गें समुद्रराजाच्या महालाकडे निघाला.

महालांत पोंचल्यावर त्यानें समुद्र-राजाकडे राजाच्या भेटीसाठीं आलों आहें असें सांगून पाठविलें. आंत येण्यास त्याला लौकच परवानगी मिळाली. समुद्रराज एका रत्नखचित सिंहासनावर बसलेला होता. त्याला पाहून सालिहानें लवून मुजरा केला. तो जीं रत्नें बरोबर घेऊन आला होता तीं त्यानें राजासमोर भेट म्हणून ओतलीं.



"बस, सालिहा! तुला भेटून कित्येक वर्षें झालीं. एकाएकीं मला भेटायला येण्याचें काय कारण झालें? नजराणा घेऊन येणारे उगाच येत नसतात हें मी ओळखतों. मला तुझें काम करतां आलें तर मी अवश्य करीन." समुद्रराज म्हणाला.

सालिहा पुन्हां मुजरा करून म्हणाला— "मी एका कामासाठीं आलों आहें हें खरें आहे. तें काम अल्लाची कृपा असेल व आपली पण कृपा असेल तर खात्रीनें पुरें होईल. आपलें शौर्य, पराक्रम व कीर्ति या समुद्र लोकांत पसरलेली आहे."

"सालिहा! तूं कोणत्या कामासाठीं आला आहेस हें सांग! मला करतां आलें तर करीन." समुद्रराज म्हणाला.

सालिहानें या खेपेस आणखी जास्त लवून मुजरा केला आणि म्हणाला— "हें काम तुमच्याशिवाय इतर कोणा-च्याही हातून होणारें नाहीं. मी आपल्या भाच्याच्या वतीनें राजकन्येला मागणी घालण्यासाठीं आलों आहें. तो बादशाह शारिमान याचा मुलगा आहे व खुरासान-पर्यंत पसरलेल्या इराण साम्राज्याचा अधिपति आहे."







तें ऐकून समुद्रराज खदखदां हंसूं लागला.

कांहीं वेळ हंसत राहून तो गंभीर मुद्रा करून सालिहाकडे पहात बसला व पुन्हां जोरजोरानें हंसूं लागला. कष्टानें हंसूं आवरून तो म्हणाला—"सालिहा! अरे मी तुला इतके दिवस शाहाणा व बुद्धिवान समजत होतों. पण ती माझी चूक होती हें मला आतां कळलें. या खुळेपणाचा कांहीं अर्थ?"

"मी एक गोष्ट सांगितल्याशिवाय राहूं शकत नाहीं. बद्रबसीम रूपानें, गुणांनीं व ऐश्वर्यानें अद्वितीय आहे. त्याचें कूळ म्हणाल तर तें तुमच्या कुळाशीं संबंध जोडण्यालायक खात्रीनेंच उच्च आहे. राजकन्येचें लग्न अशा सुयोग्य राजपुत्राशीं झालें नाहीं तर याच्याहून योग्य वर तिला कोठून मिळणार? म्हणतात कीं स्त्रीच्या भाग्यांत लग्न तरी असतें किंवा मृत्यू! आपल्या मुलीला मरणापासून वांचविण्यासाठींच मी हा उपाय आपणांस सांगितला आहे. ही संधी हातची घालवून बसूं नये अशी माझी विनंति आहे."

समुद्रराजाला सालिहाचें तें बोलणें ऐकून अर्थातच मनस्वी राग आला. म्हणाला—"कुत्र्या! माझ्या मुलीच्या लग्नाची गोष्ट काढतोस? कोण आहे तुझा भाचा? त्याचा बाप कोण? कुत्र्याची जात? घेऊन ये त्याला समोर! उभा चिरून काढीन! माझी बरोबरी करायला येतो आहे का?"

समुद्रराजाचे नोकर सालिहाला धरण्यासाठीं धांवले. परंतु तो त्यांच्या हातांतून निसटला आणि विद्युत् वेगानें दिंडीदरवाज्यांतून बाहेर निसटून पळून गेला.

[पुढील अंकीं संपूर्ण]





## करावें तसें भरावें

एका गांवीं दोन गरीब म्हाताऱ्या स्त्रिया होत्या. त्या शेजारींच पण निरनिराळ्या घरांत रहात. दोघी एकट्याच होत्या. कोणी नातेवाईक नाहीं. कोणी कांहीं देईल त्यावरच त्यांचा उदर निर्वाह चाले. परंतु दोघींच्या स्वभावांत मात्र फार अंतर होतें. एक स्वभावानें उदार होती तर दुसरी घोर स्वार्थी.

जवळच एक बौद्ध विहार होता. त्यांत राहणारे भिक्षु धर्मोपदेश करीत व गोरगरिबांची सेवाशुश्रूषा करीत. म्हणून त्या मठांत नित्य अनाथ व पंगु येत.

एकदां रात्रीं सोसाट्याचा वारा सुरू झाला व त्या मागोमाग पाऊस पडूं लागला. त्या दोघां गरीब बायकांपैकीं स्वार्थी बाई नुकतीच जेवायला बसली होती कीं कोणीतरी येऊन दारावर थाप दिली. तिनें विचार केला पावसांत कोणीतरी सांपडला असावा व रात्रीं रहायला आला असावा. आज नाहीं जेवलें म्हणून काय झालें? आजचें उद्यां खाऊं. त्याला देखील जेवायला वाढलें तर दोघांचीं पोटें भरणार नाहींत. असा विचार करून तिनें सर्व भांडीं झांकून ठेवलीं आणि येऊन दार उघडलें.

एका बौद्ध भिक्षूला पाहून तिला आश्चर्य वाटलें. त्याच्या डोक्यावर कांबळें होतें म्हणून त्याचें तोंड तिला दिसलें नाहीं. "बाई! तुम्ही जेवायला बसला होतां वाटतें. उगीच त्रास दिला तुम्हांला!" भिक्षू म्हणाला.

तें उत्तर ऐकून ती चकितच झाली. ह्याला कसें काय कळलें बुवा? म्हणून वरकरणी औदार्य दाखवून म्हणाली—"तसें



नाहीं ! या ना आंत ! माझ्या घरची मीठभाकर खाऊन पाणी प्या !"

भिक्षु म्हणाला—" बाई, माझें जेवण झालें आहें." ती चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागली. मग हा आपल्या घरीं या पावसांत कशाला बरें आला असावा ! त्या भिक्षूला तिनें त्या गांवांत किंवा त्या विहारांत पूर्वी कधीं पाहिलें देखील नव्हतें. तिनें भीत-भीतच विचारलें—" काय हवें आपणांला ? कशाला आलां आहां गरिबांकडे ?"

" बाहेर थंड वारा सुटला आहे व पाऊस मी म्हणतो आहे, हें तुला दिसतेंच आहें. श्रीमंतांना काय कमी आहे ? लोकरीचे कपडे व पांघरुणें हवीं तितकीं आहेत त्यांच्याकडे. गरिबांचाच कोणी वाली नाहीं." भिक्षु म्हणाला.

" बरोबर आहे आपलें म्हणणें. दयाळु लोकांनीं अशा वेळीं मदत केली नाहीं तर बिचाऱ्या गरिबांची का दशा होईल तें त्या देवालाच माहीत !" ती बाई म्हणाली.

" त्याच हेतूनें मी तुमच्याकडे आलों आहें. या पावसांत !" भिक्षु म्हणाला.

" तुम्ही खरोखरच पुण्यात्मा आहांत !" बाई म्हणाली.

" दान करणारीं माणसेंच खरोखरी थोर पुण्यात्मा म्हणावयाचीं. पुण्य संपादन करण्याची तुला देखील संधी मिळत आहे पहा. तुझ्याहून जास्त दुःखी जो कोणी असेल त्याला मदत करणें तुझें कर्तव्य आहे. दोघी अनाथ बायका पावसांत भिजून थंडीनें कुडकुडत आमच्या मठांत आल्या आहेत. वीज पडून त्यांचें बिचाऱ्यांचें घर जळून गेलें आणि आश्रयासाठीं त्यांना आमच्या मठांत यावें लागलें. पण मठांत त्यांना द्यायला अंथरूण-पांघरूण कांहीं नाहीं. म्हणून मी तुझ्याकडे धांवत आलों आहें. उद्यां सकाळीं परत पोंचतें करून जाईन." भिक्षु म्हणाला.

त्या बाईला भिक्षूचा राग आला. पण तो लपवून ती म्हणाली—" मी स्वतःच एक अनाथ, माझ्याकडे कोठून येणार अंथरूण पांघरूण ?"

" एखादें घोंगडेंदेखील नाहीं का तुझ्याकडे ?" बौद्ध-भिक्षूनें विचारलें.

त्या बाईनें ओळखलें. आज एका श्रीमंताच्या घरीं लग्न झालें तेव्हां त्यानें गरिबांना कांबळीं वांटली होतीं. मला मिळालेलें कांबळें या भिक्षूनें पाहिलेलें दिसतें आहे. त्यावरच स्वारीचा डोळा दिसतो आहे. काय वाटेल तें झालें तरी तें कांबळें कांहीं मी देणार नाहीं. जुनी एखादी चादर असली तर काढून द्यावी असा विचार करून ती घरांत गेली. दोनतीन चादरी होत्या. पण त्या चांगल्या होत्या. त्यांचा मोह सुटेना. या दिल्या तर पुन्हां परत येतील कीं नाहीं कोण जाणें. म्हणून तिनें एक जुनें तरटाचें कापड होतें तें काढलें. पण तें देखील तसें जास्त फाटलेलें नव्हतें.

तरी दारासमोर आलेल्या बौद्धभिक्षूला रिकाम्या हातांनीं परत कसें पाठवायचें असा



विचार करून तें तरट देत ती म्हणाली—" बिछाना म्हणून मी हेंच वापरतें आहें. मला संधीवात आहे. पण काय करायचें ? गरिबाची फिकीर गरिबांनीं नाहीं करायची तर कोण करणार ?"

" त्या दोघी देखील तुझ्याच सारख्या म्हाताऱ्या व गरीब आहेत बाई ! त्यांचें घरदार सर्व वीज पडल्यामुळें जळून गेलें आणि दोघी उघड्यावर पडल्या आहेत." भिक्षू तें तरट घेत म्हणाला. " आणखी कांहीं नाहीं का बाई तुमच्याकडे ?" त्यानें पुढें विचारलें. तिनें शपथ घेऊन

कांहीं नसल्याचें सांगितलें तेव्हां बौद्ध भिक्षू निघून गेला.

भिक्षु दुसऱ्या अनाथ म्हातारीकडे गेला व तेंच म्हणाला. त्या म्हातारीनें सर्व ऐकून घेतलें आणि तिला जें घोंगडें लग्न घरचें दान म्हणून मिळालें होतें, तें आणि एक अंथरूण व पांघरूण तिनें आणून दिलें. आणखी कांहीं हवें आहे का म्हणून देखील तिनें बौद्धभिक्षूला विचारलें.

"हें पुरें, आणखी कांहीं नको" असें सांगत म्हातारीला झोंपण्यासाठीं पुरेंसें अंथरूण पांघरूण सोडून बाकी सर्व बौद्ध-भिक्षु उचलून घेऊन गेला.

तो निघून गेल्यावर पावसाला व वाऱ्याला जास्तच जोर चढला. एक मोठा कडकडाट झाला आणि वीज नेमकी त्या दोघी अनाथ स्त्रियांच्या झोंपडीवरच पडली. छपराला आग लागली. दोघी बायका उघड्या पडल्या व स्वतःचा बचाव करण्यासाठीं पावसांत पळूं लागल्या. वाटेंत त्यांना तो बौद्धभिक्षु भेटला. तो दोघींना म्हणाला—"चला, आमच्या मठांत! रात्रभर रहा तिथें! उजाडल्यावर पाहूं काय करायचें तें."

दोघी बौद्ध विहारांत पोंचल्या. बौद्ध-भिक्षु म्हणाला. तुम्हीं जें कांहीं दिलें होतें तें बौद्ध विहारांत ठेवलें आहे. तें आतां तुमच्याच उपयोगी पडेल. घ्या तुम्हीं जें कांहीं दिलें आहे तें."

"पण दोघी पावसांत भिजत आल्या त्यांना मग काय देणार?" दुसऱ्या उदार स्त्रीनें विचारलें.

"त्या दोघी अनाथ स्त्रिया दुसऱ्या कोणी नसून तुम्हीच आहांत." असें म्हणत बौद्ध-भिक्षु अंतर्धान पावला.



P. C. REDDY













## दगडाची प्रतिमा

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. नेहमीं-प्रमाणें तो झाडाजवळ गेला, त्यावरचें प्रेत काढलें व तें खांद्यावर टाकून स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुला पाहून मला त्या श्रीधराची गोष्ट आठवते. त्याला येत असलेली कलाच त्याचा घात होण्यास कारण झाली. तुला कंटाळा येऊं नये म्हणून त्याची गोष्ट सांगतों ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली

अमरावती नगरींत नयसागर नांवाचा मंत्री राज्यकारभार पहात असे. त्याचें त्याच्या नातेवाइकांवर फार प्रेम असे. त्यानें सर्वांना राज्यांत लहान थोर नोकऱ्या दिल्या. नोकरी करण्याची देखील ज्यांना लायकी नव्हती त्यांना आपल्या घरींच त्यानें ठेवून घेतलें व त्यांच्यासाठीं कामाची कांहींतरी

**वेताळाच्या गोष्टी**

व्यवस्था करून दिली. श्रीधर असाच एक त्याचा नातेवाईक होता. तो रूपवान होता व हुशार पण होता. परंतु त्यानें विद्या किंवा कला कांहींच संपादन केलेली नव्हती. श्रीधरचें चित्त तिकडे मुळींच नव्हतें. म्हणून मंत्र्यानें बागेंत काम करणाऱ्या मजुरांवर नजर ठेवण्याचें काम त्याला दिलें. परंतु श्रीधर तें काम सोडून कोठें डोंगरांत किंवा नदीकाठीं नैसर्गिक सौंदर्य पहात बसे.

मंत्र्याच्या नजरेस आणखी एक गोष्ट आली. त्याला वत्सला नांवाची एकुलती एक मुलगी होती. श्रीधर लहानपणापासून घरांतच वाढल्यामुळें दोघांचें परस्परांवर प्रेम वाढत गेलें. ही गोष्ट लहानपणीं ठीक होती. परंतु मोठेपणीं मंत्र्याला ती आवडली नाहीं. म्हणून त्यानें आपल्या मुलीला बोलावून समजाऊन सांगितलें. म्हणाला—"बाळ! आतां तूं मोठी झालीस. श्रीधर-बरोबर हिंडणेंफिरणें व गप्पा मारणें बरोबर दिसत नाहीं. इतर मुलांबरोबर देखील तूं हिंडणें फिरणें सोडून दे." मुलगी म्हणाली—"बाबा! श्रीधर फार चांगल्या चांगल्या गोष्टी सांगतो. दिवस केव्हां निघून गेला हें कळत देखील नाहीं."



"तूं त्याच्याजवळ बोलूं नयेस किंवा हिंडूं फिरूं नयेस हें मी कां सांगत आहें ह्या गोष्टीचा तूं थोडा विचार केलास तर तुलाच माझ्या म्हणण्याचा अर्थ कळेल." मंत्री आपल्या मुलीला म्हणाला.

परंतु मुलीच्या मनावर त्यानें अपेक्षिल्या-प्रमाणें परिणाम न झालेला पाहून श्रीधरलाच दूर पाठवून द्यायचें मंत्र्यानें मनाशीं ठरविलें. त्यानें त्याला एकदां बोलावून हिताच्या चार गोष्टी सांगितल्या व म्हणाला—"श्रीधर! आजपर्यंत मी तुला स्वतःच्या मुलासारखें लहानाचें मोठें केलें. परंतु

     



वडाच्या झाडाच्या सांवलींत जशीं इतर झाडें वादत नाहींत, तसें तुला आतां स्वतःच्या पायांवर उभें राहालें पाहिजे. तुला स्वतःच्या पायांवर उभें राहतां यावें यासाठीं मी सुरवातीला थोडी मदत करीन. मी तुला वर्षं दोन वर्षं पुरेल एवढें धन देतों, तूं स्वतः कांहीं कामधंदा शीक व स्वतःच्या पायावर उभा रहा! चांगला नांवलौकिक मिळवून तूं परत आलास तर मला आनंदच होईल."

निघण्यापूर्वीं तो वत्सलेला भेटला आणि म्हणाला—"तुझे वडील मला उनाड व कुचकामाचा म्हणत आहेत. म्हणून त्यांनीं मला निघून जायला सांगितलें आहे. मी आतां परदेशीं जात आहें." वत्सलेला फार वाईट वाटलें. पण ती काय करणार. ती टिपें गाळीत घरांत निघून गेली.

श्रीधर एका गांवीं गेला. त्या गांवांत एक कारागीर रहात असे. दगडाच्या मूर्ती व प्रतिमा करण्याचेंच तो काम करी. आणखी एक कारागीर मातीच्या मूर्ती करी व त्या भाजून व त्यावर मुलामा चढवून तो त्या विकी. आणखी तिसरा एक कारागीर लाकडी मूर्ती करून विकी. त्याच गांवीं राहण्याचें त्यानें ठरविलें. तो त्या कारागिरांच्याकडे जाई व तासन् तास त्यांचें काम पहात बसे. दगडी मूर्ती करणाऱ्या कारागिराशीं त्याची फारच मैत्री जमली. तो त्याच्याशीं बराच वेळ बोलत बसे. रात्रीं संगमरमरी दगडाचे तुकडे घेऊन आपल्या घरीं जाई आणि घरीं जाऊन त्यांच्या मूर्ती करण्याचा प्रयत्न करी.

त्यानें कोणाला गुरु मानून त्याच्याकडे शिष्य म्हणून राहण्याऐवजीं स्वतःच्याच प्रयत्नानें व बुद्धीनें येईल तें करण्याचें मनाशीं ठरविलें. तो स्वतःच त्याचा गुरु होता. त्याच्या प्रयत्नामुळें त्याला ती शिल्प-विद्या आली. पण त्यानें पशुपक्ष्यांपासून ते देवीदेवतांपर्यंत सर्वांच्या मूर्ती घडवल्या. काळवत्री दगडाच्या मूर्ती देखील जिवंत मूर्ती वाटत. असें नैपुण्य होतें त्याच्या हातांत. परंतु त्याला संगमरमरी दगडाच्या मूर्ती व पुतळे करण्यांतच जास्त आनंद वाटे. संगमरमरी दगडाची वाटेल ती मूर्ती आपल्याला करतां येईल असा आत्मविश्वास वाढल्यावर त्यानें एक मोठा संगमरमरी दगड आणला व त्या दगडाचा एक सुंदर पुतळा केला. तो एका स्त्रीचा होता. तो त्या







मूर्तीजवळ बसून काम करूं लागला कीं वाटे कीं तो त्या स्त्रीशीं गुजगोष्टी करीत आहे आणि ती प्रेमानें व कौतुकानें जणुं कांहीं ऐकते आहे. ती वत्सलेचीच मूर्त होती. तो तिला गोष्टी सांगे त्यावेळीं ती जशी ऐकत बसे तिचें तेंच रूप त्याच्या हृदयांत सतत वसत असे व तेंच त्या मूर्तीत उतरलें होतें. आपल्या त्या स्वतःच्या कृतीबद्दल त्याच्या मनाचें समाधान झालें होतें. त्या पूर्वी त्यानें स्वतः घडवलेल्या किंवा इतर मूर्तिकारांनीं घडवलेल्या एकाहि मूर्तींत तो जिवंतपणा त्याला आढळला नाहीं. त्याच्या कलेंत दोष काढण्याची कोणाची छाती नाहीं असा आत्मविश्वास वाटल्यावर त्यानें अमरावतीला जाण्याचें आपल्या मनाशीं ठरविलें व एक दिवस ती मूर्ति घेऊन तो अमरावतीला गेला.

श्रीधर परत आलेला पाहून सर्वांत अधिक आनंद कोणाला झाला असेल तर तो स्वतः मंत्र्यालाच. कारण त्यानें हट्टानें व थोडा दुराग्रह करून श्रीधरला परदेशीं पाठविलें होतें. श्रीधर परत आला व बरोबर एक सुंदर मूर्तीपण घेऊन आला होता. ती मूर्त त्यानें स्वतः घडवली होती यावर मंत्र्याचा विश्वासच बसत नव्हता. परंतु स्वतःच्या मुलीचीच ती मूर्त असल्यामुळें त्याला विश्वास करावा लागला. दुसरा कारागीर तिला समोर बसवूनच तशी मूर्त घडवूं शकला असता. प्रत्येक जण म्हणे हुबेहूब वत्सलाच आहे.

त्याच वेळीं राजकन्येचा विवाह ठरला व सुमुहूर्तावर झाला देखील. वत्सला तिची मैत्रीण होती. तिची मूर्तच श्रीधरनें लग्नाचा-उपहार म्हणून तिला दिली. राजकन्येला फारच आनंद झाला. ती मूर्त स्वतः श्रीधरनेंच घडवली असलेल्याचें ऐकून तिनें त्याच्या



कलेची फार स्तुति केली. श्रीधरची कीर्ति राजवाड्यांत सर्वत्र गाजली.

तरी श्रीधरचें लग्न वत्सलेशीं होण्याचीं लक्षणें दिसत नव्हती. कारण तो किती मोठा कारागीर असला म्हणून काय झालें. कारागिराशीं का मंत्री आपल्या मुलीचें लग्न करून देणार? मंत्र्याला तो ठराव पसंत नव्हता व त्यानें साफ नकार दिला.

वत्सला तें ऐकून निराश झाली. मागे श्रीधर निघून गेल्यावर तिला त्याचा वियोग असह्य झाला होता. मध्यंतरी त्याची भेट झाली व तिच्या मनाचें थोडें समाधान झालें. त्यानें तिचा पुतळा इतका सुंदर घडवला होता कीं त्यामुळें तिच्या मनांत त्याचा आदर ज्यास्तच वाढला व त्याच्या शिवाय दुसऱ्या कोणाशीं लग्न करावयाचें नाहीं असें तिनें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें. आतां दोघांची भेट उघडपणें होणें अशक्य होतें. म्हणून दोघांनीं अपरात्रीं पळून जाण्याचें ठरविलें. मंत्र्याला त्या गोष्टीचा संशय होताच म्हणून त्यानें वत्सलेवर कडक नजर ठेवण्यासाठीं आपल्या एका विश्वासू व म्हाताऱ्या नोकराला त्या कामावर नेमलें.



वत्सला श्रीधरबरोबर रात्रीं निघाली तेव्हां म्हातारा पाहाऱ्यावर उभा होता. त्यानें वत्सलेला पुष्कळ समजाऊन सांगितलें कीं असें केल्यानें वडिलांची मान खालीं होईल. माझ्या जिवंत जीव असेपर्यंत मी तुला जाऊं देणार नाहीं. तेव्हां श्रीधरनें त्याला बाजूला सारण्यासाठीं सहज धक्का दिला. म्हातारा एकदम मटकन खालीं बसला आणि डोळे फिरवले.

श्रीधर व वत्सलेनें एवढी घाई केली त्याचें मुख्य कारण असें होतें कीं तिच्या वडिलांनीं वत्सलेचें लग्न एका राजकुमाराशीं ठरविलें होतें व चारच दिवसांनीं



मुहूर्तपण ठरला होता. तेव्हां ही संधी हातची गेली असती तर आयुष्यभर दोघांना दुःखी व्हावें लागलें असतें.

दोघं परदेशांत येऊन पोंचलीं. सुरवातीला वत्सलेच्या अंगावरचे दागिने विकून त्यांनीं आपला उदरनिर्वाह चालविला. पण श्रीधर म्हणाला—"मला एक कला अवगत असतां तुझे दागिने विकून उदरनिर्वाह करणें बरोबर नाहीं. याशिवाय हे दागिने किती दिवस पुरणार?" त्यानंतर त्यानें मूर्ती व पुतळे करून विकायला सुरवात केली व दोघं सुखानें राहूं लागलीं.

तिकडे अमरावतीभर वत्सला श्रीधर बरोबर पळून गेल्याची बातमी पसरली. त्यांत म्हातारा पाहरेकरी मेलेला दिसला. त्याच्या खुनाचा आरोप श्रीधरवर लावण्यांत आला. ती बातमी ऐकून श्रीधर वत्सलेला बरोबर घेऊन सदूर दक्षिणेकडील देशांत निघून गेला. त्यावेळीं वत्सला गरोदर होती. तीन महिन्यांनीं दोघं एका नगरींत पोंचलीं.

त्या देशांत संगमरमर दगड मिळत नसे. परंतु जो दगड मिळे तोच वापरून त्यानें उत्तमोत्तम मूर्ती घडवल्या व मोठी कीर्ति संपादन केली.

वत्सलेला मुलगा झाला. आतां दोघांच्या सुखांत जास्तचभर पडली. मुलाचें कोड-कौतुक करण्यांत दोघं रमून गेलीं. एकदां श्रीधरला कोठें संगमरमर दगड सांपडला तो दगड आणून त्यानें वत्सला व तिच्या मुलाची एक प्रतिमा घडवली. पार्वतीच्या मांडीवर गणपति शोभावा अशी मातृवात्सल्याची ती एक अद्वितीय प्रतिमा झाली. वत्सलेला त्यानें ती प्रतिमा दाखविली तेव्हां तिला अपार आनंद झालाच, त्याबरोबर तिला भय देखील वाटूं लागलें. ही मूर्त पाहून श्रीधरला लोक ओळखतील व त्यानंतर त्याच्यावर येणाऱ्या संकटाची तिला कल्पनाच करवेना. म्हणून तिनें ती प्रतिमा माळ्यावर उचलून ठेवून दिली.

एकदां एक मनुष्य तीर्थयात्रेला म्हणून उत्तरेकडून आला व तो श्रीधरची कीर्ति ऐकून त्याची मूर्तिकला पाहण्यासाठीं आला. त्यानें श्रीधरकडे असलेल्या सर्व मूर्ति विकत घेतल्या व म्हणाला—"या मूर्ती मी विकत घेतल्या खऱ्या, पण माझ्या मनाचें समाधान झालें नाहीं. कांहीं तरी नवीन व अप्रतिम असें घेऊन जावें या हेतूनें मी तुमच्याकडे आलों होतों."

श्रीधरनें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं व मातृवात्सल्याची ती प्रतिमा माळ्यावरून काढून घेऊन आला.

ती प्रतिमा पाहून त्यानें किंमत विचारली. श्रीधर म्हणाला—"ही प्रतिमा मला विका-वयाची नाहीं."

तें उत्तर ऐकून तो मनुष्य निघून गेला आणि तासा दोन तासांनीं कांहीं सैनिकांना बरोबर घेऊन आला. "हाच तो खुनी श्रीधर. धरा याला!" त्यानें हुकूम केला व म्हणाला—"मी तुला ओळखलें नाहीं. पण मंत्र्याच्या मुलीचें रूप ओळखलें."



"ठीक आहे. तुमच्याबरोबर यायला मी तयार आहें. मी सामान वगैरे बांधून बायकोला घेऊन येतों." असें सांगून श्रीधर घरांत गेला आणि बायकोचा व मुलाचा कायमचा निरोप घेऊन तो मागल्या दारानें पळून गेला. त्यानंतर तो कोठें गेला हें कळलें नाहीं.

वत्सला आपल्या मुलाला घेऊन आपल्या वडिलांकडे गेली. श्रीधरनें बनवलेली ती मातृवात्सल्याची प्रतिमा दिवाणखान्यांतच होती. सर्व ती मूर्त पाहून ती घडवणाऱ्या मूर्तिकाराची स्तुति करीत. मंत्री म्हणे, "ही माझ्या जांवयाच्या हातची कलाकृति आहे."

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"पण माझ्या मनांत एक संशय राहून गेला आहे. ती प्रतिमा श्रीधरनें तशीच लपवून ठेवली असती तर काय बिघडलें असतें. त्यानें स्वतःच्या हातानें स्वतःवर हें संकट नाहीं का ओढवून घेतलें? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून दिलें नाहींस तर परिणाम तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

"मनुष्य फक्त शारीरिक सुखाचाच भुकेला नसतो. स्वतःच्या प्रतिमेचा त्याला अभिमान असतो व तिच्या रक्षणासाठीं तो स्वतःच्या सुख सर्वस्वावर पाणी सोडायला तयार असतो. श्रीधरनें तेंच केलें." विक्रमार्क म्हणाला.

अशा प्रकारें त्याचें मौनभंग होतांच वेताळ शवाबरोबर अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.

[ कल्पित ]






## साधु आनु साळा

दोघे मित्र होते. एकाच गांवचे राहणारे. त्यांत एक होता अगदीं साधू व गरीब तर दुसरा लबाड आणि वस्ताद. गरीब माणसाजवळ चार पैसे होते. पण लबाड माणसाजवळ एक पैदेखील नव्हती.

लबाड म्हणाला—"मित्रा! आपण दोघांनीं एकदम पैसे खर्च करून टाकले तर पैसे कांहीं पुरणार नाहींत. माझ्या मतें तूं पहिल्यानें खर्च कर, मग मी करीन.' तो गरीब भोळा मित्र त्या गोष्टीस कबूल झाला.

थोड्या दिवसांनीं भोळ्या मित्राजवळ जितके पैसे होते ते सर्व खर्च होऊन गेले. तेव्हां लबाड मनुष्य म्हणाला—"चल, आपण दोघे त्या झाडाखालीं मी पैसे पुरून ठेवले आहेत ते घेऊन येऊं." दोघे त्या झाडाजवळ गेले. त्यांनीं एक दगड बाजूला केला आणि खणूं लागले. पण पैसे तेथें ठेवले असतील तर ना मिळणार? भोळ्या मित्राला खरें वाटावें म्हणून लबाड मित्र पैसे मिळाले नाहींत असें दर्शविण्यासाठीं मोठमोठ्यानें रडूं पण लागला.

भोळा मित्र म्हणाला—"मित्रा! कशाला रडतोस? अरे! आपण पैसे होते तेव्हां परस्परांच्या सुखाचे वांटेकरी होतों तसे आतां दुःखांत वांटेकरी होऊं!"

सुदैवानें त्यांना लगेच एक काम पण मिळालें. एका चढणीच्या जागीं एक गाडी पडली होती. एक श्रीमंत मनुष्य पेटी उचलायला कोणी मनुष्य मिळतो का वाट पहात उभा होता. या दोघांना पाहून त्यानें विचारलें—"उचलता का रे ही पेटी? ही पेटी डोंगरापलीकडच्या गांवीं पोंचती



करावयाची आहे. ही थोडी चढण आहे. पलीकडे सगळी उतरणच! प्रत्येकाला एकेक रुपया देईन."

लबाड मित्रानें खूण केली, चला उचलूं या पेटी! दोघांनीं पेटी डोक्यावर उचलून घेतली. लबाड म्हणाला—"हें पहा चढण आहे ना म्हणून मी पुढें होतों, उतरण लागली कीं तूं पुढें हो! चढायला थोडें कठीण जातें म्हणून मी पुढें होतो!"

भोळ्या मित्राला त्यांतला खरा हेतू कळला नाहीं व तो त्या गोष्टीस कबूल झाला. चढतांना मागच्या माणसावर व उतरतांना पुढल्या माणसावर अधिक ओझें पडतें हें त्याला कळत नव्हतें. मित्राच्या औदार्याचें कौतुक करीत विचारा चालत होता. डोंगरापलीकडे पोंचल्यावर त्या श्रीमंत माणसानें त्यांना मजुरीचा एकेक रुपया दिला.

दोघे त्या गांवच्या धर्मशाळेंत उतरले. धर्मशाळेंत सर्व सोयी होत्या. धर्मशाळेच्या मालकाशीं त्यांची चांगली ओळख झाली होती. लबाड मित्रानें गोडगोड गप्पा सांगून त्याच्याकडून कांहीं पैसे कर्जाऊ घेतले, धर्मशाळेचा मालक पैसे परत करण्या-साठीं पाठीस लागला तेव्हां दुसऱ्या दिवशीं पहाटे दोघे कोणाला कांहीं सांगितल्या-शिवाय पळून गेले.

दोघे दूर निघून गेले. काम कोठें मिळालें नाहीं व खायला प्यायला देखील मिळालें नाहीं. उपासमार झाली दोघांची. एका जागीं त्यांना एक बैलदार दगड फोडीत असलेला दिसला. बाजूला पेजेचें एक भांडें व चमचा होता. त्यांच्या तोंडाकडे पाहून त्यानें ओळखलें कीं दोघे उपाशी आहेत. म्हणाला—"हा दगड एवढा फोडून टाका आणि यांतली पेज दोघे मिळून प्या! मी जाऊन येतो जरा पलीकडच्या झोपडींत." असें सांगून तो निघून गेला.

दोघांना फार आनंद झाला. कोणीतरी वेडा पीर दिसतो आहे, असें लबाड मित्राला वाटलें. तो आपल्या मित्राला म्हणाला—"मित्रा! आपल्या हातून कांहीं तो घण आतांच उचलणार नाहीं. थोडें खाऊन पिऊन घेऊं व मग बसूं दगड फोडीत. चमचा एकच एक आहे. म्हणून आपण चमचे मोजून खाऊं या! तूं जितके चमचे पिशील तितकेच मोजून मी पिईन. बरें मग पहिल्यानें तूं पितोस कीं मी पिऊं?"

भोळा मित्र म्हणाला—"तूंच पि आधीं!"

जणुं कांहीं मित्राच्या आग्रहास्तवच पित आहें, असें सोंग करून त्यानें एक तृतीयांश पेज पिऊन टाकली व म्हणाला—"आतां तुझी पाळी, तूं खा!" असें सांगून त्यानें आपल्या मित्राला पेजेचें भांडें दिलें.

भोळ्या मित्रानें इमाने इतबारे चमचे मोजून त्याच्या लबाड मित्रानें जितके चमचे पेज प्याली होता तितकेच चमचे प्याली व त्यानें चमचा व भांडें आपल्या मित्राला दिलें. लबाड मित्रानें चमचे मोजूनच पेज प्याली. पण भांड्यांत फारच कमी पेज उरली



होती. भोळ्या मित्राला त्यावरच मनाचें समाधान करून घ्यावें लागलें.

दगड फोडण्याची पाळी आली. एकच घण आहे तेव्हां पाळीपाळीनेंच काम करणें भाग आहे." लबाड मित्र म्हणाला.

"बरें तर मी आधीं फोडतो." भोळा मित्र म्हणाला आणि दगड फोडूं लागला. लबाड मित्र नुसता गंमत पहात बसला व थोड्या वेळानें झोंपला देखील. एका तासा-भरानें त्याची झोंप मोडली तोंपर्यंत एक तृतीयांश काम झालें होतें. जणुं कांहीं आपण केवढा अपराध केला असें सोंग



करीत तो धांवत आपल्या मित्राजवळ आला आणि म्हणाला—"मित्रा! तूं मला उठवलें कां नाहींस? बरें तूं केलें आहेस तेवढें काम केल्याशिवाय मी घण खालीं ठेवणार नाहीं बघ!" त्यानें घण उचलला व दगड फोडूं लागला. आणखी एक तृतीयांश काम संपले. आतां फक्त एक तृतीयांशच उरलें होतें. पुन्हां भोळ्या मित्राची पाळी आली. तो दगड फोडूं लागला. त्यानें उरलेलें सर्व काम पुरें केलें. लबाड मित्र त्याला म्हणाला—"अरे! तूं सगळें काम कां पुरें केलेंस? मी होतों कीं!"

दोघे तेथून निघाले. त्यांना वाटेंत एक शेत लागलें. शेतकरी शेताची राखण करीत होता. दोघांनीं त्याला कांहीं काम देतां का म्हणून विचारलें. तो म्हणाला—"तुम्ही दिवसभर राखण केलीत तर तुम्हांला मी पोटभर जेवायला घालीन व झोंपायला जागा देईन." दोघांनीं काम करायचें कबूल केलें.

लबाड मित्र म्हणाला—"मित्रा! मी बाहेरून राखण करतों, तूं आंत बसून राखण कर! मी बाहेरूनच पक्ष्यांना हांकलून लावीन. पण समज कांहीं पोपट व चिमण्या आंत शिरल्याच तर तूं गोफणीनें त्यांना पळव." भोळ्या मित्रानें तें कबूल केलें.

लबाड मित्र शेताबाहेर झाडाखालीं छान झोंपून राहिला आणि भोळा मित्र माचणीवर बसून पक्ष्यांना ओरडून किंवा टाळ्या वाजवून उडवूं लागला.

रात्रीं दोघे मित्र जेवायला बसले तेव्हां भोळा मित्र म्हणाला—"नको रे बाबा हें काम! शेतकऱ्यानें या पेक्षां मेंढरें पाळायचें काम दिलें तर बरें होईल. रानांत मेंढरांना सोडून झाडाखालीं स्वस्थ पडून राहतां येईल. टाळ्या वाजवायला नकोत व ओरडून कंठशोष करायला नको."

लबाड मित्र म्हणाला—"मित्रा! तुझी ही सूचना आपणांला सुद्धां पसंत पडली बुवा!" शेतकऱ्यानें त्यांना मेंढरें चरायला घेऊन जायला सांगितलें. दोघे मेंढरें घेऊन रानांत गेले. कुत्रीं होतींच धांवपळ करायला. दोघे छान पाय पसरून सांवलींत झोंपले. त्यांची झोंप मोडली तेव्हां तेथें एक देखील मेंढरूं नव्हतें व त्यांना पाळणारें एक कुत्रें-देखील नव्हतें. लबाड मित्र म्हणाला—"तूं एका बाजूनें हांकत आण आणि मी एका बाजूनें हांकत घेऊन येतों."

दोघे निघाले. लबाड मित्र चार पावले गेला आणि आपल्या मित्राची वाट पहात परत येऊन झाडाखालीं बसून राहला. भोळ्या मित्राला बरेच अंतर चालत गेल्यावर मेंढरें बरींच दूर निघून गेलेलीं दिसलीं कुत्र्यांच्या मदतीनें त्यांना एकत्र करून आणीपर्यंत बिचाऱ्याला बरीच पायपीट करावी लागली. आल्यावर त्यानें आपल्या लबाड मित्राला विचारलें—"कायरे! तूं येथें स्वस्थ बसून राहिलास आणि माझी मात्र चांगलीच पायपीट झाली." त्या दिवशीं रात्रीं त्यानें आपल्या लबाड मित्राला तें काम आपल्या-कडून होणार नाहीं असें सांगितलें.



लबाड मित्र म्हणाला—"हें बघ! भीक मागण्याचा धंदा सर्वांत सोपा! कोणाचें बांधलेले नाहीं. आवडलें तर मागितली भीक नाहीं तर सोडून दिली. मी पाठीमागच्या दारानें भीक मागायला जाईन तूं पुढच्या दारानें जा!"

भोळ्या मित्रानें तें कबूल केलें. तो होता तसा अशक्तच. म्हणून लोक त्याला भीक घालीत. लबाड मित्र भीक मागीत नसे. मागच्या दाराजवळ बदक किंवा कोंबडें कांहीं दिसलें तर तें तो पळवून नेई. त्यानें तोच धंदा सुरू केला.











तो आपल्या भोळ्या मित्राला म्हणे—"तूं काय आणलीस भीक? चार दमड्या! आणि मी पहा आणल्या आहेत कोंबड्या!"

प्रथम दोघे दोघे परस्परांची कमाई अर्धी अर्धी वांटून खात. पण पुढें लबाड मित्र त्या गोष्टीस तयार होईना. म्हणाला—"तुला भीकच मागतां येत नाहीं. तुझ्यासाठीं मी किती दिवस मेहनत करीत राहणार!"

भोळा मित्र म्हणाला—"तर मग या पुढें मी मागच्या दारानें भीक मागायला जातों, तूं पुढल्या दारीं जा!"

लबाड मित्र त्या गोष्टीस पण कबूल झाला. पण किती भीक मिळाली तरी चोरीच्या मालाशीं कितीशी बरोबरी होणार? लबाड मित्राची कमाईच जास्त निघे.

एकदां दोघे एका घरीं भीक मागायला गेले. भोळा मित्र समोरच्या बाजूनें जाऊन मोठ्यानें ओरडून भीक मागूं लागला. त्या वेळीं लबाड मित्र मागच्या दारानें गेला आणि एक बदक आणि भुयमुगाच्या शेंगा उचलून घेऊन आला. आपल्या भोळ्या मित्राला म्हणाला—"तुझ्याबरोबर आपला निभाव नाहीं लागणार बुवा! तूं काय आणलेंस मिळवून?" असें सांगून तो भुयमुगाच्या शेंगा खाऊं लागला.

तिकडे लबाड मित्रानें केलेल्या चोरीचा सुगावा लोकांना लागला. त्यांनीं शेतांत काम करणाऱ्या चार सहा जणांना बोलावून आणलें. त्यांनीं त्या लबाड मित्राला शेंगा-खात असतांना पकडलें. त्याच्या जवळ बदक पण होतेंच. सर्वांनीं त्याला खूप बडवून काढलें. ते त्याला धरून पोलीस ठाण्यावर घेऊन गेले. त्याला तुरुंगाची शिक्षा झाली.





## सुंदरकांड

जांबुवानानें प्रोत्साहन दिल्यानंतर मारुतीनें श्री रामानें दिलेली अंगठी घेऊन लंकेत रावणानें सीतेला कोठें लपवून ठेवलें आहे हें पाहून येण्याचा निश्चय केला. त्यानें आपलें शरीर वाढवलें आणि महेन्द्र पर्वतावर चढला. त्याचा धक्का लागून झाडें मोडून पडली व त्याच्या पायाखालीं येणाऱ्या दगडांचा चूर होऊं लागला. उड्डाण करण्यापूर्वी त्यानें सूर्य, इंद्र व आपले वडील वायु यांना नमस्कार केला. नंतर हात टेंकून त्यानें पर्वतावरून एकदम उड्डाण केलें. त्या धक्क्यानें महेन्द्र-गिरि हादरला. गुहेंत राहणारे प्राणी घाबरून ओरडत बाहेर आले. पर्वतांत राहणारे विद्याधर पक्षी घाबरून हाहाकार करीत आकाशांत उडूं लागले.

मारुतीला आकाशांत उड्डाण करून समुद्रपार जात असलेला पाहून ऋषी, मुनी, सिद्ध वगैरे वनवासी लोक त्याचें कौतुक करूं लागले.

मारुतीनें उड्डाण केल्यावर क्षणभर आकाशांत दूरवर पाहिलें व जांबवानाला म्हणाला—"मी रामबाणासारखा वेगानें लंकेला जाईन. तेथें सीता दिसली नाहीं तर त्याच वेगानें स्वर्गलोकीं जाईन. तेथें देखील सीता दिसली नाहीं तर परत लंकेला येईन. त्या रावणाचा वध करून परत येईन.



माझ्या नशिबानें सीतेचें दर्शन घडलें तर तिला घेऊन येईन नाहींतर रावणासह लंकाच उचलून घेऊन येईन."

असें सांगून मारुती पुढें निघाला. त्याच्या वेगामुळें वाटेंतील झाडें समूळ उपटून उडूं लागलीं व कित्येक समुद्रांत जाऊन पडलीं. तीं झाडें मारुतीबरोबर उडतांना पाहून वाटे कीं परगांवीं जाणाऱ्या नातेवाइकांना निरोप देण्यासाठीं निघालेले जणुं कांहीं ते इष्टमित्रच आहेत. झाडें समुद्रांत पडलीं पण त्यांचीं फुलें बरीच दूर मारुतीबरोबर उडत राहालीं.

मारुती दक्षिणेकडे उडत जात असतां त्याच्या हाताच्या बोटांना लागणाऱ्या वायूचा आवाज दूरवर ऐकूं येऊं लागला. शेंडेनक्षत्रासारखा मारुती लंकेकडे जात होता. त्याच्या वेगामुळें समुद्रांत वादळ आल्यासारख्या लाटा उसळूं लागल्या. त्याची सावली समुद्रांत तीस योजन लांब व दहा योजन रुंद अशी पसरली.

अशा तऱ्हेनें मारुतीला समुद्रपार जात असलेला पाहून देवांना आनंद झाला. समुद्रानें मारुतीला थोडी विश्रांति मिळावी यासाठीं एक उपाय योजला. कारण समुद्राची म्हणजे सागराची वृद्धि करणारा इक्ष्वाकु वंशीय सगरच होता. त्याचे उपकार स्मरून त्याच वंशांत आलेल्या रामचंद्राच्या कार्यासाठीं मारुती जात आहे, तेव्हां त्याला थोडें फार सहाय्य करणें आपलें कर्तव्य आहे असा विचार सागरानें केला.

समुद्रांत दडी मारून मैनाक नांवाचा पर्वत बसला होता. समुद्र त्याला म्हणाला—"पाताळ लोकांतून राक्षसांना येतां येऊं नये म्हणून मी तुला नेमलें होतें. आतां एक काम सांगतों तें कर. वानरकेसरी हनुमान रामकार्यासाठीं केवढें साहस करून समुद्र पार करीत आहे. तुला आजूबाजूला व वर वाढण्यास आवश्यक शक्ति प्राप्त आहे. तरी तूं पाण्याच्या पातळीवर वाढत जा व मारुतीच्या वाटेवर उभा रहा. तो तुझ्यावर पाय टेकून थोडी विश्रांति घेईल व पुढें जाईल. हें काम तुला करतां येण्यासारखें आहे व तें तूं करावेंस."

तें ऐकून सुवर्ण शिखर असलेला मैनाक पर्वत समुद्राच्या इच्छेला मान देऊन वर आकाशांत वाढूं लागला. त्याचीं सुवर्ण शिखरें शतशत सूर्यांसारखीं झळकूं लागलीं.



परंतु मैनाक पर्वत असा समोर आडवा येत असलेला पाहून हनुमानाला राग आला. माझ्या कार्यांत विघ्न आणणारा हा कोण? म्हणून त्यानें पर्वताला छातीनें धक्का दिला.

मारुतीचा तो पराक्रम पाहून मैनाक पर्वताला राग येण्याऐवजीं मारुतीच्या शक्तीचें त्यानें कौतुक केलें व मनुष्य रूप धारण करून एका शिखरावर उभा राहून हात जोडून म्हणाला—"हे वानरकेसरी! तुझा पराक्रम पाहून मी थक्क झालों आहें. दुर्लंघ्य अशा समुद्राला एका उड्डाणांत पार करीत असतां तुला थोडादेखील थकवा वाटला नाहीं. याचें प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे तूं मला सहजीं धक्का देऊन बाजूला सारलें आहेस. तरी माझी अशी विनंति आहे कीं तूं माझ्या शिखरावर किंचित विश्राम करून पुढें जावें. पूर्वी कधीं काळीं रामचंद्राच्या पूर्वजांनीं म्हणजे सगरपुत्रांनीं समुद्रावर जे अपार उपकार केले आहेत त्यांची थोडी फेड म्हणून राम कार्यासाठीं जाणाऱ्या तुझ्यासारख्या वीराला विश्रांति घेण्यास आधार द्यावा अशी समुद्राची मला आज्ञा आहे. हे वानरवीरा! तूं क्षणभर माझ्या शिखरावर उतर.



कंदमुळें व फळें खाऊन पुढें जा. अतिथि हा देवतुल्य पूज्य असतो व तुझ्यासारखा अतिथि भाग्यानेंच लाभतो. तूं स्वतः एक पंडित व ज्ञानी आहेस व वायुसुत आहेस. वायूनें माझ्यावर जे उपकार केले आहेत ते मी कधीं विसणार नाहीं. कृत युगांत पर्वतांना देखील पंख होते. ते वाटेल तेव्हां वाटेल तिकडे उडत व उतरत. देव व ऋषी यांना देखील त्यांची भीति वाटे. तेव्हां देवेंद्रानें त्यांचे पंख छांटून टाकले. देवेंद्र माझे पंख कांपायला आला तेव्हां तुझे वडील वायुदेव मला वेगानें दूर घेऊन गेले. त्यांच्याच कृपेनें माझे पंख आजवर जसेच्या तसेच आहेत. म्हणून तूं माझ्या विनंतीस नकार देऊं नकोस."

मारुती म्हणाला—"तुझें नम्रपणाचें व गोड बोलणें ऐकूनच माझा श्रम परिहार झाला आहे. मी तुझें आतिथ्य स्वीकारलें आहे. परंतु रामकार्य जास्त महत्वाचें आहे व तें पुरे केल्याशिवाय विश्राम कोठें? असा विचार करून मला पुढें गेलें पाहिजे. तरी तूं राग मानूं नकोस. मी वानरांना वचन दिलें आहे कीं मी रामबाणासारखा वेगानें लंकेला जाईन." असें सांगून मारुतीनें मैनाक पर्वताला हातानें नुसता स्पर्श केला आणि त्याचा आशीर्वाद घेऊन पुढें निघाला.

"तुला आपल्या कार्यांत यश मिळो!" असा मैनाक पर्वतानें आशीर्वाद दिला. हनुमान जास्त वेगानें दक्षिणेकडे निघाला.

मैनाक पर्वताचें आतिथ्य मारुतीनें स्वीकार केलें नाहीं. हें माहीत असूनहि देवांना मारुतीच्या शक्तीची परीक्षा घ्यावी असें वाटलें. ते सांपांची आई सुरसा हिच्या-कडे गेले व हात जोडून म्हणाले—"वायुसुत हनुमान लंकेला निघाला आहे. तूं त्याला



त्याच्या वाटेवर अडव. तो तुला जिंकून पुढें जातो कीं नाहीं हें आम्हांला एकदां पहा-वयाचें आहे. थोडक्यांत म्हणजे त्याच्या शक्तीची परीक्षा घ्यावयाची आहे."

सुरसेनें देवांच्या इच्छेला मान देऊन एका भयंकर राक्षसिणीचें रूप घेतलें आणि मारुतीच्या वाटेवर 'आ' पसरून उभी राहली. मारुती जवळ येतांच म्हणाली—"मी तुला सोडणार नाहीं. तुला खाऊन मी आपली भूक भागवणार आहें."

मारुतीनें तिला नमस्कार केला व म्हणाला—"मी रामकार्यासाठीं निघालों आहें! राम घरांत नसतां रावण सीतेला उचलून घेऊन निघून गेला. मी रामाचा दूत म्हणून लंकेला जात आहें. तूं देखील या रामकार्यास मदत द्यावीस अशी माझी विनंति आहे. तूं नकार दिलास तर मी रामाची परवानगी घेऊन तुझ्या तोंडांत प्रवेश करण्यास तयार आहें."

सुरसा त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून म्हणाली—"मी तुझ्या रामाला ओळखीत नाहीं कीं त्याच्या बायकोला ओळखीत नाहीं. माझ्या नजरेला आल्यानंतर माझी नजर चुकवून कोणाला जातां येणार नाहीं. जो माझ्या समोर येईल त्याला उभा गिळ-ण्यास मला वर मिळाला आहे. हा वर मला स्वतः ब्रह्मदेवानें दिला आहे. म्हणून तूं निमूटपणें माझ्या तोंडांत प्रवेश कर." असें सांगून ती 'आ' करून मारुतीसमोर उभी राहाली.

मारुती म्हणाला—"तर मग तुझ्या तोंडांत उडी मारता येईल एवढा मोठा 'आ' कर!" असें सांगून मारुतीनें आपलें शरीर दहा योजन मोठें केलें. लगेच सुरसेनें आपलें तोंड वीस योजन मोठें केलें. मारुतीला राग आला. त्यानें आपलें शरीर वाढवून तीस योजन केलें. सुरसेनें आपलें तोंड चाळीस योजन मोठें केलें. मारुतीनें आपलें शरीर पन्नास योजन वाढवलें. अशा तऱ्हेनें चढाओढ करीत मारुतीनें आपलें शरीर नव्वद योजन वाढविलें तर सुरसेनें आपलें तोंड शंभर योजन.

पण मारुतीला गरिमा शक्तीबरोबर अणिमा शक्तीदेखील प्राप्त होती. त्यानें एकदम आपलें शरीर माशी एवढें केलें व सुरसेच्या तोंडांत उडी मारून बाहेर निघून आला आणि म्हणाला—"माते! ब्रह्मदेवानें तुला दिलेला वर पूर्ण झाला आहे. मी तुझ्यासमोर आलों व म्हणून तुला मला गिळतां आलें. पण मी आतां बाहेर आलों आहें आतां तरी मला सोडशील? मला सीता मातेच्या दर्शनाला जाऊं दे!"

सुरसेनें राक्षसिणीचें रूप सोडलें व आपलें सामान्य रूप घेऊन म्हणाली—"तूं आरंभ्या कार्यांत यशस्वी होशील. राम व सीता यांची भेट करून दे!"

मारुती पुढें निघाला. समुद्रांत सिंहक नांवाचा एक राक्षस रहात होता. त्याला एक अपूर्व शक्ति प्राप्त होती. आकाशांत कोणी पक्षी किंवा जीवजन्तु उडत असतां



त्यांची सांवली जरी पाण्यांत पडली तरी ती त्याला धरतां येत असे. त्याला मारुतीची सांवली दिसली. त्यानें मारुतीला खाऊन आपली भूक भागविण्याचें ठरविलें.

त्यानें सांवली धरल्याबरोबर मारुतीचा वेग कमी झाला. त्याला कळलें कीं त्याला कोणी तरी धरलेलें आहे. त्याचबरोबर त्याला सुग्रीवानें सांगितलेली गोष्ट आठवली कीं समुद्रांत सांवली धरणारा एक जन्तु आहे. तोच हा प्राणी असावा हें अनुमान लावायला मारुतीला थोडा सुद्धां उशीर लागला नाहीं.







मारुतीनें पुष्कळ दूर त्याला रेटत नेण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण तो प्रयत्न फुकट गेला. तेव्हां मारुतीनें आपलें शरीर वाढविलें. सिंहकानें पण आपलें तोंड वाढविलें. मारुतीनें त्याच्या तोंडांत सूक्ष्म दृष्टीनें पाहून त्याचें मर्म ओळखून घेतलें आणि चटकन प्रवेश केला. त्यानें सिंहकाच्या मर्मस्थलावर आघात करून त्याचा वध केला आणि त्याचें तोंड बंद होण्यापूर्वी बाहेर निघून आला. सिंहक रक्त ओकला आणि गटांगळ्या खाऊं लागला. त्याचें प्रेत पाण्यावर तरंगूं लागलें.

सिंहक राक्षसाचें प्रेत पाण्यावर तरंगत असलेलें पाहून आकाशांत फिरणाऱ्या भुतांना परमानंद झाला. त्यांनीं मारुतीचें स्तोत्र गायला सुरवात केली.

मारुती पुढें निघाला. थोड्या वेळानें त्याला दूर पलीकडचा किनारा दिसूं लागला. सुरवातीला जंगल होतें. पुढें लंका द्वीप व तेथील वृक्ष, लता व पर्वत प्रदेश स्पष्ट दिसूं लागले. समुद्राला येऊन मिळणाऱ्या नद्यांची अनेक मुखेंपण त्याला दिसलीं.

मारुतीला तितक्यांत आठवलें कीं त्याचें शरीर फार मोठें आहे. त्याला पाहून कोणी राक्षस येत आहे असा संशय लंकावासियांना येईल व आंत प्रवेश मिळणें कठीण जाईल. जें काम साध्य करून घेण्यासाठीं आपण आलों आहों तें बिघडतां कामा नये. म्हणून त्यानें आपलें शरीर लहान करून घेतलें.

त्याच रूपानें तो अलंब नांवाच्या पर्वतावर उतरला. पर्वताला अनेक शिखरें होतीं. आंबे, फणस, काजू वगैरेंची झाडें त्यांवर होतीं. दूर त्रिकूट पर्वतावर त्याला लंकापुरी दिसली. ती देवेंद्राच्या अमरावतीसारखीच किंबहुना त्याहून जास्त सुंदर होती.



## अबू सिंबेल

इजिप्त देशाच्या दक्षिणेकडील टोंकाला अबू सिंबेल (दोन) हें एक देऊळ आहे. हें त्या देशाच्या प्राचीन शिल्पकलेचें उत्कृष्ट उदाहरण आहे. डोंगरांत भव्य द्वारांत कोरलेल्या प्रतिमा रामिसेस द्वितीय याच्या आहेत. त्यांची उंची ६५ फूट आहे. ३२०० वर्षांपूर्वी रामिसेस यानें हीं देवळें बांधलीं रामिसेस द्वितीय याचा जन्म इ. स. पू. १३१८ मध्यें झाला. इ. स. पू. १२३२ मध्यें वयाच्या ८६ वर्षीं त्याचा मृत्यू झाला.












# भारताचा इतिहास



महंमद तुघलकाच्या मूर्खपणामुळें प्रजेला जो त्रास झाला त्यामुळें ती चिडून गेली. जागोजागीं बंडें होऊं लागलीं. राज्य व्यवस्था ढासळली. सुलतानाला जास्तच राग आला. त्यानें अत्याचार सुरू केले. त्याचा परिणाम उलटाच झाला. सर्व राज्यच खिळखिळें झालें. पहिलीं एकदोन बंडें सुलतानानें दाबून टाकलीं. पहिल्या बंडाचा पुढारी सागरचा मांडलिक सरदार बहारुद्दीन गुर्शाप्स हा होता. तो ग्यासुद्दीन याचा भाचा होता. १३२६-२७ मध्यें हें बंड झालें. सुलतानानें तें बंड मोडलें. त्यानें अमानुषपणें बहारुद्दीन याची चामडी सोलून काढविली आणि राजद्रोह्याला हीच शिक्षा मिळेल अशी घोषणा काढली.

दुसऱ्या वर्षी सिंध प्रांताचा शासक बहार ऐब यानें बंडाचें निशाण उभारलें. सुलतानानें त्याचा पराभव करून शिरच्छेद केला आणि बंडखोरांना कायमची दहशत बसावी म्हणून त्याचें मुंडकें किल्ल्याच्या मुख्य दारावर टांगून ठेवलें.

परंतु त्यानंतरदेखील बंडें संपलीं नाहींत. त्यांची संख्या वाढतच गेली. १३३५ नंतर हिंदु व मुसल्मान मांडलिक सरदार व राजे स्वतंत्र होऊं लागले. माबारच्या गव्हर्नरानें आपल्या नांवानें नाणीं देखील पाडलीं. सुलतान त्याचा पाडाव करण्यासाठीं सैन्य घेऊन निघाला. परंतु वाटेंतच कॉलऱ्याची साथ पसरली व सुलतानाला दिल्लीला पळावें लागलें. अशातऱ्हेनें विजयनगरच्या शासन-कर्त्यांच्या हातीं पराभव होईपर्यंत म्हणजे १३७७-७८ पर्यंत मुसलमानांचें राज्य मदुरा येथे टिकाव धरून राहूं शकलें. १३३८ मध्यें बंगालचा गव्हर्नर बहुद्दीन मुबारक शाह स्वतंत्र झाला. त्यानें देखील आपल्या नांवानें नाणीं पाडलीं. १३४०-४१ मध्यें अयोध्या-जाफराबादचा गव्हर्नर आइनुल मुल्क यानें बंड केलें. १३४२ मध्यें बंड मोडलें गेलें. परंतु साम्राज्याची शक्तीच क्षीण होत गेल्यानें सुलतान हत-बल झाला.

सुलतानाच्या राज्यावरचीं संकटें वाढतच गेलीं. तेलंगणांत प्रोलय नायक यानें व त्याच्या पाठोपाठ कापय नायक यानें मुसल-मान राजवट उलटून पाडून हिंदू राज्याची स्थापना केली. होयसळ राजा तृतीय वीर बल्लाळ यानें त्याला मदत केली. कृष्णा नदीच्या काठीं देखील बंडें झालीं. दक्षिणे-कडे विजयनगर वगैरे अनेक हिंदू राज्यें स्थापन झालीं. १३४७ मध्यें देवगिरी येथें बंड झालें व तेथें बहामनी राज्याची स्थापना झाली. बंडखोरांचा पाडाव करण्यासाठीं महंमद तुघलक देशाच्या पूर्वेकडून पश्चिमे-कडे व उत्तरेकडून दक्षिणेकडे धांवपळ करीत राहिला व शेवटीं २० मार्च १३५१ या रोजीं मरण पावला. बदायुनीनें लिहिलें आहे कीं अशा तऱ्हेनें सुलतानाचा प्रजेला वाटत असलेला वचक आणि प्रजेच्या बंड-



खोरपणाचा सुलतानाला वाटत असलेला वचक नाहींसा झाला.

महंमद तुघलक अचानक वारल्यामुळें सैन्यांत बंडखोरवृत्ति पसरूं नये असा विचार करून सरदारांनीं फिरोजशाहला सुलतान केलें. परंतु दिल्लीच्या अमीर उमरावांना एका मुलाला सुलतानाचा मुलगा म्हणून गादीवर बसविलें. परंतु त्यानेंच स्वत: फिरोजशाहला सुलतान मानून त्याच्याकडे शरण मागितली. फिरोज स्वत: लायक नव्हता व महंमद तुघलकाच्या कारकीर्दींत राज्यभर जी अराजकता पसरत होती तिला








आळा घालणें त्याच्या शक्तीबाहेर होतें. त्याला युद्धाचा अनुभव नव्हता. तरी त्यानें युद्धें केलीं. जय मिळण्याची वेळ आली असतां ऐन वेळीं तो युद्धभूमि सोडून निघून जाई. नगरकोट येथील युद्ध याचें एक प्रसिद्ध उदाहरण म्हणतां येईल.

फिरोजशाह एक कट्टर मुसलमान होता. त्यानें हिंदूंवर अत्याचार केले. त्यानें स्वतः खलिफाचें मांडलिकत्व याचमुळें मान्य केलें. यापूर्वी दिल्लीच्या कोणत्याहि सुलतानानें तें कबूल केलें नव्हतें. त्यानें मुसलमान धर्म स्वीकार करणाऱ्या लोकांना इनामें वगैरे देऊन खूप केलें.

फिरोजशाहकडे खाने जहान मकबूल नांवाचा एक मंत्री होता. तो मूळ तेलंगाणाचा राहणारा एक हिंदू होता. त्यानें मुसलमान धर्म स्वीकारला. त्यानें महंमद तुघलकाच्या काळांतच त्याच्या पदरीं नोकरी स्वीकारली. त्याच्या कर्तबगारीमुळेंच राज्याचा कारभार चालू राहिला. १३७० मध्यें फिरोज शाह वारल्यावर त्याचा मुलगा गादीवर बसला. फिरोजशाहनें ३७ वर्षें राज्य केलें. त्याच्या कारकीर्दींत प्रजा सुखी होती. मंगोल जातीनें स्वाऱ्या केल्या नाहींत. पाट बंधाऱ्यांची व्यवस्था करून त्यानें शेतकऱ्यांना मदत केली. जोनपुर, फतेहाबाद, हिस्सार, फिरोजपुर, फिरोजाबाद वगैरे शहरें त्यानेंच वसविलीं. त्यानें दिल्ली येथें व चौफेर १२०० वर उद्यानें बनविलीं.

शेवटीं शेवटीं तो भ्रमिष्टासारखा वागूं लागला होता. त्याचें कारण त्याचा मोठा मुलगा सन् १३७४ मध्यें वारला. त्याच दुःखानें २० सेप्टेंबर १३८८ रोजीं फिरोजशाह मरण पावला.





# महाभारत

पांडव रात्रभर आश्रमांतच राहाले. मुलें आपल्याच आश्रमांत झोंपलेलीं पाहून कुंतीच्या मनाचें समाधान झालें

दुसऱ्या दिवशीं देखील पांडव धृतराष्ट्राच्या आश्रमांतच राहाले. तिसऱ्या दिवशीं नित्यकर्म उरकून धृतराष्ट्राच्या परवानगीनें युधिष्ठिर आपले भाऊ अंतःपुरांतील स्त्रिया व इतर लोकांना घेऊन जवळपासचा वन प्रदेश पहावयास निघाले. जागो जागीं मुनि हवन करीत बसले होते.

युधिष्ठिर हस्तिनापुराहून सुवर्ण पात्र, तांब्याचीं भांडीं, रेशमी व लोकरी कापड वगैरे घेऊन आला होता. तें त्यानें तेथील लोकांना वाटलें. नंतर तो धृतराष्ट्र व गांधारी बसले होते तेथें येऊन बसला. जवळ पांडव कुंतीसह बसले होते.

इतक्यांत कुरुक्षेत्राहून शतयूप वगैरे आले. त्याचवेळीं शिष्यांसह व्यासमुनि पण आले. लहान थोर सर्व त्यांच्या स्वागतासाठीं सामोरे गेले. मृगचर्मावर बसून व्यासमुनींनीं धृतराष्ट्राला कुशल वार्ता विचारली. नंतर त्यांनीं विदुराची चवकशी केली आणि म्हणाले—

“विदुर हा यमाचा अवतार होता. यमाला मांडव्यमुनींनीं शाप दिला होता. म्हणून त्याला मानवजन्म घ्यावा लागला. परंतु योगबलानें त्यानें युधिष्ठिराच्या देहांत प्रवेश केला. आतां युधिष्ठिराचा व विदुराचा आत्मा एक झाला आहे. म्हणून युधिष्ठिरालाच विदुर मानावयास हरकत नाहीं.”

पुढें ते धृतराष्ट्राला उद्देशून म्हणाले—

“तुझें शंकासमाधान करण्याकरितां मी आज आलों आहें. तुला जें कांहीं विचारावयाचें



आहे तें खुशाल विचार. तुला कांहीं पहावयाचें असेल तर सांग. तुला मी दिव्यदृष्टि देईन."

व्यासमुनींनीं एवढें सांगितल्यावर गांधारीनें पुढें येऊन व्यासमुनींना नमस्कार केला व म्हणाली—"मुनिवर! आमचीं मुलें वारल्याला सोळा वर्षें होत आलीं तरी त्यांच्या पुत्रशोकानें ह्यांचें (धृतराष्ट्राचें) मन दुःखी राहातें. त्यांचें दर्शन एकदां घडलें तरी मनाचें अल्प तरी समाधान होईल आणि ही द्रौपदी. ती निपुत्रिक झाल्यामुळें फार दुःखी झाली आहे. सुभद्रा अभिमन्यूच्या शोकानें दुःखी आहे. हीभूरिश्रवाची भार्या तिचे पति व मामा एकाएकीं स्वर्गलोकीं गेल्यामुळें तिच्या डोळ्याचें पाणी थांबत नाहीं आणि या माझ्या शंभर सुना. त्यांनीं कोणता अपराध केला होता कीं त्यांना त्यांच्या दुर्दैवानें एकाएकीं शोकसागरांत लोटलें!"

गांधारी बोलत असतां कुंतीला आपला मुलगा कर्ण याची आठवण झाली आणि डोळ्यांना टिपें आलीं. व्यासमुनींनीं तिच्या दुःखाचें अनुमान करून विचारलें—"तुझ्या मनांत कोणती इच्छा उरली आहे?"

तेव्हां कुंतीनें कर्णाची जन्मकथा व्यासमुनींना सांगितली. म्हणाली—"दुर्वास ऋषि एकदां भिक्षेसाठीं माझ्या बाबांकडे आले. ते फार क्रोधिष्ट होते. त्यांचा राग होऊं नये म्हणून मी फार काळजी घेतली. माझ्यावर प्रसन्न होऊन त्यांनीं मला वर दिला कीं ज्या देवाचें स्मरण करीन त्या देवाचें मला तत्काळ दर्शन घडेल. तो वर मिळाल्याचें मला फार आश्चर्य वाटलें व थोडेंसें कुतूहलपण वाटलें. तो वर विसरण्याचा मी किती प्रयत्न केला. परंतु सारखा तो वर माझ्या मनांत येई. एकदां मी आमच्या राजवाड्याच्या गच्चीवर सूर्योदयाची गंमत पहात बसलें होतें. त्याचवेळीं मला तो वर आठवला. मी सूर्याचें देदीप्यमान रूप पाहिलें आणि त्याचें आवाहन केलें. तो आकाशांत होता तसाच दिसत राहिला. परंतु मनुष्य शरीर धारण करून देखील समोर प्रगट झाला.

"त्यानें विचारलें कीं तूं मला कशासाठीं बोलाविलें आहेस? काय वाटेल तो वर माग! परंतु मी फक्त कुतूहल म्हणून परीक्षा पाहण्यासाठींच सूर्याला बोलाविलें होतें. तें मी सांगितलें. तेव्हां सूर्याला राग आला. म्हणाला—"तूं मला बोलविलेंस व मी वर दिला. पण तूं मागायला तयार नसलीस तर मी तुला व तुला वर देणाऱ्या दुर्वासमुनींना शाप देईन!" मी नाइलाजानें—"तुझ्यासारखाच तेजस्वी पुत्र दे!" असा सूर्याजवळ वर मागितला. सूर्याचें तेज माझ्या शरिरांत प्रविष्ट झालें आणि सूर्य अदृश्य झाला. ही गोष्ट मी बाबांना देखील सांगितली नाहीं. मी आपल्याच खोलींत होतें. तेथेंच कर्णाचा जन्म झाला. नंतर मी लोकलाजेस्तव त्याला नदींत सोडलें. तें मी पाप केलें कीं पुण्य आतां



विचार करणें फुकट आहे. पण आतां एकदां कर्णाला पहावें असें फार वाटत आहे.

"त्यांत तुझा दोष नाहीं. तो दैवाचा निर्णय होता!" असें सांगून व्यासमुनि पुढें म्हणाले—"गांधारी, तुझे पुत्र व भाऊ तुला दिसतील. कुंतीला कर्ण, सुभद्रेला अभिमन्यु, द्रौपदीला तिचे वडील, भाऊ व पुत्र दिसतील. आतांपर्यंत ज्यांचा या युद्धांत मृत्यू झाला ते देवच होते व दैवदुर्विलासामुळें त्यांना मानवजन्म मिळाला होता. आपलें इहकार्य संपल्यामुळें ते पुन्हां स्वर्गलोकीं गेले आहेत. तुम्ही सर्व भागी-











रथीच्या कांठीं जा. तेथें तुम्हांला रात्रीं त्या सर्वांचें दर्शन घडेल.

तेथें हजर असलेले सर्व लोक आनंदानें भागीरथी नदीच्याकाठीं गेले. तेथें त्यांनीं एक उत्तम स्थान निवडून थोडी विश्रांति घेतली आणि केव्हां सर्वांचें दर्शन घडते याची वाट पहात सूर्यास्त होईपर्यंत बसून राहाले.

सूर्यास्त झाला. सर्वांनीं स्नान केलें. नंतर सर्व व्यासमुनि एकाग्रचित्त बसलेले होते. त्यांच्यासमोर येऊन सर्व बसले. नंतर व्यासमुनींनीं युद्धांत मरण पावलेल्या सर्वांचें आवाहन केलें आणि आश्चर्य म्हणजे नदींत हळूंहळूं लाटा उसळूं लागल्या आणि एक अद्भुत दृश्य सर्वांना दिसलें.

कौरव पांडवांचें सैन्य उभें होतें. भीष्म-द्रोणादिक योद्धे एक सैन्य घेऊन पाण्यांतुन वर येत असलेले दिसले. त्या सैन्यांत विराट, द्रुपद, उपपांडव, अभिमन्यु, कर्ण, शकुनी, दुर्योधन, दुःशासन वगैरे गांधारीचे पुत्र, भगदत्त, भूरिश्रव, शल्य, धृष्टद्युम्न, शिखंडी, बाल्हिक, सोमदत्त वगैरे दिसले. त्यांचीं रूपें व वस्त्रें ते युद्धाला गेले त्या वेळचींच होतीं. तींच शस्त्रें व ध्वज त्यांच्या हातांत होते. त्यांच्या मनांत वैरभाव अणुमात्र देखील नव्हता.

व्यासमुनींनीं धृतराष्ट्राला दिव्यदृष्टि दिली. त्याला व गांधारीला त्यांच्या मृत पुत्रांचें व इतर बंधुबांधवांचें दर्शन घडलें. व्यासमुनींच्या तपोबलानें मृत योद्धे आपल्या मातापितारांना व बंधुबांधवांना भेटूं शकले, कांहीं काळ परस्परांच्या संगतींत आनंदानें घालवूं शकले. कोणाच्या मनांत शोक किंवा दुःख यांचा लवलेश नव्हता. ती रात्र आनंदानें केव्हां निघून गेली, कोणाला कळलें नाहीं.





[ २२ ]

[गरुडराजाच्या अनुयायांनीं लख् वगैरेंना कैद केलें. त्या दिवशीं रात्रीं मार्जार व श्वानकर्णीच्या दोघा अनुयायांनीं पंखवाल्या जातीचे पंख लावून हेरगिरी केली आणि लख् वगैरेंना तेथें कैद केलें होतें तेथें गेले. जितवर्मा व शक्तिवर्मा पाहाऱ्यावर होते. त्यांना संशय आला. त्यांनीं त्यांना अडवलें. पुढें वाचा.]

शक्तिवर्मा तलवार घेऊन धांवला. त्याच्या पाठोपाठ जितवर्मा देखील तलवार उसपून धांवला. परंतु मार्जार व श्वान-कर्णीच्या दोघां अनुयायांनीं न भितां दोघांना बाजूला उभे राहायला दरडावून सांगितलें. म्हणाले—"उगीच जास्त ढवळाढवळ करण्याचें कारण नाहीं. मुकाट्यानें बाजूला व्हा. गरुडराजानें या तिघांना ताबडतोब घेऊन यायला सांगितलें आहे. शेजारच्या राहुटींत ब्रह्मदंडी बसला आहे, त्याला कळतां कामा नये असें देखील सांगितलें आहे."

त्यांच्या आवाजांत असा कांहीं कडकपणा होता कीं शक्तिवर्मा व जितवर्मा परस्परांचीं तोंडें पहात उभे राहाले. शक्तिवर्मा तल-वार म्यानेंत ठेवीत म्हणाला—"सरदारानेंच तिघांना घेऊन यायला सांगितलें असेल तर
























आम्हांला कांहीं म्हणावयाचें नाहीं. परंतु तुमचा तोंडावळा पाहून तुम्ही पंखवाल्या जातीचे नाहीं असा आम्हांला संशय येत आहे!"

शक्तिवर्माची ती शंका ऐकून मार्जारचा अनुयायी हंसला व म्हणाला—"आम्ही जाणून बुजूनच रानटी लोकांसारखा तोंडावळा करून घेतला आहे. हो बाजूला, असल्या शंकाकुशंका करून आमचा वेळ फुकट घालवूं नकोस!" असें सांगून तो पुढें निघाला देखील.

सर्व त्याच्या पाठोपाठ निघाले. परंतु जितवर्माच्या मनांतला संशय दूर झाला नव्हता. तो तलवार घेऊन त्यांच्यावर धांवला. इतक्यांत लखूनें त्याचा पाय ओढून त्याला खालीं पाडलें. गोमांगनें शक्तिवर्माला टांग मारून खालीं पाडलें.

जयमल दोरी घेऊन आला आणि म्हणाला—"उगाच जास्त गडबड केलीत तर तुमचे नरडें आवळून टाकूं. पडून रहा मेल्यासारखे." असें सांगून त्यानें व सर्वांनीं मिळून दोघांचे पाय बांधून ठेवले. इतक्यांत पलीकडच्या तंबूंतून ब्रह्मदंडी मांत्रिकाचा आवाज ऐकूं आला.

"ब्रह्मदंडीला सर्व कळल्यासारखें दिसत आहे. पाय काढलेला बरा." असें सांगून त्यानें व इतरांनीं त्यांच्या हातीं तलवार भाला, धनुष्यबाण जें कांहीं आलें तें घेतलें आणि निघाले.

ब्रह्मदंडी तिकडून ओरडत होता—"ते तिघे शक्तिवर्मा व जितवर्मा दोघांवर मारहाण करून निसटून पळाले. गरुडराज! ऊठ!"

जयमलनें दोघां रानटी लोकांना विचारलें—"मार्जार व श्वानकर्णी दोघांनीं तुम्हांला पाठविलें आहे का? तुमच्या बरोबर आणखी किती जण आहेत व ते कोठें दबा धरून बसले आहेत?"



"तसें कांहीं नाहीं! आम्हां दोघांना हेर म्हणून त्यांनीं पाठविलें होतें व तुमच्यावर काय प्रसंग ओढवला आहे हें येऊन सांगायला सांगितलें होतें." दोघांपैकीं एक जण म्हणाला.

लखू एका राहुटींतून बाहेर निघाला व ब्रह्मदंडीच्या राहुटीकडे त्यानें एकदां वळून पाहिलें. जयमलला तो कांहीं सांगणार एवढ्यांत महाकाय आपला चाबूक फिरवीत ते उभे होते तिकडे येऊं लागला. तें पाहून गोमांग तलवार घेऊन त्याच्याकडे धांवायला तयार झाला. पण महाकाय ओरडूं लागला "त्या तिघांना दोन पंखवाले सामील झाले आहेत. गरुडराजाच्या अनुयायांत फूट आणि फितुरी! दगा! विश्वासघात! गरुडराज विश्वासघात!"

जयमलनें एकदां चारी बाजूला दृष्टि फिरविली. प्रत्येक राहुटीसमोर पंखवाले उभे होते. कांहीं—'दगा! फितुरी!' म्हणून पळत होते. समोर येणाऱ्याला सांगत होते. संभाळून 'फितुरी!' "लखू आतां निसटून पळून जाण्यास एकच एक उपाय आहे. आतांपर्यंत आपल्या शत्रूची खात्री झाली असेल कीं आपण पळून गेलों आहों. ते






आपल्याला पकडण्याची शिकस्त करून पाहणार. आपण कोठें आहों कोणत्या वाटेनें पळालों, ह्या गोष्टीचा मागमूसहि लागतां कामा नये. म्हणून त्यांची फसवणूक करण्या-करितां आपण एक युक्ति करूं या. मशाली घेऊन शक्य होईल तितक्या राहुट्यांना आग लावूं या. त्यामुळें धांवपळ सुरू होईल व ह्या गडबडींत पळून जाणें कठीण नाहीं." जयमलनें सुचविलें.

जयमल बोलतच होता, लखू गोमांग व दोघे रानटी लोक सर्वांनीं एकेक मशाल उचलून घेतली आणि "विश्वासघात!" स्वामीद्रोह! पळा! वांचवा!" असें ओरडत दहावीस राहुट्यांना आग लावली. राहुट्या पेटूं लागल्या आणि वारा सुटल्यामुळें आग पसरूं लागली.

ब्रह्मदंडी व महाकाय आग लागलेली पाहून घाबरून गेले. त्यांना काय करावें हेंच सुचेना. ब्रह्मदंडी आपली जादूची कांडी वर आकाशांत उचलून ओरडूं लागला—"हे काळभैरवा! आपल्या या भक्ताला आगींत होरपळून जाळून टाकणार? या भक्ताची परीक्षा घेत आहेस का?" तो ओरडत होता आणि स्वतःला वांचवण्यासाठीं पळत होता. पळत असतां तो महाकाय, शक्तिवर्मा व जितवर्माला ओरडून सांगत होता—"वीर पुरुष हो! आपल्या शौर्याची परीक्षा याच वेळीं आहे! ते दुष्ट कोठें पळाले? शोधा! हुडकून काढा त्यांना! मी गरुडराजाला जाऊन उठवतों." तो गरुडराजाच्या राहुटीजवळ गेला.

ब्रह्मदंडीला पळत आलेला पाहून गरुड-राज मोठमोठ्यानें हंसून म्हणाला—"काय मांत्रिका? तुझा मंत्रतंत्र कोठें गेला? एवढीशी आग लागली म्हणून घाबरून गेलास? गिधाडासारखें तुझें तोंड आहे हें मी म्हटलें तें उगाच नाहीं."



"आतां मी काय सांगूं गरुडराजा! अरे ते दुष्ट आपल्या हातावर तुरी देऊन पळाले कीं? त्यांनींच आपल्या तर्व राहु-ट्यांना आग लावली आणि तूं माझी थट्टा उडवीत हंसत आहेस! तुझे कांहीं अनुयायी फितूर झाले आहेत!" ब्रह्मदंडी अपमान झाला असला तरी राग पिऊन म्हणाला.

"त्या दुष्टांना आणि स्वामिद्रोह्यांना धरून आणण्यासाठीं मी केव्हांच आपल्या अनुयायांना पाठविलें आहे. तुला घाबरण्याचें कारण नाहीं. तूं स्वस्थ बसून रहा! तुझे अंगरक्षक जितवर्मा व शक्तिवर्मा कोठें आहेत? आणि तो गुलामांचा सरदार ऐदी कोठें गेला आहे? ते देखील त्यांना सामील झाले कीं काय?" गरुडराजानें संशयी नजरेनें मांत्रिका-कडे पहात विचारलें.

ब्रह्मदंडी घाबरून पाहूं लागला. त्याला महाकाय व दोघे अंगरक्षक जवळपास कोठें दिसले नाहींत. तरी तो म्हणाला—"ते फितूर होणें शक्य नाहीं. ते देखील तुझ्या अनुयायांबरोबर त्यांना धरण्यासाठीं धांवपळ करीत असतील."

इतक्यांत चारपांच पंखवाले पळत आले. गरुड राजानें विचारलें—"धरलें का त्या



तिघांना? किती आहेत स्वामिद्रोही?" एकानें लवून मुजरा केला व म्हणाला—"सरदार! ते सर्व मिळून पांचजण आहेत! त्यांनीं आपल्यापैकीं दहा पांचजणांना ठार केलें आहे. कित्येक जखमी झाले आहेत. ते घाबरून मगरींच्या तलावाकडे पळतांना दिसले."

"तर मग आपलें काम जास्तच सोपें झालें. तुम्ही जाऊन या बाजूनें त्यांच्या वाटा अडवून उभे रहा आणि त्यांना रेटीत न्या तलावाकडे! इकडे वळले तर पकडा त्यांना. तलावांत शिरले तर मगरी आहेतच



त्यांचा फराळ करायला तिकडे.'' गरुडराज म्हणाला.

"परंतु....गरुडराज! त्या लखूला मगरींनीं धरून खालें तर आटोपला सर्व खटाटोप! त्याच्या केसाला देखील धक्का लागतां कामा नये. भयानक दरींतल्या सर्व संपत्तीचा वारस तोच तर आहे!'' ब्रह्मदंडी घाबऱ्या आवाजांत म्हणाला.

गरुडराजानें ब्रह्मदंडी जें म्हणाला तिकडे कांहीं लक्षच दिलें नाहीं आणि उठून आपल्या अनुयायांना म्हणाला—"चला! पाहूं या जाऊन, मगरी त्यांचा फराळ करीत आहेत कीं ते उंदरासारखे सांपडले पिंजऱ्यांत." असें सांगून तो तलावाकडे निघाला. ब्रह्मदंडी निमूटपणें त्याच्या पाठोपाठ निघाला.

सर्व तलावाच्या काठीं पोंचले तेव्हां तेथें पळापळ आणि ओरडा ओरड चालू होती. गरुडराजानें दोघां तिघांना जवळ यायला खुणावलें आणि विचारलें—"काय भानगड आहे? उंदीर पिंजऱ्यांतून निसटून पळाले का?"

"नाहीं सरदार! आम्ही जाळें आवळींत आणलें आहे. कोठून निसटणार ते? तलावाकाठच्या झाडींत शिरले आहेत. सशासारखी दडी मारून बसले आहेत झुडपाआड. त्यांना बाहेर ओढून काढलें पाहिजे."

ब्रह्मदंडीला वाटलें कीं या सर्व प्रयत्नांत इतरांबरोबर लखू देखील तलावांत उडी मारील. म्हणून तो ओरडून म्हणाला—"बाळ लखू! तुला भ्यायचें कारण नाहीं. तुझ्या केसाला देखील कोणी शिवणार नाहीं. तूं त्या विश्वासघातकी साथीदारांचा नाद सोडून इकडे ये कसा! गरुडराज दयाळु आहे. तो तुला माफ करील."



ब्रह्मदंडीच्या त्या आवाजाला जणुकांहीं उत्तर म्हणून झाडींतून उत्तर आलें—"मार्जार की जय!" "श्वानकर्णी की जय!" या जयघोषाच्या पाठोपाठ लांब भाले पंखवाल्यांवर येऊन त्यांना घायाळ करूं लागले.

गरुडराज खुंटावरून खालीं उडी मारीत म्हणाला—"या रानटी लोकांनीं आमच्या चारी बाजूला गराडा घातला आहे वाटतें! आतां स्वतःच्या रक्षणासाठींच पळालें पाहिजे! पळा! गरुडासारखे उडून पळून जा!" सर्व पंखवाले मागें फिरले आणि पळूं लागले.

ब्रह्मदंडी देखील मागें फिरला आणि पळूं लागला.

मार्जार व श्वानकर्णी त्यांच्या अनुयायांकडून कांहीं निरोप किंवा खुणेचा आवाज येतो का वाट पहात दबा धरून बसले होते. परंतु दोन्हींपैकीं एकहि झालें नाहीं. सुदैवानें काळोखांत एकदम पंखवाल्यांच्या वस्तीला आग लागलेली दिसल्याबरोबर मार्जार व श्वानकर्णीनें विचार केला कीं हीच संधी आहे पंखवाल्याची खोड मोडायला. त्यांनीं लगेच छापा मारला. त्यांचे भाले लागून पंखवाले पटापट जमिनीवर आदळूं लागले



व इतर पळूं लागले. तें पाहून त्यांना जोर चढला. परंतु लखू वगैरे कोठें आहेत हें त्यांना कळेना. तें कळायला मार्ग पण नव्हता. म्हणून त्यांना आणखी एक भीति वाटली. आपले भाले चुकून त्यांनाच लागले तर! ज्यांच्यासाठीं एवढी जोखिम घेऊन आलों त्यांचाच जीव घेतल्याचें पातक कपाळीं येणार. म्हणून त्यांनीं भाले फेंकू नका असें ओरडून सांगितलें आणि ओरडून हांक मारूं लागले—"लखू! जयमल! कोठें आहां?"

मार्जार व श्वानकर्णीचा आवाज तलावाकाठच्या झुडपांत लपून बसलेल्या लखू व त्याच्या अनुयायांना ऐकूं आला. एकदां त्यांना वाटलें कीं त्या आवाजाला उत्तर देणें धोक्याचें होईल. परंतु पुन्हां विचार केला कीं हरकत नाहीं. ते उत्तर देणार इतक्यांत पंखवाले त्याच बाजूला पळत आले. त्यांना पळूं कां द्यायचें असा विचार करून लखू वगैरेंनीं आपापल्या तलवारी उपसल्या व त्यांना थांबविलें.

परंतु लखू वगैरेंना आपल्या तलवारींचा उपयोग करायला पुरेशी संधीच मिळाली नाहीं. कारण एका बाजूला झुडपें होतीं व दुसऱ्या बाजूला तलाव. तरी थोडीफार झटापट झालीच. त्या झटापटींत कांहीं घसरून तलावांत पडले. स्वतः लखू व गोमांग देखील दोनदां तलावांत पडले. पण सुदैवानें ते वांचले व बाहेर येऊन पंखवाल्यांना तलावांत ढकलूं लागले. दूर त्यांना श्वानकर्णी व मार्जारचा आवाज स्पष्ट ऐकूं येत होता. म्हणून त्यांना धीर आला होता व शत्रूशीं लढण्याचा चेव चढला होता.

[पुढें चालू]





[३]

समुद्रराजाच्या सैनिकांच्या हातांतून आपली सुटका करून घेऊन सालिहा बाहेर आला तेव्हां त्याला जें दृश्य दिसलें तें पाहून तो चकितच झाला. राजवाड्याच्या बाहेर एक हजाराचें सैन्य उभें होतें. आपापल्या घोड्यावर सज्ज हल्ला करण्याची आज्ञा होण्याची वाट पहात सर्व घोडेस्वार तयार होते. तें सैन्य सालिहाचेंच होतें. सालिहा समुद्रराजाकडे नियून गेल्यावर त्याच्या आईनें समुद्रराजाचा क्रूर स्वभाव ओळखून आपल्या मुलाच्या रक्षणार्थ तें सैन्य पाठविलें होतें.

सालिहानें बाहेर आल्यावर प्रसंग ओळखून राजवाड्याला गराडा घालण्यास आज्ञा केली व तो कांहीं निवडक सैनिकांना बरोबर घेऊन राजवाड्यांत शिरला. सैनिकांना अर्थातच समुद्रराजाच्या सैनिकांशीं युद्ध करावें लागलें. शत्रूचा पराभव करीत सालिहा राजवाड्यांत प्रत्यक्ष समुद्रराजाच्या दरबारांत पोंचला. तेथें समुद्रराजाच्या रक्षणार्थ जे सैनिक उभे होते त्या सर्वांना जखमी करून तो समुद्रराजाच्या सिंहासनाजवळ पोंचला.

समुद्रराजाला स्वतःचा पराभव प्रत्यक्ष डोळ्यासमोर दिसत होता. परंतु त्याला त्याची थोडीदेखील फिकीर नव्हती. तो आपल्या उरलेल्या सैनिकांना धीर देऊन तलवार उपसून सालिहाला ठार करण्यास धांवला. तो हंसत होता व आपल्या सैनिकांना ओरडून सांगत होता—"धरून आणा त्या बंडखोराला! त्याच्या हातापायाचीं



हाडें मोडून टाकल्याशिवाय माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं. माझ्याशीं वैर करणारा जिवंत रहात नाहीं हें त्याला माहीत नाहींसें दिसतें."

"समुद्रराजाचा जय!" "सालिहाचा जय!" असा जयघोष दोन्ही सैन्यांतले योद्धा करीत होते. सालिहाच्या सैन्याला चेव चढला व त्यानें समुद्रराजाच्या सैन्याला कापून काढलें. मरणाला समोर प्रत्यक्ष पाहून समुद्रराज स्वतः सालिहावर तुटून पडला. परंतु सालिहानें आपलें चातुर्य दाखवून आपला भाला फेंकला. समुद्रराजा बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. जखम तितकीशी मोठी नव्हती. त्याला कैद करण्यास सांगून सालिहा अंतःपुराकडे वळला.

राजकन्येला राजवाड्यांत घडलेला प्रकार कळला. तिनें चोरवाटेनें पळून जावयाचा विचार केला आणि आपल्या एका विश्वासू दासीला बरोबर घेऊन गुप्त मार्गानें ती राजवाड्याबाहेर गेली. दासी तिला एका द्वीपांत घेऊन गेली. तें एक अत्यंत रमणीय असें द्वीप होतें. चहूंकडे हिरवळ व दाट झाडी होती. तें निर्जन स्थान स्वतःला राहण्यास उत्तम आहे असा विचार करून राजकुमारी जहानारा एका झाडावर चढून लपून बसली. तरी तिच्या मनांत सारखी धास्ती होतीच, कोणीं येत तर नसेल!

तिकडे बद्रबसीमला कळलें कीं त्याचा मामा समुद्रराजाकडे गेला आहे. त्याच्या रक्षणार्थ एक मोठें सैन्य पण गेलें आहे. कांहीं वेळानें सालिहाबरोबर गेलेले गुलाम पळून आले व त्यांनीं समुद्रराजाकडे झालेल्या रक्तपाताचें वर्णन करून सांगितलें. बद्रबसीमनें विचार केला कीं या सर्वाला कारण तोच आहे. त्याला फार वाईट वाटलें. आपल्या आजीसमोर जाण्यास



देखील त्याला धीर होईना. त्याला वाटलें कीं त्या रक्तपाताबद्दल आपल्याला जबाबदार समजून ती रागावणार. म्हणून तो कोणाला कांहीं सांगितल्याशिवाय घराबाहेर पडला व आपल्या आईकडे जायला निघाला. आजोळी येतांना त्याचा मामा त्याला समुद्रमार्गाची वाट दाखवायला बरोबर होता. परत जातांना त्याला बरोबर वाट सांपडली नाहीं. तो एका निर्जन द्वीपांत येऊन पोंचला. समुद्रराजाची कन्या ज्या द्वीपांत लपून बसली होती तेंच तें द्वीप होतें. हा दैवयोगच. आणि हा देखील दैवयोगच कीं तो ज्या झाडाखालीं विश्रांति घेण्यासाठीं बसला होता त्याच झाडावर राजकन्या बसलेली होती. तिच्यासाठींच तर त्याच्या मामाला स्वतःचा जीव धोक्यांत घालावा लागला होता. पण त्याला किंवा तिला या गोष्टीची कल्पना देखील नव्हती.

बद्रबसीमनें पडल्या पडल्या सहज वर पाहिलें तेव्हां त्याला झाडावर एक चंद्र दिसला. तो दचकून उठून बसला तेव्हां त्याला कळलें कीं तो चंद्र नसून एका चंद्रमुखीचें तें तोंड आहे. त्याला परमानंद झाला. त्यांत जास्त आनंद होण्याचें कारण



म्हणजे त्याच्या मामानें राजकन्येचें जें वर्णन केलें तें तंतोतंत त्या सुंदर तरुणीशीं जुळत होतें. युद्धाचें भय वाटून तीदेखील तिकडे पळून आली असावी असें त्याला वाटलें. तरी मनाची खात्री करून घेण्यासाठीं तो धीर करून गोड आवाजांत विचारूं लागला—

"हे सुंदरी! तूं कोण? आणि या निर्जन स्थानीं झाडावर असें बसून राहण्याचें काय कारण?"

"मी समुद्रराजाची कन्या आहें. माझें नांव, जहानारा! शत्रूनें आमच्या राजवाड्यावर एकाएकीं स्वारी केली व माझ्या

वडिलांना कैद केलें. स्वतःचा बचाव करून घेण्यासाठीं मी इकडे पळून आलें आहें. आतांपर्यंत त्या दुष्ट सालिहानें हालहाल करून माझ्या वडिलांना ठार केलें असेल. मला हुडकून काढण्यासाठीं त्यानें सारा राजवाडा पालथा घातला असेल. या संकटांतून कोण माझें रक्षण करणार? त्या अल्लाची काय मर्जी आहे कोणास ठाऊक?" असें म्हणत ती मुळूमुळू रडूं लागली.

पण बद्रबसीमला फार आनंद झाला. तो म्हणाला—"तुला भिण्याचें मुळींच कारण नाहीं. मीच तो बद्रबसीम राजा आहें, गुलानारचा मुलगा! मी तुझी भेट होईल का, या काळजीनें घर सोडून बाहेर पडलों. त्या अल्लाची मर्जी म्हणून आपली भेट झाली. आतां तुला कसलीच भीति नाहीं. तूं खालीं उतर, मी तुझ्याशीं लग्न करून तुला आपली पट्टराणी करून घेईन. माझें पृथ्वीचें राज्य व तुझ्या बापाचें समुद्रांतलें राज्य दोन्ही मिळून एक मोठें साम्राज्य होईल. आपण दोघें त्यावर राज्य करूं."

जहानारा म्हणाली—"अल्लाची मेहरबानी कीं तुझी व माझी भेट झाली. आतां मला कसलीच भीति नाहीं. तुझ्याशीं माझं लग्न करून देण्यास माझ्या बाबांनीं नकार कां दावा हेंच मला कळत नाहीं. आपण दोघांनीं स्वखुशीनें लग्न करून घेऊं. माझ्या वडिलांच्या अपराधाबद्दल तूं मला माफ कर व आपल्या मामाला पण माफ करायला सांग! तुला पाहाल्यापासून माझें मन जणूं कांहीं हिरावून गेलें आहे." असें म्हणत ती झाडावरून उतरली.

बद्रबसीम प्रेमानें तिचा हात हातांत घेण्यासाठीं पुढें आला. परंतु तिनें त्याला दूर लोटलें व म्हणाली—"दुष्टा! भूमीवर राहणाऱ्या मनुष्या! तुला पक्षीरूप मिळो! तुझी चोंच व पाय तांबडे होऊन जातील."

बद्रबसीमला कळेना कीं प्रेमानें बोलणारी जहानारा एकदम कशी पालटली. त्याला पक्ष्याचें रूप मिळालेलें पाहून तर तो चकितच झाला. लाल तोंड व लाल पाय होते. पंख होते, पण त्याला त्यांच्या सहाय्यानें उडतां येईना. बदकासारखी त्याची स्थिति झाली. त्याला स्वतःच्या स्थितीबद्दल इतकें दुःख झालें कीं त्याच्या डोळ्यांतून अश्रूधारा येऊं लागल्या.








पण जहानाराला त्याच्या दुःखाची पर्वा नव्हती. तिनें आपल्या दासीला सांगितलें की याला धरून उघड्या वाळवंटांत सोड! वाळूंत पोळून मेला म्हणजे माझ्या मनाचें समाधान होईल."

मालकिणीच्या आज्ञेप्रमाणें दासी पक्षी झालेल्या बद्रबसीमला घेऊन निघाली. पण तिनें विचार केला कीं कांहीं वेळानें मालकिणीलाच पश्चात्ताप होईल व ती रागावेल कीं मी रागाच्या भरांत त्याला वाळवंटांत सोडून आणायला सांगितलें असलें तरी तुला थोडा विचार करायला नको होता का? मग आपलीच दुर्दशा व्हायची. याशिवाय तिला बद्रबसीमवर दया आली. त्याच्या सारख्या रूपवानाशीं लग्न करण्यास राजकन्येनें तयार होऊं नये याचें तिला थोडें आश्चर्यच वाटलें. म्हणून तिनें बद्रबसीमला एका बगीच्यांत सोडलें. त्या बगिच्यांत फळझाडें होतीं.

इकडे सालिहानें समुद्रराजाला एका कोठडींत कैद करून ठेवलें व स्वतःला त्याच्या राज्याचा राजा घोषित केलें. राजकन्येचा शोध लागावा म्हणून त्यानें पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. पण त्याला तिचा मागमूसही लागला नाहीं. निराश होऊन तो आपल्या आईला भेटण्यासाठीं निघून गेला. त्यानें बद्रबसीम कोठें आहे म्हणून विचारलें. तेव्हां ती म्हणाली—"मुलींबरोबर कोठेंतरी हिंडायला गेला आहे!" परंतु कांहीं वेळानें मुली परत आल्या. त्यांच्याबरोबर बद्रबसीम नव्हता. तो कोठें आहे हें त्यांना माहीत नव्हतें.

त्याच्या शोधार्थ नोकर व दासदासी धांवले. पण कोणाला पत्ता लागला नाहीं. सर्व घाबरून गेले कीं बद्रबसीम गेला कोठें? सालिहानें बद्रबसीम नाहींसा झाल्याची गोष्ट गुप्तपणें आपल्या बहिणीला कळविली.



बातमी कळतांच गुलनार घाबरून गेली आणि आपल्या माहेरी आली. तिच्या आईला बद्रबसीम कोठें आहे हें कांहींच माहीत नसल्यामुळें ती देखील गुलनारबरोबर रडूं लागली. सालिहानें समुद्रराजाकडे गेल्यानंतर जें कांहीं घडलें तो सर्व वृत्तांत तिनें सांगितला. बद्रबसीमचा पत्ता नाहीं व जिच्यासाठीं एवढें युद्ध झालें ती देखील नाहीं हें ऐकून गुलनारला वाटलें आतां या जगांत जिवंत राहून तरी काय करावयाचें आहे? परंतु तिच्या आईनें तिची समजूत घातली व म्हणाली—"असें निराश होऊन स्वतःच्या जिवाचें बरेंवाईट करून घेणें बरोबर नाहीं. अल्लाची कृपा असेल तर बद्रबसीम सुखरूप घरीं परत येईल व सर्व गोष्टी मनासारख्या होतील. तूं परत आपल्या घरीं जा. बद्रबसीम नाहींसा झाला आहे हें कोणाला कळूं देऊं नकोस. राज्याला कोणी वारस नाहीं म्हणून गादीला हक्कदार निघतील. तेव्हां तूं लवकर परत जा."

गुलनारला आईचा सल्ला पसंत पडला व ती सर्वांचा निरोप घेऊन आपल्या घरीं परत आली. तिच्या वागण्यावरून किंवा बोलण्यावरून बद्रबसीम नाहींसा झाला आहे या गोष्टीची कोणाला शंकादेखील आली नाहीं.



तिकडे जहानाराच्या दासीनें बद्रबसीमला एका बेटावर आणून सोडलें. त्या बेटावर पुष्कळ फळझाडें होतीं व चहूंकडे हिरवळ होती. परंतु त्या निर्जन बेटावर पक्षीरूपानें राहाणें नशिबीं आल्यामुळें त्याला फार वाईट वाटलें. आपल्याला हें पक्षीरूप मिळालें कसें? त्या राजकन्येनें आपल्यावर चेटूक केलें. म्हणजे तिला ती विद्या येत

असावी. त्यानें उडण्याचा यत्न करून पाहिला पण त्याच्या पंखांत शक्तीच नव्हती. उडतां आलें तरी काय उपयोग? आपल्याला कोण ओळखणार आणि कोण सोडवणार? पूर्ण हताश होऊन जमिनीवर अंग टाकून तो पडून होता.

कांहीं वेळानें तो उठला. त्यानें विचार केला, अल्लाची कृपा असेल तर हे दिवसहि जातील. म्हणून स्वतःच्या मनाला धीर देऊन त्यानें कांहीं फळें खाल्लीं व कोणाची नजर पडणार नाहीं अशा जागीं पडून राहिला.

एकदां तो त्या बेटावर हिंडत होता. त्याला एका शिकाऱ्यानें पाहिलें. त्याला तो एक विचित्र पक्षी वाटला. त्याच्या सारखा लाल तोंड व लाल पाय असलेला पक्षी त्यानें त्या पूर्वी कधींच पाहिला नव्हता. तो हळूच पाठीमागून आला व त्यानें जाळें टाकून त्याला धरलें.

त्या शिकाऱ्यानें विचार केला कीं हा एक विचित्र पक्षी आहे. मी जर याला बाजारांत विकला तर लोक याला विकत घेऊन भाजून खाऊन टाकतील. मला किंमत देखील अगदीं बेताचीच मिळेल. पण जर



का राजाकडे घेऊन जाऊन राजाला तो नजर केला तर राजा मोठें बक्षीस देईल. असा विचार करून त्यानें आपल्या देशाच्या सुलतानाला तो पक्षी नजर केला. सुलतानानें त्याला दहा दीनार बक्षीस दिले. शिकारी आनंदानें घरीं परत गेला.

सुलतानानें तो विचित्र पक्षी एका सोनेरी पिंजऱ्यांत ठेवला. तो स्वतः त्याला दाना पाणी देऊं लागला. परंतु तो पक्षी त्याला शिवत देखील नसे. सुलतानाला आश्चर्य वाटलें. म्हणून त्यानें पक्ष्याला पिंजऱ्यांतून बाहेर काढला व त्याच्या समोर फळें व मांसाचे कांहीं तुकडे टाकले. त्याबरोबर तो पक्षी खाऊं लागला. सुल्तानाला आनंद झाला. त्यानें आपल्या गुलामाला बोलाविलें आणि म्हणाला—"आपल्या मालकिणीला जाऊन सांग कीं एक विचित्र पक्षी मी विकत घेतला आहे. तो पक्ष्यांचें खाणें खात नाहीं. त्याला पाहण्यासाठीं यायला बोलाविलें आहे."

सुलतानाचा निरोप ऐकून बेगम तो विचित्र पक्षी पाहाण्यासाठीं आली. परंतु पक्ष्याला पाहाल्याबरोबर तिनें तोंडावर बुरखा ओढून घेतला आणि मागें सरकली.





सुलतानाला आश्चर्य वाटलें. तो तिच्याजवळ जाऊन म्हणाला—"येथें मी व माझा हुजऱ्या आम्ही दोघेच आहों. मग पडद्याची काय गरज आहे?"

तिनें सुलतानाला खूण करून जवळ बोलाविलें व म्हणाली—"तो पक्षी नसून मनुष्य आहे. हा शारिमान व गुलनार यांचा मुलगा बद्रबसीम आहे. समुद्रराजाची कन्या जहानारा हिनें याच्यावर चेटूक करून याला पक्षी केलें आहे. कारण याचा मामा सालिहा यानें तिच्या बापाचा पराभव करून त्याला कैदेंत टाकलें आहे. सालिहानें याच्याशीं तिचें लग्न लावून देण्यासाठीं युद्ध करून तिच्या बापाला कैदेंत टाकलें. या गोष्टीचा तिला राग होता."

बेगमला मंत्रशास्त्र चांगलें अवगत होतें. म्हणूनच वर सांगितल्याप्रमाणें बद्रबसीमचा वृत्तांत ती सुलतानाला सांगूं शकली. सर्व वृत्त ऐकून घेतल्यावर सुलतानानें बद्रबसीमला म्हणजे पक्ष्याला विचारलें—"हें सर्व खरें आहे का?" त्यानें आपले पंख फडफडवून होकार दर्शविला.

"म्हणजे या बिचाऱ्यावर तर फारच मोठें संकट येऊन पडलें आहे. तूं याला लवकर मंत्रबळानें या संकटांतून सोडव. मला दया येते याची." सुलतान आपल्या बेगमला म्हणाला.

बेगमनें भिंतींत बसवलेलें एक कपाट उघडून बद्रबसीमला त्यांत जायला सांगितलें. पक्षी लगेच आंत जाऊन बसला. नंतर ती घरांत गेली व एका भांड्यांत पाणी घेऊन तिनें एक मंत्र म्हटला. मंत्राचा परिणाम पाण्यावर झाला. कारण त्या पाण्याला उकळी फुटली. तिनें त्यांतलें थोडें पाणी घेऊन त्या कपाटांत बसलेल्या पक्ष्यावर शिंपडलें व म्हणाली—"तूं हें रूप सोड



आणि स्वतःचें रूप घेऊन बाहेर ये."

आश्चर्य म्हणजे त्या पक्ष्याचें सर्व अंग एक क्षणभर थरारलें आणि तो पक्षी अदृश्य होऊन त्याच्या जागीं बद्रबसीम प्रगट झाला. सुलतान त्याचें रूप पाहून थक्क झाला. म्हणाला—"तुझ्या या रूपाला साजेल असेंच तुझें नांव तुझ्या आईबापांनीं ठेवलें आहे."

बद्रबसीम सुलतानाजवळ गेला. त्याला लवून मुजरा केला व त्या देशाच्या चालीप्रमाणें सुलतानाच्या हाताचें चुंबन करून म्हणाला—"मी आयुष्यभर आपले व बेगमसाहेबांचे उपकार विसरणार नाहीं."

सुलतानानें त्याला आशीर्वाद देऊन त्याच्या कपाळाचें चुंबन केलें आणि त्याला त्याचा जीवनवृत्तांत सांगायला सांगितलें. बद्रबसीमनें सर्व जीवन वृत्त सांगितलें. तें ऐकून सुलतानानें त्याला विचारलें—"बाळ! तुला माझ्याकडून आणखी कांहीं मदत होण्यासारखी असेल तर तूं खुशाल माग."

बद्रबसीम म्हणाला—"घर सोडून कित्येक दिवस झाले. मला प्रथम स्वदेशीं गेलें पाहिजे. माझ्या गैरहजेरींत काय काय



कारस्थानें झालीं असतील कोणास ठाऊक? मी नाहींसा झाल्यानंतर माझ्या आईवर कोणकोणती संकटें ओढवलीं असतील हें तिचें तिलाच ठाऊक!"

सुलतानानें आपल्या स्वतःच्या गलबतांत बद्रबसीमच्या प्रवासाची व्यवस्था करून दिली. तो स्वदेशीं पोंचला त्यावेळीं त्याची आजी, मामा व आजोळची इतर मंडळी हजर होती. बद्रबसीम सुखरूप परत आलेला पाहून त्यांना फार आनंद झाला.

मुलाला पाहून गुलनारच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागले. त्याच्यावर जीं जीं

       

संकटें ओढवली त्यांचें त्यानें वर्णन केलें व म्हणाला—"जहानारा माझ्याशीं इतक्या दुष्टपणानें वागली असली तरी तिच्याशींच लग्न करण्याचा माझा निश्चय आहे. त्यांत थोडादेखील बदल झालेला नाहीं."

त्याची आजी म्हणाली—"समुद्रराजाचा पराभव करून त्याला तुझ्या मामानें कैद करून आणलें आहे. त्याला हजर करण्यास तिनें सांगितलें. समुद्रराजाला साखळदंडांनीं बांधलें होतें. त्याला बद्रबसीमनें स्वतःच्या हातांनीं सोडविलें आणि म्हणाला—"माझ्या-मुळें आपल्याला फार कष्ट झाले. आतां मी स्वतःच आपणासमोर आपल्या मुलीसाठीं मागणी घालीत आहें. हें आपल्याला पसंत नसेल तर माझें कांहीं म्हणणें नाहीं. तिच्याशीं माझें लग्न झालें नाहीं तर मी राज्य सोडून निघून जाईन. मी आपलें राज्य आपल्याला परत द्यावें अशी आपल्या मामांजवळ मी विनंति करीत आहें."

समुद्रराजाचें मन पालटलें. म्हणाला—"माझ्या मुलीला तुझ्याहून जास्त चांगला वर कोठून मिळणार ? पण ती एका बेटांत लपून बसली आहे. ती माझ्या शब्दाबाहेर नाहीं. मी तिला बोलावून आणतों."

समुद्रराजानें आपल्या खास नोकराला पाठवून जहानाराला बोलाविलें आणि म्हणाला—"मुली ! मी याला तुझ्याशीं लग्न करून देण्याचें वचन दिलें आहे. याच्या-सारखा सुंदर, पराक्रमी, उदार व वैभव-संपन्न बादशाह आणखी कोण असणार ?"

जहानारानें मान हलवून लाजत संमति दिली. सर्वांना आनंद झाला. थाटानें लग्नसमारंभ पार पडला. बद्रबसीमच्या राज्यांत त्याची प्रजा सुखी झाली. [संपूर्ण]





# नवरी फुलराणी

एक जमीनदार होता. त्याचा वाडा म्हणजे एक छोटेखानी किल्लाच होता. जमीन-दारच तो, त्याच्याकडे हजारो एकर जमीन होती. त्याला एकाच गोष्टीची उणीव होती. त्याची बायको लहान वयांतच वारली.

शेजारच्या एका शेतकऱ्याची मुलगी एकदां त्याच्या दृष्टीस पडली. तिला पाहि-ल्यापासून तिच्याशींच लग्न करण्याचें त्यानें ठरविलें. ती गरिबाघरची मुलगी होती. त्याला वाटलें कीं गरिबाची मुलगी आहे. वैभव पाहून भुलून जाईल व विचारल्या-बरोबर लग्नाला तयार होईल. त्यानें त्या मुलीलाच विचारलें.

ती तोंडानें 'हो' म्हणाली. परंतु तिनें मनांत विचार केला, या थेरड्याची खोड मोडली पाहिजे.

"माझ्याशीं ? माझ्याशीं ? पण कां ?" तिनें विचारलें.

पहिल्यानें होकार देऊन नंतर तिनें तो प्रश्न विचारलेला ऐकून जमीनदाराला राग आला. तरी स्वतःला आवरून तो तिची मनधरणी करूं लागला. त्या मुलीनें तितक्याच दृढपणानें नकार दिला.

त्यानें विचार केला, मी तरी खुळा आहें. तिला विचारण्याची गरजच काय, तिच्या बापालाच विचारूं या. त्यानें तिच्या बापाकडे निरोप पाठविला. गरीब शेतकरी धांवत आला व नमस्कार करून दूर उभा राहिला, म्हणाला—"हे पहा, तुझ्यावर जें कर्ज आहेना त्याची परतफेड करण्याची गरज नाहीं आणि तूं ज्या जमिनींत खंडावर शेती करीत आहेस ती जमीनदेखील मी तुझ्या












नांवावर लिहून देईन. पण एका अटीवर. आपल्या मुलीचें लग्न माझ्याशीं करून दे."

शेतकरी म्हणाला—"पाहातों. मुलगी लहान आहे. पण पाहातों. सांगतों तिला. ती माझ्या शब्दाबाहेर नाहीं." शेतकरी घरीं निघून गेला. त्यानें आपल्या मुलीला अनेक प्रकारें समजावून सांगितलें पण ती कबूल झाली नाहीं. ती म्हणाली—"बाबा! त्यानें स्वतःचें सर्व शेत जमीन, वाडा व तिजोरी जरी तुमच्या नांवीं लिहून दिली तरी मी त्या थेरड्याशीं लग्न करणार नाहीं." शेतकऱ्यानें तो प्रश्न पुन्हां काढला नाहीं.

पण जमीनदाराला मात्र आश्चर्य वाटलें. कित्येक दिवस लोटले तरी शेतकरी न आलेला पाहून त्यानें त्याला बोलावून आणण्यासाठीं नोकराला पाठविलें. शेतकरी आला व हात जोडून उभा राहिला. जमीनदार म्हणाला—"काय रे! आपल्या मुलीशीं लग्न करून द्यायला तूं कबूल झालास आणि आतां तोंड दाखवीत नाहींस?"

काय उत्तर द्यावें हें त्या बिचाऱ्याला सुचेना. कांहींतरी बोलायचें म्हणून म्हणाला—"मालक! आमच्याकडून कांहीं उशीर नाहीं. लग्नाची तयारी करावी!"

मुलीनें कबूल केलें का?" जमीनदारानें सरळ प्रश्न केला.

"तिच्या कबुलीची काय गरज? मुहूर्त ठरवून मला कळवा. मी तिला कामाला म्हणून पाठवून देईन. तुम्ही तिच्या गळ्यांत मंगळसूत्र बांधून टाका म्हणजे झालें." शेतकरी म्हणाला.

जमीनदाराला ती युक्ति पसंत पडली. त्यानें लग्नाची सर्व तयारी केली. ज्यांना-ज्यांना बोलावणें पाठविणें आवश्यक होतें त्या सर्वांना त्यानें बोलावणें पाठविलें. भटजींनीं येऊन सर्व आवश्यक तयारी केली.



नंतर जमीनदारानें नोकराला बोलावून त्या शेतकऱ्याच्या घरीं जायला सांगितलें. म्हणाला—"तो कोणाला तरी पाठवीन म्हणाला होता. जाऊन घेऊन ये."

नोकर शेतकऱ्याच्या घरीं गेला आणि मालकाचा निरोप सांगून म्हणाला—"तुम्ही कोणाला तरी पाठवितों म्हणाला होतां. पाठवतां का माझ्या बरोबर?"

"होय, ती त्या पलीकडच्या शेतांत आहे, पहा!" शेतकरी म्हणाला.

नोकर शेतांत गेला. तेथें शेतकऱ्याची मुलगी गवत कापीत होती. तिला तो म्हणाला—"तुझ्या बापानें जमीनदाराकडे कोणाला तरी पाठवायचें वचन दिलें होतें. घेऊन जा म्हणाला शेतांतून!"

मुलीनें विचार केला, असें काय? आणि म्हणाली—"ती काय पलीकडे बांधून ठेवली आहे. ती काळी घोडी!"

नोकर घोडीला सोडून तिच्यावर बसून जमीनदाराकडे गेला. त्याला मालकानें विचारलें—"काय, घेऊन आलास का?"

"हो! फाटकाजवळ उभी केली आहे तिला." नोकर म्हणाला. "वर माडीवर घेऊन जा तिला!" मालक म्हणाला.



"वर माडीवर म्हणतां ? वर नेतां येईल का मला ?" नोकरानें चकित होऊन विचारलें.

मालकाला वाटलें कीं नवऱ्या मुलीला घेऊन एकट्यानें जायला त्याला लाज वाटत असेल म्हणून म्हणाला–"दोघां तिघांना घे बरोबर म्हणजे झालें !"

नोकरानें दोघां तिघांच्या मदतीनें घोडीला वरच्या मजल्यावर जिना चढून पोंचतें केलें आणि मालकाला कळविलें. मालक म्हणाला–"जाऊन बायकांना सांग कीं तिला सजवून ठेवा !"

नोकरानें चकित होऊन विचारलें–"हें काय मालक ?"

"उगाच जास्त बोलत राहूं नकोस. साडी चोळी दाग दागिने सर्व नीट घाला म्हणावें." मालक म्हणाला.

नोकरानें मोलकरणींना जाऊन सांगितलें कीं मालकाची आज्ञा आहे कीं जा वर आणि त्या घोडीला नवऱ्या मुलीसारखें छान सजवा !

मोलकरणींनीं मालकाच्या विक्षिप्तपणा बद्दल आश्चर्य करीत त्याच्या आज्ञेचें पालन केलें. नोकरानें मालकाला सांगितलें कीं सर्व तयारी झाली.

"तर मग घेऊन ये तिला खालीं." जमीनदारानें आज्ञा केली.

जिन्यावर खुरांचा आवाज ऐकून व घोडीचा तो शृंगार पाहून मांडवांत जमा झालेली मंडळी हंसूं लागलीं.

जमीनदाराचें दुसरें लग्न अशा तऱ्हेनें होण्यापूर्वीच संपलें. सर्व वऱ्हाडी मंडळी हंसत आपापल्या घरीं निघून गेलीं. त्यानंतर जमीनदारानें पुढें लग्नाची गोष्ट कधीं काढली नाहीं.



      



# हरपलेलें अमरत्व

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरचें प्रेत काढून तें खांद्यावर टाकलें व स्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"या मध्यरात्रीच्या वेळीं तूं कोणत्या फळाची आशा ठेवून इतका कष्ट सहन करीत आहेस हें मला नाहीं समजत. पण तुला माहीत असेलच, मिळालेलें अमरत्व सुद्धां चारुकेशी सारखा मनुष्य गमावून बसतो. तुझा चालण्याचा श्रम अल्प का होईना, कमी करण्यासाठीं मी चारुकेशीची गोष्ट सांगतों." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

गांधार देशावर वाळवंटांतल्या एका राज्याच्या लोकांनीं स्वारी केली तेव्हां गांधार देशांतील छोटेखानीं राज्यें त्यांना अडवूं शकलीं नाहींत. गांधार देशाच्या प्रजेचा कोणी वाली उरला नाहीं. तेव्हां गांधारेय नांवाच्या एका शूर तरुणानें देशभर हिंडून देशाच्या तरुणांना देश-रक्षणासाठीं आह्वान केलें व त्यांची संघटना करून एक सैन्य उभें केलें. या सैन्यानें शत्रूला देशाबाहेर हांकलून लावलें व गांधार-देश स्वतंत्र केला. गांधारेयच्या अनु-यायांना देखील गांधरेय हेंच नांव पडलें. गांधारेयांच्या प्रयत्नानें गांधार देश पुन्हां शस्यश्यामल व सुखी झाला. गांधारेयांना दुसऱ्याचें राज्य जिंकण्याची महत्वाकांक्षा कधींच नव्हती. म्हणून युद्ध संपल्यानंतर सर्वत्र शांतता नांदूं लागली. आपल्या शक्तीचा सदुपयोग व्हावा म्हणून त्यांनीं शिकार करण्यास सुरवात केली. एकदां ते वसंत ऋतूंत शिकारीसाठीं हिंदुकुश पर्वतावर गेले. त्यांच्या बरोबर गांधरेयचा मुलगा चारुकेशी पण होता. इतर लोक शिकार करीत हिंडत असतां तो एका उंच शिखरावर बसून एका खोल दरीचें दृश्य पाहूं लागला.

पाहतां पाहतां दरीच्या पायथ्याशीं असलेल्या एका सरोवरांतून ढगासारखें कांहींतरी वर आलें. तो ढग चारुकेशी




बसला होता तेथपर्यंत आला व एकदम फुटला व त्यांतून एक विमान प्रगट झालें. त्या विमानांत एक देवकन्या बसलेली होती. तिचें सौंदर्य पाहून चारुकेशी चकित झाला.

विमान चारुकेशीसमोरच थांबलें. देव-कन्या त्याला म्हणाली–"मी चक्रवर्ती विद्याधर याची मुलगी आहें. आमच्या घराण्याच्या सर्व स्त्रियांना विद्याधरनी म्हणतात. कित्येक दिवसांपासून माझें मन तुझ्यावर बसलें आहे. मी आपल्या वडिलांच्या परवानगीनें तुझ्याशीं विवाह करण्याच्या हेतूनें आल्यें आहें. तूं माझ्याशीं लग्न केलेंस तर तुला देखील

अमरत्व लाभेल. तुला वार्धक्य येणार नाहीं व मरणाची भीतिपण उरणार नाहीं. रोगांचें भय नाहीं. आपण दोघं सुखांत वर्षानुवर्षें आयुष्य घालवूं."

चारुकेशीला तें सर्व स्वप्नासारखें वाटलें. त्याला त्या आकस्मिक प्रसंगीं काय करावें हें सुचेना. तो यंत्रवत सरळ विमानांत जाऊन बसला. विमान उडूं लागलें. गांधारेयांनीं तें पाहिलें व मोठमोठ्यानें ओरडूं लागले. परंतु त्यांचा आवाज त्याला ऐकूं आला नाहीं. विमान पर्वत, नद्या, समुद्र ओलांडून विद्याधर लोकांत पोंचलें. चारुकेशीला इतक्या सुंदर देशाची कल्पना देखील नव्हती. तेथील प्रत्येक घर, वृक्ष, लता व लहान लहान रोपटीं इतकीं सुंदर होतीं कीं जणुं कांहीं विश्वकर्म्यानें स्वतःच्या हातानेंच तीं घडवलीं होतीं. तेथें एक देखील कुरूप मनुष्य नव्हता. चक्रवर्ती विद्याधर स्वतः चारुकेशीच्या स्वागतासाठीं सामोरा आला. त्याच दिवशीं चारुकेशी व विद्याधरी या दोघांचें लग्न झालें. राज्यांतले सर्व मानकरी व दरबारी लग्नाला हजर होते.

चारुकेशी स्वदेश व गांधारेय प्रजेला पार विसरून गेला. विद्याधरीच्या सहवासांत



त्याला या सर्व गोष्टींची आठवण कोठून असणार ? चिंता व काळजी नांवाची वस्तु त्याच्या मनाला कधीं शिवली देखील नाहीं. त्यानें इच्छिलेली वस्तु मनांत इच्छा उत्पन्न झाल्याबरोबर समोर हजर होत असे.

कांहीं काळानंतर चारुकेशीचें मन पालटूं लागलें. त्याला स्वप्नें पडूं लागलीं. परंतु तीं स्वप्नें विद्याधर देशाचीं नसून गांधार देशाचीं होतीं. गांधारेय देशांतील लोक शिकारीला कसे जात, पक्ष्यांचे पंख कसे काढीत, रानटी डुकराला मारून कसे उचलून नेत ? त्याचे मित्र व सवंगडी सर्व स्वप्नांत येऊं लागले. एक दिवशीं स्वप्नांतून तो जागा झाला तेव्हां आपण गांधार देशापासून फार दूर आहोंत व स्वदेशीं पोंचणें आतां अशक्य झालें आहे याची त्याला जाणीव झाली व मन फार फार दुःखी झालें. त्या दिवशीं त्याचा उतरलेला चेहरा पाहून विद्याधरीनें त्याला विचारलें कीं काय झालें तुम्हांला ? तेव्हां तो म्हणाला–"स्वप्नांत मला हे हे मित्र भेटले. त्यांच्या बरोबर मी हरणांची शिकार करीत रानांत हिंडत आहें."





कांहीं काळ लोटला. चारुकेशीला स्वदेशाची स्वप्नेंच अधिकाधिक पडूं लागली. विद्याधरी त्याला म्हणे,—"तुझ्या मनांत मर्त्यलोकाचे विचारच नेहमीं येतात म्हणून तुला तीं स्वप्नें पडतात. तुला असें कोणतें सुख तेथें मिळेल असें वाटतें, तें तरी कळूं दे. तेथें रोग, वार्धक्य व मरण यांच्या भयाबरोबर अनेक कष्ट सहन करावे लागतात. हिंवाळ्यांत झाडें वाळून जातात व उन्हाळ्यांत तलाव व सरोवरें आटतात."

तो म्हणे—"उन्हाळ्यानंतर पावसाळा आला व सरोवरें भरलीं कीं पृथ्वीचें रूप बदलतें. सहा ऋतूंचें एकामागून एक येणें व जाणें तूं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेंस तरच तुला त्याच्या आनंदाची कल्पना येईल. फक्त एकच दिवस गांधार देशांत जाऊन यावें वाटतें मला."

पण त्यानें मर्त्यलोकांत जाण्याचें नांव काढलेलें तिला बिलकुल आवडत नसे. परंतु त्यानें फारच आग्रह केल्यावर तिनें तें मान्य केलें. ती म्हणाली—"तुम्ही जा या विमानांत बसून आणि जें जें पहावयाचें आहे, पाहून या. पण चुकून सुद्धां जमिनीवर पाऊल ठेवूं नका. विमानांतून खालीं उतरूं नका." तिनें त्याला बजावून बजावून सांगितलें.

चारुकेशीला पुन्हां स्वदेशाचें दर्शन होणार याबद्दल फार आनंद झाला. तो विमानांत बसून स्वदेशीं गेला. गांधारेय जेथें जेथें शिकारीला जात, जेथें ते शस्त्रास्त्र विद्या शिकत त्या सर्व जागा त्यानें विमानांतच बसून पाहिल्या. परंतु त्याला त्याचा एक मित्रदेखील दिसला नाहीं कीं त्यांचा आवाज ऐकूं आला नाहीं. सर्वत्र शुकशुकाट. तर मग गांधारेय स्वदेश सोडून कोठें निघून गेले आहेत कीं काय?



एका जागीं एक शेतकरी शेतांत काम करीत होता त्याला हांक मारून त्यानें विचारलें—"या प्रदेशांत गांधारेय रहात असत ते कोठें दिसत नाहींत?"

"गांधारेय लोक? त्यांचा काळ लोटून आज तीन शतकें लोटलीं. तूं कोण?" शेतकऱ्यानें चकित होऊन विचारलें.

चारुकेशीला तें खरेंच वाटेना. तो विमानांतून परत निघाला. त्याला आणखी एक दृश्य दिसलें. चार जण डोंगरांत कांहीं तरी खणत होते. एक दगड बाजूला सारण्याचा यत्न मोठ्या कष्टानें ते करीत होते.

मनुष्य जात इतकी का अशक्त झाली आहे? गांधारेय असते तर दोघांनीं मिळून तो दगड बाजूला सारला असता." असें मनाशीं म्हणत आपल्या शक्तीचें प्रदर्शन करण्यासाठीं तो विमानांतून उतरून चालूं लागला. पण दोनच पावलें तो चालला असेल तो खालीं पडला. विमान आकाशांत उडून गेलें. दगड सारणाऱ्यांना त्याचा काळवंडलेला देह मात्र दिसला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगितली आणि विचारलें—"राजा मला एका गोष्टीची शंका वाटते. सामान्यपणें माणसाला अमरत्व हें










दुर्लभ असतां चारुकेशी सारखा समजूतदार मनुष्य सर्व सुखांवर पाणी सोडून आपल्या सुंदर बायकोला सोडून मर्त्य लोकांत यायला कां आतुर झाला? तें देखील मरण आपल्याला निश्चितपणें मिळणार हें माहिती असून? या प्रश्नाचें उत्तर माहिती असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

"चारुकेशीला अमरत्व मिळालें असलें तरी त्याचें मानवत्व गेलेलें नव्हतें. स्वत: जवळ जें नसतें तेंच मिळावें असें माणसाला वाटतें व त्याची उणीव इतकी जास्त भासूं लागते कीं त्यासाठीं मनुष्य वाटेल तो त्याग करायला तयार होतो. म्हणूनच मनुष्य आजपर्यंत प्रगति करीत आलेला आहे. देवलोकांत चारुकेशीला कोणत्या गोष्टीची उणीव असणार? पण मर्त्यलोकांतले बदलणारें नैसर्गिक सौंदर्य देवलोकांत कोठून मिळणार? म्हणून त्याच गोष्टी त्याला स्वप्नांत दिसत. फक्त स्वत: सुख उपभोगल्यानें माणसाच्या मनाचें समाधान होत नाहीं. दुसऱ्याला मदत करून त्याला सुखी करण्यांत देखील एक तऱ्हेचा आनंद वाटतो. त्याच आनंदाच्या शोधार्थ तो धांवला होता. या शिवाय जन्मभूमि ही स्वर्गाहून जास्त प्रिय वाटते मनाला. म्हणून मनुष्य स्वभावाला धरूनच तो जमिनीवर उतरला होता आणि त्याचा परिणाम व्हायचा तोच झाला" राजा म्हणाला.

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवाबरोबर नाहींसा झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.





# खडतर व्रत

एक राजा होता व एक राणी होती. त्यांना बारा मुलें होतीं. पण एक देखील मुलगी नव्हती म्हणून राणीला तिचीच उणीव भासे. नाहींतर मुलगा होत नाहीं म्हणून लोक व्रतें अनुष्ठानें करतात. या उलट मुलगी व्हावी म्हणून राणी देवीच्या देवळांत गेली व पदर पसरून तिनें देवी जवळ मागणें घातलें कीं देवी, मला एक सुंदर कन्या दे. मग मुलें नसलीं तरी हरकत नाहीं.

तोंडानें ती म्हणाली खरी, पण तिनें स्वत:च आपली जीभ चांवली व म्हणाली— "किती मूर्ख व पापिण आहे मी! माझ्या तोंडांतून असे शब्द निघाले तरी कसे?" तिला फार पश्चात्ताप वाटला. पण पुढें कांहीं दिवसांनीं ही गोष्ट ती पार विसरून गेली. आपलें मागणें देवी पुरें करील व आपण जसें मागणें घातलें आहे तसेंच पुरें करील हे तिच्या ध्यानीं मनीं देखील नव्हतें.

देवी नवसाला पावली आणि राणीला नऊ महिन्यांनीं खरोखरच एक कन्यारत्न झालें. तिचीं बाराचीं बारा मुलें बदकें झालीं आणि आकाश मार्गें उडून गेलीं. पुढें तीं कोणाला पुन्हां कधीं दिसलीं नाहींत.

बारा वर्षें लोटलीं. राजकन्या खरोखरच फार सुंदर होती. तिला पाहिलें कीं असें वाटे कीं प्रत्यक्ष देवीचाच अवतार आहे. राजकन्येनें मैत्रिणींच्या व दासदासींच्या तोंडून ऐकलें कीं तिला बारा भाऊ होते व जन्मल्याबरोबर ते बदकें होऊन उडून गेले. परंतु असें कां झालें हें मात्र तिला कळलें नाहीं. घरांत ती एकटीच होती. बरोबर

श्री. का. ना. पवार



खेळायला कोणी नाहीं म्हणून भाऊ नसल्यानें एकटेपणा जास्तच जाणवला. भाऊ कां बदकें होऊन उडून गेले याविषयीं कळावें अशी उत्सुकता अर्थातच जास्त जास्त वाढूं लागली व एक मानसिक आजार होण्यास तें एक कारण झालें. मुलीनें नेहमीं हंसत रहावें व खेळत रहावें असें आईला वाटे. परंतु ती अशी आजाऱ्यासारखी अंथरुणावर पडून राहायची किंवा एकटी कोठें तरी बसून रहावयाची हें पाहून तिच्या आईला काळजी वाटूं लागली. मुलीनें शेवटीं आईला कारण विचारलेंच व आईनें तें इच्छा नसून सांगून टाकलें. त्यावर मुलगी म्हणाली—"म्हणजे माझ्या भावांची अशी स्थिति व्हायला कारण मीच. त्यांना किती कष्ट सहन करावे लागत असतील कोण जाणें ! त्यांना पुन्हां मनुष्य रूप मिळेपर्यंत मी स्वस्थ बसणार नाहीं."

तें ऐकून आईला वाटलें कीं मुलें तर आतां नाहींतच, या मुलीनें देखील जिवाचें बरें वाईट करून घेतलें तर काय होणार ? म्हणून तिनें तिला नकळत तिच्यावर नजर ठेवण्यासाठीं दासदासी नेमल्या. परंतु त्याच दिवशीं रात्रीं राजकन्या राजवाड्यांतून बाहेर दूर रानांत निघून गेली. तिनें बरोबर खायला थोडेंफार घेतलें होतें. सुदैवानें तिला रानांत फळें खायला मिळालीं. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं ती एका झोंपडींत जाऊन पोंचली. त्या झोंपडीच्या चहूं बाजूला फुलवाडी होती. त्या झोंपडींत जेवणाची सर्व तयारी होती व बारा अंथरुणें पण तयार होतीं. इतक्यांत तिला बाहेर कोणी आल्याची चाहूल लागली. नंतर एका मागून एक बारा तरुण आंत आले. तिला पाहून त्या सर्वांना फार वाईट वाटलें. एकजण म्हणाला देखील.



"आपलें दुर्भाग्य कोठून घेऊन आलें तुला कोण जाणे ? एका मुलीमुळेंच तर आम्हांला आपल्या आईबापांपासून पारखें व्हावें लागलें आणि दिवसभर बदक होऊन जगावें लागत आहे. बारा वर्षें झालीं तो शाप लागून."

दुसरा म्हणाला—"म्हणूनच तर मुलगी दिसली कीं तिचा जीव घ्यायचें आम्ही ठरविलें आहे. परंतु तूं इतकी गरीब व भोळी दिसतेस कीं तुझा जीव घ्यायला हात पुढें होत नाहीं. तरी आम्हांला आपली प्रतिज्ञा तरी कशी मोडतां येईल ?"

"मी तुमचीच बहीण आहें. तुम्ही म्हणालांत तें मी कालच ऐकलें आणि तुमच्या शोधार्थ घर सोडून बाहेर निघालें." राजकन्या म्हणाली.

तिच्या भावांना तें ऐकून फार लाज वाटली. आपली बहीण इतकी चांगली आहे आणि आम्ही अशी प्रतिज्ञा कां बरें केली होती !

इतक्यांत दरवाज्यांत एक स्त्री आली आणि त्यांना रागावून म्हणाली—"पुरे झाली तुमची प्रतिज्ञा ! तुम्ही या मुलीचा जीव घ्यायचा विचार नुसता मनांत आणलांत



तर पहा, तुम्हांला या तलावांतलें शेवाळ करून टाकीन मी ! खबरदार तिच्या अंगाला हात लावलांत तर ! ती तुम्हांला शापमुक्त करण्यासाठीं आली आहे. तें तेवढें सोपें नाहीं. तिला खडतर व्रत करावें लागणार आहे. रानांतलें मऊ गवत व शेवाळें आणून त्यांचीं वस्त्रें तुमच्यासाठीं विणून तिनें तयार केली पाहिजेत. यालाच निदान पांच वर्षें लागतील. या पांच वर्षांत तिनें हसतां कामा नये कीं रडतां कामा नये. कोणाशीं बोलतां कामा नये. या तिन्ही पैकीं एक देखील चुकून जरी घडलें तरी व्रतभंग होईल. म्हणून



तुम्ही स्वतःच्या हितासाठीं तिची काळजी वहात राहालें पाहिजे." असें सांगून ती स्त्री अदृश्य झाली.

भावांना तें ऐकून परमानंद झाला. आपला उद्धार करण्यासाठीं धाकट्या बहिणीला हें खडतर व्रत घ्यावें लागणार याबद्दल त्यांना तिची फार दया आली. बाराच वर्षांची तर मुलगी होती ती. त्यांनीं तिच्या रक्षणासाठीं सतत जागरूक राहाण्याचें ठरविलें.

बहिणीनें व्रत सुरू केलें. ती त्यांच्यासाठीं रानटी गवताचे सदरे शिवूं लागली. तीन वर्षें लोटलीं. ती कोणाशीं बोलली नाहीं, हंसली नाहीं कीं रडली नाहीं. तोंपर्यंत आठ सदरे तयार झाले होते.

एकदां ती फुलबागेजवळ रानटी गवत कापीत बसली असतां एका राजकुमारानें बाहेरच्या फाटकाजवळ येऊन तिला विचारलें—"येऊं का आंत?" तिनें मान हलवून होकार दिल्यावर तो आंत गेला. तो म्हणाला—"मी वनापलीकडच्या नगराचा राजा आहें. शिकारीसाठीं आलों होतों या बाजूला. तूं येतेस का आमच्या गांवीं? मी तुझ्याशीं लग्न करून तुला आपली पट्टराणी करीन."

तिनें त्याला पाहिलें तेव्हांपासूनच त्यानें जणुंकांहीं तिचें मन चोरलें होतें. दोघांची दृष्टादृष्ट झाली व मनाची साक्ष मनाला पटली. परंतु तिला आपल्या बारा भावांचा उद्धार करावयाचा होता. व त्यासाठीं तिनें व्रत केलें होतें. तें व्रत अर्धेअधिक पुरें झालें होतें. म्हणून मनांत फार इच्छा असूनदेखील राजकुमार तिच्याशीं बोलूं लागला म्हणजे ती तोंड फिरवून घेई.

शेवटीं तिला राहवलें नाहीं म्हणून राजकुमाराच्या हात हातांत घेऊन तिनें आपली मौन संमति दर्शविली. ती त्या राजकुमाराबरोबर गेली तरी तिच्या भावांना ती कोठें गेली आहे हें कळलेंच. तरी निघण्यापूर्वी तिनें तोंपर्यंत तयार झालेले सदरे व गवत दोन टोपल्यांत घातलें आणि दोन्ही टोपल्या घेऊन निघाली. राजकुमाराच्या नोकरांनीं त्या टोपल्या नेण्याची जबाबदारी घेतली. राजकुमारानें तिला बरोबर घोड्यावर बसवून घेतलें आणि राजधानीकडे निघाला. दोघांचा विवाह थाटामाटानें पार पडला.

तिच्या रूपावरून व वागण्यावरन राजकुमाराची खात्री झाली होती कीं त्याची बायको सामान्य स्त्री नसून कोणीतरी राजकन्याच आहे. परंतु त्याच्या सावत्र आईला वाटलें कीं ती कोणी तरी रानटी जातीची स्त्री आहे व तसें म्हणून दाखवायला देखील तिनें मागें पुढें पाहिलें नाहीं.

परंतु राजकुमार स्वतंत्र विचाराचा होता त्यानें सावत्र आईच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें. राजकन्येनें गवताचे सदरे विणून तयार करण्याचें काम चालू ठेवलें. एक वर्ष गेलें, तिला एक मुलगा झाला. राजाला फार आनंद झाला. सावत्र मुलाच्या मुलाचें बारसें वगैरे सोहळे पाहून सावत्र आईला





हेवा वाटूं लागला. तिनें आपल्या सावत्र मुलाचें व सुनेचें आपसांत वितुष्ट यावें म्हणून प्रयत्न सुरू केला. एकदां तिनें सुनेला भूल यावी म्हणून एक औषध दिलें व तिच्या मुलाला पळवून नेण्यासाठीं उचललें. पण तितक्यांत तिला खिडकींतून एक लांडगा तोंड वासून उभा असलेला दिसला. तिनें त्या मुलाला बाहेर फेंकून दिला. लांडगा मुलाला घेऊन दूर पळून गेला.

नंतर राजमातानें आपलें बोट कापून घेतलें आणि सुनेच्या तोंडाला रक्त फांसून निघून गेली. राजकुमार शिकार करून परत आला तेव्हां सावत्र आईनें त्या रानटी स्त्रीला घरांत पट्टराणी म्हणून आणल्याचा काय परिणाम झाला तें तिखटमीठ लावून वर्णन करून सांगितलें. तिनें नातवाचा अशा तऱ्हेनें अमानुषपणें वध झाल्याबद्दल ओक्साबोक्शी रडण्याचें ढोंग देखील केलें.

बायकोच्या तोंडाला रक्त व मुलगा नाहींसा झालेला पाहून दुःखामुळें व भयामुळें राजा किंकर्तव्य विमूढ उभा राहिला. तरी त्यानें सर्वांना बजावून सांगितलें कीं ही गोष्ट कोणाला कळतां कामा नये. तिनें आपल्या सावत्र आईला सांगितलें कीं कोणी विचारलें तर सांग लांडगा उचलून घेऊन गेला. तिनें होकार दिला. परंतु तिनें आपल्या सावत्र मुलाला जसें सांगितलें होतें तसेंच खोटें सर्वांना सांगितलें.

हें सर्व घडल्याचें सर्वांत अधिक दुःख कोणाला झालें असेल तर स्वतः राजकन्येला. तिचा मुलगा नाहींसा झालेला व तिच्यावरच त्याच्या खुनाचा आरोप! राजाच्या मनांत देखील तोच संदेह आहे असें कळल्यावर तर तिला फारच वाईट वाटलें. तरी तिनें मनाला फार आवरलें व आपल्या भावंडांसाठीं सदरे विणण्याचें काम चालू ठेवलें.



तिचे भाऊ पक्षीरूपानें येत. खिडकींतून ती सुखरूप आहे हें पहात व निघून जात.

आणखी एक वर्ष झालें. अकरा सदरे विणून तयार झाले. बारावा देखील जवळ जवळ पुरा होत आला. थोडाच उरला असेल व तिला पुन्हां दिवस गेले व या खेपेस तिला एक मुलगी झाली.

पहिल्यानें झालें तसें पुन्हां होऊं नये म्हणून राजकुमारानें राणीच्या खोलींत चोवीस तास दास दासींचा पाहारा ठेवला. परंतु दुष्ट राजमातेनें या खेपेस दासींना लांच देऊन राणीला पुन्हां भूल यावी म्हणून औषध दिलें. बेशुद्ध राणीच्या कुशींत झोंपलेल्या मुलीला उचलून घेऊन ती निघाली. तेवढ्यांत तिला खिडकींतून तोंड वासून उभा असलेला तोच लांडगा दिसला. तिनें मागचा पुढचा कांहीं एक विचार न करतां त्या मुलीला खालीं टाकलें. लांडगा मुलीला घेऊन रानांत निघून गेला.

मागच्या प्रमाणेंच राणीनें आपलें बोट कापून घेतलें आणि राणीच्या तोंडाला रक्त फासून मोठमोठ्यानें ओरडूं लागली कीं जाऊन पहा त्या राक्षसिणीनें मुलीला देखील खाऊन टाकलें आहे.



राणी संकटांत पडली कीं काय करावें? बोलावें तर व्रत भंग होणार, रडावें तरी व्रत-भंग होणार? व्रत पुरें होण्यास थोडाच काळ हवा होता. तिनें मनाचा निग्रह केला व प्राण गेला तरी व्रत न मोडण्याचें मनाशीं ठरविलें. बारावा सदरा विणून पुरा करण्यासाठीं ती सर्व शक्ति एकवटून काम करूं लागली.

राजवाड्यांत अनेक बेत होऊं लागले. राजानें तिला पुन्हां रानांत सोडून द्यायचा विचार केला. परंतु राजमातेला तें कबूल नव्हतें. ती म्हणाली–"अशा राक्षसिणीला

जिवंत जाळली पाहिजे!" इतर दरबारी न्यायाधीश वगैरेंचें तेंच मत पडलें. राजकुमार तरी काय करणार? त्यानें आज्ञा केली कीं त्या दिवशीं सायंकाळीं राणीला जिवंत जाळून टाकण्यांत यावें.

ठरल्या वेळीं शिपाई आले व राणीला स्मशानांत घेऊन गेले. ती तो सदरादेखील बरोबर घेऊन निघाली व विणण्याचें काम तिनें चालू ठेवलें. सुदैवानें तो सदरा पुरा झाला व ती चितेवर चढून उभी राहाली आणि म्हणाली—

"मला याविषयीं कांहींएक सुद्धां माहीत नाहीं. प्रथम राजाला बोलावून आणा!"

राणी बोलूं लागलेली पाहून सर्व चकित झाले. आणखी आश्चर्याची गोष्ट म्हणजे, कोठून तरी बारा पक्षी उडत आले. ती त्यांना एक एक सदरा अंगांत घालूं लागली व ते सुंदर तरुण होऊन तेथें उभे राहूं लागले. बारा पक्षी बारा राजकुमार झाले. त्यांनीं आपल्या बहिणीला चितेवरून खालीं उतरवलें.

त्याच वेळीं तेथें राजा आला. तेवढ्यांत कोणी तरी अनोळखी स्त्री आली. तिच्या कडेवर एक मुलगी होती व एक मुलगा तिचें बोट धरून चालत येत होता. तिनें दोघां मुलांना राजकन्येला दिलें व म्हणाली—
"हीं घे तुझीं मुलें!"

हें सर्व दृश्य पाहून राजा तर चकित झालाच तेथें हजर असलेले लोक देखील आश्चर्यचकित झाले. सर्वांना आनंद झाला. राजा राणीला व आपल्या मुलांना घेऊन आनंदानें राजवाड्यांत परत आला. बारा राजकुमार आपल्या राज्यांत परत गेले.






मारुतीनें शंभर योजनें दूर उड्डाण केलें होतें. तरी त्याला दम लागला नाहीं. थकवा थोडा देखील वाटला नाहीं. म्हणून त्यानें विचार केला कीं शेंकडों योजन उड्डाण करणें त्याला सहज शक्य होईल. हा समुद्र ओलांडून जाणें तर अगदीं सोपें.

तो हिरव्या गार जमिनीवरून अर्धांत्रीच उडत चालला होता. डोंगराळ प्रदेशांतली झाडी होती ती. एकदां उतरून ती वनश्री पहावी असें त्याच्या मनाला वाटलें. परंतु त्यानें तो मोह आवरला. रामकार्यास निघालेल्या राम सेवकास वेळ कोठून असणार? म्हणून तो तेथें क्षणभर देखील थांबला नाहीं व तडक लंकेला निघाला.

लंकेच्या चारी बाजूला उंच व सुंदर फुलझाडें व फळझाडें होतीं. उद्यानें होतीं. पुढें सोन्याचा कोट होता. कोणाला आंत प्रवेश मिळूं नये म्हणून चोवीस तास प्रत्येक दारावर राक्षसांचा पाहारा होता. मुख्य मुख्कोटाच्या आंत अनेक बालेकिल्ले व ध्वज स्तंभ होते. गगनचुंबी इमारती उंच डोंगरावर बांधलेल्या असल्यामुळें लंकानगरीला एक अपूर्व सौंदर्य लाभलें होतें. तिच्यासमोर अमरावतीची देखील मान खालीं होत होती.



मारुतीनें नगराच्या रक्षणासाठीं केलेला बंदोबस्त पाहिला. तेव्हां त्यानें विचार केला कीं वानरांचें सैन्य हा समुद्र ओलांडून कसें येणार ? शंभर योजनें समुद्र ओलांडून लंकेला येणें अंगद, नील सुग्रीव वगैरे मोजक्या शूर वानरांना शक्य आहे. पण इतर असंख्य वानर समुद्र पार करून कसे येणार ?

मारुतीच्या मनांत अशीहि एक शंका आली कीं स्वतः महाप्रतापी रामचंद्र तरी कसे लंकेला येऊन रावणाला जिंकणार ? कारण रामचंद्र किती शूर आणि पराक्रमी असले तरी उड्डाण करून लंकेला येऊं शकतील कीं नाहीं या गोष्टीची शंका त्याच्या मनांत सहज आल्या वांचून राहिली नाहीं. नंतर त्यानें विचार केला कीं सीतेला भेटून मग या सर्व गोष्टींचा विचार केलेला बरा. म्हणून लगेच मारुतीनें अणिमा शक्तीचा उपयोग करून लघुरूप घेतलें. फार लहान रूप घेतलें तर लंकेंत प्रवेश करून जायला फार वेळ लागेल. फार मोठें रूप घेतलें तर राक्षसांची नजर चुकवून प्रवेश करणें अशक्य. म्हणून जेथें जसें अनुकूल पडेल तसें रूप घेऊन मारुती पुढें निघाला.

सीतेची भेट घेण्यास सर्वांत उत्तम वेळ म्हणजे रात्रीची वेळ. सूर्यास्तानंतर त्यानें मांजराएवढें रूप घेतलें आणि उड्या मारीत लंकेंत प्रवेश केला. लंकानगरीचें सौंदर्य पाहून मारुतीला आश्चर्य वाटलें. सात सात आठ आठ मजली इमारती व त्यांस सोन्या-चांदीचे खांब आणि भिंती. त्यांवर हिरे व माणकें बसवलेलीं. हें नगर जिंकणें वानर जातीला शक्य होईल का ! मारुतीच्या मनांत तेच तेच विचार सारखे घोळत होते.

मारुतीच्या डोळ्यासमोर एकाएकीं एक भयंकर आकृति उभी राहाली. ती एक राक्षसीण होती. "कोण तूं ! कशाला आला आहेस तूं ! खरें बोलला नाहींस तर तुझा गळा दाबून तुला ठार करीन."



"मी कोण हें मी तुला सांगणारच आहें. पण प्रथम तूं कोण हें सांगशील कीं नाहीं ? तुझें हें आक्राळ विक्राळ रूप पाहून विचारावेंसें वाटलें. तुला काय वाटलें कीं मी तुला पाहून भिऊन जाईन ?" मारुतीनें उत्तर देण्याऐवजीं तिलाच प्रश्न केला.

"मी लंकिणी आहें, रावणाची दासी व सेवीका. मला रावणानें या नगरीच्या रक्षणासाठीं नेमलें आहे. ती राक्षसीण म्हणाली. माझी नजर चुकवून तुला आंत जातां येणार नाहीं. आज माझ्या हातून तुझें मरण निश्चित आहे, हें विसरूं नकोस !" लंकिणी म्हणाली.

"मी आलों आहें तुमचें तें सुंदर नगर, येथील किल्ला, बुरूज व गगनचुंबी इमारती पहायला. नगर पाहून मी आल्या वाटेनें निघून जाईन. मी कांहीं चोरी करणार नाहीं कीं कोणाला कांहीं त्रास देणार नाहीं." मारुती म्हणाला.

मारुतीनें नम्रपणें विनंति केली, परंतु लंकिणीनें त्याला उचलून आवळून ठार करण्याचा प्रयत्न केला. त्याबरोबर मारुतीनें



उग्र रूप धारण करून तिच्या छातींत एक असा मुक्का मारला कीं ती रक्त ओकूं लागली. तेवढ्यावरून तिला मारुतीच्या शक्तीची कल्पना आली. ती बेशुद्ध होऊन जमिनीवर आदळली.

शुद्धीवर आल्यानंतर तिनें मारुतीला हात जोडून नमस्कार केला आणि म्हणाली—"वानरकेसरी ! तूं आपला पराक्रम माझ्या सारख्या अबला स्त्रीसमोर कां दाखविलास ? मी हात जोडतें, तूं मला जीवदान दे ! ब्रह्मदेवानें मला एकदां सांगितलें होतें कीं कोणीतरी वानर येऊन मला जिंकील. त्या



क्षणापासून राक्षसांच्या वैभवाला उतरती कळा लागेल. तें आतां होणार यांत मला शंका नाहीं. रावणानें सीतेला पळवून आणून राक्षस जातीवर विनाकारण स्वतःच्या हातानें हें संकट ओढवलें आहे. तूं नगरांत प्रवेश करून तुला काय वाटेल तें कर. सीतेला पण पाहून ये."

अशा तऱ्हेनें लंकिणीला जिंकून मारुती लंकेचा मुख्य कोट ओलांडून लंकेंत शिरला.

तो राज मार्गावर चालत असतां त्याला वाटेंत वाद्य, नृत्य वगैरेंचा आवाज ऐकूं आला. हंसणें खिदळणें पण ऐकूं आलें. रस्त्यांवर व घरांसमोर तोरणें बांधण्यांत आली होतीं. निरनिराळ्या प्रकारची रंगरंगोटी करण्यांत आली होती.

कांहीं कांहीं घरांसमोरून जातांना मारुतीला आंतून वेदपाठ ऐकूं आला. एका जागीं त्याला राक्षसांचें सैन्य देखील दिसलें.

रावणाच्या खास महालाजवळ मारुती पोंचला तोंपर्यंत चांगला काळोख पडला होता. सोन्याचा बालेकिला आणि आंत सोन्याच्याच भिंती व खांब. मोतीं, हिरे, माणकें वगैरे नवरत्नें त्यांवर बसवलेलीं. सिंहद्वारावर राक्षसांचा पाहारा होता.

मारुतीनें अदृश्यपणें त्या बालेकिल्ल्यांत प्रवेश केला. हत्ती, घोडे बांधलेले होते. रथ ठेवायला सुंदर जागा तयार केली होती. राक्षस स्त्री पुरुष मदिरापान करून झिंडत होते.

तो प्रत्येक घर आणि उद्यान पहात प्रहस्त, महापार्श्व, कुंभकर्ण, विभीषण, महोदर, विरूपाक्ष, विद्युन्माली, वज्रदंष्ट्र, शुक, सारण, इंद्रजित, जंबुमाली, रश्मिकेतु, वज्रकाय, धूम्राक्ष, विद्युद्रूप, विघन, शुकनास, युद्धोन्मत्त, ध्वजग्रीव, ब्रह्मकर्ण, इंद्रजिह्वा, कराल वगैरेंचीं घरें पहात रावणाच्या महालांत शिरला. त्या महालाच्या अंगणांत अनेक रंगाचे घोडे, ऐरावतासारखे हत्ती व सुंदर सोन्याचे दागिने घालून सजून पाहारेकरी उभे होते. त्या महालांत लतामंडप, चित्रशाळा आणि क्रीडास्थलें होतीं. मण्याचे पडदे झुलत होते. पलंग, पाट, भांडीं वगैरे सर्व सामान सोन्याचें होतें. जागोजागीं फुलांच्या माळा, सुगंधी तेलें घातलेल्या समया आणि दीपस्तंभ होते. विश्वकर्म्यानें निर्मिलेल्या महालापेक्षां सुंदर जगांत आणखी कोणता महाल असणार ? त्याला पुष्पक विमान देखील तेथेंच दिसलें.

अत्यद्भुत पुष्पक विमान पाहून मारुती रावणाच्या शयनगृहांत गेला. मध्य रात्रीची वेळ होती. सर्व झोंपीं गेले होते. तेथें मारुतीला सहस्रावधि स्त्रिया दिसल्या. त्यांत देव स्त्रिया, गंधर्व स्त्रिया व राक्षस स्त्रिया होत्या. परंतु त्यांच्यापैकीं एकीला देखील रावण बलात्कारानें घेऊन आला नव्हता. प्रत्येकीचें रावणावर प्रेम होतें.

रावण एका पलंगावर झोंपलेला होता. त्याच्या काळ्या अंगावर चंदन लावलेलें होतें. सुंदर जरीकाठीं रेशमी वस्त्रें त्याच्या अंगावर होतीं. त्यामुळें त्याचें तें भव्य शरीर मंदराचलासारखें भासे. मारुती रावणा-



जवळ गेला. नंतर भ्याल्यासारखा मागें सरकला. जवळ ठेवलेल्या शिड्यांवर चढून तो रावणाला पाहूं लागला. झोंपलेल्या स्त्रियांमध्यें सीता तर नसेल ना, असा विचार करून त्यानें चारी बाजूला एक नजर फिरविली, तेव्हां रावणाच्या पलंगावर त्याला मंदोदरी दिसली. तिला पाहून त्याच्या मनांत शंका आली. ही सीता असेल का ? पण लगेच दुसरा विचार त्याच्या मनांत आला. रामाच्या वियोगानें सीता रडत असणार. ती निश्चितपणें कोठून खाणार किंवा झोंपणार ? ती सीता असणें शक्यच



नाहीं अशी मनाची खात्री झाली. सीता जिवंत असेल तर ती या स्त्रियांमध्यें नसणार, आणखी कोठेंतरी असेल. पुन्हां आणखी एक शंका त्याच्या मनांत आली. सीतेनें रामाच्या विरहानें आत्महत्या तर करून घेतली नसेल? तर मग सर्व यत्न निष्फळच इतकें दूर येऊन व परिश्रम करून सीतेचें दर्शन घडल्याशिवायच का मला परत जावें लागणार? तो विचारांत पडला.

हनुमान प्रत्येक घरांत गेला व प्रत्येक खोली त्यानें हुडकून पाहिली. पण सीता कोठें दिसली नाहीं. शेवटीं रस्ते, गल्ल्या, मांडव, विहरी व बावड्यासुद्धां त्यानें पाहाल्या. नंतर आणखी एक शंका त्याच्या मनांत आली. सीता लंकेंत नसेलहि कदाचित! रावण सीतेला उचलून समुद्र ओलांडीत असतां ती समुद्रांत पडली असेल. मी सीतेला पाहाल्याशिवाय परत गेलों तर राम उपोषण करून प्राण सोडील. त्याचा भाऊ जीव देईल. सुग्रीव व अंगद त्या दुःखानें मरतील. म्हणून सीता जोपर्यंत दृष्टीस पडत नाहीं तोंपर्यंत मी लंका सोडणार नाहीं. येथें लंकेंतच फलाहार करून पडून राहीन. शेवटीं सीता दिसलीच नाहीं तर अन्न त्याग करून प्राण देईन. मारुतीनें मनाशीं निश्चय केला.

रात संपत आली होती. किल्ल्याच्या भिंतीवर चढून त्यानें मागें वळून पाहिलें तेव्हां त्याला अशोकवाटिका दिसली. सहज त्याच्या मनांत आलें, या वाटिकेंत सीता आहे का पहावें. त्याला अशोक वृक्षांबरोबर आंबे, पेरू व इतर फळझाडें दिसलीं. मारुती स्वतःला आवरूं शकला नाहीं. विद्युत् वेगानें तिकडे गेला. त्याच्या वेगानें झाडावरचीं फुलें गळून पडूं लागलीं. पक्षी घाबरून ओरडूं लागले. मारुतीनें जोरानें















झाडें हलवून फळें खालीं पाडलीं. लता व वेली ओरबाडून खालीं पाडल्या.

अशोक वाटिकेंत अनेक सुंदर इमारती होत्या. कृत्रिम वृक्ष व डोंगर होते. हे पर्वत मुख्यत: विहार करण्यासाठीं बनविलेले होते. पर्वताच्या चहुंकेर झाडी होती. त्या झाडींत घरें होतीं. डोंगरावरून एक नदी वहात खाली मैदानांत येत होती. नदीपासून दूर एका तलावांत निरनिराळ्या रंगाचीं व जातींचीं कमळें होतीं. एक थंड पाण्याचें सरोवर एका बाजूला होतें. या सरोवराच्या कांठीं रत्नखचित घाट होता. कांठावर मोतीं वाळूसारखे पडलेलें होते. सरोवराच्या काठा-काठानें सुंदर घरें बांधलेलीं होतीं.

मारुतीला एक दाट पानांचा, सोन्याचा चौथरा असलेला एक शिंशुपा वृक्ष दिसला. नंतर सोन्यासारखी चमकणारीं कांहीं झाडें दिसलीं. त्याला वाटलें कीं या झाडांनाच सोनें लागत असावें. त्या सुवर्ण वृक्षांच्या मध्यभागीं त्याला एक अशोक वृक्ष दिसला. तो अशोक वृक्ष हवेनें हलला कीं बांगड्यांचा आवाज होई. हनुमानाला आश्चर्य व कुतूहल वाटलें.

तो चटकन शिंशुपा वृक्षावर चढला. त्यानें विचार केला. हे अशोक वन किती रमणीय आहे ! सीता रोज येथें येत असावी. तिला विहार करण्यासारखेंच हें वन आहे. स्नानासाठीं शेजारींच एक सुंदर सरोवर आहे. सीतेसाठीं अशोकवन व अशोकवना-साठीं सीता,–दोघांची निर्मिति जणुंकांहीं परस्परांसाठींच झालेली असावी. सीता जिवंत असेल तर याच वनांत असणार किंवा विहार करण्यासाठीं येत असणार. मी तिचें दर्शन घेणार !"





# २५. लुंग मेन बुद्ध

होनानच्या लुंगमेन खोऱ्यांत चवथ्या शतकांत बुद्धाची एक भव्य प्रतिमा डोंगरांत गुहेंत दगड कोरून बनविण्यांत आली. अफगाणिस्तानांतून गेलेल्या गांधार शिल्पकलेचा प्रभाव या मूर्तीवर स्पष्ट दिसतो. या भागांत बुद्धाच्या अनेक मोठमोठ्या मूर्ती आहेत.












# भारताचा इतिहास



फिरोज शाह वारल्यानंतर त्याचा नातू तुघलक शाह ग्यासुद्दीन तुघलक द्वितीय या नांवानें सुलतान झाला. परंतु कांहीं वरिष्ठ अंमलदार व अमीर उमरावांनीं कट करून ता. १९ फेब्रुवरी १३८९ या रोजीं त्याचा वध करविला. त्यानंतर त्यांनीं सर्वांनीं मिळून त्याचा एक नातेवाईक अबू बकर याला दिल्लीच्या गादीवर बसविलें. मध्यंतरी फिरोज शाहचा मुलगा नासिरुद्दीन महंमद याला त्याच्या अनुयायांनीं सायान नजीक सुलतान केलें. अबू बकर आपल्या विरोधी सरदारांचा बिमोड करूं शकला नाहीं व त्यानें १३९० मध्यें गादीवरचा हक्क सोडून दिला. नासिरुद्दीन पण आजारी पडला व सन १३९४ मध्यें मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा मुलगा हुमायून गादीवर बसला. त्यानें कांहीं दिवस राज्य केलें व तो देखील मार्च महिन्याच्या ८ व्या तारखेस मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा सर्वांत लहान मुलगा नासिरुद्दीन महंमद गादीवर बसला. हाच तुघलक वंशांतला शेवटचा सुलतान. फिरोज शाहच्या मोठ्या मुलाचा मुलगा तुसुत शाह त्याचा एक प्रतिस्पर्धी होता. कांहीं वरिष्ठ अंमलदारांच्या मदतीनें गादी बळकावण्याच्या प्रयत्नांत तो विद्रोही सरदारांच्या हातीं मारला गेला.

फिरोज नंतर तुघलक घराण्यांतले सर्व सुलतान निर्बळ होते. म्हणून साम्राज्याचे संरक्षक होऊं शकले नाहीं व त्याचे तुकडे तुकडे झाले. दिल्लीच्या अंमलदारांमध्यें आपसांत भांडणें होतीं व ते ह्या किंवा त्या सुलतानाची बाजू घेऊन आपल्या शक्तीचा अपव्यय करीत राहिले. यामुळें दिल्लीचें राज्य कमकुवत होत गेलें. जोनपुर, गुजरात, माळवा, खानदेश, ग्वाल्हेर, मेवात इत्यादि स्थानांचे अंमलदार व हिंदू मुसलमान प्रतिनिधि स्वतंत्र झाले.

दिल्लीचें साम्राज्य अशा प्रकारें व खिळखिळें झालें असतां अमीर तैमूर यानें हिंदुस्थानावर स्वारी केली. त्याचा जन्म १३३६ मध्यें ट्रान्स एशियाना देशाच्या केश नामक स्थानीं झाला. तो १३६९ मध्यें समरकंदच्या गादीवर बसला व आपलें साम्राज्य वाढविण्यासाठीं त्यानें इराण, अफगाणिस्थान, पेसोपोकेदिया इत्यादीवर स्वाऱ्या केल्या. भारताच्या वैभवाचें वर्णन ऐकून त्याची दृष्टी भारताकडे वळली.



तैमूरचा नातू महंमद यानें १३९८ मध्यें मुलतानवर स्वारी केली व सहा महिन्यांनीं त्यानें तें शहर जिंकलें. १३९८च्या एप्रिल मध्यें तैमूर स्वतः एक मोठें सैन्य घेऊन समरकंदहून निघाला. सिंधू, झेलम, रावी, चिनाव वगैरे नद्या ओलांडून त्यानें त्याच वर्षीं अक्टोबरच्या १३ तारखेला मुलतान पासून ७० मैलावर तलंब या जागीं तळ दिला. त्यानें तलंब शहर लुटलें. तेथील लोकांची कत्तल केली आणि कांहीं लोकांना कैद केलें. वाटेंत अनेक नगरें लुटीत, कत्तल करीत डिसेंबरच्या अखेरीस तो दिल्लीस येऊन पोंचला. त्यानें सुमारें एक लाख कैद्यांची कत्तल केली. सुलतान महंमद मुल्ला इकबाल यानें डिसेंबरच्या १७ तारखेस १० हजार घोडेस्वार व ४० पैदळ सैन्य घेऊन १२० हत्तींसह तैमूरला थोपवून धरण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा पराभव झाला व त्याला पळून जावें लागलें. दुसऱ्या दिवशीं तैमूर दिल्ली शहरांत शिरला. कित्येक दिवस लूट चालू होती. नागरिकांची अमानुषपणें कत्तल करण्यांत आली. सहस्रावधी लोक तुर्कांच्या हातीं कैद झाले. उत्तमोत्तम

वस्तूंचा संग्रह समरकंदला नेण्यांत आला व तेथें तैमूरलंग याच्या योजनेप्रमाणें जुम्मा मशीद बांधण्यांत आली.

तैमूरला भारतांत राहण्याची इच्छा नव्हती. तो दिल्लीला फक्त १५ च दिवस राहिला. परत जातेवेळीं त्यानें फिरोजाबाद (१३९९ च्या जानेवारींत) व मीरत जिंकून हरिद्वार नजीक कांगडा येथें १६ जानेवारी रोजीं दोन हिंदू सैन्यांचा पराभव केला. नंतर त्यानें जम्मू शहराची लूट केली व असंख्य प्रजेची कत्तल केली. तो मुल्तान लाहोर, दीमालपुर इत्यादींची राज्यव्यवस्था पाहण्यासाठीं खिज्रखान सैयद याची नेमणूक करून सिंधू नदीपलीकडे गेला. तैमूरलंगच्या स्वारीमुळें भारताचें जेवढें नुकसान झालें तितकें कोणत्याहि परकीयाच्या स्वारीनें झालें नाहीं. तैमूर निघून गेल्यावर दिल्ली येथें दुष्काळ पडला. जे लोक उरले होते ते देखील दुष्काळांत बळी पडले. असें सांगतात कीं दोन महिने दिल्ली ओसाड पडली होती व तेथें पक्ष्यांचें देखील वास्तव्य नव्हतें. दिल्लीचें राज्य तसेंच ढांसळत आलें होतें. तैमूरच्या स्वारीमुळें तें कोलमडून पडलें. १३९९ मध्यें नुसूत शाहनें सुल्तान होण्याचा यत्न करून पाहिला. परंतु मुल्ला इकबाल यानें त्याला हुसकावून लावलें. १४०१ मध्यें मुल्ला दिल्लीला आला. त्यानें महंमद शाहला देखील बोलावून घेतलें. १२ नोव्हेंबर १४०५ या रोजीं खिज्रखान याच्या हातीं मुल्ला इकबालचा अंत झाला. महंमद शाह पुन्हां सुल्तान झाला. २० वर्षें पर्यंत तो नांवापुरता सुल्तान होता. १४१३ मध्यें तो मरण पावला व त्याच्याबरोबर तुघलक वंश देखील संपुष्टांत आला.





# महाभारत

नंतर व्यास मुनींनीं मृतकांना परत जाण्यास सांगितलें. सर्व आपापल्या वाहनांत बसून पुन्हां गंगेंत उतरले व आपापल्या लोकांत निघून गेले.

व्यास मुनि स्त्रियांकडे वळून म्हणाले— "ज्यांना ज्यांना आपल्या पतीबरोबर जाण्याची इच्छा असेल त्यांनीं गंगेंत उतरावें." धृतराष्ट्राच्या सुना आपल्या सासूसासऱ्यांच्या अनुज्ञेनें गंगेंत उतरल्या. त्यांनीं सर्वांनीं आपापले भौतिक देह गंगेंत सोडले व दिव्य देह धारण करून आपल्या पतीबरोबर प्रस्थान केलें. सर्व जोडपीं आपापल्या विमानांत बसून परलोकीं गेलीं.

त्यानंतर धृतराष्ट्र इतर लोकांबरोबर आपल्या आश्रमांत परत आला. व्यास मुनींनीं धृतराष्ट्राकरवीं सर्वांस परत जाऊन राज्यकारभार पाहण्यास सांगितलें. धृतराष्ट्र युधिष्ठिराला म्हणाला—"मुलांनो! आतां तुम्ही सर्व परत जा! तुम्ही येथें असेपर्यंत तपश्चर्या करणें शक्य नाहीं. मी हस्तिपुरांत राहिलों असतों तर जितकें सुख मला मिळालें असतें तितकेंच येथें आहे.

धृतराष्ट्रादिकांचा निरोप घेत असतां विशेषेंकरून आईचा निरोप घेत असतां युधिष्ठिराचा पाय अडखळला. परंतु कुंतीनें स्वतःच पुढें येऊन प्रेमानें निरोप दिल्यावर त्याला नकार देववला नाहीं. तो अंतःपुरांतील स्त्रिया, इतर लोक व नोकरांचाकरांसह हस्तिनापुरास परत आला. धृतराष्ट्र वनवासास जाऊन तीन वर्षें लोटलीं. एकदां नारद मुनि युधिष्ठिराला भेटण्यासाठीं आले.












युधिष्ठिरानें आदरपूर्वक त्यांना बसावयास सांगून कुशल प्रश्न केले.

नारद मुनि म्हणाले—" युधिष्ठिरा! तुला भेटून पुष्कळ वर्षें लोटलीं. तीर्थदर्शन करीत मी तुला भेटायला आलों आहें."

"गंगाकाठच्या लोकांच्या तोंडीं मी ऐकलें आहे कीं आमचे काका धृतराष्ट्र तपश्चर्या करीत आहेत व त्यामुळें त्यांचें शरीर फार कृश झालें आहे. तुम्ही त्यांना भेटून आला असाल? त्यांनी गांधारी, कुंती व संजय यांची कुशलवार्ता आम्हांला सांगितलींत तर मी आपला फार आभारी होईन." युधिष्ठिर म्हणाला.

"युधिष्ठिरा! अरे, मी जें कांहीं पाहिलें किंवा ऐकलें तें सांगतों. ऐक. तूं आल्यानंतर धृतराष्ट्र, गांधारी, कुंती व संजय गंगेच्या काठाकाठानें तिच्या मुखाकडे निघाले. त्यांच्याबरोबर हवन आदि करणारे इतर लोक व तपस्वी देखील निघाले. वाटेंत तुझ्या चुलत्यानें सहा महिने मौनव्रत घेतलें व तो वायुभक्षण करून राहिला. त्याची तपश्चर्या पाहून ऋषीमुनींनीं देखील तोंडांत बोटें घातलीं. त्याचें शरीर म्हणजे फक्त हाडांचा सांपळा मात्र उरला. गांधारीनें फलाहार केला. कुंती एक महिना निराहार राहिली. संजय प्रत्येक सहा प्रहर लोटल्यावर आहार घेत असे. नंतर धृतराष्ट्र रानांत थोडा हिंडूं फिरूं लागला. गांधारी व कुंतीदेखील त्याच्याबरोबर जात. संजयाचा हात धरून धृतराष्ट्र व कुंतीचा हात धरून गांधारी चालत असे. एकेदिवशीं गंगास्नान करून सर्व आश्रमांत परत येत असतां एक मोठें वादळ आलें व वणवा पेटला. धृतराष्ट्राचा देह मुळांतच निराहार तपश्चर्या करीत राहल्यामुळें थकला होता. त्याला धांवणें



किंवा पळणें शक्यच नव्हतें. गांधारी व कुंती तर स्त्रियाच व त्यांत वार्धक्य आणि उपास केल्यानें अगदीं थकल्या होत्या. वणवा जवळ जवळ येऊं लागला तेव्हां धृतराष्ट्रानें संजयाला हांक मारून पळून जाण्यास सांगितलें. म्हणाला—" तूं धडधाकट आहेस. आमच्याबरोबर तूं असहाय स्थितींत कां मरतोस?" पण संजयाला तें कसें पसंत पडणार? त्याबरोबर वृद्ध धृतराष्ट्र, गांधारी कुंती वगैरेंना कसें वांचवावें हें देखील त्याला कळेना. धृतराष्ट्रानें पुन्हा आग्रह करून पळून जायला सांगितलें. म्हणाला—" आम्ही तपस्वी! या देहाचें कार्य संपलेलें. अर्थात देह ठेवण्यास स्वतःच तयार झालों आहों. पण तुला तसें करण्याचा अधिकार नाहीं." तेव्हां अगदीं नाइलाज झाल्यामुळें संजय जाण्यास तयार झाला. धृतराष्ट्र, गांधारी व कुंतीसह पूर्वेकडे तोंड करून बसले. संजयानें त्यांना प्रदक्षिणा करून नमस्कार केला आणि निघून गेला. गंगाकाठच्या लोकांना ही वार्ता देऊन तो कोठेंतरी निघून गेला आहे. अशा तऱ्हेनें धृतराष्ट्र आदिकांचा शेवट झाला. त्यांचीं आगींत जळलेली शरीरें मी पाहिलीं आहेत."



ती दुःखद व करुणाजनक वार्ता ऐकून सर्व पांडव हळहळले. सर्व हस्तिनापुरावर शोककळा पसरली.

युधिष्ठिर आपला शोकावेग आवरून म्हणाला—" इतकी खडतर तपश्चर्या करून आम्ही सर्व जिवंत असतां आमच्या काकांना काकूंना, व आईला अशा परिस्थितींत मरावें लागलें. पोटचीं मुलें पटापट मेल्यामुळें गांधारी माउलीला किती दुःख सहन करावें लागलें. आम्ही येथें ऐश्वर्य भोगीत आहों आणि आमची माता असहाय अवस्थेंत











आगींत जळून मरावी ? कशाला हें राज्य व कशाला हें ऐश्वर्य ? आम्हांला त्यांच्याबरोबर त्या वणव्यांत मरण आलें असतें तर बरें झालें असतें ? प्रत्यक्ष काळाला जिंकण्याची शक्ति जिच्या मुलांत आहे तिला अशा तऱ्हेनें मृत्यु यावा ? अग्नीला अर्जुनानें जी मदत केली होती ती सर्व फुकट गेली म्हणावयाची ? अग्नीचा हा किती कृतघ्नपणा कीं त्यानें आपल्या सहाय्यकर्त्याच्या मातेचाच अशा तऱ्हेनें वध करावा."

शोकावेगानें दु:खी कष्टी पांडवांना थोडा धीर देऊन नारदानें आणखी एक बातमी सांगितली. म्हणाला—"सामान्य वणव्यांत धृतराष्ट्र जळून मेला नाहीं. त्यानें वायुभक्षण करून तपश्चर्या केली होती. हवनादि संपूर्ण करून अग्निकुंड तसेंच सोडून देण्यांत आलें होतें. हवन करणाऱ्या ब्राह्मणांनीं निर्जन स्थानीं हवनकुंड तसेंच सोडून दिल्यामुळें वणवा पेटला. मला ही गोष्ट ऋषी व मुनींकडून कळली. म्हणून एक तऱ्हेनें स्वत: पेटवलेल्या अग्नींतच धृतराष्ट्राचा देह जळला व तो सर्वोच्च लोकाचा अधिकारी झाला आहे. आतां तूं आपल्या भावंडांसह त्यांचें श्राद्ध व तर्पण कर."

नंतर युधिष्ठिर आपल्या चौघां भावांबरोबर गंगा नदीच्या तीरावर गेला. तेथें त्यानें धृतराष्ट्र, गांधारी व कुंती तिघांची शास्त्रोक्त विधीप्रमाणें अन्त्येष्टी क्रिया केली. ते नगराबाहेरच कांहीं काळ राहिले. धृतराष्ट्र आदिकांनीं जेथें देह ठेवला तेथें जाऊन शास्त्रोक्त विधीप्रमाणें कर्तव्य तें केलें. दहा दिवस सुतक, तेराव्या दिवशीं श्राद्ध तर्पणादि केलें. सुवर्ण, चांदी यांच्या दानाबरोबर गोदान पण केलें.

नंतर युधिष्ठिरानें हस्तिापुरांत प्रवेश केला. नारद मुनि शेवटपर्यंत युधिष्ठिराजवळ हजर होते. नंतर युधिष्ठिराचा व पांडवांचा निरोप घेऊन निघून गेले.






[ २३ ]

[ श्वानकर्णी व मार्जार यांच्या अनुयायांच्या मदतीनें लखू व त्याचे साथी कैदेंतून सुटले. त्यांनीं सर्वांनीं पंखवाल्या जातीच्या झोंपड्यांना आग लावली. त्या गडबडींत त्यांना पळून जाण्यास छान संधी मिळाली. परंतु शत्रूनें त्यांना मगरींच्या तलावाजवळ पुन्हां घेरलें. तितक्यांत श्वानकर्णी व मार्जार आपल्या अनुयायांसह त्यांच्या मदतीला धांवले. त्यांचा आवाज त्यांना ऐकूं आल्यावर त्यांना नवीन चेव चढला—पुढें वाचा. ]

एक दोन मिनिटें पंखवाल्या लोकांशीं त्यांचें युद्ध झालें. मार्जार व श्वानकर्णींचा आवाज ऐकून पंखवाल्यांचा धीर खचला तर लखू व त्याच्या साथी अनुयायांना नवा चेव चढला. सर्वांनीं मिळून पंखवाल्या लोकांना मगरींच्या तलावांत रेटीत न्यायला सुरवात केली. गोमांगनें खालीं पडलेला भाला उचलून घेतला आणि पंखवाल्यांना मागें रेटूं लागला. तो लखूला म्हणाला—"आतां आपल्याला कसलीच भीति उरली नाहीं. आपल्या हातांत शस्त्र असल्यावर आपल्यावर हल्ला करण्याची कोणाची छाती आहे ? तूं देखील अगदीं निर्भयपणें पुढें होऊन लोळव सगळ्यांना."

गोमांगचा हल्ला परतविण्याची शक्ति पंखवाल्यांत नव्हती. ते ओरडत मागें सरकत



होते व हताश होऊन मगरीच्या तलावांत पडत होते. तें पाहून उरलेल्या पंखवाल्याचा धीर पूर्णपणें खचला. ते मागें फिरले व ओरडूं लागले—"सरदार! तिकडे धोका आहे. श्वानकर्णा व मार्जार आपल्या अनुयायांसह आले आहेत."

तें ऐकून सर्व पंखवाले वाट फुटेल तिकडे पळूं लागले. गरुडराजानें देखील विचार केला कीं स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं पळून जाण्याखेरीज दुसरा उपाय नाहीं. त्याचे अनुयायी त्याच्या आज्ञेची वाट पाहाण्याशिवायच पळूं लागले होते. ब्रह्मदंडी मांत्रिक आपली जादूची कांडी फिरवीत मोठमोठ्यानें ओरडूं लागला—"जय काळभैरव! गरुडराजा! आतां आपले ग्रह आपल्या विरुद्ध आहेत. काळभैरव आपल्यावर रागावलेला दिसतो आहे. म्हणून आपण आतां येथून पाय काढण्यांतच शहाणपण आहे. चल आपण रानांत पळून जाऊन तेथें दबा धरून बसूं या!"

"मांत्रिका! माझा सुद्धां तोच विचार आहे. आम्हां गरुडजातीच्या लोकांना रात्रीं कांहीं दिसत नाहीं. सूर्योदय होऊं दे. मग दाखवूं आम्ही आपला प्रताप." असें सांगून तो पळाला.

इतक्यांत शक्तिवर्मा व जितवर्मा पण पळत तेथें येऊन पोंचले. त्यांच्या तलवारी तुटलेल्या होत्या. त्यांचीं अंगें रक्तबंबाळ झालेलीं होतीं. त्यांना पाहून ब्रह्मदंडीला जिवांत जीव आल्यासारखें वाटलें. तो म्हणाला—"त्यांनीं तुम्हांला कत्तल करून टाकलें असावें असें वाटलें होतें मला! बरें झालें तुम्ही आलांत."

"आमची कत्तल? कोण करणार?" जितवर्मा मोठमोठ्यानें हंसून म्हणाला. "हा पहा आमच्या तलवारी आणि रक्तानें



माखलेलीं आमचीं अंगें. किती शत्रूंना आम्ही यमसदनाला पाठविलें हें आमचें आम्हांलाच माहीत तलवारी तुटल्या म्हणून....नाहींतर...."

जितवर्माच्या त्या फुशारक्या ऐकून महाकाय मोठ्यानें हंसून म्हणाला—"तुम्हां दोघांपैकीं एकानें देखील शत्रूचें तोंड पाहिलें असेल तर शपथ! कोठें तरी झाडावर नाहींतर झुडपाआड लपून बसलां असाल झालें."

जितवर्मा व शक्तिवर्मा आपल्या मोडक्या तलवारी घेऊन महाकायाला मारण्यासाठीं त्याच्या अंगावर धांवले. तेव्हां गरुडराज त्यांना दरडावून म्हणाला—"पुरे करा तुमचा हा खेळ खंडोबा! तुमच्याचमुळें पहा केवढें मोठें संकट आलें आहे तें. तुमचा पाहारा असतां ते दोघे कसे निघाले हें सांगा. त्याचें समाधानकारक उत्तर दिलें नाहींत तर आमच्या कुलदेवीच्या मनःशांतिसाठीं तुम्हां दोघांना येथल्या येथें बळी देतों."

तिकडून गुहावासी जवळ जवळ येत असल्याचें ऐकूं आलें. ब्रह्मदंडी मांत्रिकानें गरुडराजाचा हात धरला व त्याला म्हणाला—"गरुडराजा! थोडा शांत हो! ते रानटी



गुहावासी जवळ जवळ येत आहेत. आपण वेळींच पळून गेलों नाहीं तर सर्वांचाच बळी त्या कुत्र्या मांजरांच्या देवीला दिला जाईल."

ब्रह्मदंडी बोलतच होता. त्याचें बोलणें पुरें होण्यापूर्वीच गरुडराज रानांत शिरला. महाकाय, ब्रह्मदंडी, जितवर्मा व शक्तिवर्मा त्याच्या पाठोपाठ पळाले.

जितवर्मा शक्तिवर्माला म्हणाला—"हें पहा शक्तिवर्मा! आपण शत्रूचा नाश करण्यासाठीं आपला जीव धोक्यांत घातला तो फुकट गेला. त्या पंखवाल्याच्या नादाला











लागून हा मांत्रिक देखील आमच्या शौर्यावर शंका करूं लगला आहे."

"अरे ते दोवेच काय? हा मांसाचा गोळा महाकाय देखील आपला अपमान करीत आहे. चांगल्या तलवारी मिळूं तर दे. पहिल्यानें या तिघांचा समाचारच घेऊं!" शक्तिवर्मा म्हणाला.

इतक्यांत "मार्जार की जय" असा जयघोष दुरून ऐकूं आला आणि त्याच्या पाठोपाठ भाल्यांचीं पातीं झळकत असलेलीं दिसलीं. "पळा! शत्रु अगदीं जवळ येऊन ठेपला आहे. तोंडें बंद करा बघूं तुम्ही दोघे." असें दोघांना दटावून सांगत ब्रह्मदंडी हरणासारखा टुण दिशी उडी मारून जोरानें धांवला.

लखू आपल्या अनुयायांबरोबर आणि मार्जार व श्वानकर्णीच्या अनुयायांसह गरुड-राजाच्या झोंपडीजवळ पोंचला तेव्हां त्याला तेथें एक देखील पंखवाल्या जातीचा मनुष्य दिसला नाहीं. आलेल्या संकटाला तोंड देणें अशक्य आहे हें ओळखून सर्व पळाले आहेत हें कळायला त्यांना फारसा वेळ लागला नाहीं. परंतु काळोखांत त्यांचा पाठलाग करून त्यांना गाठणें देखील शक्य नव्हतें. म्हणून लखूनें एकट्या दुकट्या गुहावासियांनीं रानांत जावें व जो पंखवाला जेथें भेटेल त्याला ठार करावें असें सांगितलें. त्याप्रमाणें मार्जार व श्वानकर्णीचे अनुयायी रानांत शिरले. त्यांच्यापैकीं कोणाच्यातरी हातीं ब्रह्मदंडी व गरुडराज कैद होण्याची शक्यता होती. पण त्यांचें नशीब बलवत्तर होतें. ते निसटून पळून गेले.

ती रात्र लखू, जयमल वगैरेंनीं गरुड-राजाच्या जळलेल्या झोंपडी नजीकच काढली. सूर्योदय झाला. पंखवाल्या जातीचे लोक ज्या पंखांचा उपयोग करीत असत ते पंख जागाजागीं पडलेले होते. ते पाहून इतके दिवस ते किती भ्रमांत होते हें श्वानकर्णी व मार्जारला कळलें. कारण ते पंख कृत्रिम होते.

"आम्हांला वाटत होतें कीं हे पंख अंगचे व नैसर्गिक असावेत. पक्ष्यांसारखें यांना उडतां पण येत असावें. पण ती सर्व फसवणूक होती हें आतां आम्हांला कळलें." मार्जार म्हणाला.

"ठीक! त्यांचें कपट उशिरां का होईना आम्हांला कळलें. आतां रानटी जनावरां-सारखे पटापट मरतील हे आमच्या हातून. भित्रे आणि भागूबाई आहेत सर्व. त्यांचें शौर्य व साहस आम्हांला आतां कळलें आहे." श्वानकर्णी म्हणाला.

लखू व जयमल दोघांना त्या रानटी गुहावासियांचा उत्साह पाहून आनंद झाला. सूर्योदय झाल्यानंतर मार्जार व श्वानकर्णी दोघांनीं लखू, जयमल व गोमांग तिघांच्या गौरवार्थ एक मेजवानी दिली. मेजवानीच्या वेळीं गाणें व नृत्यदेखील झालें. तरुण गुहावासियांनीं मल्लयुद्ध व निरनिराळ्या प्रकारच्या कसरती दाखवून सर्वांचें मनो-रंजन केलें.





मेजवानीच्या वेळीं जयमलनें मार्जार व श्वानकर्णी या दोघांना एक सल्ला दिला. तुम्हांला आतां पंखवाल्या जातीचें जरासुद्धां भय उरलें नाहीं, म्हणून तुम्ही आपल्या गुहा सोडून उघड्या मैदानांत कां येऊन रहात नाहीं ?

पण श्वानकर्णीला तो सल्ला पसंत पडला नाहीं. तो म्हणाला—"आम्ही आमच्या वाडवडिलांच्या काळापासून गुहेंत वास करीत आलों आहों. गुहा सोडून आतां झाडाखालीं राहणें आम्हांला शक्य नाहीं. तें कसें जमेल आम्हांला ?"

जयमल हंसून म्हणाला—"एक काम कर. सर्वच गुहा सोडून बाहेर नका राहूं. प्रथम तुम्ही तुमच्यापैकीं तरुण मंडळींना मैदानांत रहायला परवानगी द्या. कांहीं जण उघड्या हवेंत राहूं लागले व त्यांचा अनुभव कळला कीं इतरदेखील हळूहळू बाहेर येऊन राहूं लागतील. तें कांहीं असो, या पंखवाल्यांना पुन्हां झोपड्या बांधून राहूं देऊं नका. येथें पाण्याची सोय आहे. ही जागा इतर दृष्टीनें देखील उपयोगी आहे. म्हणून तुम्ही ही जागा सोडूं नका. माझें ऐका तुम्ही !"

त्या पंखवाल्याची आम्हांला भीति नाहीं. तुमच्या मदतीनें आम्हांला आमची थोरा-मोठ्यांची गदा मिळाली. मार्जार व मी दोघांचें वैर संपून आतां आम्ही दोघे मित्र व साथी झालों आहों. तुम्ही आमच्या दोघांच्या जातीवर जे उपकार केले आहेत ते आम्ही कधींहि विसरणार नाहीं. तुमच्या म्हणण्यावर आम्ही आपला प्राण देखील द्यायला तयार आहों." श्वानकर्णी म्हणाला.

मार्जारनें श्वानकर्णीच्या म्हणण्याला दुजोरा दिला. जयमल आपल्या साथी मित्रांकडे पाहून



मार्जार व श्वानकर्णीला म्हणाला—"आम्ही जी कांहीं मदत मागूं ती तुम्ही द्याल हें आम्हांला माहीत आहे. तर मग एक मदत करा. आम्हांला भयंकर दरींत जावयाचें आहे. तुमच्यापैकीं कोणी त्या दरींत कधीं जाऊन आला असेल तर त्यानें सांगावें."

तें ऐकून श्वानकर्णी व मार्जार परस्परांकडे पाहूं लागले. दोघांच्या मुद्रेवर आश्चर्याची छटा झळकत होती.

श्वानकर्णी एकदां खाकरून म्हणाला—"आमच्या पिढींत तरी कोणी त्या दरींत जाऊन परत जिवंत आलेला मला माहीत नाहीं. पण आम्ही त्या दरीविषयीं ऐकलें मात्र पुष्कळ आहे. विन्ध्य पर्वतापलीकडची ती एक दरी आहे. तेथें पोंचणें फार कठीण व धोक्याचें आहे."

"मार्जार! तुमच्या बोलण्यावरून मला असें वाटतें कीं तुम्हांला वाट माहीत आहे. तुम्ही रस्ता दाखविलांत तरी आम्हांला पुरे आहे. त्या दरींत एक औषधीवनस्पती आहे तो आम्हांला आणावयाचा आहे. ब्रह्मपूरचा राजा आजारी आहे. त्या आजाराला तेंच एक औषध आहे. म्हणून राजवैद्यांनीं आम्हांला तें औषध घेऊन येण्यासाठीं पाठविलें आहे.



"श्वानकर्णीनें सांगितल्याप्रमाणें त्या दरींत जाणें धोक्याचें आहे आहे. मी म्हणेन कीं अशक्य पण आहे." मार्जार म्हणाला.

"मार्जार! अरे हें सर्व आम्हांला माहीत नाहीं असें का वाटतें तुला. वाटेल त्या धोक्याच्या जागीं जायला तयार होऊनच आलों आहों. आम्हांला तुम्ही वाट दाखवून दिलीत कीं पुढलें आमचें आम्ही पाहून घेऊं. आणखी एक मदत तुम्ही करावी असेंहि मी सांगूं इच्छितों. गरुडाचें तोंड लावून बसणाऱ्या त्या भामट्याबरोबर तो









गोसावडा मांत्रिक ब्रह्मदंडी पण आहे. तो तुम्हांला कोठें दिसला तर तुम्ही त्याला कैद करा आणि आम्ही परत येईपर्यंत त्याला सोडूं नका. त्यानें गडबड बिडबड सुरू केली तर त्याला ठार केलेंत तरी हरकत नाहीं!" जयमल म्हणाला.

"तें आम्ही पाहून घेऊं. आम्ही तुम्हांला त्या भयंकर दरीची वाट तर दाखवूंच, आणि आम्ही दोघे मी व मार्जार तुमच्याबरोबर त्या दरींत येऊं. काय मार्जार!" श्वानकर्णी म्हणाला.

मार्जार तितक्याच उत्साहानें म्हणाला— "मी आपल्या जातीचा सरदार म्हणून आणखी एकाला नेमून तुमच्याबरोबर यायला मोकळा होईन."

त्या गोष्टीस जयमल व लखू दोघांनीं आपली नापसंती दर्शविली. नंतर कांहीं वेळ त्यांचें बोलणें झालें. सूर्यास्तानंतर जयमल, लखू व गोमांग तिघांना डोंगराच्या उंच शिखरावरून मोठमोठ्या लांब सटक रानटी झाडांच्या मुळांच्या सहाय्यानें मार्जार व श्वानकर्णीनें एका दरींत उतरविलें. ते म्हणाले—"त्या दरींत त्यांना गुहेसारखा बोगदा दिसेल. त्यांत शिरून तुम्ही पलीकडे गेलांत तर तुम्हांला ती भयंकर दरी लागेल.

लखू वगैरे श्वानकर्णी व मार्जार यांच्या मदतीनें लांब सटकमुळें दोरखंडासारखी धरून खोल दरींत उतरले. त्यांना दूर ढोलक्याचा आवाज ऐकूं आला. त्यांनीं तिकडे वळून पाहिलें तेव्हां त्यांनासमोर कोणीतरी आपले केस पिंजारून उड्या मारीत असलेला दिसला. त्याच्या हातांत एक भयंकर पक्षी होता.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# कावळ्याची मदत

एक तरुण मुलगा होता. तो पक्षी धरून बाजारांत विकत असे आणि त्यावरच त्याचा उदरनिर्वाह होत असे. एकदां तो रानांत जाळें पसरून कोणता पक्षी जाळ्यांत सांपडतो याची वाट पहात बसला असतां एक कावळा जाळ्यांत येऊन सांपडला. त्याला धरून घेऊन येण्यासाठीं तो झाडावर चढला. पण कावळा मनुष्यासारखा बोलूं लागला. म्हणाला—"मुला! मला धरून तुला काय फायदा मिळणार आहे? तूं मला सोडून दे. त्याबद्दल तुला एक सुंदर व विचित्र पक्षी पुढल्या खेपेस मिळेल. तो तूं सुलतानाकडे दिलास तर तुला मनमुराद बक्षिस मिळेल. मुलानें कावळ्याच्या बोलण्यावर विश्वास करून त्याला सोडलें. त्यानें पुन्हां जाळें झाडावर लावून ठेवलें, आणि आश्चर्य म्हणजे झाडावरून उतरल्याबरोबर कोठून तरी खरोखरच एक सुंदर पक्षी जाळ्यांत येऊन पडला. तो पक्षी अत्यद्भुत पक्षी निघाला. त्याचा रंग विचित्र होता, शेपटी विचित्र होती व त्याच्या अंगाची घडणच अशी कांहीं विचित्र होती कीं त्या पक्ष्याला पाहाल्यावर वाटेल ती किंमत देऊन विकत घेण्याचा मोह सुलतानाला वाटल्याखेरीज राहिला नसता. तो एक किन्नर जातीचा पक्षी होता. तो मुलगा त्या पक्ष्याला एका सुंदर पिंजऱ्यांत ठेवून सुलतानाकडे गेला.

सुलतान पक्ष्याला पाहून इतका खूष झाला कीं त्यानें त्या मुलाला मोठें बक्षिस दिलें. नंतर सुलतानानें त्या पक्ष्यासाठीं एक सोन्याचा सुंदर पिंजरा तयार करविला आणि त्यांत त्या पक्ष्याला ठेवलें.

श्री. ज. मा. सरवटे



परंतु सुलतानाच्या वजिराला ही गोष्ट मुळीच पसंत पडली नाहीं. त्याला विचारल्याशिवाय एका मुलाला राजानें बक्षिस दिलेलें त्याला आवडलें नाहीं.

तो सुलतानाला जाऊन म्हणाला—“शहेनशाह! या पक्ष्याला सोन्याच्या पिंजऱ्यांत ठेवल्यानें त्याचें महत्व काय? त्याला घरासारखा मोठा हस्तीदंती पिंजरा बांधून दिला तर तें शोभेल.”

“हो पण इतक्या मोठ्या संख्येनें हत्तीचे दांत कोठून मिळणार?” सुलतानानें वजिरालाच विचारलें.

“ज्यानें पक्षी आणून दिला त्यानेंच हस्तीदंती घराला जरूर तेवढे हत्तीचें दांत आणून द्यावेत.” वजिरानें सुचविलें.

वजिरानें त्या मुलाला बोलावून चाळीस दिवसाच्या आंत एक घर बांधायला पुरतील एवढे हत्तीचे दांत आणून द्यायला सांगितलें.

मुलानें विचारलें—“पण हत्तीचे दांत कोठून आणणार मी इतके!”

“सुलतानाचा हुकूम आहे. तूं वाटेल तेथून घेऊन ये. आणले नाहींस तर तुला हत्तीच्या पायाखालीं तुडवून ठार करावा अशी आज्ञा आहे.” दुष्ट वजीर म्हणाला.

तो मुलगा काळजींत पडला कीं हत्तीचे दांत कोठून मिळणार? विचार करीत तो राजवाड्याबाहेर पडला. तितक्यांत एक कावळा त्याच्या खांद्यावर येऊन बसला. त्यानें त्याला विचारलें—“काय झालें? फार काळजींत पडलेला दिसतो आहेस?”

“काय सांगूं? तुला वांचविल्यावर मला खरोखरच एक सुंदर पक्षी सांपडला. त्याला घेऊन मी सुलतानाकडे गेलों. मला मोठें बक्षिस सुलतानानें दिलें. पण त्या पक्ष्यासाठीं हस्तीदंती घर बांधायला हत्तीचे दांत



पुरविण्यास हुकूम केला आहे. चाळीस दिवसांत मी हें काम केलें नाहीं तर प्राण दंडाची शिक्षा मला केली जाईल!” तो मुलगा म्हणाला.

“घाबरण्याचें कारण नाहीं. मी सांगेन तसें कर म्हणजे तुला यश मिळेल. तूं सुलतानाला जाऊन सांग कीं हत्तीचे दांत घेऊन येण्यासाठीं तुला चाळीस पिंपें भरून दारू द्यावी. पिंपें घेऊन मी सांगतों त्या तलावावर जा. त्या तलावांत पाणी प्यायला हत्तींचे कित्येक कळप येतात. तूं ती दारू तलावांत ओत. हत्ती पाणी प्यायला आले कीं तें पाणी पिऊन बेशुद्ध होऊन पडतील. तूं त्यांचे दांत कापून घे आणि सुलतानाला नेऊन दे.” कावळ्यानें सल्ला दिला. मुलानें कावळ्याच्या सल्ल्याप्रमाणें हत्तीचे दांत आणून सुलतानाला दिले. हत्तीचे दांत पाहून सुलतान जास्तच खूष झाला. त्यानें आणखी बक्षिस दिलें व त्या पक्ष्यासाठीं सुंदर हस्तीदंती घर बनविलें.

वजिराचा डाव फसला. त्याला जास्तच राग आला. तो सुलतानाकडे गेला आणि म्हणाला—“शहेनशाह! आपल्याला हा एक अत्यद्भुत पक्षी मिळाला आहे. त्याच्यासाठीं



आपण हस्तीदंती घर देखील करविलें. पण मला हें कळत नाहीं कीं हा पक्षी बोलत कसा नाहीं व गात कां नाहीं?’

“मला तरी तेंच आश्चर्य वाटत आहे!” सुलतान म्हणाला.

“मला असें वाटतें कीं हा पक्षी एक पाळलेला पक्षी असावा. हा मालकाच्या समोर बोलत असणार! त्याच्या मालकाला बोलावून आणलें तर कदाचित हा पक्षी बोलेल.” वजिरानें सूचना केली.

“अरे पण तो मालक कोण हें कसें कळणार?” सुलतानानें शंका केली.

     

"तें त्या पक्षी आणून देणाऱ्याला माहीत असणार !" वजीर म्हणाला.

वजिरानें त्या तरुण मुलाकडे निरोप पाठवून त्याला बोलाविलें. तो त्याला म्हणाला—"या विचित्र पक्ष्याचा जुना मालक कोण हें चाळीस दिवसांच्या आंत कळलें नाहीं तर तुझें डोकें उडविण्यांत येईल."

मुलगा म्हणाला—"त्याचा मालक कोण हें आतां मी काय सांगणार ? त्याला मी धरून आणलें तेव्हां तो पक्षी झाडावर बसला होता. तो रानटी पक्षी आहे कीं पाळलेला हें मला तरी काय माहीत ?"

"तें मला काहीं कळत नाहीं. सुलतानाची आज्ञा आहे. ती बजावून घेण्याची जबाबदारी माझ्यावर आहे. तूं त्या हुकुमाचें पालन केलें नाहींस तर त्याचा जो परिणाम होईल तो मी तुला सांगितलाच आहे." वजीर म्हणाला.

बिचारा दुःखी मनानें घरीं गेला आणि खाटेवर पडून मुळूमुळू रडूं लागला. त्याच वेळीं कावळा खिडकींतून येऊन एका कठड्यावर बसला आणि विचारूं लागला—"असें एकाएकीं कोणतें संकट कोसळलें आहे ?" त्यानें घडलेला वृत्तांत सांगितला.



"त्यांत एवढी काळजी करीत बसण्याचें काय कारण बुवा ? तूं दरबारांत जा आणि सुलतानाची जल विहार करण्याची मोठी नौका आहे ती व बरोबर चाळीस दासी मागून घे. त्यांत बसून तूं पश्चिमेकडे निघालास तर एक बेट लागेल. तें बेट म्हणजे समुद्रांतून वर निघालेला एक डोंगरच समज. तें एक अप्सरांचें द्वीप आहे. अप्सरांची राणी त्या पक्ष्याची मालकीण आहे. सुलतानाची विहारनौका पाहून त्या अप्सरा ती पाहण्यासाठीं धांवतील. पण फक्त राणीलाच नौकेंत चढूं दे. तिच्या सेवेला बरोबर नेलेल्या दासी आहेतच. तिच्या मनोविनोदासाठीं तूं विशेष व्यवस्था करून ठेव. ती दारू पिऊन बेशुद्ध झाली कीं नांगर उचलून स्वदेशीं चलायला खलाश्यांना सांग." कावळ्यानें सल्ला दिला.

त्या तरुण मुलानें कावळ्याच्या सल्ल्या-प्रमाणें सर्व केलें. अप्सरांची राणी बेशुद्ध स्थितींत असतां विहार नौका दूर समुद्रांत येऊन पोंचली. तिला शुद्ध आली तेव्हां ती घाबरून गेली. परंतु त्या तरुण मुलानें तिला नम्रपणानें सर्व परिस्थिति समजाऊन सांगितली व म्हणाला—"तुम्ही बिलकुल काळजी





करू नका तुम्हांला सुखरूप स्वदेशीं पोंचविण्याची जबाबदारी मी घेतों. माझें एक लहानसें काम आहे तेवढें करून या म्हणजे झालें."

बिहारनौका किनाऱ्याला लागल्याबरोबर मुलगा अप्सरांच्या राणीला घेऊन सुलतानाकडे गेला. बिहारनौका परत आलेली कळतांच सुलतान आपलें सिंहासन हस्तीदंती घरासमोर ठेवून त्याच्यावर येऊन बसला. राणी समोर येतांच किन्नरपक्षी गाऊं लागला. सर्व त्याच्या गाण्यावर लुब्ध झाले. कोणाला स्वतःचें अप्सरांची राणी देहभान विसरून गेली. सुलतानाच्या मनाची वेगळीच स्थिति झाली होती. त्याला हें कळेना कीं त्याचें मन पक्ष्याच्या गाण्यावर मुग्ध झालें आहे कीं अप्सरांच्या राणीच्या सौंदर्यावर. त्यानें राणीला सिंहासनावर स्वतःजवळ बसवून घेतलें. राणी सुलतानाशीं लग्न करण्यास तयार झाली. दुसऱ्या दिवशींच दोघांचें लग्न देखील झालें. मेजवानी झाली. सर्वत्र आनंदी आनंद झाला.

परंतु वजिराला या सर्व गोष्टीचा आनंद वाटण्या ऐवजीं खेद वाटत होता. त्या मुलावर सूड उगवण्यासाठीं त्यानें जे जे प्रयत्न केले ते सर्व फोल ठरले. काय करावें हेंच त्याला सुचेना.

पुढें कांहीं दिवसांनीं सुलतानाच्या बेगमेची तब्येत बिघडली. राज वैद्यांनीं औषधोपचार सुरू केला. परंतु गुण पडला नाहीं.

वैद्य व हकीम हात जोडून सुलतानाला म्हणाले—" शहेनशाह ! बेगमसाहेब सामान्य मनुष्य जातींतली स्त्री नसून अप्सरा आहे. म्हणून आमचा हा सर्व प्रयत्न फुकट आहे. अप्सरांच्या देशांतून औषधें आणून औषधोपचार केल्याशिवाय गुण पडणार नाहीं."



लगेच वजिरानें सुचविलें कीं पक्ष्याला पकडून आणणाराला पाठवावें औषध घेऊन यायला.

तरुण मुलाला पुन्हां अप्सरांच्या द्वीपांत जावें लागलें. या खेपेस नावेजवळ कोणी आलें नाहीं. स्वतः त्यालाच बेटावर उतरून डोंगर चढून जावें लागलें. तो राजवाड्याजवळ पोंचला तेव्हां राजवाड्याच्या सिंहद्वारावर दोन सिंह पहारा देत उभे होते. एका अनोळखी माणसाला समोर येत असलेला पाहून ते प्रथम गुरगुरू लागले व नंतर मोठ मोठ्यानें गर्जना करू लागले.

तें पाहून तो मुलगा घाबरून जागच्या जागीं उभा राहिला. पुढें जावें तर सिंह फाडून खाणार, मागें वळावें तर सुलतान औषध आणलें नाहीं म्हणून रागावणार व सुळावर चढवणार. काय करावें त्याला सुचेना. इतक्यांत त्याचा मित्र कावळा त्याच्या खांद्यावर येऊन बसला. मुलानें थोडक्यांत सर्व वृत्त सांगितलें.

कावळा म्हणाला—" माझें एक पीस घेऊन सिंहांच्या अंगावर तूं फिरविलेंस तर ते तुला खाणार नाहीत."



त्या मुलानें कावळ्याचें एक पीस काढून घेतलें आणि कावळ्यानें सांगितल्याप्रमाणें सिंहांच्या अंगावर प्रेमानें फिरविलें. सिंह बाजूला उभे राहिले. तो मुलगा राजवाड्यांत गेला. त्याला पाहून सर्व अप्सरा त्याच्या चारी बाजूला घोळका करून उभ्या राहिल्या. त्यांच्या राणीच्या आजाराची गोष्ट ऐकून त्यांना फार वाईट वाटलें. त्यांनीं त्याला एक औषध आणून दिलें. तें घेऊन तो लगेच स्वदेशीं परतला.

सुलतान त्याची वाट पहातच बसला होता. तो येतांच त्याला बरोबर घेऊन

      

सुल्तान आपल्या बेगमेकडे गेला. अर्थातच कावळापण बरोबर होताच.

औषधाचा एकच थेंब तोंडांत पडल्या-बरोबर बेगम शुद्धीवर आली व उठून बसली. त्या मुलाच्या खांद्यावर कावळ्याला पाहून ती म्हणाली–"अग ! इथें आहेस का तूं ? आळशी कुठली...."

तें ऐकून जणूं कांहीं त्याला भीति वाटली असें दाखवून कावळा दबकून बसला.

"या मुलाला ठार करण्याचा प्रयत्न चालू होता. पण तूं त्याला वांचविलेंस हें मला माहीत आहे. तूं मला देखील मदत केली आहेस. माझा जीव वांचविला आहेस." अप्सरांची राणी कावळ्याला म्हणाली.

राणी उठून उभी राहिली. "या कावळ्याची तुझी ओळख दिसते आहे. पण तुम्ही आपसांत बोलूं शकतां हें कसें काय हें नाहीं कळलें मला." सुलतानानें विचारलें.

"ही माझी एक दासी आहे. तिनें माझ्या सेवेला असतां टाळाटाळ केली. मला राग आला व मी तिला शाप दिला. तिला कावळ्याचें रूप मिळालें. पण तिला आतां मी माफ करतें." अप्सरांची राणी म्हणाली.

राणी बोलत असतां कावळा अदृश्य झाला व त्याच्या जागीं एक सुंदर दासी सर्वांना दिसली. ती देखील सुंदर होती. दासी सुल्तान व बेगम दोघांच्या आज्ञेनें त्या दासीशीं त्या तरुण मुलाचें लग्न करून देण्यांत आलें.

वजिरानें मुलाला कसें छळलें हें सुल्तानाला कळलें तेव्हां त्यानें वजिराला नोकरी वरून कमी केलें आणि हद्दपारीची शिक्षा दिली. सुलतानानें त्याच्या जागेवर त्या मुलाला आपला वजीर म्हणून नेमलें.





# खलीफांची शिळकत

अकबराच्या दरबारांत तानसेन जसा एक नांवाजलेला गवई होता तसाच हरुन अल रशीद खलीफांच्या दरबारांत इशाक अल नदीम नांवाचा एक प्रसिद्ध गवई होता. तो मोसल येथील राहणारा होता. खलीफांची त्याच्यावर फार मर्जी होती. एवढेंच काय तर ते त्याला आपला जीवश्च कंठश्च मित्र मानीत. त्यांनीं आपल्या सुंदर महालापैकीं एक महाल त्याला राहण्यासाठीं लिहून दिला होता व त्यालाच राजवाड्यांतल्या दास-दासींना गायन-वाद्य आदि शिकविण्यास नेमलें होतें.

एकदां खलीफांना करमतनासें झालें. त्यांनीं आपला वजीर जाफर याला बोलावून इशाक, मंसूर व युनूस नांवाच्या कारकुनास बोलावून आणावयास सांगितलें. ते आले तेव्हां खलीफांनीं अगदीं साधा पोशाख करून यायला सांगितलें. सर्व खलीफांच्या हुकमाप्रमाणें साधे कपडे घालून हजर झाले. नंतर ते राजमहालाबाहेर निघाले. एका लहानशा नावेंत बसून ते टाइग्रिस नदीच्या काठाकाठानें अल्ताफ नामक जागीं येऊन पोंचले. तेथें सर्व नावेंतून उतरले.

ते हंसत गप्पा मारीत चालले असतां समोरून एक म्हातारा आला. त्याची दाढी पांढरी होती. त्यानें इशाकचा हात आपल्या हातांत घेऊन डोळ्याला लावला. इशाकनें त्याला ओळखलें. तो म्हातारा राजमहालांत दासदासी विकायला घेऊन येई. त्याच्याकडून विकत घेतलेल्या दासदासीपैकीं कित्येकांनीं इशाकच्या तालिमींत संगीतविद्या संपादन केली होती.









त्या म्हाताऱ्यानें खलीफांना ओळखलें नाहीं. कारण खलीफा साधा पोशाख करून आले होते. तो इशाकला म्हणाला—" हुजूर, आपल्याला भेटायला यायची इच्छा बरेच दिवस झाले माझ्या मनांत होती. पण आज माझें केवढें नशीब ? आपण स्वतःच आलांत. आपणांजवळ एक विनंति आहे. एक मुलगी आहे. वाद्य संगीतांत ती स्वतःच चांगली प्रवीण आहे. तिनें आपल्या हाताखालीं कांहीं दिवस तालीम घेतली तर जगांत तिची बरोबरी कोणी करूं शकणार नाहीं. त्यांत ती फार सुंदर पण आहे. एकदां येऊन आपण तिचें गाणें ऐकावें. आपणांला तिचें गाणें पसंत पडलें तर मी आपल्या महालांत तिला पाठवून देईन."

इशाकनें एकदां खलीफांकडे पाहून इंगित केले व त्या म्हाताऱ्याला म्हणाला—" तुम्ही व्हा पुढें ! आम्ही येतों तिला पहायला."

म्हातारा निघाला. सर्व त्याच्या पाठी-मागून तो गेला होता त्याच वाटेनें गेले. गुलामांचा व्यापार ज्या महालांत होत असे त्या महालांत पोंचले. त्यांना एका मोठ्या दिवाण खान्यांत बसविण्यांत आलें. म्हाताऱ्यानें एका सुंदर मुलीला आणून इशाकसमोर



एका उंच जागीं बसविलें. तिच्या हातांत एक वाद्य होतें. ती वाद्य वाजवूं लागली आणि गाणें म्हणूं लागली. तिचा बारीक व गोड आवाज ऐकून खलीफा खूष झाले व "वाहवा ! वाहवा !" असें हर्षातिरेकानें म्हणाले. इशाकसुद्धां शाबासकी देण्यासाठीं उठणार होता. पण तितक्यांत ती इशाक-समोर जवळ येऊन बसली व इशाकचा हात आपल्या हातांत घेऊन आपल्या डोक्यावर ठेवीत म्हणाली—" उस्ताद ! आपल्या समोर हात चालत नाहीं. तोंडांतून आवाजच येत नाहीं. मला प्राविण्य मिळवून देण्याचें सामर्थ्य फक्त आपल्या आशीर्वादांतच आहे." असें म्हणत ती डोळ्यांतून टिपें गाळूं लागली.

तिची ती मुद्रा पाहून इशाकला थोडें आश्चर्य वाटलें व तिची दयापण आली. तो म्हणाला—" तुला इतकें वाईट वाटून घेण्याचें कारण काय ? कोण तूं ? सर्व निस्संकोच-पणें सांग !" ती इतरांसमोर बोलायला तयार नाहीं हें पाहून खलिफाची परवानगी घेऊन इशाक तिच्या बरोबर एका बाजूला गेला. तेथें तिनें तोंडावरचा बुरखा बाजूला सारला. तिचें सौंदर्य पाहून इशाक चकित





झाला. तो हळूच तिला म्हणाला—"बोल! काय हवें तुला?"

"माझ्या आयुष्याची कथाच एक करुण कहाणी आहे. आपलें शिष्यत्व लाभावें म्हणून मी कित्येक दिवसांपासून वाट पहात आल्यें. इतर दासींची विक्री होऊं लागली कीं माझी छाती धडधड उडूं लागे, कोठं नेऊन टाकणार आहेत मला कोणास ठाऊक? परंतु मी नशिबानें स्वतःला वांचवीत आलें. आपलें शिष्यत्व करणें हेंच माझ्या आयुष्याचें ध्येय आहे." इतक्यांत म्हातारा व्यापारी तेथें आला. इशाकनें त्याला त्या दासीची किंमत विचारली व नांवदेखील विचारलें. "हिचें नांव तुफहा अल कुलाब असें आहे व किंमत विचाराल तर फक्त दहा हजार दीनार! इतर व्यापारी या किंमतीवर बोली बोलत गेले आहेत. परंतु मी तिला आतांपर्यंत विकलें नाहीं याचें कारण ही मुलगीच. सौदा पटायच्या ऐन वेळीं एकदम ही असें कांहीं बोलते कीं सौदा बिघडून जातो. मी दहा हजाराहून जास्त दीनार मागत नाहीं. तसा हिच्यासाठीं केलेला खर्च भागणार नाहीं."

इशाक हंसून म्हणाला—"ठीक! मग तूं दुप्पट तिप्पट किंमत वाढवून कां नाहीं मागत? हिची किंमत खात्रीनें तेवढी आहे. तूं पाठवून दे हिला माझ्या घरीं आणि आपले पैसे घेऊन जा." त्यानंतर इशाक खलीफा होते तेथें गेला आणि त्या दासीच्या खरेदीचें वर्णन केलें.

म्हातारा त्या मुलीला घेऊन इशाकच्या महालांत गेला आणि किंमत वसूल करून घेऊन घरीं परतला. इशाकच्या दासींनीं या नव्या दासीला न्हाऊं घातलें व तिची वेणीफणी करून तिला सुंदर वस्त्रें अंगांत घालायला दिलीं.

इशाक घरीं परत आला. तिचें तें सौंदर्य व श्रृंगार पाहून त्यानें मनांत विचार केला कीं हिला मी कांहीं दिवस शिक्षण दिलें तर ती खात्रीनें खलीफाच्या अंतःपुरांत राणी सारखी शोभेल. ही या इहलोकांतील मुलगी असेलसें नाहीं वाटत. स्वर्गातील अप्सरा देखील हिचें सौंदर्य पाहून माना खाली घालतील.

त्यानें तिला शिकण्यासाठीं सर्व आवश्यक ती व्यवस्था करून दिली. तिची सर्व प्रकारें बडदास्त रहावी म्हणून काळजी घेतली. तिला कोणत्याहि गोष्टीची उणीव भासूं दिली नाहीं.

एके दिवशीं तिच्याबरोबरच्या इशाकच्या इतर शिष्या वन विहार करण्यासाठीं निघाल्या. महालांत कोणी नव्हतें. संगीत विद्येची साधना ज्या खोलींत होत असे त्या खोलींत तुफहा गेली. वाद्य हातीं घेऊन ती वाजवूं लागली व गाणें म्हणूं लागली. तिच्या हाताच्या नाजूक बोटांतून व कंठांतून गोड संगीत अमृताच्या प्रवाहासारखें वाहूं लागलें.

इशाक त्याचवेळीं खलीफांच्या महालांतून आपल्या घरीं परत आला. त्याच्या



कानावर तो गोड आवाज गेला. त्याला संगीताचा एक स्वर्गिक आनंद मिळाला. नकळत त्याच्या तोंडावाटें "वाह वाह!" शब्द निघाले. त्याचा आवाज ओळखून तुफहा उठून उभी राहिली. इशाक भिंतीला टेंकून उभा होता व तन्मय होऊन गाणें ऐकत होता. एकाएकीं गाणें थांबलेलें पाहून त्यानें डोळे उघडून पाहिलें. तुफहा जवळ येऊन विचारूं लागली—"तुम्ही असे उभे कां? तब्येत बरी आहे ना?"

"आंत बसून तूंच का गाणें म्हणत होतीस?" इशाकनें तिला विचारलें.

"होय ! मीच ती दुर्दैवी स्त्री !" ती म्हणाली.

इशाक स्वत:चें डोकें धरून स्वत:शींच पुटपुटला—"उघडलें का डोळे तुझे ? इशाक ! तूं स्वत:ला अद्वितीय संगीतज्ञ समजत होतास. कळलें का तुला कीं हिच्यासमोर तुला देखील मान खाली करावी." त्यानें तिचा हात आपल्या हातांत घेऊन डोळ्यांना लावण्याचा यत्न केला. ती म्हणाली—"हें काय उस्ताद ! आपण माझे गुरु ! मी आपली दासी !" असें सांगून तिनें हात मागें घेतला.

"असें नको बोलूस पोरी ! इशाकचें गुरुपण संपलें. तुझ्या आवाजासमोर व तुझ्या तयारी समोर माझें कसब फुकट आहे. कोकिळेच्या आवाजासमोर कावळ्याची कावकाव काय कामाची ? आजच मी तुला खलीफांच्या समोर हजर करतों. खलीफा तुला आपल्या अंत:पुराची राणी केल्याशिवाय राहणार नाहींत. या इशाकला विसरूं नकोस म्हणजे झालें." इशाक म्हणाला.

खलीफांच्या महालांत एका खोलींत तुफहाला बसवून तो तिला घेऊन खलीफांकडे निघाला. नंतर इशाक थोडा पुढें गेला. इशाक खलीफांच्या खास महलांत गेला आणि मुजरा करून म्हणाला—"हुजूर ! स्वर्गांतून तुफहा नांवाची एक अप्सरा घेऊन आलों आहें आपल्याला नजर करण्यासाठीं. ती माझी आतां शिष्या नसून गुरु तुल्य आहे."

"आपण त्या दिवशीं गुलामांच्या वाड्यांत पाहिली तीच का ही ?" खलीफांनीं विचारलें.

"होय हुजूर ! तीच ही" इशाक म्हणाला.

खलीफानें तिला आंत घेऊन यायला आज्ञा केली व जाफरला म्हणाले—"इशाक आजपर्यंत कोणाला आपल्याहून वरचढ मानायला तयार नव्हता. आज तो दुसऱ्याची एवढी स्तुति करतो आहे."

इशाक आपल्या शिष्येला घेऊन आंत आला. तिनें खलीफांना सलाम केला आणि बुरखा काढून टाकला. तिनें सौंदर्य पाहून खलीफा थक्कच झाले. जाफर व मंसूरला देखील स्वत:च्या डोळ्यांवर विश्वास होईना. या पूर्वीं कधीं न पाहिलेलें सौंदर्य प्रत्यक्ष डोळ्यासमोर उभें होतें. खलीफा सिंहासना वरून उठून तिच्या जवळ आले व ती आपलीच मिळकत आहे हें दर्शविण्यासाठीं





तिच्या तोंडावर त्यांनीं ओढणी टाकली. नंतर त्यांनीं तिला बसायला सांगितलें आणि म्हणाले—"तुफहा! तूं आल्यानें आमच्या या घरांत चहूंकडे उजेड पडला आहे बघ."

इशाकनें एक वाद्य तिच्या हातांत दिलें. तिनें सिंहासना जवळच बसून वाजवायला सुरवात केली. कांहीं वेळ वाद्य वाजविल्या नंतर ती गाणें म्हणूं लागली.

खलीफा सिंहासनावर बसून कांहीं वेळ गाणें ऐकत होता. पण तो गाण्यावर इतका मुग्ध झाला होता कीं तो सिंहासनावरून उठून ती बसली होती तेथें जवळ जमिनीवर बसून गाणें ऐकूं लागला. म्हणाला—"तुफहा! तूं खात्रीनें इहलोकांतली नाहींस. अल्लानें स्वतःच्या हातानें तुला घडविलें आहे." नंतर इशाककडे वळून म्हणाला—"इशाक, तूं हिची प्रशंसा केलीस ती कांहीं पुरेशी केली नव्हतीस. हिचें गुणवर्णन अर्धवटच होतें."

"हजूर! आपण म्हणतां आहां त्यांत थोडी देखील अतिशयोक्ति नाहीं. ती एकटी गात बसली होती तेव्हां मी आड उभा राहून ऐकलें. तेव्हांच माझी खात्री झाली कीं माझी कला हिच्यासमोर काडीमोलाची नाहीं." इशाक म्हणाला.

तुफहानें आणखी एक गीत म्हटलें. खलीफांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु लपविण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. ते मंसूरला म्हणाले—"तूं आपल्या या नव्या मालकिणीला अंतःपुरांतील सर्वांत मोठ्या व सुंदर खोलींत घेऊन जा. आणि पहा त्यांना कोणत्याहि प्रकारचा त्रास होता कामा नये. त्यांनीं इशाकला एक लाख दीनारें बक्षिस दिलीं आणि पुष्कळ शालीपण दिल्या.

[ पुढल्या अंकांत संपूर्ण ]





# खुनाचा आरोप

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला. झाडावरून प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाच्या दिशेनें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याच्याशीं बोलूं लागला. म्हणाला—"राजा, मला वाटतें कीं कोणीतरी मंत्र टाकून तुला भुलविलें आहे व तुझ्याकडून वाटेल तें काम करवून घेत आहे. हें पहा ना, सहमित्र यानें मंत्र-प्रभावामुळेंच अमानुष अशी कृत्यें केली होतीं. त्याची गोष्ट आज मी तुला सांगणार आहें. लक्ष देऊन ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

सहमित्र हा समुद्र किनाऱ्यावरील एका प्रदेशाचा रहिवाशी होता. तरुण वयांत तो विन्ध्य पर्वतांतील प्रदेशांत हिंडत फिरत येऊन पोंचला. एकदां तो करिकुञ्ज नांवाच्या गांवाजवळून जात असतां लोकांच्या

       



तोंडून त्यानें विचित्र विचित्र गोष्टी ऐकल्या. म्हणे त्या गांवालगतच्या रानांत वाघ वगैरे हिंस्र श्वापदें राहतात व कांहीं जागा तर शापग्रस्तच आहेत. म्हणजे त्या जागीं कोणी चुकून गेलाच तर आयुष्यांत कधीं न घडलेल्या गोष्टी घडतात. गांवकरी त्या बाजूला फिरकत देखील नसत.

सहमित्रानें तें सर्व ऐकलें होतें. पण त्याला गांवकऱ्यांचा तो भोळसटपणा असेल असें वाटलें. त्यानें साहस करून त्या रानांतूनच जाण्याचा विचार केला. नुकताच पावसाळा संपला होता. सर्वत्र हिरवळ होती. सहमित्र रानांत शिरला. पक्षी आनंदानें किलबिल करीत होते.

एका झाडाखालीं विश्रांतीसाठीं तो जरा बसला आणि तेवढ्यांत त्याचा डोळा लागला. त्याची झोंप मोडली तेव्हां त्याला खूप भूक लागली होती. सहज त्याचें लक्ष पोटाकडे गेलें. पोटावर पांढरी पिवळी लव पाहून त्याला आश्चर्य वाटलें. पुढेंतर हाताला बोटांच्या ऐवजीं पंजा व मनगटावर लव आणि वाघासारखे पिवळे पट्टे पाहून त्याला आश्चर्यच वाटलें. तळ्याच्या कांठीं जाऊन त्यानें पाण्यांत आपलें प्रतिबिंब पाहिलें तेव्हां त्याला आपण वाघ झालों आहों हें समजलें. त्याला फार आश्चर्य वाटलें. अंगांत एक विचित्र शक्ति आल्यासारखें वाटूं लागलें. त्यानें उड्या मारल्या. डोंगरावर चढून पाहिलें. त्यानें विचार केला, वाईट वाटून घेण्याचें काय कारण ? मनुष्य जन्म आपल्याला मिळाला होता. आपण वाघाला भीत होतों. आतां आपल्याला पाहून सर्व भितील. हा देखील एक अनुभव मिळेल.

परंतु हें काय त्याला तर अनिवार भूक लागली. भूक कशी भागवायची ? आपण खायचें काय ? आपल्याला फळ-भाज्या,



भात, पोळी, भाकरी वगैरे कोठें लाभणार ? आतां शिकार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

रानांत बराच वेळ शिकारीच्या शोधार्थ तो फिरत राहिला. पण समोर एकदेखील शिकार दिसली नाहीं. गांवांत जाऊन खायला कांहीं मिळतें का पहावें असा विचार करून तो गांवाजवळ गेला. त्याला दुरून एक सुंदर मुलगी दिसली. त्याला वाटलें कीं आपण तिच्याजवळ कांहीं तरी खायला मागितलें तर खायला मिळेल. बोलण्यासाठीं म्हणून त्यानें तोंड उघडलें मात्र, हें पाहून ती मुलगी मोठ्यानें ओरडली व धूम पळूं लागली. "अरे बापरे वाघ !" तिनें मागें वळून देखील पाहिलें नाहीं. तेव्हां कोठें करिकुळजला कळलें कीं मनुष्यवस्तींत आतां आपल्याला प्रवेश नाहीं.



परंतु त्याला भूक इतकी लागली होती कीं तो रात्रीं गांवांत शिरला. छान काळोख पडला होता. त्याला दिवसाच्यासारखें सर्व कांहीं दिसत होतें. पण घरें गोठे सर्व आंतून बंद. गांवानजीक वाघ आल्याची वार्ता संध्याकाळीं गांवभर पसरली होती. वाघ रात्रीं गांवांत येईल या भीतीनें लोकांनीं गोठे देखील बंद करून ठेवले होते. वासरूं, बकरी, कुत्रें कांहींएक नजरेस पडलें नाहीं. तेव्हां अगदीं हताश होऊन तो रानांत परतला आणि एका जागीं पडून राहिला. तो जागा झाला तेव्हां छान उजाडलें होतें.

तीं एका जागीं गवता आड पडून त्याला दुरून कोणीतरी बोलत येत असल्याची चाहूल लागली. त्यानें कानोसा घेतला आणि दबा धरून गवताआड बसून राहिला. तिघे कोणीतरी बोलत त्याच बाजूला येत होते. एकजण लठ्ठ होता. त्याच्या अंगांतल्या कपड्यावरून तो मालक असावा व इतर दोघे त्याचे नोकर असावेत



हें त्यानें ओळखलें. त्यानें त्या गलेलठ्ठ माणसाला मारून खाण्याचें ठरविलें. माणसाला मारून खाणें त्याला आवडत नव्हतें. पण काय करणार ? दुसरी शिकार मिळत नाहीं व भूकतर अनिवार. त्यानें जास्त वेळ विचार करीत न थांबतां त्या माणसावर उडी मारली आणि त्याला ठार केलें. त्याचे दोघे नोकर "वाघ ! वाघ !" म्हणून ओरडत पळून गेले. सहमित्रानें त्या माणसाला खाऊन आपली भूक भागविली.

सहमित्राची भूक भागली खरी. पण त्याला या वाघाचें जिणें आवडलें नाहीं. माणसाचें रूप जाऊन वाघाचें रूप मिळालें असलें तरी मनुष्याचा स्वभावधर्म नाहींसा झाला नव्हता. त्याला घृणा वाटली स्वतःच्या जिण्याबद्दल प्रथम वाघ झाल्याबद्दल त्याला आनंद झाला होता. पण एकाच दिवसांत परत मनुष्य होण्याची तीव्र इच्छा त्याच्या मनांत उपजली.

तो एका जागीं बसून हाच विचार करीत बसला असतां त्याला सहज वाटलें, ज्या जागीं आपण बसल्यामुळें आपल्याला हें व्याघ्ररूप मिळालें त्याच जागीं पुन्हां जाऊन पडून राहिल्यानें कदाचित मनुष्य रूप मिळेल. तो विचार मनांत येतांच तो उठला व त्या झाडाखालीं त्यानें जागीं पडून राहिला. आणि आश्चर्य म्हणजे खरोखरच त्याला मनुष्य रूप मिळालें. त्याला फार फार आनंद झाला. तो उठला आणि त्याच गांवांत गेला.

गांवांतत्या ला लोक सांगूं लागले कीं काल रात्रीं आमच्या गांवांत वाघ आला होता. संध्याकाळीं एका मुलीला वाघ दिसला. बरें तर बरें, ती वांचली व रात्रीं आम्ही आपलीं घरें व गोठे बंद करून ठेवलें होते. पण आज सकाळीं एका श्रीमंत माणसाला त्या वाघानें खाऊन टाकलेंच.





सहमित्रानें तें सर्व ऐकून घेतलें आणि कांहींच बोलला नाहीं. तो पुढें हिंडत हिंडत एका राज्यांत राजाच्या पदरीं नोकरी करूं लागला. त्याला चांगली नोकरी मिळाली. त्यानें कधीं कोणाजवळ आपल्या व्याघ्र जीवनाची गोष्ट काढली नाहीं. हळू हळू तो स्वतः आपलें तें घृणित व्याघ्रजीवन विसरून गेला.

एकदां तो आपल्या कांहीं अधिकारी मित्रमंडळींबरोबर गंगा काठीं फिरायला गेला असतां वाघांच्या गोष्टी सुरू झाल्या. वाघांची भूक कशी अनिवार असते याच गोष्टीवर गप्पा चालू होत्या. सहमित्रानें तरुणवयांत एकच दिवस व्याघ्रजीवन कसें घालविलें ह्याचें वर्णन करून त्या श्रीमंत माणसाला कसें ठार करून खाऊन टाकलें हें देखील सांगितलें.

पण गंमत अशी कीं त्याच्या बरोबरच्या अधिकाऱ्यांपैकीं एका तरुण अधिकाऱ्यानें आपली तलवार उपसली आणि त्याच्या अंगावर धांवला. म्हणाला—"तर मग तूंच माझ्या वडिलांना ठार करणारा खुनी ! त्यांच्या खुनाचा सूड घेतल्याशिवाय मी राहणार नाहीं."

सहमित्र चकित झाला. स्वप्नांत देखील त्याला त्या गोष्टीची कल्पना नव्हती कीं त्या माणसाचा मुलगाबरोबर असेल. तो म्हणाला—"क्षमाकर बाबा ! अज्ञानामुळें त्या व्याघ्रजीवनांत हें कर्म माझ्या हातून घडलें. मी मनुष्य असतों तर तें घृणित कृत्य केलें असतें का ?"

इतर लोकांनीं मध्यस्थी करून तें भांडण मिटविलें. परंतु त्या तरुण मुलानें वेळ संधी पाहून सूड घेण्याचें मनाशीं ठरविलें. तो आपल्या घरीं निघून गेला. परंतु सममित्राला त्या रात्रीं झोंप आली नाहीं. पुन्हां कधीं

त्या तरुण सरदाराची व आपली गांठ पडली तर तो आपल्याला ठार केल्याशिवाय राहणार नाहीं. असा विचार करून तो गांव सोडून निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें– "राजा! दोन गोष्टींची शंका माझ्या मनांत येते. सहमित्रावर नरहत्येचें हें पाप लावणें बरोबर होईल का? त्या तरुण माणसानें आपल्या बापाच्या खुनाबद्दल सूड घेणें रास्त होईल का? या दोन प्रश्नांचें समाधानकारक उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर परिणाम तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील.

विक्रमार्क म्हणाला–"मनुष्याला ठार करणें हा वाघाचा स्वभावधर्म आहे, मनुष्याचा नाहीं. सहमित्रानें मनुष्य राहून त्या माणसाला ठार केलें असतें तर त्याचें पाप त्याला लागलें असतें. वाघानें एका माणसाला ठार केलें वास्तव नव्हे तर वाघ हा मनुष्य जातीचा शत्रू आहे म्हणून त्याला ठार करण्यांत हरकत नाहीं. पण त्यानें एका माणसाला खाऊन टाकलें हा त्याचा अपराध ठरत नाहीं. कारण तो त्याचा स्वभावधर्म आहे. परंतु जर का मनुष्य रूप असून एका माणसाला खाण्याचें घृणित कार्य त्यानें केलें असतें तर तें कधीं क्षम्य ठरलें नसतें. म्हणून माझ्या मतें हा अपराध सहमित्रावर लागत नाहीं व त्या अपराधाबद्दल सुडाच्या भावनेनें त्याला ठार करण्याचा यत्न चुकीचा ठरतो."

अशातऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवाबरोबर नाहींसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. [कल्पित]





# वल्कलचीर

पोतन नांवाचें एक नगर होतें. त्या नगराच्या राजाचें नांव सोमचंद्र व राणीचें नांव धारिणी होतें. त्यांना एक मुलगा होता त्याचें नांव प्रसन्नचंद्र असें होतें. एकदां सोमचंद्र भांग काढण्यासाठीं आरशासमोर उभा राहिला. त्याला कानाजवळचे केस पांढरे झालेले दिसले. त्या वेळीं राणी देखील जवळ उभी होती. ती थोडी हंसली. राजाला आपल्या म्हातारपणाची जाणीव झाली. तो म्हणाला–"नको आतां या राज्याचा मोह मी वानप्रस्थाश्रम घेणार."

सोमचंद्रानें आपला एकुलता एक मुलगा प्रसन्नचंद्र याला राज्याभिषेक करून वानप्रस्थाश्रम ग्रहण केला. त्याच्या बरोबर राणी धारिणी पण रानांत गेली. धारिणी वनांत जातांनाच गरोदर होती. तिला यथावेळीं एक सुंदर मुलगा झाला. रानांत मुलाला राजसी थाटाचीं वस्त्रं कोठून मिळणार. साधीं वल्कलेंच त्याच्या अंगावर असायचीं. म्हणून त्याचें नांव वल्कलचीर असें पडलें.

मुलगा झाल्यावर एका वर्षाच्या आंतच धारिणी वारली. सोमचंद्राला मुलाच्या पालनपोषणाचा भार उचलावा लागला. वल्कलचीर मोठा झाला तेव्हां त्याला मुनि, यज्ञ व आश्रम यांच्या व्यतिरिक्त जगांतली कांहीं एक माहिती नव्हती.

तिकडे पोतन नगरीं प्रसन्नचंद्र याला कळलें कीं त्याचा धाकटा भाऊ आश्रमांत लहानाचा मोठा झाला आहे. त्याला पोतन नगरीस घेऊन यावें असा त्यानें विचार केला. त्याला वाटलें कीं आश्रमांत राहणाऱ्या तरुण मुलाला नुसतें बोलावल्यानें नगरांत

श्री. का. बा. सोमण



येणें आवडणार नाहीं. म्हणून त्यानें कांहीं सुंदर तरुणींना मुनिकन्यांचा वेष धारण करून रानांत पाठविलें. त्यांच्या बरोबर त्यानें वल्कलचीरला देण्यासाठीं सुंदर रेशमी वस्त्रें व सुवर्णालंकार पाठविले.

त्या तरुण मुली मुनिकन्यांचा वेष धारण करून सोमचंद्राच्या आश्रमानजिकच्या प्रदेशांत हिंडूं फिरूं लागल्या. त्यांनीं वल्कलचीरला ओळखलें व त्याला फळफळावळ खायला दिलीं. त्या मुनिकन्याच आहेत असें वल्कलचीरला वाटलें व तो त्यांच्या बरोबर गप्पागोष्टींत रंगला. त्यांनीं त्याला सांगितलें कीं आमचा आश्रम पोतन नगराजवळ आहे. आमच्या आश्रमांत आलास तर तुला रोज अशींच फळें खायला मिळतील व आमच्याबरोबर हिंडा फिरायला मिळेल.'' वल्कलचीरच्या मनांत त्यांच्या आश्रमांत जाण्याची इच्छा उत्पन्न झाली. तितक्यांत सोमचंद्राला येत असलेला पाहून सर्वजणी रानांतून पळून गेल्या.

वल्कलचीर त्यांना शोधण्यासाठीं त्यांच्या पाठोपाठ धांवला. परंतु त्या फार दूर निघून गेल्या असल्या कारणानें त्याला निराश व्हावें लागलें. त्याला वाटेंत एक गाडी दिसली. तो गाडीवाल्याला म्हणाला—"मला पोतन आश्रमांत जायचें आहे. घेऊन जातोस का?'' तो गाडीवाला त्याला एक वेडा पीर समजून आपल्या गाडींत बसवून निघाला. एका चोरानें त्याची वाट अडविली व गाडींत कांहीं माल आहे का पाहूं लागला. पण गाडीवाला वस्ताद होता. त्यानें एका काठीनें त्याचें टाळकें फोडलें व त्याच्या जवळ जो माल होता तो गाडींत घालून निघून गेला. वल्कलचीरला हें सर्व कांहीं कळलें नाहीं. त्याला तें सर्व विचित्र वाटलें. पण तो कांहीं बोलला नाहीं. कारण पोतन आश्रमांत जाण्याचा विचारच काय तो त्याच्या मनांत होता. गाडीवाला सरळ पोतन नगरी येऊन पोंचला.

पोतन नगरीं गाडी पोंचल्यावर गाडीवाला म्हणाला—"हाच तो पोतन आश्रम.'' असें सांगून गाडीवाला आपल्या घरीं निघून गेला.

वल्कलचीर पोतन नगराला पाहून चकित झाला. हा आश्रम कांहीं तरी विचित्रच दिसतो आहे बुवा! वाटेंत त्याला जो कोणी भेटे त्यांना तो 'महामुनि!' म्हणून हांक मारून नमस्कार करी. फिरत फिरत तो एका वाड्याजवळ उभा राहिला. त्या वाड्याच्या माडीवर त्याला संगीत ऐकूं आलें. आवाज बायकी होता. त्याला वाटलें कीं मुनिकन्या रानांत भेटल्या होत्या त्याच या असतील. वाड्यांत शिरला व माडीवर गेला. तें राजनर्तकीचें घर होतें.

राजनर्तकी आपल्या वाड्यांत एका मुनिवेषांत आलेल्या तरुणाला पाहून जवळ आली. तेव्हां वल्कलचीर म्हणाला—"मला राहण्यासाठीं एका पर्णकुटीची व्यवस्था करा.''



राजनर्तकी स्मित करून—"बरें!'' म्हणाली आणि वल्कलचीरच्या स्नानादिची व्यवस्था केली. तिनें त्याला सुंदर वस्त्रें अंगांत घालायला दिलीं व आपल्या मुलीशीं त्याचें लग्न करून देण्याची खटपट करूं लागली. वल्कचीरला तें कांहीं समजलें नाहीं. ती जें कांहीं म्हणाली त्याला तो होकार देत गेला. परंतु विवाह गीतें सुरू झाल्यावर त्याला त्या गाण्यांचा आनंद जरी वाटला तरी गाण्यांतलें कांहीं शब्द विचित्र वाटले. मंगलवाद्यें सुरू झाल्यावर तो थोडा घाबरला, म्याला म्हटलें तरी चालेल.

तिकडे प्रसन्नचंद्राला रानांत घडलेलें सर्व वृत्त कळलें. सर्व तरुणींनीं खरें खरें तेंच सांगितलें. आतां वल्कलचीर आश्रमांत बाबांकडे परत गेला कीं आणखी कोठें गेला हें कसें कळायचें ?

राजनर्तकीच्या घरीं लग्नाच्या तयारीची गोष्ट त्याला कळली. तेथें नवरदेवाचें विचित्र वागणें पण कळलें. त्यावरून तो वल्कलचीरच असावा असें अनुमान करून राजा स्वतः तेथें गेला व आपल्या भावाला राजवाड्यांत घेऊन आला. प्रसन्नचंद्रानें आपल्या भावाला सर्व गोष्टी समजावून सांगितल्या व त्याला राज्याचा अर्धा वांटा देऊन त्याचें एका राजकन्येशीं लग्न करून दिलें.

दोन तीन महिने लोटले असतील, कांहीं सैनिक त्या गाडीवाल्याला धरून घेऊन आले आणि म्हणाले—“ याच्याकडे चोरीचा माल सांपडला आहे. वल्कलचीरनें गाडीवाल्याला ओळखलें. त्यानें साक्ष दिली कीं गाडीवाला खरा चोर नव्हे. चोराला बडवून त्याच्याकडचा माल गाडीवाल्यानें घेतला होता. राजानें भावाच्या म्हणण्याप्रमाणें गाडीवाल्याला सोडून दिलें.

आणखी बारा वर्षे लोटलीं. वल्कलचीरला आपल्या वृद्ध बापाची आठवण झाली. सोमचंद्र तर पुत्रविरहानें मृत्युशय्येवरच होता. दोघे भाऊ वडिलांना भेटायला गेले.

दोघां मुलांना येत असलेले पाहून वृद्ध पित्याला फार आनंद झाला. पितापुत्रांची ती भेट आश्रमांतील ऋषीं व मुनींना देखील आनंदाची वाटली. दोनतीन दिवस पित्याच्या सान्निध्यांत राहून दोघे भाऊ राजधानींत परत आले.





# राक्षस पायऱ्या

पश्चिमी समुद्राच्या कांठीं सहस्रावधि वर्षां पूर्वीं एका गांवीं गांवचा पाटील रहात असे. त्याला एक मुलगा होता. त्या मुलाचें नांव ललित असें होतें. ललित एक हुशार मुलगा होता. गांवकरी त्या मुलाचें चातुर्य व हुशारी पाहून पाटलांना म्हणत—“ पाटील ! तुमच्या पोटीं स्वतः बृहस्पतीच जन्माला आला आहे.”

एकदां ललित खेळायला म्हणून गेला आणि घरीं परत आला नाहीं. त्याचा पुष्कळ शोध केला. पत्ता लागेना.

त्या गांवांत बैमार नांवाचा एक लोहार रहात असे. गांवकऱ्यांची त्याच्यावर फार मर्जी असे. कारण त्याच्या एका गुणामुळें गांवकऱ्यांपैकीं दोघांतिघांची एक खेप तरी त्याच्या घरीं होत असे. तो स्वप्नांचा ठीक ठीक अर्थ सांगे. स्वप्नें विचित्रच असतात पण त्यांचा देखील कांहींतरी अर्थ असतो हें बैमारनें त्यांना दाखवून दिलें होतें.

ललित निघून गेलेल्याला तीन वर्षे होऊन गेलीं. पाटील तर मुलाची आशा सोडून स्वस्थ बसले होते. परंतु एकदां रात्रीं झोपल्यावर बैमारच्या स्वप्नांत तो मुलगा आला तो एका पांढऱ्या घोड्यावर बसून आला होता. तो बैमारला म्हणाला—“ काका ! मी जृंभकासुराच्या गुहेंत आहें. त्यानें मला आपला दास करून घेतलें आहे. आतां मला लवकरच दास्यमुक्ति मिळेल. पण वेळेवर कोणीतरी घेऊन जायला आलें पाहिजे. तुम्ही आलांत तर बरें होईल. मी राक्षस पर्वतावर राहातों.”

श्री. न. ग. नेवगी




"अरे वाळ हें तर सगळें स्वप्नच आहे. यावर मी कसा काय विश्वास करूं?" लोहारानें स्वप्नांतच ललित जवळ शंका केली.

"तर मग ही खरी गोष्ट कीं खोटी हें पटायला ही खूण ठेवून जातों!" ललित म्हणाला. तो घोडा वळवून निघणार त्याच वेळीं त्याच्या तोंडांत घोड्यानें एक लाथ मारली. लाथ बरोबर कपाळाला लागली व त्याच धक्क्यानें लोहाराची झोंप मोडली. लोहाराचा त्या गोष्टीवर विश्वासच बसेना. पण जिथें लाथ लागली होती ती जागा दुखत होती. म्हणून उठून लोहारानें आरशांत आपलें तोंड पाहिलें तर कपाळावर घोड्याच्या नालेची एक निळी खूण स्पष्ट दिसली. लोहारानें इतर लोकांच्या स्वप्नाचा अर्थ लावून त्यांच्या मनाचें समाधान केलें होतें. पण स्वतःच्याच स्वप्नाचा अर्थ त्याला लावतां येईना.

समुद्रकांठापासून थोड्याच अंतरावर एक डोंगर होता डोंगर चढून जाण्यासाठीं पायऱ्यापण दिसत होत्या. पण त्या पायऱ्या चढून जाणें माणसाला शक्यच नव्हतें. फार उंच होत्या त्या पायऱ्या. म्हणून त्यांचें नांव राक्षस पायऱ्या असें पडलें होतें. पण राक्षसांनीं स्वतःला चढण्यासाठीं त्या पायऱ्या बांधल्या होत्या याची कल्पना देखील कोणाला नव्हती. कारण कोणी त्यावर चढून जाणाऱ्या राक्षसाला पाहिलें नव्हतें. किंवदंती अशी होती कीं तो राक्षस त्या पायऱ्या चढून जात असे.

वैमारनें राक्षसाच्या हातांतून ललितचें रक्षण करण्याचें ठरवून रात्रीं डोंगरावर जाण्याचें मनाशीं ठरविलें. थोडासा काळोख पडल्यावर तो निघाला.

राक्षसाच्या डोंगराकडे जायला वाट समुद्रांतून होती. त्यानें एक दांडकें हातांत घेतलें आणि एका ओळखीच्या कोळ्याच्या घरीं गेला. त्याला पडलेलें स्वप्न वर्णन करून सांगितलें व म्हणाला—"तूं मला त्या डोंगरापर्यंत पोंचव." कोळी म्हणाला—"अहो का का? एवढी विनंति करण्याची काय जरूर? येतों नाव घेऊन!"

त्याविवशीं लोहारानें कोळ्याच्या घरींच भाकर खाल्ली नंतर दोघे नाव घेऊन निघाले. काळोखी रात्र होती. थोड्या वेळानें नाव राक्षस पायऱ्यांच्या जवळ येऊन पोंचली.

येथवर कसें यायचें हें वैमारला माहीत होतें. पण पुढें कसें जायचें आणि काय करायचें हें त्याला माहीत नव्हतें. ऐकून त्याला माहीत होतें कीं गुहेचें तोंड मोठें आहे. तें एक मायाद्वारच आहे. फक्त रात्रीं तें उघडतें.

लोहार आपल्या मित्राला म्हणाला—"आपण दोघे स्वप्नांतल्या गोष्टीवर विचार करून येथवर आलों. आपल्याहून वेडा आणखी कोणी असेल का?"

"काका! तें आतां मला काय माहीत? तें तुम्हींच ओळखा!" कोळी म्हणाला.

ठीक त्याच वेळीं पाण्यांत लःख उजेड पडला. तो उजेड डोंगरांतून येत होता



आणि त्याचा अंधुक प्रकाश डोंगरावर पडला होता. त्या उजेडांतच लोहाराला गुहेचें दार दिसलें. तो काठी खांद्यावर टाकून डोंगर चढूं लागला. तो अगदीं गुहेच्या दाराजवळ जाऊन पोंचला. गुहेचें दार त्याला भयंकर दिसलें. मुंडमाळा जागोजागीं टांगलेल्या होत्या.

आंत पाऊल टाकावें कीं नाहीं, हा विचार करीत तो थोडा वेळ थबकला. बाहेर उजेड होता, पण गुहेंत गडद अंधकार होता. तरी तो आंत शिरला. चांचपत कित्येक वळणें पार करावीं लागलीं.

     



"या गुहेंत आपण चाललों आहों खरें, परत कसें येतां येणार? त्यापेक्षां आतांच मागें पाऊल घेतलेलें बरें." असा एक विचार त्याच्या मनांत आला. पण तेवढ्यांत पाठीमागून मोठा आवाज झाला. गुहेचें दार बंद झालें असावें असें अनुमान करून तो पुढें निघाला. दूर त्याला एक दिवा दिसला.

लोहार त्या दिव्याच्या अनुरोधानें चालूं लागला. आतां रस्ता सरळ होता. खाच खळगे किंवा वळणें वगैरे नव्हती. तो एका मोठ्या दालनांत पोंचला. आंत छपराला एक दिवा टांगलेला होता. त्याच्या खालीं दिव्याच्या उजेडांत एका दगडी टेबलाच्या चारी बाजूला तीन चार राक्षस बसलेले त्याला दिसले. राक्षसच ते. त्यांना पाहतांच लोहाराच्या छातींत धडकीच भरली.

त्या राक्षसांत जरा मोठा व त्या सर्वांचा नायक असा एक राक्षस होता. त्यानें कर्कश आवाजांत लोहाराला विचारलें—"काय पाहिजे तुला?"

तो आवाज ऐकून लोहार जास्तच घाबरला. तरी हिंमत करून म्हणाला—"ललितला घेऊन जाण्यासाठीं आलों आहें! नोकरीचा काळ संपत आला आहे न?"

"कोणी पाठविलें तुला?" राक्षसानें त्याला विचारलें.

"मीच स्वतः आलों!" लोहार निर्भीक-पणें म्हणाला.

"तर मग चल! माझ्या नोकरांत तो उभा आहे. त्याला ओळखून तूं बोलावून घेऊन जा." पण तूं त्याला ओळखलें नाहींस तर मात्र जिवंत परतून जातां येणार नाहीं!" राक्षसानें त्याला बजावून सांगितलें. राक्षस त्याला एका मोठ्या दालनांत घेऊन गेला. त्या दालनांत कित्येक दिवे होते व पंचवीस ते पन्नास मुलें उभीं होतीं. सर्वांचीं तोंडें, उंची वगैरे अगदीं एकसारखीं आणि आश्चर्य म्हणजे सर्वांचीं तोंडें ललित-सारखीं होतीं. त्यांत ललितला कसें ओळखायचें?"

"घे ओळखून आपल्या ललितला! फक्त एक संधी देतों मी तुला!" राक्षस दरडावून म्हणाला.

लोहारानें सर्व मुलांना न्याहाळून पाहिलें. सर्व एकसारखे. काय ओळखणार तो? तो राक्षसाला म्हणाला—"राक्षस राजा! तुझ्या कृपेनें तुझे सर्व नोकर पहा, हवा, पाण्याशिवाय कसे सशक्त आहेत. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा कीं तुझी त्यांच्यावर फारच कृपा आहे."

"तें सर्व ठीक आहे रे! हुशार दिसतोस कीं तूं! बघूं तुझा हात!" असें म्हणत राक्षसानें हात पुढें केला. तो हात पाहून लोहाराला कांपरें भरलें व त्याची बोबडी वळली. त्यानें हाताऐवजीं आपली काठी पुढें केली. राक्षसानें सुतासारखी ती काठी आपल्या बोटाला गुंडाळली.

तें पाहून सर्व मुलें खदखदां हंसूं लागलीं. लोहारानें सर्व मुलांकडे पाहिलें.










फक्त एकच मुलगा हंसत नव्हता. लोहार त्याच्याजवळ गेला व त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला—" हा पहा आमचा ललित ! यालाच बरोबर घेऊन जाण्यासाठीं आलों होतों. राक्षस किती दुष्ट असले तरी ते दिलेलें वचन कधींच मोडीत नाहींत हें मी ऐकलें आहे."

लोहारानें एवढें म्हटल्यावरोबर एकदम सर्व दिवे विझले. एकदम दाट काळोख पडला. मोठमोठे दगड आदळण्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. भूकंपासारखी स्थिति झाली. त्या भयंकर स्थितींत देखील लोहार भ्याला नाहीं. त्यानें ज्या मुलाच्या खांद्यावर हात ठेवला होता त्याला उचलून घेतला. पण त्याला केव्हां घेरी आली हें कळलें नाहीं. तो शुद्धीवर आला तेव्हां गुहेबाहेर तो राक्षस पायऱ्याच्या अगदीं वरच्या

ललित होता

म्हणजे आपल्याला घेरी आलीच नव्हती तर. या जागीं आपल्याला कोणी पोंचतें केलें हें त्याला कळेना. परंतु जें काम पुरें करण्यासाठीं तो एवढा धीर करून आला होता तें पुरें झाल्याबद्दल त्याच्या मनाचें समाधान झालें.

त्याचवेळीं सूर्योदय झाला. तो डोंगर उतरून खालीं आला. त्याचा मित्र कोळी त्याची वाट पहात बसला होता. नावेंत बसून तिघे आपल्या गांवीं आले. लोहारानें ललितला त्याच्या बापाकडे पोंचतें केलें. वैमार राक्षसाच्या गुहेंतून ललितला कसा सोडवून घेऊन आला त्याची गोष्ट मोठ्या अभिमानानें त्या गांवचे गांवकरी आजपर्यंत सांगत आहेत.






हनुमानानें शिंशुपा (शिशवी) च्या झाडावर चढून चारी बाजूस पाहिलें. रावणाची ती सुंदर बाग त्याला नंदनवनाप्रमाणें सुंदर भासली. त्या बागेंत सुंदर तऱ्हेनें लावलेल्या लतावेलींच्या रंगीबेरंगी फुलांनीं आणि नाना तऱ्हेच्या फळांनीं लादलेलीं झाडें फारच शोभून दिसत होती. मधून मधून कमळांनीं भरलेल्या पुष्करणी आणि त्यांच्या भोंवतालीं असलेले लताकुंज चित्ताकर्षक होते. त्या बागेंत अशोकाची झाडें जास्त असल्यानें त्या बागेचें नांव 'अशोक वाटिका' पडलें होतें. नावाप्रमाणें खरोखरच ती वाटिका शोक हरण करणारी होती.

वाटिकेच्या एक बाजूला मारुतीला एक पांढरा शुभ्र उंच मांडव दिसला. त्यांत सोनेरी चबुतरे असून वर चढण्यासाठीं मोत्यानें मढविलेल्या पायऱ्या होत्या. त्या मांडवांत त्याला एक स्त्री बसलेली दिसली. ती आपल्या दु:खानें अतिशय क्षीण झाली होती आणि वारंवार दु:खानें उसासे सोडीत होती. तिच्या भोंवती राक्षशिणींचा पाहारा असल्यानें तिची दशा अगदींच केवीलवाणी दिसत होती. तिनें आपल्या केसांची वेणी घातलेली होती. तिच्या अंगावर अलंकार वगैरे कांहींच नव्हते. लुगडें, तेंहि मळकेंच होतें



रामाची भेट होण्यापूर्वी ऋष्यमूक पर्वतावर वानर राज सुग्रीव याच्यासह कांहीं वानर बसले होते. अर्थातच मारुतीपण त्या वेळीं बरोबर होतांच. तेव्हां त्यांना आकाशांतून एक राक्षस एका स्त्रीला पळवून नेत असलेला दिसला. त्या स्त्रीनें आपले आपले दागिने खालीं टाकले होते. पुढें तीच सीता होती व तो राक्षस रावण होता, हें कळलें.

रावण एक स्त्रीला पळवून नेत असतांना त्यानें पाहिलेली ती स्त्री अगदीं अशीच होती. तिचा चेहेरा, केस, सौंदर्य सर्व कांहीं तसेंच दिसलें. त्यावरून ही सीता असावी असा अंदाज मारुतीनें लावला.

मारुतीनें आणखी एक गोष्ट पाहिली. त्या स्त्रीनें कांहीं दागिने काढून तेथील एका वृक्षाच्या फांदीला अडकवून ठेवले होते. खुणेसाठीं म्हणून जे दागिने रामानें मारुती-जवळ दिले होते नेमके तेच दागिने त्यांत वगळून बाकी सर्व होते. ह्यावरून ती सीताच असली पाहिजे ह्याची साक्ष पटायला वेळ लागला नाहीं.

तिला पाहतांच त्याच्या मनांत विचार आला कीं हीच राजा जनकाची लाडकी मुलगी, राजा दशरथाची मोठी सून आणि श्रीरामचंद्राची पत्नी सीता असणार. हिच्या रक्षणासाठीं रामानें किती राक्षसांना मारलें, हिच्यासाठींच वालीला मारलें, एवढेंच नव्हें-तर तो तिन्ही लोक पालथे घालण्यास तयार झाला आहे. हिच्यासाठीं मी एवढा मोठा समुद्र पार करून आलों. हिला या स्थितींत पाहून मला एवढें दुःख होत आहे तर रामाला किती होत असेल!

रात्र उलटून गेली होती. पहाट झाल्यानें जिकडे तिकडे मंत्रघोष सुरू होता. त्याच प्रमाणें वेदपाठ ऐकूं येत होता. मंगलवाद्यांनीं



नगरी दुमदुमून गेली होती. ह्या सर्व मंगल घोषानें रावण जागा झाला. उठताच त्याला सीतेची आठवण झाली. तो सर्व प्रकारें शृंगार करून अशोकवाटिकेकडे निघाला. बरोबर शंभर दासी होत्या. कांहींच्या हातांत सोन्याच्या समया होत्या, कांहींच्या हातांत चवऱ्या, मोर्चेल व पंखे होते. कांहीं जणी आभूषणांचे थाळ घेऊन चालल्या होत्या. एकीनें रावणाच्या डोक्यावर छत्र धरलें होतें व एकीच्या हातांत रत्नजटित मद्यपात्र होतें.

रावण अशोकवाटिकेच्या जवळ आला. त्याला जवळून पाहातां यावें म्हणून मारुती खालच्या फांदीवर येऊन बसला. सीता भयानें थरथरां कांपत होती. तिला पाहून रावण म्हणाला—“व्यर्थ आपल्याला कां शिणवितेस ? तारुण्य फिरफिरून येत नसतें. तें आहे तोपर्यंत त्याचा मनसोक्त उपभोग घ्यावा. तुझ्या सौंदर्यानें मी मुग्ध झालों आहे. तुझ्या प्रेमासाठीं मी हा हात पुढें पसरला आहे. त्याचा स्वीकार कर. आनंदानें माझा हात धर मी तुला माझी पट्टराणी करीन. पृथ्वीचें राज्य तुझ्या पायावर घालीन.” तूं जन्मभर सुखांत राहशील. ज्या रामासाठीं तूं एवढें दुःख करीत आहेस,



ज्याला भावानें सिंहासनावरून खालीं ओढून जंगलांत हांकलून दिला आहे, आणि जो जंगलांत वणवण भटकत आहे तो अजूनपर्यंत जिवंत तरी असेल काय ? तुला पुन्हां त्याचें दर्शन घडणें शक्य नाहीं. हिरण्यकश्यपूच्या बायकोला इंद्रानें पळवून नेलें असतां हिरण्य-कश्यपूनें नारदाकडून तिला परत बोलावून घेतलें. पण त्या रामानें कितीहि विनवण्या केल्या तरी मी तुला त्याच्या स्वाधीन करणार नाहीं. लक्षांत ठेव. अग, तूं ह्या अशा मलीन वेषांत सुद्धां किती सुंदर दिसते आहेस ! तर मग तूं हीं वस्त्राभूषणें घाल म्हणजे तुझ्या











रूपाचें हें तेज जास्त चमकूं लागेल. ऊठ, मंगलस्नान कर आणि राजाच्या राणीला शोभेल अशी राहा. माझी पट्टराणी हो.''

रावणाचें बोलणें ऐकून सीता संतापानें लाल झाली. जवळच पडलेली गवताची काडी मधें ठेवून ती म्हणाली—" चांडाळा, तुला मोक्ष जितका दुर्लभ आहे तितकीच मी सुद्धां दुर्लभ आहे. मी एका पुरुषाची पत्नी आहे, पतिव्रता आहे. तुला तो कितीहि अयोग्य वाटला तरी तोच मला प्रिय आहे. तुझ्या ह्या मातीमोलाच्या वैभवाची मला इच्छा नाहीं. ती तुझी तुलाच लखलाभो. नीचा, मूढा, तुझ्या ह्या कामानें तूं, आपलें, आपल्या कुटुंबाचें, आपल्या कुळाचें, आपल्या राज्याचें नुकसान करून घेत आहेस. तुझें सर्वस्व नष्ट होणार आहे. अजून जागा हो. जर तुला स्वतःच्या हिताची इच्छा असेल तर तूं बऱ्या बोलानें मला माझ्या पतीच्या स्वाधीन कर. तो महा पुरुष तुला क्षमा करील.

" तूं आपल्या पराक्रमाचा किंवा वैभवाचा गर्व करूं नकोस. रामा लक्ष्मणांनीं तुला चांगलें ओळखलें आहे. ते तुझा नाश केल्यावांचून राहणार नाहींत. तुला आपल्या बळाचा एवढा अभिमान आहे तर त्यांच्या पश्चात् कशाला मला चोरून पळवून आण-लीस? त्यांच्याशीं युद्ध कां नाहीं केलेंस? त्यांच्या समोर तूं माझ्यकाडे नुसतें वक्रदृष्टीनें हिलें असतेंस तरी तुझी धडगत नव्हती. रामलक्ष्मण तुझा नाश केल्याशिवाय स्वस्थ बसणार नाहींत. उगाच त्यांच्याशीं वैर मांडून सर्वस्वी बुडूं नकोस.''

सीतेच्या बोलण्यानें चिडून जाऊन तो तिला म्हणाला—" तूं माझा अपमान करून घोर अपराध करीत आहेस. वास्तविक ह्या तुझ्या अपराधाबद्दल तुला मृत्युदंडच योग्य आहे. परंतु मी तुझ्यावर दया करून तुला आतांच ती शिक्षा करीत नाहीं. अजून दोन महिन्याचा अवधि आहे. तोंपर्यंत विचार कर. नीट विचार करून स्वखुशीनें माझा हात धर. माझी राणी हो. नाहींतर मी तुला उभी चिरून कच्ची खाऊन टाकीन. तूं सुद्धां ही गोष्ट पक्की लक्ष्यांत ठेव."

त्यानंतर रावणानें पाहारा करणाऱ्या राक्षशिणींना ताकीत दिली कीं सीतेला भय दाखवून किंवा अन्य प्रकारें सीतेचें मन माझ्याकडे वळविण्याचा प्रयत्न करा नाहींतर सीतेबरोबर तुम्हांला देखील ठार करीन.



रावणाबरोबर आलेल्या गंधर्व स्त्रियांनीं सीतेबद्दल आपली सहानुभूति व्यक्त केली.

रावण परत जात असतां त्याच्या एका बायकोनें त्याला आलिंगन करून म्हटलें—" कशाला उगाच तिच्या मागें लागतां? तिचें दैवच खोटें. नाहीं तिच्या नशीबीं सुख त्याला ती तरी काय करणार!" असें म्हणून तिनें हंसून रावणाकडे पाहिलें. रावण स्मित करून स्त्रियांच्या घोळक्यांत आपल्या प्रासादाकडे निघून गेला.

रावणाच्या आज्ञेनें राक्षशिणींनीं सीतेचें मन वळवण्याचा खूप प्रयत्न केला. त्यासाठीं त्यांनीं साम, दाम, दंड, भेद आदि सर्व उपाय योजिले. पण सीता जरा सुद्धां आपल्या निश्चयापासून ढळली नाहीं. मग सीतेला भय वाटावें म्हणून त्या आपसांत बोलूं लागल्या. एक म्हणाली—" जर हिनें रावणाचें ऐकलें नाहीं तर आपण हिचे बारीक बारीक तुकडे करून खाऊन टाकूंया." दूसरी—" हो, अगदीं मद्यांत बुडवून खाऊं या." तिसरी—" छे! छे!! असें नाहीं, एकेक अंग तोडून खाऊं म्हणजे बरें."

त्यांच्या ह्या अशा बोलण्याची सीतेला शिसारी आली आणि भय देखील वाटलें.



ती तेथून उठून दूर एका अशोक वृक्षाच्या खालीं विचार करीत उभी राहिली. रावण म्हणतो तसें खरोखरच रामलक्ष्मण मरून गेले कीं काय ? कां रावणानेंच त्यांना मारून टाकिलें ? पण हें कसें शक्य असेल ? कदाचित त्यांनीं विरक्त आणि निराश होऊन संन्यास तर घेतला नसेल ? राक्षशिणींनीं पुन्हां तिला घेरलें व त्रास देऊं लागल्या.

तेवढ्यांत त्रिजटा नावांची राक्षसीण तेथें आली आणि म्हणाली—" सीतेला कांहीं बोलूं नका बरं ! मोठा अनर्थ ओढवेल. मला आत्तां एक फार भयंकर स्वप्न पडलें. सांगतें तुम्हांला, ऐका. राम श्वेतवस्त्र परिधान करून पांढऱ्या फुलांची माळ गळ्यांत घालून पांढऱ्या स्वच्छ हस्तीदंती पालखींत बसून लक्ष्मणाला बरोबर घेऊन आकाश मार्गानें लंकेंत आला. त्याच्या पांढऱ्या पालखीला हजार पांढरे हंस उचलून आणीत होते आणि ही सीता पांढरे शुभ्र लुगडें नेसून समुद्राच्या मध्यभागीं असलेल्या श्वेत पर्वतावर उभी होती आणि राम लक्ष्मण चार दातांच्या हत्तीवर बसून सर्व लंका नगरीभर हिंडले. राम श्वेत पर्वतावर आल्याबरोबर सीतादेखील त्याच्यावर चढून बसली. ती जेव्हां रामाच्या मांडीवरून उठली, तेव्हां जणूं कांहीं तिनें सूर्यचंद्रच हाताला धरले आहेत असें दिसलें. नंतर मी रामाला आठ बैलाच्या रथांतून जात असतांना पाहिलें. इतक्यांत सीता पुष्पक विमानांत बसून उत्तरेकडे जात असलेली दिसली. विमानांत रामलक्ष्मणहि होते. तेवढ्यांत रावण दिसला. त्याच्या अंगावर लाल कपडे होते. गळ्यांत लाल जासवंदीच्या आणि कण्हेरीच्या फुलांच्या माळा होत्या. अंगावर तेल ओतलेलें होतें आणि तो दारू पिऊन झिंगून पडलेला मला दिसला. मधेंच रावण पुष्पक विमानांतून खालीं पडत असलेला पण

मला दिसला आणि काय सांगूं ? विचित्रच एक एक ! काय याचें अकाळ विक्राळ रूप. लाल कपडे घातलेला, लाल फुलें घेतलेला, अंगाला रक्तचंदन फासलेला, दांत विचकून हंसत असलेला रावण एका मुंडन केलेल्या काळें लुगडें नेसलेल्या बाईला उचलून घेऊन हांसत खिदळत गाढवाच्या रथांत बसून जात असलेला मला दिसला. तो दक्षिणेकडे चालला होता. वाटेंतच तो रथांतून पडला. तसाच उठून फरफटत जातांना वाटेंत एका चिखलाच्या डबक्यांत पडला आणि बुडून गेला. कुम्भकर्णाची पण तीच स्थिति झालेली दिसली. रावणाचा मुलगा ही तसाच दिसला. नंतर मेघ गर्जनेचा मोठा आवाज झाला. मी डोळे मिटले. झोपेंतच मला दिसलें कीं रावण डुकरावर बसलेला आहे. इंद्रजीत मगरीवर बसलेला आहे व कुम्भकर्ण उंटावर बसला आहे आणि हे तिघे भरधांव दक्षिणेकडे चालले आहेत. इतक्यांत प्रलय झाल्यासारखें वाटलें. गोपुरें पडलीं, तोरणें ओघळलीं आणि विजेच्या कडकडाटांत लंका समुद्रांत बुडून गेली. त्याच्यांतच लंका जळून जात असलेल्या ज्वाळा दिसल्या. त्या पाहतांच मी एकदम जागी झालें. थोडा वेळ माझ्या तोंडून शब्द फुटेना. क्षणभरानें मी सावध झालें. तेव्हां मला कळलें कीं मी पाहिलें तें सारें स्वप्न होतें. कांहीं असो मला मात्र भीति वाटली. हें सर्व पाहून मला वाटलें तें मी तुम्हांला सांगतें आहे. तुम्हीं सीतेला कांहीं त्रास देऊं नका. नाहींतर खरोखरच आपल्यावर संकट येईल."

तें वृत्त ऐकून सर्व राक्षसिणींना दहशतच बसली.





## २६. फूजीसान्

फूजीयामा नांवाचें एक पर्वत शिखर जपान देशांत सर्वांत जास्त उंच आहे (१२,३९५ फूट). हा एक ज्वालामुखी आहे. १०० वर्षांपूर्वी हा फुटला आणि राखेच्या ६ इंच जाडीच्या थराखालीं सारें टोकियो नगर झांकून गेलें. याचा केटर २००० फूट आहे. जपानी लोक त्याची पूजा करतात.





# भारताचा इतिहास



सुलतान मोहम्मदाच्या कारकीर्दीबरोबर तुघलक वंश लयास गेला. त्याच्या नंतर दिल्लीच्या उमरावांनीं दौलतखान लोदी नांवाच्या सरदाराला गादीवर बसविलें परंतु तैमूरलंगाचा हिंदुस्थानांतला प्रतिनिधि खिज्रखान मुलतान येथें रहात असे. त्यानें सन् १४१४ मध्यें दिल्लीवर स्वारी करून दिल्ली शहर काबीज केलें. दौलतखानाला कैद करून हिस्सार फिरोजा येथें पाठविण्यांत आलें. कांहीं इतिहासकारांचें मत आहे कीं खिज्रखान हा महंमद पैगंबराचाच वंशज असल्यामुळें त्यानें स्थापन केलेल्या राजवंशाचें नांव सैयद वंश पडलें. खिज्रखान योग्य शासक नव्हता. त्याच्या सात वर्षांच्या कारकीर्दींत दिल्लीच्या साम्राज्याची हद्द जवळ पासच्या जिल्ह्यापलीकडे गेली नाहीं. ह्या छोट्याशा राज्यांत देखील मधूनमधून बंडें होत. बंडे मोडण्याचा खिज्रखान व त्याचा मंत्री ताजुलमुल्क दोघांनीं पुष्कळ यत्न केला. सन् १४२१ मध्यें दोघे एका मागून एक मरण पावले.

खिज्रखान ज्या दिवशीं मरण पावला त्याच दिवशीं (२० मे १४२१) त्याचा मुलगा मुबारक शाह याला दिल्लीच्या प्रमुख सरदारांनीं गादीवर बसविलें. तो देखील योग्य शासक नव्हता. त्यानें राज्यांतली थोडी फार बंडाळी मोडली. परंतु राज्याला खोकर जातीपासून धोका वाढला. त्याच्या दरबारांत हिंदूंचें वर्चस्व वाढलें. तो यमुना नदीच्या काठीं मुबारकाबाद नगराचा बांधकामाची पाहाणी करीत असतां हिंदू व मुसलमान सरदारांनीं कट करून त्याला ठार केलें. १९ फेब्रुवारी १४३४ च्या या कटाचा पुढारी वजीर सर्वरुलमुल्क नांवाचा सरदार होता.

त्याच्या नंतर त्याचा वारस महंमद सुलतान झाला. तो देखील अयोग्यच होता. कटवाल्यांचा सरदार सर्वरुलमुल्क वारल्यानंतर त्यानें राजसत्ता पूर्णपणें आपल्या हातीं करून घ्यायला हवी होती. परंतु त्याच्यांत ती कर्तबगारी नव्हती. माळव्याचा अधिकारी महंमद शाह खिलजी यानें दिल्लीवर स्वारी केली. तेव्हां सुलतानाच्या मदतीला म्हणून आलेल्या बहिलोल खान यानें स्वतःच दिल्लीची गादी बळकावण्याचें ठरविलें. त्याला त्याच्या प्रयत्नांत यश मिळालें नाहीं. परंतु सैयद वंशाचा दिवसेंदिवस ह्रासच होत गेला. सन् १४४५ मध्यें महंमदशाह मरण पावला.

त्याचा मुलगा अल्लाउद्दीन आलम शाह गादीवर आला तेव्हां दिल्लीच्या राज्यांत दिल्ली नगर व जवळ पासचीं कांहीं खेडीं मात्र उरलीं होतीं. तेव्हां या ल्हानशा राज्याचा अधिपति होण्याऐवजीं आपलें स्वतःचें गांव बदाऊन येथें जाऊन राहाणेंच त्याला जास्त आवडलें. म्हणून सन् १४५१ मध्यें तो आपलें राज्य बहिलोलखान लोदी याला देऊन टाकून बदाऊनला निघून गेला. दिल्लीच्या गादीवर येणारा बहिलोल



खान हा अफगाण जातीचा प्रथम सुलतान होय. त्यानेंच लोदी वंशाची स्थापना केली. हा लाहोर सरहिंद येथें राज्यप्रतिनिधि म्हणून कार्य करीत असे. तेव्हां यानें हमीद खान नांवाच्या मंत्र्याच्या मदतीनें सन १४५१ मध्यें आलमशाह याचें सिंहासन काबीज करून घेतलें होते. हा पहिल्या सुलतानांसारखा विलासी व अयोग्य नव्हता. तो एक कर्तबगार व महत्वाकांक्षी योद्धा होता. त्यानें अफगाण लोकांचें सहाय्य घेऊन हमीदखानाला कैद केलें. मेवाड, संभल, मैनपुरी, सुकेत, रेवाडी वगैरे स्वतंत्र

      

Fullscreen 127 10 / 72

राज्यें आपल्या आमलाखालीं आणलीं. सन् १४८६ मध्यें जोनपुर जिंकून त्यानें आपला मुलगा बार्बक शाह याला राज्य प्रतिनिधि म्हणून नेमलें. ग्वाल्हेरच्या कितरसिंह नामक मांडलिक राजाचें पारिपत्य करून परत येत असतां वाटेंत सन् १४८९ मध्यें तो आजारी पडला व मरण पावला.

सुलतानाचा दुसरा मुलगा निजामखान हा सिकंदर शाह हा किताब घेऊन गादीवर आला तो फार पराक्रमी होता. लोदी वंशांतील तिघां सुलतानांत हाच सर्वांत योग्य होता. यानें राज्यांतील बंडाळी नाहींशी केली. बंडखोरांना कडक शिक्षा केल्या. प्रमुख अफगाण सरदारांच्या जगिरींची तपासणी करविली. मांडलिक राज्यांना त्याचा वचक जाणवला. त्यानें १५०४ मध्यें, आज जेथें आग्रा शहर आहे, त्याच्याजवळ एका नवीन नगराची स्थापना केली. त्याला शेवटपर्यंत बंडखोरांना आपल्या अधिकाराखालीं ठेवण्यासाठीं प्रयत्न करावा लागला. सन् १५१७ मध्यें तो वारला त्याच दिवशी त्याचा मुलगा इब्राहिमखान गादीवर आला. त्याचा भाऊ जलालखान याला गादीवर आणण्याचा प्रयत्न कांहीं सरदारांनीं केला. परंतु त्यांना त्यांत यश आलें नाहीं. जलाल कैद झाला आणि सुलतानाच्या आज्ञेनें त्याला मृत्युदंड देण्यांत आला. इब्राहिम पराक्रमी होता. पण कर्तबगार नव्हता. आपला वचक वाढविण्यासाठीं त्यानें कांहीं उच्च अधिकाऱ्यांना त्रास द्यायला सुरवात केली. म्हणून सर्व अफगाण प्रमुख त्याचे शत्रु झाले. सुलतानाचा मित्र दौलत खान लोदी आणि आलेखान यांनीं काबुलचा शासक बाबर याला हिंदुस्थानावर स्वारी करण्यास बोलाविलें.





# महाभारत

एकदां विश्वामित्र ऋषी कण्व, नारद इत्यादिकांसह द्वारकेला आले. रोहिणी व वसुदेव यांचे पुत्र आणि कांहीं यादव यांना थोडी थट्टा करावीशी वाटली. त्यांनीं कृष्ण-जांबुवतींचा मुलगा सांब याला एका गरोदर स्त्रीचें सोंग देऊन समोर उभें केलें व मुनिवर्यांस विचारलें—"मुनिवर्य ! ही एक गरोदार स्त्री आहे ! आपण त्रिकालज्ञानी मुनि. हिला मुलगा होईल कीं मुलगी ?"

मुनींना अर्थातच हा पोरकटपणा आवडला नाहीं. ते रागानें म्हणाले—"हा सांब आहे ! याच्या पोटांतून एक मुसळ जन्मास येईल व तो वृष्णी व अंधक वंशाचा म्हणजे यादव वंशाचा नाश करील." असा शाप देऊन व एकदां श्रीकृष्णाकडे करड्या नजरेनें पहात सर्व मुनि निघून गेले.

मुनींचा शापच तो, सांबाच्या पोटीं खरोखरच मुसळ जन्मलें. कृष्णाच्या आज्ञेनें त्याचे तुकडे तुकडे करून समुद्रांत टाकण्यांत आले. त्यानंतर राज्यभर राजाज्ञा झाली कीं कोणी मद्यपान करूं नये. कोणी मद्यपान केल्यास त्यालाच नव्हेतर त्याच्या बंधुबांधवांस देखील मृत्युदंडाची शिक्षा देण्याचें ठरलें होतें. मुनींचा शाप झाल्यामुळें हा प्रतिबंध लावण्यांत आला आहे ओळखून सर्वांनीं मद्यपान करण्याचें सोडलें. इतकी सावधगिरी बाळगली तरी शाप काय व्यर्थ जाणार ? अपशकुन होऊं लागलेच. द्वारकेच्या गल्ल्या गल्ल्यांतून जिकडे पहावें तिकडे उंदीर अन् घुशी. जागोजागीं फुटकीं मडकीं दिसूं लागलीं. भर बाजार पुढें कोल्हेकुई ऐकूं येऊं लागली.



हें सर्व पाहून कृष्ण यादवांना म्हणाला—"महाभारत सुरू होण्यापूर्वी अशाच तऱ्हेनें अपशकुन होऊं लागले होते. मानव वंशाचा संहार सुरू होण्यापूर्वींच असे अपशकुन होतात." असें युधिष्ठिर म्हणाला होता.

कृष्णानें सर्व यादवांना समुद्रकाठीं चला-वयास सांगितलें. वृष्णी व अंधक सपत्नीक समुद्रकाठीं गेले. मांस, मदिरा व मिष्टान्नें तयार करण्यांत आलीं. सर्व द्वारकावासी समुद्र किनाऱ्यावर पोंचले. कृष्णाचा बाल-मित्र उद्धव, यादव वीरांना समुद्रकाठीं घेऊन गेला तेव्हां कृष्णानें त्याला प्रतिबंध केला नाहीं.

यादवांच्या माकडचेष्टांना सीमा उरली नाहीं. त्यांनीं मांस मदिरेवर मनसोक्त हात मारला. आजपर्यंत जो संयम पाळला होता तो संधी मिळतांच सुटला आणि नृत्य, गान व मदिरापानाला ऊत आला. कृष्णाशेजारीं बलराम व कृतवर्मा बसले होते त्यांनीं देखील मद्यपान केलें. सात्यकी दारूच्या धुंदींत कृतवर्माला म्हणाला—"तूं बरोबर होतास म्हणून अश्वत्थाम्यानें झोंपलेल्यांचा अमानुष वध केला. क्षत्रियांच्या हातून असलीं कामें होतात. यादव वीर असलें घृणित पापकर्म कधींच करीत नाहींत." प्रद्युम्नानें पण कृत-वर्म्यावर व्यंग बाण केले

"कळलें बरें का भाऊबाई! उपास करणाऱ्या भूरिश्रवाचा वध करणारे क्षत्रिय वीर आम्ही देखील पाहिले आहेत." कृतवर्मा म्हणाला.

कृष्णानें कृतवर्म्याकडे एकदांच करड्या नजरेनें पाहिलें.

"ह्या नीचाचा भाऊ शतधन्वी यानेंच स्यमंतक मण्यासाठीं सत्राजिताचा वध केला नव्हता का?" सात्यकी कृष्णाला म्हणाला.



तें ऐकून सत्यभामेला राग आला व तिनें कृष्णाला हें सर्व ऐकून थंड आणि स्वस्थ कां बसलां आहां, असें विचारलें.

"थांबा तुम्ही सगळे, मी याला पहा धृष्टद्युम्न आणि शिखंडीच्या शोधार्थ पाठवून देतों." असें सांगून सात्यकीनें तलवार उपसून कृतवर्म्याचें डोकें उडविलें.

कृतवर्म्याचा वध झाल्यामुळें भोजांना राग आला व त्यांनीं मद्यपात्रें उचलून सात्यकीवर फेंकायला सुरवात केली.

तें पाहून प्रद्युम्नानें भोजांवर हल्ला केला. भोजांनीं सात्यकी व प्रद्युम्न दोघांना ठार केलें.

कृष्णाला राग आला. त्यानें एक मूठभर गवत उपटलें. त्यांचें मुसळ झालें. त्याच्या सहाय्यानें कृष्णानें सर्व प्रमुख वीरांचा संहार केला. तेंच गवत उपटल्यावर त्यांचीं मुसळें झालीं. तीं घेऊन भोज, अन्धक, शैनेय इत्यादिक यादवांनीं आपसांत युद्ध करून स्वतःचाच संहार करून घेतला. पिता-पुत्रांनीं देखील परस्परांचा वध करून घेतला. कृष्ण मुसळ घेऊन निघाला. त्यानें देखील कित्येक यादवांचा संहार केला. तेव्हां बभ्रु व दारुक दोघे कृष्णाला म्हणाले—"तूं



सर्वांचा वध केलास. आतां बलरामाचा शोध काढूं या."

तिघे बलरामाच्या शोधार्थ निघाले. त्यांनीं त्याला एका झाडाजवळ बसलेला पाहिलें. तो खिन्न मनानें तेथें बसला होता. कृष्ण दारुकाला म्हणाला—"तूं लगेच हस्तिनापुरीं जाऊन यादवांच्या या संहाराची बातमी सांग. अर्जुन जरूर मदतीला धांवून येईल." दारुक रथ घेऊन निघाला. नंतर कृष्ण बभ्रूला म्हणाला—"तूं जाऊन स्त्रियांचें रक्षण कर. नाहीं तर त्यांच्या दागिन्यां-साठीं चोर त्यांना त्रास देतील. तो थोडें

अंतर चालत गेला असेल, त्याच्या अंगावर एक मुसळ येऊन आदळलें आणि त्याचा अंत झाला." तेव्हां कृष्ण बलरामाला म्हणाला—"दादा! मी स्त्रियांना राजधानींत पोंचता करून येतों. तोंपर्यंत तूं येथेंच रहा."

स्त्रियांना राजधानींत पोंचविल्यावर कृष्ण वसुदेवाला म्हणाला—"स्त्रियांच्या रक्षणाचा भार तुमच्यावर टाकून जात आहें. बलराम अर्जुनाची वाट पहात रानांतच बसलेला आहे. मी तिकडेच जात आहें. ज्या जागीं सर्व यादवांचा संहार झाला तेथें राहण्याची आतां माझी इच्छा नाहीं. मी व दादा दोघे यापुढें तपश्चर्या करणार आहों." असें सांगून वसुदेवाला कृष्णानें नमस्कार केला आणि निघाला. त्याला जात असलेला पाहून स्त्रियांनीं आक्रोश केला. पण तो म्हणाला—"अर्जुन येत आहे. तुम्ही घाबरूं नका." असें सांगून तो निघून गेला.

बलराम योगसमाधींत मग्न होता. त्याच्या पोटांतून एक श्वेत सर्प बाहेर आला आणि समुद्रांत निघून गेला. तो आदिशेष होता. वरुणलोकाच्या नागप्रमुखांनीं त्याची पूजा केली. बलरामाला देह त्याग करीत असलेला पाहून कृष्ण निर्जन वनांत एकटा हिंडत राहिला. नंतर त्यानें योगनिद्रा ग्रहण केली.

त्याच वेळीं जर नांवाचा एक रानटी शिकारी त्या बाजूला आला. त्याला दुरून कृष्णाचा पाय हरिणासारखा वाटला. त्यानें नेम धरून बाण मारला. जवळ येऊन पाहातो तों कृष्ण. त्यानें कृष्णाचे पाय धरून माफी मागितली. कृष्णानें जरला माफ करून आशीर्वाद दिला आणि देह त्याग केला. त्याच्या देहांतून एक दिव्य ज्योति निघून आकाशांत गेली. देव, देवांगना व ऋषी व मुनींनीं त्याचें स्वागत केलें.





[२४]

[मगरींच्या तलावाजवळ श्वानकर्णी व मार्जार आणि त्यांच्या अनुयायांनीं लखू व त्याच्या साथीदारांचें रक्षण केलें. नंतर ते त्या गुहावासियांच्या सल्ल्याप्रमाणें आणि साहाय्यानें डोंगराच्या शिखरावरून एका खोल दरींत उतरले. तेथें त्यांना एक मनुष्य एका भयंकर पक्ष्याला हातांत धरून मोठमोठ्यानें कांहींतरी पुटपुटत असलेला दिसला. तो भुतें उतरवणारा किंवा असाव कोणी मांत्रिक असावा असें त्यांना वाटलें—पुढें वाचा.]

दरींत उतरल्यावर तें आश्चर्यकारक दृश्य पाहून लखू व त्याचे साथीदार भयभीत व चकित झाले. जयमल कोणाच्याहि नजरेस पडल्याशिवाय आपल्या साथीदारांना खूण करून एका झाडावर चढला. त्याच्या पाठोपाठ गोमांग व लखूपण चढले. त्या मांत्रिकानें किंवा इतर कोणी त्यांना पाहिलें नाहीं.

"हे कोणीतरी नरमांसभक्षक जातीचे लोक दिसतात. तो गंडभैरंड म्हणून ओरडत त्या पक्ष्याला धरून उड्या मारीत आहे, या जातीचा सरदार असावा. आपण एका संकटांतून सुटका करून घेऊन दुसऱ्या संकटांत तर सांपडलों नसूं?" जयमल शंकेच्या स्वरांत म्हणाला.



लखू कांहीं बोलणार तितक्यांत तो मांत्रिक आपल्या अनुयायांना संबोधन करून म्हणाला—"आपल्या सर्व कष्टांचें मूळ कारण म्हणजे आपला शत्रू. त्यानें आपल्या या गंडभैरंड पक्ष्यांना चोरून पकडून नेऊन कितींचे पंख कापून नेले कोण जाणें ? त्या पक्ष्याच्या मामाचें आपण रक्षण केलें पाहिजे. तोच आपलें रक्षण करील. गंडभैरंडाच्या रक्षणासाठीं आपलें सर्वस्व पणाला लावायला तुमची तयारी आहे !"

त्याचें उत्तर म्हणून त्याच्या सर्व अनुयायांनीं आप आपले भाले वर उचलून प्रतिज्ञा केली—"गंडभैरंड पक्ष्यांचे पंख कापून कोण घेऊन जात आहे हें आम्हांला चांगलें माहीत आहे. आजपासून त्यांच्यापैकीं एकानें देखील आपल्या राज्यांत पाऊल टाकलें तर तो जिवंत परतूं शकणार नाहीं."

"तर मग चला ! रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून त्या पक्ष्यांचा मामा राहतो त्या पर्वताचें रक्षण करा." असें सांगून त्या मांत्रिकानें आपल्या हातांतला तो गंडभैरंड पक्षी सोडला.

"आतां कळलें कीं त्या गरुडराजाचे अनुयायी कोठून पंख मिळवीत होते ते ! म्हणजे पंखवाल्यांच्या जातीशीं यांचें शत्रुत्व आहे." जयमलनें हळूंच लखूच्या कानांत सांगितलें.

"पण एक गोष्ट विसरतो आहेस. कदाचित ते आपल्यालाच पंख चोरणाऱ्या जातीचे लोक समजून ठार करायचे !" लखूनें सावध राहण्याच्या स्वरांत उत्तर दिलें.

झाडावर चढून तिघे आपसांत बोलत असतां तो मांत्रिक आपल्या अनुयायांसह तेथून निघून गेला. तो दृष्टीआड होईपर्यंत तिघे झाडावरच दबा धरून बसून राहाले. जवळपास कोणी नाहीं. याची खात्री पटल्यावर ते खालीं उतरले.



"तूर्त तरी त्या मांत्रिकाच्या अनुयायांची आपल्याला भीति राहिली नाहीं. श्वानकर्णी व मार्जारनें सांगितलेल्या गुहेची वाट आपल्याला सांपडली तर आपलें अर्धें काम होईल. आपण भयानक दरींत सहज पोहोचूं शकूं." गोमांग म्हणाला.

तें ऐकून जयमल जरा हंसला व म्हणाला—"वेड्या या डोंगराळ प्रदेशांत आणि या झाडींत ती गुहा तुला सहजीं सांपडेल असें वाटलें होय ? घाई करण्यांत तरी काय फायदा ? पहिल्यानें स्वतःचें रक्षण कसें करावयाचें हा प्रश्न आहे आपल्या समोर. त्या मांत्रिकाच्या अनुयायांच्या नजरेस आपण पडलों तर संपलेंच."

लखूनें अगदीं हळू चाहूल लागल्याशिवाय झाडांच्या आडून दूर चालत जाऊन व कांहीं तरी पाहून जवळ यायला दोघांना खूण केली. ते जवळ आल्यावर दूर डोंगराकडे बोट दाखवीत म्हणाला—"आपण त्या जागीं निर्विघ्न पोंचूं शकलों तर गुहेची वाट कोठें आहे, खात्रीनें कळेल. अगदीं निःशब्दपणें चला."

नंतर ते त्या प्रमाणें त्या डोंगराच्या दिशेनें निघाले. तो डोंगर उंच सखल व खडबडीत होता. अगदीं निर्जन प्रदेश होता तो. तेथें त्या मांत्रिकाचे साथीदार कोणी नाहींत याची खात्री झाल्यावर लखू वगैरे पर्वतच्या पायथ्याशीं पोंचले.

त्याच वेळीं डोंगरावरून त्यांना एक आरोळी ऐकूं आली. तिघांनीं वर डोकें करून पाहिलें. चार पांच जंगली आपले भाले घेऊन धांवत खालीं येत असलेले दिसले. ते ओरडत होते—"कोण तुम्ही ? फिरा मागें. एक पाऊल देखील पुढें टाकलेंत तर प्राणाला मुकाल. आतां गंडभैरंडाचे पंख कापायला मिळणार नाहींत."





जयमलनें ओरडून उत्तर दिलें—“आम्ही गंडभेरंड पक्ष्यांचे पंख न्यायला आलों नाहीं. आम्हांला आमच्या वाटेनें जाऊं द्या !”

जयमल बोलतच होता, डोंगरावरून मोठमोठे दगड गणगडत खालीं येऊं लागले. गोमांग कांहीं तरी बोलणार होता. पण जयमल त्याला म्हणाला—“अरे तूं त्यांची किती समजूत घालण्याचा यत्न केलास तरी ते दगडांचा वर्षाव करूनच त्याचें उत्तर देणार हें नाहीं का कळत तुला ? म्हणून यांतून सुटायला एकच उपाय आहे, मागें परतणें !”

जयमल मागें फिरला व त्याच्या पाठोपाठ दोघेदेखील पळू लागले. तिथे एका मोठ्या शिळेआड दडून बसले. कोणी कांहीं बोलला नाहीं. ते रानटी लोक पाठलाग करीत येत तर नसतील अशी शंका त्यांच्या मनांत साहजिकच होती. पण बराच वेळ त्या बाजूला कोणी फिरकला नाहीं. तेव्हां कोठें त्यांनीं निश्चिंतपणानें एक श्वास सोडला.

“ती भुयाराची वाट कोठें आहे कळलें मला !” म्हणत गोमांगनें त्यांच्याकडे आश्चर्यचकित मुद्रेनें पाहिलें.

पण जयमलच्या मनावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तो स्मित करून म्हणाला—“त्यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे ? अरे श्वानकर्णीनें आणि मार्जारनें या डोंगरापलीकडे ती भयानक दरी आहे असें नव्हतें का सांगितलें ? म्हणजे हे डोंगर त्या भयानक दरीच्या अलीकडे आहेत. त्याच्यावर चढल्यावर एक दरी दिसेल व तसेच पर्वत पलीकडे दिसले तर मधली दरी भयानक दरी आहे हें समजायला हरकत नाहीं.”

“हरमग त्यांनीं कोणती तरी एक गुहा मिळेल असें म्हटलें होतें तें काय ?” गोमांगनें विचारलें.



“अरे कोणती तरी ते एवढ्यासाठीं म्हणाले कीं श्वानकर्णी व मार्जार दोघांना नेमकी गुहा कोणती व ती भुयारांतली चोरवाट कोठली हें माहीत नाहीं. आणखी ते असें देखील म्हणाले नाहीं का कीं त्या भयंकर दरींत प्रवेश करून कोणी परत आलेला त्यांनीं पाहिलेला नाहीं. भुयारांतल्या वाटेची गोष्ट काल्पनिकच असावी.” जयमल म्हणाला.

“म्हणजे काय वाटेल तें करून त्या मांत्रिकाची व त्याच्या अनुयायांची नजर चुकवून श्वानकर्णी वगैरेंनीं सांगितलेल्या डोंगरांपर्यंत आपण पोंचलों पाहिजे ?” लखूनें विचारलें.

जयमलनें होकारार्थी मान हलवून पुढें म्हटलें—“काळोख पडल्यावर जाणें बरें होईल. तोपर्यंत आपण येथेंच थांबूं या. मला असें वाटतें कीं येथें त्या लोकांची आपल्याला भीति नाहीं. आतां बरोबर खायला म्हणून आणलें होतें ना तें काढा.”

रानटी गोमांगनें पळसाच्या मोठमोठ्या पानांत बांधून आणलेल्या भाकऱ्या काढल्या. सर्वांनीं मिळून पोटभर खाऊन घेतलें आणि संध्याकाळपर्यंत तेथेंच बसून राहाले.




सूर्यास्तानंतर चंद्रोदय झाला. लखू व त्याचे साथीदार डोंगर चढूं लागले. जयमल आपल्या साथीदारांना म्हणाला—“आजचें चांदणें आपल्याला व आपल्या शत्रूला दोघां-नाहि फायद्याचें आहे. आपण या प्रदेशांत नवखे, म्हणून आपल्याला वाट ओळखायला सोपें. आपण किंवा आपली सावली आपल्या शत्रूला दिसेल, म्हणून त्याला पण तें फायद्याचें आहे. माझ्या मतें आपल्याला थोडा त्रास झाला तरी आपण झाडाआडूनच चालूं या.”

तिथे झाडांच्या आड काळोखांतून जात असतां त्यांना समोर एका झाडाखालीं एक



काळी आकृति हलत असलेली दिसली व चालण्याचा आवाज पण ऐकूं आला. तिथे झाडाआड लपून त्या बाजूला पाहूं लागले.

"डोंगरावर जायची ही एकच एक वाट आहे असें दिसतें आणि त्या वाटेवरचा त्या मांत्रिकाचा हा पाहारेकरी असावा." गोमांग म्हणाला.

"मला देखील तीच शंका वाटते. पण तो वाट अडवून उभा असेपर्यंत आपल्याला पुढें तरी कसें जातां येणार? म्हणून काय वाटेल तें करून निमूटपणें हा कांटा बाजूला सारला पाहिजे." लखू म्हणाला.

"त्यांत काय! तें कांहीं तेवढें कठीण नाहीं. मी पलीकडच्या झाडाजवळ कांहींतरी आवाज करतों. तें काय आहे हें पहायला तो तिकडे वळेल. तुम्ही दोघांनीं पाठीमागून त्याला धरा व त्याच्या तोंडांत बोळे कोंबा. नाहींतर तो ओरडा करून आपल्या साथी-दारांना गोळा करायचा. नंतर त्याचे पाय बांधून त्याला या एका बाजूला टाकून." असें सांगून गोमांग हळू हळू मांजराच्या पावलांनीं एका बाजूला एका झाडाआड जाऊन उभा राहिला.

थोड्यावेळानें तो उभा होता त्या बाजूनें 'खटखट' असा आवाज ऐकूं येऊं लागला. लगेच तो पाहारेकरी आपला भाला वर करून त्या झाडाकडे जात ओरडला— "कोण तिकडे! समोर ये!"

तो तिकडे वळला आणि पाठीमागून लखू व जयमल दोघांनीं पाठीमागून त्याला धरलें. लखूनें पाठीमागून त्याचे हात धरले आणि त्याच्या तंगड्या आपल्या पायांनीं आवळून धरल्या. जयमलनें त्याच्या तोंडांत रुमाल कोंबून त्याचें डोकें धरलें व मान मागें फिरवली. तरी तेवढ्या अवधींत, तो एकदां ओरडलाच. तिकडे डोंगरावरून त्याचा जणूंकांहीं प्रतिध्वनि त्याच्या साथी-दारांचा ओरडा ऐकूं येऊं लागला.

"आतां वेळ घालवून भागायचें नाहीं. त्याचे पाय बांधून व तोंड बांधून त्याला फेंकून देऊं या कोठें तरी. तो ओरडला आहे व त्याचें उत्तर पण त्याच्या साथीदारां-कडून आलें आहे." जयमल म्हणाला.

त्याप्रमाणें त्याला बांधून टाकल्यावर तिघे पुढें जायला तयार झाले तेव्हां त्यांना डोंगरावरून त्या पाहारेकऱ्याचे चार पांच साथीदार धांवत ओरडत येत असलेले दिसले.

"आपल्या साथीदाराच्या रक्षणासाठीं हे लोक इकडे येत आहेत. आपण उजव्या बाजूनें निसटून निघून जाऊं तिकडे वाट मोकळी आहे. चला या, पळत या." असें सांगून लखू उजव्या बाजूनें पळत डोंगर चढूं लागला.

लखूनें अनुमान केल्याप्रमाणें डोंगराच्या टोंकाला शत्रूचा एक देखील मनुष्य नव्हता. त्यानें डोंगराच्या टोंकावरून पलीकडे दूरवर पाहिलें तेव्हां त्याला आश्चर्यच वाटलें. त्याला एक मोठी रुंद दरी दिसली. विचित्र झाडें व त्यांवर बसलेले भुतांसारखे गंडभेरुंड पक्षी आपले पंख पसरून बसलेले.










"हीच ती भयानक दरी! मला तरी शंका नाहीं." लखू विजयोत्साहानें म्हणाला.

"मला देखील शंका नाहीं. पण डोंगराच्या या टोंकापसून दरींत जायचें कसें? या उभ्या खडकावर पायाला आधार मिळेल अशी एक तरी जागा आहे का?" जयमल्ल निराश होऊन म्हणाला.

"या पहा वेली दिसत आहेत मला. चांगल्या जाडजूड आहेत. धरून उतरूं या दरींत!" गोमांग म्हणाला.

त्या वेली बळकट आहेत कीं नाहीं हें पाहण्यासाठीं जयमल आणि लखू जरा खालीं वांकले. पण तितक्यांत त्यांना पाठीमागून ओरडत किती तरी लोक येत असल्याचा भास झाला आवाज जवळ जवळ येऊं लागला. एक जण ओरडून म्हणाला—"अरे हे लोक तर येथेंच आहेत! यांना पळून जाऊं देऊं नका. भाले भोसकून ठार करा."

सर्व त्याच्या पाठोपाठ लखू व त्याचे साथीदार होते तिकडे जोरानें पळत डोंगर चढूं लागले. अगदीं जवळ येऊन पोंचले तेव्हां जयमलनें एक जाडजूड वेलाला धरलें आणि दरींत उतरूं लागला व म्हणाला—"आतां या वेलांच्या मदतीनें आंत उतरल्याशिवाय गत्यंतर नाहीं. लखू व गोमांग पण त्याच्या पाठोंपाठ झरझर उतरूं लागले.

तितक्यांत मान्त्रिकाचे अनुयायी तेथें येऊन पोंचले व त्यांना वेल धरून उतरतांना पाहून ओरडले—"कापा ते वेल आणि आदळूं द्या त्या दुष्टांना खालीं खडकावर. सर्वांना एकदमच मोक्ष मिळेल. दोन दोन दगड घेऊन सर्व वेल ठेंचून तोडण्याचा प्रयत्न करूं लागले. [पुढें चालू]





# अर्थपाल

पुष्पपुराचा प्रधान धर्मपाल याला कामपाल नांवाचा मुलगा होता. तो स्वतंत्र विचाराचा होता आणि कोणाला सांगितल्याशिवाय तो एकदां घरांतून निघाला आणि काशीला आला.

काशीचा राजा चंडसिंह याला कांतिमती नांवाची एक मुलगी होती. एकदां ती आपल्या मैत्रिणींबरोबर बागेंत खेळत असतां कामपाल तेथें आला. तिचें सौंदर्य पाहून व तिच्याशींच लग्न करण्याचें ठरवून तो तिला एकांतांत भेटला. दोघांची ओळख झाली व दोघांनीं गांधर्वविवाह करून घेतला. कांतिमतीला दिवस गेले व तिला एक पुत्ररत्न झालें.

कांतिमतीच्या गुप्त विवाहाची गोष्ट तिच्या घरीं कोणालाच माहीत नव्हती. मुलगा झाल्यावर तिनें लोकलाजेस्तव आपल्या मुलाला एका दासीच्या हातीं स्मशानांत नेऊन ठेवायला सांगितलें. ती मुलाला स्मशानांत ठेवून परत येत असतां तिला अपरात्रीं कोठून आलीस असा प्रश्न करून राजाच्या शिपायांनीं कैद केलें. तिनें स्वतःचा प्राण वांचविण्यासाठीं खरेंखरें तें सांगून टाकलें. तिनें कामपाल राजोद्यानांत कोठें झोंपतो हें देखील सांगून टाकलें. राजाच्या शिपायांनीं त्याला धरून राजासमोर हजर केलें. राजानें त्याला शिरच्छेदाची शिक्षा देऊन पाठवून दिलें. चांडाळ त्याला घेऊन वध्यभूमीकडे गेले.

तिकडे कांतिमतीचा मुलगा स्मशानांत रडत होता. त्याचें रडणें तारावली नांवाच्या यक्ष कन्येनें ऐकलें. ती कुबेराची मुलगी



होती व मलय पर्वतावरच अलकापुरीला चालली होती. तिनें मुलाला उचलून घेतलें आणि आपले वडील कुबेर यांच्याकडे त्याला घेऊन गेली. कुबेराच्या आज्ञेनें तिनें त्या मुलाला मगध देशाची राणी वसुमती हिच्याकडे नेऊन ठेवलें. वसुमतीनें मुलाच्या पालन पोषणाची जबाबदारी स्वतःवर घेतली. तारावली पुन्हां परत काशीच्या स्मशानांत आली.

चांडाळ कामपालला वध्यभूमीकडे घेऊन गेला व त्याला मारण्यासाठीं त्यानें तलवार उचलली. परंतु त्यापूर्वींच कामपालनें स्वतःची सुटका करून घेऊन चांडाळाच्याच तलवारीनें त्याचा वध केला अन् पळून गेला.

रानांत त्याला एका झाडाखालीं तारावली उभी असलेली दिसली. दोघांची ओळख झाली. तारावली म्हणाली—“कुबेरानें मला सांगितलें आहे कीं आपण दोघे पूर्वजन्मीं पतिपत्नी होतों. या जन्मीसुद्धां तुझी पत्नी होऊनच राहण्याची इच्छा आहे. कुबेराच्या आज्ञेनेंच मी तुझ्या मुलाचें रक्षण केलें आहे. मी त्याला वसुमतीकडे ठेवून आलें आहे.”

तें ऐकून कामपालला फार आनंद झाला. तिच्याशीं लग्न करून तो तिच्या बरोबर राहूं लागला. दोन तीन दिवस आनंदानें गेले. नंतर कामपाल तारावलीला म्हणाला—“चंडसिंहानें एका क्षुल्लक अपराधाबद्दल मला प्राणदंड दिला. मी त्याचा सूड घेतल्यावांचून राहणार नाहीं.”

तें ऐकून तारावली गालांतल्या गालांत हंसून म्हणाली—“ठीक ! मध्यरात्रीच्या वेळीं जा. म्हणजे तेथें कांतिमती पण भेटेल.”

यक्षिणीच ती, तिच्या मंत्रबळानें कामपाल चंडसिंहाच्या शयनगृहांत पोंचला. राजाला जागा करून आपली तलवार दाखवून म्हणाला—“आपल्या पापाचें प्रायश्चित्त कर ! तुझ्या परवानगीवांचून मी तुझ्या मुलीशीं लग्न केलें. तिच्या इच्छेविरुद्ध नाहीं. पण तूं मला त्याबद्दल प्राणदंड दिलास ! सांग, आतां तुझें काय म्हणणें आहे ?”

चंडसिंह थोडा घाबरला. म्हणाला—“तुझी कांहींच चूक नाहीं. मीच रागाच्या भरांत ती शिक्षा केली. मला क्षमा कर उद्यां मी सर्वांसमक्ष तुमचें लग्न करून देतों.”

कामपालानें आपल्या सासऱ्याला सोडून दिलें. चंडसिंहानें वचन दिल्याप्रमाणें आपल्या मुलीशीं त्याचें लग्न करून दिलें. त्यानंतर कामपालालाच त्यानें आपला प्रधान नेमलें. कामपाल तारावलीला घेऊन आला व आपल्या दोघां पत्नींसह आनंदानें त्याचा संसार थाटला.

एकदां एक विचित्र गोष्ट घडली व ती कामपालनें स्वतःच्या डोळ्यासमोर घडतांना पाहिली.

काशी नगरींत एक अट्टल चोर रहात असे. त्याचें नांव पूर्णभद्र असें होतें. तसा तो उच्च कुळांतच जन्माला आला होता. पण वाईट संगतींत पडून चोरी करूं लागला. एकदां त्यानें एका वाण्याच्या घरांत चोरी केली. चोरी करीत असतां



वाण्याच्या नोकरांनीं त्याला धरलें. राजाचे शिपाई त्याला धरून न्यायाधिशाकडे नेत होते. त्याच वेळीं मृत्युविजय नांवाचा एक मदांध हत्ती त्याच्या अंगावर धांवून आला. आपल्याला फांशीची शिक्षा मिळणार या गोष्टीची त्याला खात्री होती. म्हणून जिवावर उदार होऊ तो एक काठी घेऊन त्या हत्तीला मारायला धांवला. हत्ती त्याला सोंडेंत धरणार इतक्यांत पूर्णभद्रानें हत्तीच्या दांतावर जोरानें काठी मारली. तिरिमिरीनें हत्ती मागें वळला आणि पळूं लागला. पण महावतानें हत्तीला अंकुश मारून पुन्हां



पूर्णभद्रावर सोडण्याचा प्रयत्न केला. पण हत्तीला काठीचा वार इतका मर्मी बसला होता कीं तो पळूं लागला. पूर्णभद्र त्याच्या पाठीमागें धांवत त्याला पिटाळूं लागला.

कामपाल हें सर्व आपल्या घराच्या सज्जांत उभा राहून पहात होता. पूर्णभद्राला बोलावून तो म्हणाला—"तूं मृत्युविजयला सुद्धां पळवून लावलें आहेस. तुझ्या या शौर्याबद्दल व साहसाबद्दल मी तुला या खेपेस माफ करीत आहें. पुढें संभाळून रहा." तेव्हांपासून दोघांची परस्परांशीं मैत्री वाढत गेली.

पुढें कांहीं दिवसांनीं चंडसिंह वारला. त्याचा मोठा मुलगा चंडघोष क्षय रोगानें पुष्कळ दिवसांपूर्वीं वारला होता. गादीला वारस त्याचा पांच वर्षांचा धाकटा भाऊ सिंहघोष हा होता. कामपालनें त्याला गादीवर बसविलें आणि त्याचा मंत्री म्हणून राज्यकारभार पाहूं लागला.

कामपाल मंत्री तर होताच, राजाचा मेहुणापण होता. सर्व राज्यकारभार त्याच्या हातांत. त्याची मर्जी संभाळून इतर अधिकाऱ्यांना काम करावें लागे. पण तें त्यांना कसें पसंत पडणार ?

सिंहघोष थोडा मोठा झाल्यावर त्यांनीं प्रधानाविरुद्ध त्याचे कान भरायला सुरवात केली. म्हणत—"अक्कासाहेबांचे यजमान आहेत हें कोणाला माहीत नाहीं ? पण सरकारांना खरी गोष्ट कदाचित माहीत नसेल. हा गुप्त विवाह झाला होता. थोरल्या महाराजांनीं शिरच्छेद करून टाकण्याची शिक्षा दिली होती. पण हा आहे मोठा बस्ताद. त्यानेंच कट करून महाराजांना ठार करण्याचा घाट घातला. पण महाराजांनीं त्याच्या. भीतीनें त्याचें लग्न तुमच्या बहिणीशीं करून दिलें. अहो, त्या लग्नापूर्वी त्यांना एक मुलगा झाला होता. आणखी तुमच्या वडील बंधूना ह्यांनींच विष घालून त्यांचा कांटा दूर केला. तुम्ही लहान, ते नाहीं तुमच्या वाटेला जात. पण तुम्ही त्यांचें ऐकत नाहीं असें जर का त्यांना कळलें तर मात्र जें होईल तें देवच जाणें."

या गोष्टी सिंहघोषाला खऱ्या वाटूं लागल्या. परंतु यक्षिणी तारावलीच्या भीतीमुळें आपल्या मेहुण्याचा विरुद्ध कांहीं करण्याची त्याला हिम्मत होईना.

परंतु कांहीं कारणावरून कामपाल व तारावली दोघांचें भांडण झालें. कामपालनें पुष्कळ समजूत घालण्याचा यत्न करून पाहिला. पण ती निघून गेली. कामपालला फार वाईट वाटलें. राज्यकारभाराची जबाबदारी तरी देखील तो मोठ्या कष्टानें संभाळीत होता. परंतु सिंहघोषानें कामपालाला कैद करून त्याच्यावर राजद्रोहाचा अपराध लावला व त्याचे डोळे काढून टाकण्याची त्याला शिक्षा केली.

अर्थातच ही गोष्ट कोणाला आवडली नाहीं. तो अन्यायच होता. पूर्णभद्राला पण राजाच्या या आततायीपणाचा फार राग आला. कामपालला झालेली शिक्षा स्वतःचा





डोळ्यांनीं पाहण्यापेक्षां आत्महत्या करून घेणें त्याला बरें वाटलें. म्हणून तो राजधानीच्या बाहेर रानांत निघून गेला. तेथें त्याला एक तरुण मुलगा दिसला. पूर्णभद्रानें चवकशी केली तेव्हां त्याला कळलें कीं तो कामपालाचाच मुलगा आहे. त्याचें नांव अर्थपाल असें होतें. मगधची राणी वसुमति हिनें त्याला बाळगलें होतें व लहानाचें मोठें केलें होतें. मोठा झाल्यावर तो देशभर हिंडत हिंडत काशीजवळच्या रानांत येऊन पोंचला.

पूर्णभद्र याच्याकडून त्याला त्याच्या बापाला मिळालेल्या शिक्षेचें वर्णन कळलें. तो म्हणाला—"मी आपल्या वडिलांचें रक्षण करण्याची जबाबदारी घेतों. त्यासाठीं शत्रूशीं युद्धाला मी तयार आहें."

तो हें बोलतच होता तेवढ्यांत एक सांप बिळांतून बाहेर आला. अर्थपालाला मंत्रविद्या अवगत होती. त्यानें मंत्र टाकून सांपाला धरलें व म्हणाला—"छान! मी या सांपाला घेऊन जातों व ऐन वेळीं मंत्र टाकून त्याला सोडतों. तो माझ्या वडिलांना जाऊन चावेल. ते बेशुद्ध होऊन पडतील. मी त्यानंतर त्यांना मंत्र बळानें जिवंत करीन. सर्व लोक ते आतां मेले असें समजून त्यांचा अंत्यविधि करण्याची तयारी करतील. तुम्ही जाऊन माझ्या आईला सर्व नीट समजावून सांगा व वडिलांच्या बरोबर सती जाण्याच्या तयारीनें रहायला सांगा. पुढें जें करावयाचें तें मी पाहून घेईन."

पूर्णभद्रानें आनंदानें कांतिमतीला जाऊन त्याप्रमाणें सांगितलें. अर्थपाल सांपाला घेऊन वध्यभूमीकडे गेला व तेथें एका झाडावर चढून बसला.

राजाचे नोकर कामपालला घेऊन वध्यभूमींत आले. राजाज्ञा सांगण्यांत आली. डोळे काढून नंतर त्याचा वध करावा अशी आज्ञा होती. राजद्रोह्याला अशीच शिक्षा केली जाईल अशी घोषणा केली होती.



ती घोषणा ऐकून जमा झालेल्या लोकांनीं राजाज्ञेविरुद्ध ओरडा सुरू केला. त्याच गडबडींत अर्थपालनें मंत्र टाकून सांप सोडला. सांप प्रथम चांडालाला व नंतर कामपालाला चावला व गर्दींतून जाऊं लागला. लोकांनीं त्याला वाट दिली.

अर्थपाल झाडावरून उतरला व त्यानें मंत्रबळानें विष चढूं दिलें नाहीं. कामपाल बेशुद्ध स्थितींतच पडलेला होता,—अगदीं मेल्यासारखा. अर्थपाल पुढें येऊन म्हणाला—"राजद्रोह्याला राजानें तर शिक्षा सांगितली होतीच. त्या पूर्वींच देवानें त्याला ही अशी शिक्षा केली आहे."

या सर्व गोष्टीची कांतिमतीला थोडी थोडी माहिती होती. म्हणून ती भ्याली तरी जास्त दुःखी नव्हती. आपल्या पतीचें डोकें मांडीवर घेऊन ती बसली व भावाकडे सती जाण्यास परवानगीसाठीं निरोप सांगून पाठवला. भावानें परवानगी आनंदानें दिली.

चांडालाला जिवंत करण्याचा प्रयत्न कित्येक मांत्रिकांनीं केला, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. कांतिमती कामपालला आपल्या घरीं घेऊन गेली. तिनें पतीला एका दर्भासनावर निजवलें. कारण त्या काळच्या रीतीप्रमाणें सती जाणाऱ्या स्त्रीनें तसें करावयाचें असतें. नंतर तिनें बरोबर आलेल्या लोकांना निरोप दिला व अर्थपालला म्हणाली—"बाळ! आतां तूं माझी व आपल्या वडिलांची भेट करून दे."



अर्थपालानें मंत्रबळानें आपल्या बापाला जिवंत केलें व सर्व हकीकत सांगितली आणि म्हणाला—"आतां तुम्ही सांगाल तसें पुढें करूं या."

"आपलें हें घर किल्ल्यासारखें सुरक्षित आहे. यांत सहजीं कोणाला शिरकाव मिळणार नाहीं. आंत काय होत आहे हें कोणाला कळणार देखील नाहीं. मी कित्येक लोकांवर उपकार केले आहेत व ते खात्रीनें माझ्या मदतीला धांवतील. माझ्याजवळ शस्त्रास्त्रांची कमतरता नाहीं. आपण प्रजेंत राजाच्या विरुद्ध असंतोष पसरविला तर आपल्याला सूड घेतां येईल." कामपाल म्हणाला.

कामपाल व अर्थपाल दोघांचें कारस्थान तरुण राजाला कळलें. त्यानें त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं जय्यत तयारी सुरू केली. पण त्यांत त्याला यश मिळालें नाहीं.

एकदां अर्थपालनें पूर्णभद्राच्या मदतीनें राजवाड्यांतल्या सर्व गुप्त मार्गांची व जागांची माहिती काढून घेतली. राजा कोठें झोंपतो हें देखील त्याला कळलें. त्यानें राजाच्या शयनगृहापर्यंत एक भुयार खोदून तयार केलें व त्या वाटेनें तो शयन गृहांत पोंचला. त्यानें राजाला कैद करून आपल्या आई-वडिलांसमोर हजर केलें. सिंहघोषानें समोर आपल्या बहिणीला व मेहुण्याला पाहिलें. त्याची मान खालीं झाली व त्याच्या तोंडा-वाटे एक शब्द देखील निघाला नाहीं. त्यांनीं तरुण राजाला तुरुंगांत टाकलें. कामपालनें आपला मुलगा अर्थपाल याला गादीवर बसविलें.

कांतिमतीचा मोठा भाऊ क्षय रोगानें वारला तेव्हां त्याची बायको गरोदर होती. तिला एक मुलगी झाली होती. ती मुलगी आतां चांगली वयांत आली होती. तिचें नांव मणिकर्णिका असें होतें. कामपालनें तिच्याशीं आपल्या मुलाचें लग्न करून दिलें.





# विचित्र व्यापारी

एका गरीब माणसाला एकुलता एक मुलगा होता. तो लहानपणापासूनच फार अशक्त होता. त्याला कांहीं काम देखील करतां येत नव्हतें. त्याचें नांव गोपाळ असें होतें. बापानें आपल्या अशक्त व असहाय मुलाला मोठ्या कष्टानें लहानाचें मोठें केलें. परंतु पुढें तर दोन वेळचें पोटसुद्धां भरेनासें झालें. म्हणून गोपाळला नोकरीला लावणें भाग झालें.

पण अशा अशक्त पाप्याच्या पितराला नोकर कोण ठेवणार? म्हणून गोपाळचा बाप त्याला गांवच्या पाटलांकडे घेऊन गेला. पाटलांनीं त्याला नोकर म्हणून ठेवून घेतलें. पाटील स्वभावानें अगदीं निष्ठुर व दुष्ट होता. तो मारहाण करी व काम करून घेऊन नंतर मजुरी देत नसे. गोपाळच्या बापानें पाटलाच्या घरीं कामाला लावून दिलें. पोटभर खायला तर घालील ना पाटील, खायला आणि अंगांत घालायला दिलें कीं पुरें. असा विचार त्यानें केला.

गोपाळनें पाटलाच्या घरीं तीन वर्षें नोकरी केली. पाटील त्याला मारी, उपाशी ठेवी. कामावरून मात्र त्यानें काढलें नाहीं. परंतु गोपाळच अगदीं कंटाळून गेला आणि पाटलाचा निरोप घेत म्हणाला—"मालक! तुमच्या घरची चाकरी तीन वर्षें केली. आतां दुसरीकडे करावी म्हणतों. पगार देऊन निरोप द्या."

पाटलानें त्याच्या हातावर तीन रुपये ठेवले व म्हणाला—"वर्षाला एक रुपया या प्रमाणें मी तुला पगार दिला आहे."



"मी जे कपडे घालून आलों होतों त्याच कपड्यांवर जात आहें." गोपाळ नम्रपणें म्हणाला.

"कपडे देईन अशी मी कबुली दिली नव्हती. पगाराची तरी बोली कोठें होती?" पाटील म्हणाला.

गोपाळ ते तीन रुपये घेऊन कपडे विकत घेण्यासाठीं शेजारच्या बाजार पेठेंत निघाला. ती वाट डोंगराळ प्रदेशांतून जात होती. एका वळणावर त्याला एक भिकारी भेटला. तो भिकारी इतका उंच होता कीं त्याला पाहून गोपाळ घाबरून मोठ्यानें ओरडला.

पण तो भिकारी म्हणाला—"घाबरूं नकोस! मी तुला खायला का आलों आहें? एक रुपया मला दे!"

"माझ्याजवळ आहेतच मुळीं एकूण तीन रुपये, तुला एक रुपया दिला तर कपडे विकत घ्यायला माझ्याकडे काय उरणार?" गोपाळनें विचारलें.

"तीन रुपये आहेत ना? मग एक रुपया मला दे, दोन रुपये पुरतील तुला!" भिकारी म्हणाला.

गोपाळ एक रुपया त्याला देऊन पुढें निघाला. वाटेंत त्याला आणखी एक भिकारी भेटला. तो पहिल्या भिकाऱ्याहूनहि जास्त उंच होता. त्यानें देखील गोपाळकडून एक रुपया मागून घेतला. आतां गोपाळजवळ फक्त एकच एक रुपया उरला.

डोंगराच्या चढणीच्या टोंकाला तिसरा भिकारी भेटला तो पहिल्या दोघांपेक्षांहि जास्त उंच होता. गोपाळनें त्याला उरलेला एक रुपया देऊन टाकला. पण त्या तिसऱ्या भिकाऱ्यानें त्याला विचारलें—"तूं मला रुपया दिलास तसा आणखी दोघांना आधीं दिला होतास ना? तर मग प्रत्येक रुपयाबद्दल एक एक वर मागून घे!"

गोपाळ थोडा वेळ घुटमळला. पण मग विचार करून म्हणाला—"कृष्ण आपला पावा वाजवूं लागला म्हणजे सर्व गोपिका थयथय नाचूं लागत असें मी ऐकलें आहे. मला देखील असा एक पावा दे. मी वाजवूं लागलों कीं तो ऐकून ऐकणाऱ्यानें नाचूं लागावें."

भिकारी म्हणाला—"अरे हा काय वर मागितलास? पण या खेपेस चांगला वर मागून घे बरं का!"

"मला एक गोफण दे कीं किती दुरून दगड मारला तरी अचूक नेम लागेल." गोपाळ म्हणाला.

"अरे तूं हें सर्व काय मागत बसला आहेस? कामाची कांहीं वस्तु मागून घे कीं." भिकारी म्हणाला.

"मी कोणाकडे कांहीं मागितलें तर लगेच तें देईल असा वर दे!" गोपाळनें तिसरा वर मागितला.

"हा वर चांगला मागितलास. तूं मागितल्याप्रमाणें तुला पावा व गोफण देतों व तिसरा वर मागितलास तो देखील मान्य!" असें सांगून भिकारी निघून गेला.



गोपाळ तेथेंच दगडाला टेंकून जरा विश्रांति घेण्यासाठीं बसला आणि त्याचा क्षणभर डोळा लागला. उठून पाहातो तर शेजारीं एक पावा व गोफण! पाहून त्याला आनंद झाला.

तो पावा आणि गोफण घेऊन बाजार-पेठेंत गेला. तो एका कापडाच्या दुकानांत गेला व त्याला जें कांहीं हवें होतें त्यानें एका दमांत सर्व सांगून टाकलें. दुकानदार अगदीं चिक्कू मारवाडी होता. पण त्यानें गोपाळनें जें कांहीं मागितलें तें देऊन टाकलें व पै देखील घेतली नाहीं. नंतर तो एका








श्रीमंत गृहस्थाकडे गेला आणि त्यानें त्याच्या जवळ त्याचा घोडा मागितला. त्यानें आनंदानें दिला. गोपाळला तिसऱ्या वराचा प्रत्यय आला. तो घोड्यावर बसून सरळ पाटलांच्या घरीं गेला. त्यानें घोडा थांबवून पाटलांना हांक मारली व म्हणाला— "नमस्कार पाटील !"

पाटील चकित होऊन विचारूं लागला— "अरे हा घोडा कोणाचा आणलास वाटतें ? आणि हे कपडे ! राजाच्या शिपायांनीं पाहिलें तर मुसक्या बांधून नेतील. गोपाळ म्हणाला आणि ही बासुरी रे कोठली ? कृष्णा सारखा पावा वाजवलास म्हणजे गोपिका धांवत येतील असें वाटलें होय तुला ?" पाटलांनीं थट्टा केली.

"त्यांत काय पाटील या बांसरीपेक्षां ही गोफण चांगली आहे. पहा तर जरा !" गोपाळ म्हणाला.

"पुरे झाल्या तुझ्या गप्पा ! मला नाहीं वेळ त्या ऐकायला !" असें म्हणत पाटील जाणार इतक्यांत गोपाळनें एक दगड एका पक्ष्याला मारला. तो पक्षी पाटलांच्या समोरच बाभळीच्या झाडाच्या कांट्यांत पडला.

पाटील चकित होऊन म्हणाले—"मग ती बांसरी वाजवून दाखव कीं !"

"तुम्ही तेवढा पक्षी काढून आणून दिलात तर बांसरी वाजवीन व गोपिकापण नाचूं लागतील." गोपाळ म्हणाला.

पाटील गंमत पाहण्यासाठीं तो पक्षी काढायला कांट्यांत गेले. त्याबरोबर गोपाळनें बांसरी वाजवायला सुरवात केली आणि त्या आवाजानें पाटील कांट्यांतच पिंगा घालत नाचूं लागले. सर्व अंगभर कांटे बोचले आणि कपडे फाटून गेले.

गोपाळनें जें मागितलें तें देऊन पाटलांनीं आपली सोडवणूक करून घेतली.





# खरी किंमत

एक कोळी होता. एकदां त्याच्या जाळ्यांत एक मासा सांपडला. त्यानें तो मासा आपल्या बायकोला नेऊन दिला. बायकोनें मासा कापला. आंतून एक चकचकीत खडा बाहेर येऊन पडला. तो एक हिरा होता.

"तो मासा तसाच मीठ घालून बाजूला ठेऊन दे. मी तो बाजारांत जाऊन विकीन चांगली किंमत मिळेल." कोळी बायकोला म्हणाला आणि बाजारपेठेंत निघाला.

पण वाटेंत त्याला एक शंका आली. तो मासा विकायचा कसा ? एक तर कापलेला. कोण विकत घेणार ? हिरा दाखवला तर तो माश्याच्या पोटांतूनच निघाला या गोष्टीवर कोण विश्वास करणार आणि माशाची खरीखरी किंमत कोण देणार ? जर आपण बरोबर किंमत मिळावी म्हणून भांडूं लागलों तर मी हिरा चोरून आणला म्हणून सरकार दरबारांत वर्दी करायला कमी करणार नाहींत. म्हणून कोळी सरळ राजवाड्याच्या दिंडी दरवाज्याजवळ जाऊन उभा राहिला. पाहारेकऱ्यांनीं त्याला अडवलें आणि विचारलें—"काय काम आहे आंत ?"

"कांहीं नाहीं महाराजांची भेट घ्यायला आलों आहें." कोळी म्हणाला.

"राजाची भेट घ्यायला ?" पाहारेकऱ्यांनीं आश्चर्यानें त्याला विचारलें. "तूं कोण गांवचा राजा, बुवा, आला आहेस राजाच्या भेटीला ?"

"नाहीं हो ! मी गरीब कोळी आहें. मेहरबानी करून आंत सोडा ! मला



राजाकडे कांहींच मागावयाचें नाहीं. राजालाच एक नजराणा द्यायला आलें आहे." कोळी म्हणाला.

द्वारपालकानें विचारलें कीं स्वतः जाऊनच तो नजराणा दिला पाहिजे असें कोठें आहे? तुला आंत जाऊं दिलें तर मलाच फांशीची शिक्षा होईल. जें कांहीं तुला द्यावयाचें असेल दे. मी महाराजाकडे पोंचतें करतों."

बिचारा कोळी निराश झाला. त्यानें बरोबर आणलेला हिरा त्याला दाखविला आणि म्हणाला-"हा मी महाराजांना नजर करण्यासाठीं घेऊन आलों आहें."

द्वारपालक आणखी एका शिपायाला दारावर उभा करून तो हिरा आंत घेऊन गेला. कांहीं वेळानें तो बाहेर कांहीं कपडे घेऊन आला आणि म्हणाला—"महाराजांनीं तुझा हिरा पाहून आनंदानें तुला इनाम म्हणून हे कपडे दिले आहेत."

कोळी निराश झाला. त्यानें विचारलें—"महाराजांनीं एवढेंच इनाम दिलें?"

"अरे खुळ्या, तूं एक कांचेचा तुकडा आणून दिलास त्याबद्दल महाराज तुला आपलें राज्य देतील असें वाटलें का?" द्वारपालकानें विचारलें. कोळी हताश होऊन घरीं निघून गेला.

द्वारपालकानें तो हिरा राजाला दिला नव्हता. मधल्या मधें लाटला होता. तो दुसऱ्या दिवशीं बाजारांत गेला. जव्हेऱ्याला दाखवून त्याची किंमत विचारली.

जव्हेऱ्यानें हिरा पारखून पाहिला आणि द्वारपालकाला विचारलें—"तुझ्याकडे हा हिरा कोठून रे आला?"

द्वारपालक म्हणाला—"माझा एक नातेवाईक व्यापारी आहे. समुद्र पारच्या दूरदूरच्या देशांशीं त्याचा संबंध आहे. मी त्याला कर्ज दिलें होतें. त्याची



फेड करण्यासाठीं त्यानें हा हिराच पाठवून दिला."

जव्हेऱ्यानें त्याची किंमत पांच हजार रुपये देऊं केली. द्वारपालक जास्त किंमत मागूं लागला. जव्हेऱ्यानें दहा हजारापर्यंत किंमत वाढवली आणि म्हणाला—"या उपर तुझी मर्जी!" द्वारपालकानें तो हिरा दहा हजार रुपये घेऊन त्या जव्हेऱ्याला विकला.

पण आतां हा हिरा विकत कोण घेणार? निदान पंचवीस हजार नाहीं मिळाले तर काय उपयोग? त्यानें राजाला जाऊन तो हिरा दाखविला. राजानें आपल्या रत्नपारखी अधिकाऱ्यांना तो दाखविला. त्यांनीं त्याची किंमत तीस हजार लावली.

राजा हिरा आपल्या अंतःपुरांत घेऊन गेला. तेथें एक कुलदेवतेची मूर्ती होती. मनांत कांहीं संशय असला कीं राजा देवीचा कौल घेई. या खेपेस देखील राजानें देवीचा कौल घ्यायचें ठरवून तो हिरा देवीच्या हातांत नेऊन ठेवला आणि डोळे मिटून देवीसमोर हात जोडून उभा राहिला. हिरा खालीं पडल्याचा आवाज झाला. राजानें पुन्हां दोनदां हिरा देवीच्या



हातांत ठेवला आणि दोन्ही वेळां हिरा देवीच्या हातांतून खालीं पडला.

राजानें जव्हेऱ्याला बोलावून विचारलें—"तुला हा हिरा कोठून मिळाला? हा हिरा खरोखरीच चांगला आहे. पण याच्या खरीदींत कांहीं तरी लबाडी आहे."

जव्हेरी म्हणाला—"महाराज, मी आपल्यासमोर कधीं खोटें बोलणार नाहीं. मी दहा हजार रुपयाला विकत घेतला आहे. याची किंमत याच्याहून खात्रीनें जास्त आहे."

"पण तूं हा कोणाकडून विकत घेतलास हें सांगशील कीं नाहीं?" राजानें विचारलें.










जव्हेऱ्यानें खरें तें सांगितलें. म्हणाला—“ द्वारपालकानें विकला ! ”

राजानें द्वारपालकाला बोलावून विचारलें—“ तूं हा हिरा जव्हेऱ्याला विकलास हें खरें आहे. पण तुला हा मिळाला कोठून व कसा ? ”

द्वारपालकाची बोबडीच वळली. म्हणाला—“ महाराज, माफ करावी ! एका कोळ्यानें तो मला आणून दिला. मी त्याबद्दल त्याला एक धोतर जोडा आणि उपरणें दिलें. तो आनंदानें निघून गेला.”

“ कोण तो कोळी ? घेऊन ये बोलावून त्याला !” राजानें आज्ञा केली.

“ महाराज ! त्याचें नांव गांव मला माहीत नाहीं.” द्वारपालक म्हणाला.

राजानें राज्यभर दवंडी पिटवून सर्व कोळ्यांना दरबारांत हजर करण्यास सांगितलें. कोळी आले. राजा आपला मंत्री, जव्हेरी आणि द्वारपालक यांना बरोबर घेऊन त्यांतला हिरा विकणारा कोळी कोण, हें पहायला निघाला. द्वारपालक व कोळ्यानें परस्परांस ओळखलें.

राजाच्या तर्फे प्रधानानें कोळ्याकडून तो हिरा त्याला कोठें मिळाला हें विचारून घेतलें. घरीं जाऊन त्यानें माशाचे ते दोन तुकडे आणले आणि त्यांत हिरा कोणत्या जागीं होता हें देखील दाखविलें.

राजानें द्वारपालकाला तुरुंगांत टाकलें. जव्हेऱ्याला त्याचे दहा हजार रुपये परत देवविले आणि हिऱ्याची खरी किंमत तीस हजार रुपये त्या कोळ्याला दिले.

तो ती तीस हजार रुपयांची मोट घेऊन घरीं गेला आणि बायकोसमोर ती ओतून म्हणाला—“ हिऱ्याची खरी किंमत ती ही आहे.”



# निरुपयोगी साधन

एक ससा एका दगडाजवळ येऊन म्हणाला—“ तूं चांगले दांत घडवतोस असें मी ऐकलें आहे. मला दोन दांत घडवून दे !”

“ तुझे दांत तर चांगले बळकट आहेत ना ?” दगडानें विचारलें.

“ माझे दांत चांगले बळकट नाहींत असें नाहीं. मला मोठे दांत हवे आहेत, वाघासारखे मोठमोठे !” ससा म्हणाला.

“ कशाला ?” दगडानें विचारलें.

“ कोल्ह्याला भीति दाखवायला. त्याचा सुळसुळाट फार वाढला आहे. मला पाहूनच तो पळेल असें कांहीं तरी करावेंसें वाटतें मला.” ससा म्हणाला.

दगडानें सश्याला हवे होते तसे दांत बसवून दिले.

सश्यानें तलावांत आपलें तोंड पाहिलें आणि गालांतल्या गालांत हंसून म्हणाला—“ याला म्हणतात दांत ! ” इतक्यांत तेथें एक कोल्हा आला. ससा घाबरून दगडाला जाऊन म्हणाला—“ बाबारे ! हे घे आपले दांत व मला याहून मोठे व भयंकर दांत बसवून दे.”

दगड म्हणाला—“ हें पहा, मला वाटतें कीं दांताऐवजीं तुझें काळीजच बदलून दिलें पाहिजे.”



# विचित्र मनोरथ

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत काढून घेतलें आणि तें खांद्यावर टाकून नेहमींप्रमाणें स्मशानाच्या वाटेनें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याच्याशीं बोलूं लागला. म्हणाला—"तूं कोणत्या हेतूनें हें सर्व करीत आहेस हें मला कळत नाहीं. तुला पाहून मला खांडिक्याची आठवण येते. तुला थकवा वाटूं नये म्हणून मी त्याची गोष्ट सांगतों. ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

जनक राजाचा वंशज अमितध्वज नांवाचा एक राजा राज्य करीत असे. त्याला दोन मुलगे होते. एकाचें नांव कृतध्वज व दुसऱ्याचें खांडिक्य. दोघांनीं बापाचें राज्य वांटून घेतलें व आपआपल्या राज्यांत राज्य करूं लागले. कृतध्वजाला केशिध्वज नांवाचा मुलगा होता. गादीवर बसल्यानंतर त्यानें त्याचा चुलता खांडिक्य याचें राज्य देखील बळजबरीनें आपल्या राज्याला जोडलें. खांडिक्य आपला मंत्री व पुरोहित यांच्या सह रानांत जाऊन राहूं लागला.

केशिध्वजाला योगविद्या अवगत होती. त्यानें यज्ञ केले आणि आपली शक्ति वाढविली. एकदां तो योग समाधींत असतां एका वाघानें येऊन त्याची यज्ञधेनु खाऊन टाकली. हें जें पाप घडलें त्याला प्रायश्चित्त काय हें त्यानें यज्ञ करणाऱ्या थोर ऋषी मुनींना विचारलें. पण कोणी प्रायश्चित्त सुचवूं शकला नाहीं. पण कशेर मुनींस विचारल्यास ते सांगतील असें अनेकांनीं सुचविलें.

राजा कशेर मुनींच्या आश्रमांत गेला व त्यानें त्यांना तोच प्रश्न केला.

मुनि म्हणाले—"राजा, तुझा प्रश्न ठीक आहे. मला देखील ठीक ठीक काय प्रायश्चित्त केलें असतां तूं या पापांतून मुक्त होशील हें माहीत नाहीं. परंतु जर का तूं शुनक मुनींकडे गेलास तर ते तुला खात्रीनें काय प्रायश्चित्त करावें हें सांगूं शकतील."

केशीध्वज शुनक मुनींकडे गेला आणि घडलेली गोष्ट सांगून काय प्रायश्चित्त करावें



असा प्रश्न केला. तेव्हां शुनक मुनि म्हणाले—"राजा, मला तर याविषयीं कांहींच माहीत नाहीं. मग मी तरी काय सांगणार? कशेर मुनि तरी सांगूं शकतील कीं नाहीं याची मला शंका आहे. फक्त एकालाच याविषयीं पूर्ण माहिती आहे व तो म्हणजे खांडिक्य!"

केशीध्वजासमोर तें ऐकून दुसरा एक प्रश्न उभा राहिला. ज्याला गादीवरून काढून त्याची गादी आपण बळकावली आतां त्याच्याकडे कोणत्या तोंडानें जाऊन हा प्रश्न विचारावयाचा? विचारला तरी ते त्याचें



उत्तर देतील का? थोडा वेळ तो विचार करीत उभा राहिला. पण नंतर त्यानें मनाशीं विचार केला कांहीं हरकत नाहीं हा प्रश्न विचारायला. प्रश्न विचारल्यावर जुन्या वैरा-मुळें खांडिक्यानें माझा वध केला तरी मला यज्ञाचें फळ मिळेल. कारण मी या वेळीं यज्ञकार्य नीट चालावें म्हणून झटत आहें. परंतु जर का त्यानें प्रश्नाचें सरळ उत्तर दिलें तर तसेंहि फळ मिळेल. कारण यज्ञ चालू राहील व यज्ञ यशस्वी झाला म्हणजे फळ हें मिळणारच. म्हणून त्याच्याकडे जाण्यांत कांहीं हरकत नाहीं.

असा विचार करून केशीध्वज रथांत बसून खांडिक्याकडे गेला. त्याला पाहतांच खांडिक्याला राग आला. म्हणाला—"दुष्टा! अजून तुझी दुष्ट बुद्धि गेली नाहीं तर! माझा वध करण्यासाठीं तूं या एकांत स्थानीं पण आला आहेस. मग हा छद्म वेष करून कशाला आला आहेस? तुझ्या अंगावर हरिणाजिन असलें तरी मृगचर्म पांघरलेला वाघ आहेस तूं. तूं माझें राज्य बळजबरीनें हिसकावून घेतलेंस. तेवढ्यानें तुझें पोट भरलें नाहीं. आतां माझा जीव घ्यायला आला आहेस. माझें राज्य हिसकावून घेणाऱ्याचा वध करण्यांत काय पाप आहे? उभा रहा, मी तुझा वध करतों."

तें ऐकून केशीध्वज खांडिक्याला नमस्कार करून म्हणाला—"मी तुझा वध करण्याच्या हेतूनें आलों नाहीं. मनांत एक दोन शंका होत्या त्यांचें समाधान करून घेण्यासाठीं आलों आहें. माझ्या शंकांचें समाधान करावयाचें कीं माझा वध हें मी तुझ्यावरच सोडतों. मी दोन्हींला तयार आहें."

तें ऐकून खांडिक्यानें आपला मंत्री व पुरोहित दोघांचा सल्ला घेतला. दोघे म्हणाले—"हा तर आपला हाडवैरी. याचा वध केल्यास आपणाला कांहीं दोष लागणार नाहीं. शत्रुऋण किंचित देखील ठेवूं नये अशी राजनीति आहे. आपण त्यानंतर निर्विघ्नपणें राज्य करावें."

परंतु खांडिक्याला तो सल्ला पसंत पडला नाहीं. म्हणाला—"यानें यज्ञदीक्षा घेतली आहे. आतां याचा वध केला तर त्याला परलोकीं सुखप्राप्तीचा अधिकार सहजीं मिळेल. याला जिवंत सोडलें तर त्याचा फक्त इहलोकच सुखी होईल. म्हणून मी याचा वध करीत नाहीं."

त्यानें केशीध्वज याच्याजवळ येऊन विचारलें—"असा कोणता धर्मसंदेह तुझ्या मनांत उत्पन्न झाला आहे?" केशीध्वजनें आपले दोन्ही प्रश्न विचारले आणि खांडिक्यानें त्यांचीं समाधानकारक उत्तरें देऊन प्रायश्चित्त सांगितलें आणि त्याला निरोप दिला.

केशीध्वज राजधानींत परत आला. प्रायश्चित करून त्यानें यज्ञ पुरा केला. त्यानें पुरोहितांची पूजा करून त्यांना दक्षिणा दिली. परंतु त्याच्या मनाला एक गोष्ट राहून राहून टोंचत होती कीं खांडिक्याला आपण गुरुदक्षिणा दिली नाहीं. म्हणून तो



पुन्हां रथांत बसून खांडिक्याकडे गेला. त्याला समोर येत असलेला पाहून खांडिक्य शस्त्रास्त्र घेऊन युद्धास तयार झाला.

"मी युद्ध करण्यास आलों नाहीं, गुरु-दक्षिणा देण्यास आलों आहें. तुमच्या कृपेमुळें माझा यज्ञ पुरा झाला. मागाल ती गुरुदक्षिणा द्यायला मी तयार आहें." केशीध्वज म्हणाला.

खांडिक्यानें मंत्री व पुरोहित दोघांचा पुन्हां सल्ला घेतला. "स्वारी छान फसली आहे संकटांत. निस्संकोच राज्य मागून घ्या." तें ऐकून खांडिक्याला हंसूं आलें.

   

तो केशीध्वजाजवळ जाऊन म्हणाला—" मला कोणत्याहि वस्तूची गरज नाहीं. फक्त तुला येत असलेली योगविद्या मला शिकव."

तें ऐकून केशीध्वजाला आश्चर्य वाटलें. कारण खांडिक्य आपलें राज्य परत मागून घेणार असें त्याला वाटत होतें. तो खांडिक्याला गुरुदक्षिणा म्हणून योगविद्या शिकवून निघून गेला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून राजाला विचारलें—" राजा, मला एक शंका वाटते. राजानें त्याचे मंत्री व पुरोहित दोघांनीं सल्ला दिला तरी आपलें राज्य परत कां मागून घेतलें नाहीं ? त्यांचा सल्ला ऐकून त्याला हंसूं कां आलें ? त्याला राज्याचा मोह नव्हता म्हणून ? कीं केशीध्वजाशीं वैर बाळगणें व्यर्थ आहे असें वाटलें म्हणून ? या प्रश्नांची उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस तर त्यांचा परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर लोळूं लागतील."

तें ऐकून विक्रमार्क म्हणाला—" खांडिक्य एक कुलीन क्षत्रीय वंशी होता. म्हणून राज्य लोभ त्याच्या मनांत एवढा जास्त नव्हता. परंतु ज्यानें बळजबरीनें आपलें राज्य हिसकावून घेतलें त्याच्याशीं मैत्री तरी कशी ठेवणार ? कुलीन क्षत्रिय आपला अधिकार युद्ध करून मिळवतो, भिक्षा मागून, कोणाचे उपकार म्हणून घेत नाहीं. ही गोष्ट मंत्र्याला किंवा पुरोहिताला कळूं नये याबद्दल खांडिक्याला हंसूं आलें."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग झाल्यामुळें वेताळ नाहींसा झाला व पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. [ कल्पित ]





# खलीफांची मिळकत

[ २ ]

त्या दिवसापासून तुफहा खलीफांच्या हृदयाची राणी झाली. एक क्षण भर देखील तिचा विरह त्यांना सहन होत नसे. तिच्या सेवेसाठीं त्यांनीं पन्नास दासी नेमल्या. तिच्या तैनातीसाठीं दरमहा दोन लाख दीनार देण्याची व्यवस्था करून दिली. या शिवाय नेहमीं एक न एक भेट तुफहाकडे ते पाठवीतच.

तिच्या रक्षणाची काळजी खलीफांना इतकी असे कीं त्यांनीं ती जबाबदारी इतर कोणावर टाकली नाहीं. कोठें जावयाचें झाल्यास तिच्या महालाला स्वतः बाहेरून कुलूप लावून घेत. कांहीं कारणानें तिचे डोळे ओले झालेले दिसत तेव्हां खलिफा अगदीं घाबरून जात व अगदीं आपुलकीनें चवकशी करीत.

एकदां खलीफा शिकारीला गेले होते. तुफहा आपल्या खोलींत एकटीच होती. तेव्हां खलीफांची मोठी बेगम जुबेदा तेथें आली. तिला पाहून तुफहा नम्रपणें म्हणाली— " बेगम साहेबा ! मला या खोलीबाहेर जाण्याची परवानगी असती तर आपल्या सेवेला नित्य हजर राहालें असतें, याबद्दल क्षमा करावी. आपणच कधीं मधीं दर्शनाचा लाभ द्यावा."

जुबेदा म्हणाली—" यांत तुझा कांहीं अपराध नाहीं. तुझें हृदय निष्पाप आहे हें मला कळतें. खलीफांची प्रेमपात्र अशी जी कोणी असेल तिच्याकडे मी चुकूनदेखील जात नाहीं. परंतु मी तुझ्याकडे मात्र स्वतः धांवून आलें. तूं आल्यापासून माझा

श्री. शशिकांत सावंत



अपमान आणि निरादर होत आहे. माझें जिणें व्यर्थ झालें आहे. फक्त भूभार म्हणून जगत आहें. वंध्या स्त्रीसारखी आज माझी स्थिति झाली आहे. खलीफा मला कधीं भेटायला तर येतच नाहींत, माझी विचार पूस करणें देखील त्यांनीं सोडून दिलें आहे." असें सांगून ती रडूं लागली. तिच्या बरोबर तुफहा पण रडूं लागली.

नंतर जुबेदा तुफहाला म्हणाली—"मी तुझ्याकडे एक विनंति करायला आलें आहें. महिन्यांतून फक्त एक दिवस त्यांनीं माझ्या महालांत यावें. नाहीं तर माझी स्थिति एखाद्या दासी सारखी होईल."

तुफहानें तिचा हात आपल्या हातांत घेऊन डोळ्याला लावला व म्हणाली—"एक दिवसच काय, नेहमींच खलीफांनीं आपल्या महालांत रहावें. मला आपली एक दासी म्हणून पडून राहूं द्या म्हणजे मी त्यांतच संतोष मानून राहीन.

खलीफा शिकार मध्येंच सोडून परत आल्याचें कळलें. खलीफा सरळ तुफहाकडेच येणार हें चांगलें माहीत असल्यामुळें जुबेदा घाईघाईनें आपल्या महालांत निघून गेली.

ती गेल्यानंतर थोड्यावेळानें खलीफा तुफहाच्या खोलींत आले. दोघांचें जेवण झाल्यावर तुफहानें खलीफाला जुबेदाकडे जावयास सांगितलें. खलीफा तिच्या इच्छे-विरुद्ध कांहीं करत नसत. म्हणून ते जुबेदाच्या महालांत गेले. जातांना त्यांनीं संवयीप्रमाणें तुफहाच्या खोलीला बाहेर कुलूप लावून ठेवून दिलें.

खलीफा निघून गेल्यावर तुफहा पुस्तक घेऊन कांहीं वेळ वाचत बसली. त्यानंतर एक तंतुवाद्य घेऊन तें वाजवीत गाणें गुण-गुणूं लागली. अकस्मात् तिला समोर एक



अद्भुत दृश्य दिसलें. दिव्याच्या उजेडांत एक अनोळखी वृद्ध मनुष्य गाण्याच्या सुरावर व तालावर नाचत होता. तो वृद्ध त्याच्या कपड्यावरून राजघराण्यांतला असावा असें वाटे. तो डोळे मिटून अगदीं तन्मय होऊन नाचत होता.

परंतु बंद खोलींत त्या अपरिचित माण-साला त्या स्थितींत पाहून तुफहा मात्र फार घाबरून गेली. बाहेर पाहारा होता, दार बंद, मग हा आंत आला कसा? अल्लावर भरंवसा ठेवून तिला तो आल्याचें कळलेंच नाहीं अशा तऱ्हेनें ती गात राहाली.

कांहीं वेळानें तो वृद्ध जवळ येऊन तिला म्हणाला—"काय पण गोड होतें तुझें गाणें? वाहवा! वाहवा!"

"अल्लाची शपथ, तूं भुतांचा राजा असावास असें मला वाटतें." तुफहा म्हणाली.

"बरोबर ओळखलेंस तुफहा! मी भूत-लोकांतून आलों आहें. एवढेंच नव्हें, मी त्या लोकाचा राजा पण आहें. तुला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. माझें नांव इब्लिस. मीच कित्येक दिवसांपासून नकळत तुझें रक्षण करीत आलों आहें. माझी राणी





कमरियाचें तुझ्यावर फार प्रेम आहे. आम्ही दोघं तुला निश्चितपणें झोप यावी याची काळजी वाहातों. तूं झोपलीस कीं ती तुझ्याकडे पहात तासन्तास बसून राहाते. तरी तिच्या मनाचें समाधान होत नाहीं. आज तिच्या इच्छेप्रमाणेंच मी आलों आहें. तूं माझ्याबरोबर आलीस तर मी तुला एका उच्च अधिकाराच्या जागेवर नेमेन. आज चांगला शुभ मुहूर्त आहे. आजच आमच्या एकुलत्या एका मुलीचें लग्न आहे. मेज-वानीला तूंच मुख्य पाहुणी म्हणून होणार आहेस. तुला वाटेल तितके दिवस तूं आमच्या भूतलोकांत रहा. तूं सांगशील त्या दिवशीं मी तुला परत पोंचती करीन." वृद्ध म्हणाला.

तुफहा भ्यालेली होती. पण त्या वृद्ध माणसाच्या गोड बोलण्यानें तिची भीति कमी झाली व ती त्याच्या विनंतीला नकार देऊं शकली नाहीं. तो वृद्ध तिला हात धरून बाहेर घेऊन गेला. भिंती देखील आडव्या आल्या नाहींत. बाहेर एक घोडा उभा होता. इब्लिसनें तुफहाला त्यावर बस-विल्याबरोबर घोडा आकाशांत उडूं लागला. घोड्याला पंख होते व तो आकाशांत जोरानें उडत होता. त्याच्याबरोबर इब्लिस देखील धांवत होता. उंच आकाशांत उडत असल्या-मुळें तिला भोंवळ आली. पण ती खालीं पडली नाहीं. ती शुद्धीवर आली तेव्हां घोडा जमिनीवर चालत होता. पहावें तिकडे फुलेंच फुलें. उंच जागीं डोंगराच्या पायथ्याला एक सुंदर महाल होता. त्याचीं दारें खिडक्या तांब्याच्या होत्या. दिंडी दरवाज्यावर भुतांचे सरदार तिच्या स्वागतासाठीं हजर होते. इब्लिसला दुरूनच ओळखून ते ओरडले—

"तुफहा आली! तुफहा आली!"

त्यांनीं तिला आदरपूर्वक घोड्यावरून



उतरवलें. एका मोठ्या दिवाणखान्यांत तिला नेऊन गेले. हिऱ्यामोत्यांनीं मढवलेल्या एका उच्च आसनावर तिला बसविलें. दिवाणखान्याच्या भिंती सोन्याच्या होत्या व खांब चांदीचे होते. भुतांचे सरदार तिच्या आसनाभोंवती बसले. दोघां शिवाय बाकी सर्वांचें रूप व पोशाख माणसासारखेच होते.

थोड्या वेळानें भुतांची राणी कमरिया आपल्या तिघां बहिणींबरोवर दिवाणखान्यांत आली. तिनें प्रवेश करतांच सर्वांनीं उभे राहून तिला वंदन केलें. तुफ्हानें आपल्या आसनावरून खालीं येऊन राणीचें स्वागत केलें. राणीनें आपल्या बहिणींची ओळख करून दिली व स्वतः दुसऱ्या एका आसनावर जाऊन बसली.

मेजवानी सुरू झाली. त्या दोघां विचित्र भुतांकडे खुणावून तुफ्हानें कमरियाला त्यांच्या विचित्र रूपाचें कारण विचारलें.

"तुला भीति वाटूं नये म्हणून बाकी सर्वांनीं मानव रूप धरलें आहे, पण त्या दोघांनीं आपल्याच घमेंडींत आपलें हें रूप सोडलें नाहीं. हा आहे अलशिस्वान व तो मायमून!" तिनें दोघांकडे खुणावून नांवें सांगितलीं.

"त्याला पाहून मला भीति वाटते बाई!" तुफ्हा म्हणाली. तें ऐकून सर्व भुतें खदखदां हंसूं लागलीं.

मेजवानी संपल्यावर इब्लिसनें तुफ्हाला गाणें म्हणायला सांगितलें. तिनें एक सुंदर व गोड गाणें म्हटलें. तिचा गोड आवाज ऐकून भुतें डोलूं लागलीं. त्यांनीं तिला आणखी गाणीं म्हणायला आग्रह केला. तिनें निरनिराळ्या चालींवर कित्येक पदें म्हटलीं. कित्येक पदें फुलांविषयीं व पक्ष्यांविषयीं होतीं. सर्वांनीं मुक्तकंठानें तिच्या गाण्याची स्तुति केली. तिला देखील आनंद झाला. पण तिनें परत जाण्याची इच्छा दर्शविली.

इब्लिसला वाईट वाटलें. तो म्हणाला—"तुझा गुरु ईशाक माझ्या चांगला परिचयाचा आहे. मी त्याला कित्येक रागरागिणी शिकविल्या आहेत. गिटार वाद्य वाजविण्याची एक नवीन पद्धत मी तुला शिकवीन तूं हें वाद्य शिकून घेतलेंस तर सर्वत्र तुझी प्रशंसाच होईल. खलीफांचें तुझ्यावर जास्तच प्रेम वाढेल." असें सांगून त्यानें गिटार वाद्य एका विशिष्ट पद्धतीनें वाजवायला सुरुवात केली. तें वाद्य तुफ्हा तन्मय होऊन ऐकूं लागली. तिनें आपल्या आयुष्यांत इतकें उत्तम संगीत कधीं ऐकलें नव्हतें. नंतर तिनें इब्लिसच्या हातून गिटार घेतलें व तीच गत वाजवून दाखविली. तिचें नैपुण्य पाहून सर्व चकित झाले.

नंतर इब्लिसच्या आज्ञेप्रमाणें नोकर बारा पेट्या घेऊन आले. सर्व पेट्या एकाच तऱ्हेच्या होत्या. तुला आमच्या तर्फे ही भेट समज. असें सांगून इब्लिसनें पेट्या उघडून आंतील उत्तमोत्तम मखमलीची व रेशमी जरदारी वस्त्रें व आभूषणें तिला
















दाखविलीं. एका पेटींत निरनिराळ्या तऱ्हेचीं उत्तरेंच होतीं.

कमरिया राणी तिला निरोप देत असतां म्हणाली—"आम्ही मधूनमधून तुझ्या भेटीला अदृश्य रूपानें येत जाऊं."

परत जातांना इब्लिसनें तुफ़ाला घोड्यावर बसविलें नाहीं. आपल्या खांद्यावर आश्चर्य असें कीं क्षणभरांत ती आपल्या खोलींत पोंचली होती. बाराच्या बारा पेट्या भिंतीला चिकटून ठेवलेल्या होत्या. आपण या खोलीबाहेर कोठें गेलोंच नव्हतों असें तिला वाटलें. आपण स्वप्नतर पाहिलें नाहीं अशी एक शंका तिच्या मनांत येऊन गेली. खात्री करून घेण्यासाठीं ती गिटार वाद्य घेऊन इब्लिसनें शिकवलेली गत वाजवूं लागली.

खोलीबाहेर सव्वाब नांवाचा हिजडा उभा होता. तो गाणें ऐकून मुग्ध झाला. अरे ही तर आपलीच मालकीण वाजवीत असली पाहिजे. तो धांवतच जुबेदा बेगमच्या महालांत गेला. खलीफा शयन-गृहांत होते. त्यानें पाहारेकऱ्याचे पाय धरून माफी मागितली आणि म्हणाला—"माफ कर मित्रा! काय वाटेल तें करून खलीफांना जागा कर!"

"अरे, तुला वेडबीड तर नाहीं लागलें. माझी मान उडेल त्याची काय वाट?" पाहारेकरी म्हणाला. परंतु सव्वाबनें आपला हट्ट सोडला नाहीं. त्यांच्या बोलण्याच्या आवाजानें शेवटीं खलीफांनी झोंप मोडली व तेच दार उघडून बाहेर आले आणि विचारलें—"हा काय दंगा चालवला आहे?"

मस्रूर माफी मागून म्हणाला—"सव्वाब आपल्याला जागे करायला सांगत होता."

"काय पाहिजे त्याला?" खलीफानीं विचारलें आणि आंत येऊन काय तें सांगायला सांगितलें. आपण स्वतः खलीफांशीं बोलत आहों, ही गोष्ट सव्वाब पार विसरून गेला आणि सलाम देखील केला नाहीं. घाइघाईत बरळूं लागला—"अरे चल लवकर! माझी मालकीण तुफ़ा गिटार वाजवून त्यावर एक गाणें म्हणत आहे. चल लवकर आणि तेथें बसून एकदां तें गाणें ऐक, माझ्या बाळा!"

खलीफा कांहीं एक बोलले नाहींत व त्याच्याकडे करड्या नजरेनें पाहूं लागले. सव्वाबनें विचारलें—"मी म्हटलें तें ऐकूं नाहीं आलें का? तुफ़ा आपल्या खोलींत बसून गाणें म्हणते आहे. ऐक जाऊन खुळ्या!"

खलीफा जास्त वेळ विचार करीत थांबले नाहींत. त्यांना जो अंगरखा समोर पलंगावर दिसला तो त्यांनीं उचलला आणि अंगांत घालीत म्हणाले—"काय झालें तरी काय तुला मूर्खा! तुझी मालकीण निघून गेली आहे. जाफर म्हणाला कीं तिला कोणीतरी भूत उचलून पळवून घेऊन गेलें आहे. भुतें ज्यांना उचलून नेतात ते पुन्हां परत येत नसतात, ही साधी गोष्ट माहीत नाहीं वाटतें तुला? तुला स्वप्न तर नाहीं



पडलें? आला आहे मोठा मला जागा करायला."

"स्वप्न! मी तर झोंपलोंच नाहीं व माझी मालकीण जिवंत आहे. म्हणून तर मी बोलवायला येथवर आलों आहें. काय पण तुझी ही दशा झाली आहे?" म्हातारा सव्वाब म्हणाला.

आतां मात्र खलीफांना हंसूं आवरेना. ते सव्वाबला म्हणाले—"हे बघ, तुझें म्हणणें खरें निघालें तर समज, तुझें भाग्य उदयाला आलें आहे. तुला मी गुलामींतून मुक्त करून तुला एक हजार दीनार इनाम देईन.

पण जर का खोटें निघालें तर लक्षांत ठेव, फांशी होईल."

"अल्ला !.....हें खरें होऊं दे ! हें स्वप्न ठरूं देऊं नकोस !" असें पुटपुटत सख्वाब खलीफांना बरोबर घेऊन तुफहाच्या महालाकडे निघाला. खोलीजवळ येतांच खलीफांना तुफहाचें गोड संगीत ऐकूं आलें. खोलीचें दार उघडायला एक क्षणभरच लागला असेल. दार उघडल्याबरोबर तुफहानें समोर येऊन खलीफांना मिठी मारली. खलीफा एकदम ओरडले आणि बेशुद्ध होऊन जमिनीवर पडले.

तुफहानें त्यांना पाणी शिंपडून शुद्धीवर आणलें. खलीफा शुद्धीवर आले खरे परंतु थोडा वेळ जणुं कांहीं दुसऱ्याच कोठल्या तरी तंद्रेंत मग्न होऊन तिच्याकडे पहात बसून राहाले. नंतर मोठ्या कष्टानें श्वास सोडून म्हणाले—"तुफहा ! तूं नाहींशी झालीस तें एक आश्चर्यच व पुन्हां परत आली आहेस हें त्याहून मोठें आश्चर्य !"

तुफहानें घडलेलें वृत्त सविस्तर सांगितलें व भूत लोकांतून भेट म्हणून तिनें ज्या बारा पेट्या आणल्या होत्या त्या दाखविल्या. पेट्या उघडून पाहाल्यावर आंतल्या हिऱ्या माणक्यांच्या झकझकाटानें खलीफांचे डोळे दिपून गेले. अब्बासवंशीयांच्या अपार वैभवाचें व संपत्तीचें मूळ कारण म्हणजे हा खजिनाच.

तुफहा परत आल्याच्या खुशींत खलीफांनीं राज्यभर रोषणाई केली व उत्सवाचा दिवस म्हणून प्रजेला मेजवानी दिली. मेजवानीच्या वेळीं इशाकनें इब्लिसच्या पद्धतीवर एक गीत रचून तें गिटारवर म्हणून दाखविलें आणि सर्वांचें मनोरंजन केलें. [संपूर्ण]






मध्यंतरी सीता रामचंद्राच्या विरहदुःखानें आणि रावणाच्या कठोर वचनांनीं फार दुःखी झाली. तिला वाटूं लागलें कीं आतां रामाचें दर्शन या जन्मांत तरी होणें शक्य नाहीं. तो दुष्ट रावण केव्हां वध करील कोण जाणें ? रावण निघून गेला. सीता विचार करीत बसली होती. स्वच्छ चांदणें पडलें होतें. पण तिची मनस्थिति अगदीं बदलून गेली होती. तिनें आत्महत्येचा विचार करून गळ्याला फांस लावून घेण्याच्या हेतूनें गळ्याला आपल्याच वेणीचा विळखा दिला.

पण इतक्यांत तिला कांहीं शुभ शकुन होऊं लागले. डावा डोळा लवूं लागला व डाव्या अंगाला स्फुरण चढूं लागलें. तें पाहून तिच्या जिवांत जीव आला.

मारुती शिंशुपा (शिसवी) वृक्षावर बसून हें सर्व पहात होता. पण काय करावें हें त्याला सुचेना. रामाचा संदेश पोंचता करणें हें काम त्यानें अंगावर घेतलें होतें. सीतेशीं कांहीं बोललों नाहीं व सीता येथें सुखरूप आहे एवढेंच पाहून आपण परत गेलों तर रामाला त्याचें वाईट वाटेल. सीतेचा कांहीं निरोप आणला नाहीं याबद्दल कदाचित रागदेखील येईल. पण सीतेशीं बोलावें तर कसें ? या राक्षसिणी तिच्या चारीबाजूला घोळका करून बसल्या आहेत. मी संस्कृत







पण जर का खोटें निघालें तर लक्षांत ठेव, फांशी होईल."

"अल्ला !....हें खरें होऊं दे ! हें स्वप्न ठरूं देऊं नकोस !" असें पुटपुटत सव्वाब खलीफांना बरोबर घेऊन तुफ़हाच्या महालाकडे निघाला. खोलीजवळ येतांच खलीफांना तुफ़हाचें गोड संगीत ऐकूं आलें. खोलीचें दार उघडायला एक क्षणभरच लागला असेल. दार उघडल्याबरोबर तुफ़हानें समोर येऊन खलीफांना मिठी मारली. खलीफा एकदम ओरडले आणि बेशुद्ध होऊन जमिनीवर पडले.

तुफ़हानें त्यांना पाणी शिंपडून शुद्धीवर आणलें. खलीफा शुद्धीवर आले खरे परंतु थोडा वेळ जणुं कांहीं दुसऱ्याच कोठल्या तरी तंद्रेंत मग्न होऊन तिच्याकडे पहात बसून राहाले. नंतर मोठ्या कष्टानें श्वास सोडून म्हणाले—"तुफ़हा ! तूं नाहींशी झालीस तें एक आश्चर्यच व पुन्हां परत आली आहेस हें त्याहून मोठें आश्चर्य !"

तुफ़हानें घडलेलें वृत्त सविस्तर सांगितलें व भूत लोकांतून भेट म्हणून तिनें ज्या बारा पेट्या आणल्या होत्या त्या दाखविल्या. पेट्या उघडून पाहाल्यावर आंतल्या हिऱ्या माणक्यांच्या झकझकाटानें खलीफांचे डोळे दिपून गेले. अब्बासवंशीयांच्या अपार वैभवाचें व संपत्तीचें मूळ कारण म्हणजे हा खजिनाच.

तुफ़हा परत आल्याच्या खुशींत खलीफांनीं राज्यभर रोषणाई केली व उत्सवाचा दिवस म्हणून प्रजेला मेजवानी दिली. मेजवानीच्या वेळीं इशाकनें इब्लिसच्या पद्धतीवर एक गीत रचून तें गिटारवर म्हणून दाखविलें आणि सर्वांचें मनोरंजन केलें. [संपूर्ण]





वानरच तें सर्व बोलला ह्या गोष्टीची तिची खात्री झाली. पुन्हां विचार केला, हा भ्रम तर नसेल. रामाच्या विषयींच मनांत सारखे विचार चालू असल्यामुळें रामाच्या विषयीं कोणी बोलत आहे असा भ्रम झाला असावा.

इतक्यांत मारुती झाडावरून खालीं उतरून आला. सर्व राक्षसिणी घोरत पडल्या होत्या. मारुतीनें दुरूनच सीतेला प्रणाम केला व विचारूं लागला—"हे देवी ! तूं कोण ? तुझ्या अंगावरचीं वस्त्रें अशीं जुनीं व फाटकीं कां ? तूं कोणत्या जातीची ? तूं तर कोणी कुलीन दिसते आहेस. तुझ्या वडिलांचें व पतीचें नांव काय ? तूं जन-स्थानांतून रावणानें हरण करून आणलेली सीताच असलीस तर सांग !"

सीता म्हणाली—"मी महाराज दशरथ यांची सून व जनकराजाची कन्या आहें. श्रीरामचंद्र माझे पति. माझें नांव सीता. मला तेरावें वर्ष लागलें तेव्हां रामचंद्राला राज्याभिषेक करण्याचा दशरथ महाराजांनीं निश्चय केला. परंतु त्यांची तृतीय पत्नी कैकेयी हट्ट करून बसली कीं रामाला राज्याभिषेक केल्यास आत्महत्या करीन. तिनें असा देखील हट्ट केला कीं रामाला चौदा वर्षें वनवासाला पाठवावें. रामानें राज्याचा अधिकार सोडला आणि वनवास ग्रहण करण्याचें ठरविलें. त्यानें मला कौसल्या मातेजवळ रहावयास सांगितलें. पण रामाचा वियोग मला असह्य वाटला म्हणून मी त्याच्या बरोबर वनांत आलें. माझ्या आधीं आपल्या वडील भावाबरोबर वनवासास जायला लक्ष्मण वल्कल वस्त्रें धारण करून तयार झाला होता. आम्ही सर्व दंडकारण्यांत असतां रावण मला उचलून घेऊन लंकेला आला. फक्त दोनच महिने तो मला जिवंत राहूं देईल. नंतर तो माझा वध करील."



सीतेला दुःखी पाहून मारुती पण फार दुःखी झाला. सीतेचें दुःख कमी करण्याच्या हेतूनें मारुती म्हणाला—"माते सीते! मी रामाचा दूत आहें. रामानें स्वतःची कुशल-वार्ता तुला कळवून तुझी कुशलवार्ता घेऊन येण्यासाठीं मला पाठविलें आहे. लक्ष्मणानें साष्टांग नमस्कार सांगायला सांगितलें आहे."

तें ऐकून सीतेला आनंद झाला. तिचा कंठ गहिंवरून आला. क्षणभर डोळे मिटून ती बसली व नंतर म्हणाली—"रामचंद्राचें दर्शन माझ्या नशीबीं असेल तर मला आनंद मिळेल."

सीतेच्या मनांत आपल्यावर विश्वास बसला असावा असें वाटल्यानंतर मारुती पुढें येऊन समोर उभा राहिला. सीतेला वाटलें रावणच तें मायावी रूप धारण करून आला आहे. तिनें विचार केला कीं एखाद्या ओळखीच्या माणसाशीं बोलावें तशी मी या वानराशीं बोललें ही केवढी चूक केली? प्रथम ती अशोक वृक्षाला टेकून उभी होती. पण मग खालीं बसली. मारुतीनें तिला प्रणाम केला तरी त्याच्याकडे पाहण्याला तिला धीर होईना. ती त्याला म्हणाली—"तूंच रावण आहेस, मला मुळींच शंका नाहीं. माकडाचें रूप घेऊन तू मला फस-विण्यास आला आहेस. दंडकारण्यांत तूं संन्याश्याचें रूप धरून आला होतास. मी श्रीरामचंद्राच्या दुःखानें दुःखी आहें व उपवास करीत आहें. तूं या अबलेला असा त्रास कां देतोस? तूं रामाचा दूत आहेस तर त्यांच्या गुणांचें वर्णन कर. राम व लक्ष्मण यांच्या स्वभावाचें वर्णन कर तुझी रामचंद्राशीं केव्हां व कशी भेट झाली नर आणि वानर यांची मैत्री कशी?"

मारुतीनें श्रीरामाचें गुण वर्णन करून त्याचें सौंदर्य व शौर्य वर्णन केलें. लक्ष्मणाच्या



भ्रातृभक्तीचें पण वर्णन केलें आणि नंतर सीता हरण झाल्यानंतर राम ऋष्यमूक पर्वताजवळ सीतेचा शोध काढीत कसा आला व त्यानंतर काय काय घडलें व शेवटीं स्वतः लंकेला कसा आला हें सांगून म्हणाला—"मी वानरांचा राजा सुग्रीव याचा मंत्री आहें." नंतर त्यानें रामाची अंगठी सीतेला देऊन तिची खात्री पटविली.

सीतेचा मारुतीवर आतां पूर्ण विश्वास बसला. तिच्या तोंडावर आनंद झळकूं लागला. ती मारुतीला म्हणाली—"मारुती! तर मग तूं सामान्य माकड नसून एक पराक्रमी वानर आहेस. समुद्र पार करून येण्यासारखें एक अशक्य कार्य तूं शक्य करून दाखविलें आहेस."

नंतर सीता विचार करूं लागली कीं रामचंद्र आतां लवकरच येऊन आपली सुटका करणार. अयोध्येहून भरत एक अक्षौहिणी सैन्य मदतीला पाठवील. राम-लक्ष्मण रावणादिक राक्षसांचा नाश करून मला सोडवून नेतील. पुन्हां दुसरा विचार आला. रामलक्ष्मण येतील कीं नाहीं? नाहीं आले तर प्राण त्याग करण्याखेरीज दुसरा उपाय नाहीं.



मारुती म्हणाला—"रामचंद्र नेहमीं तुझ्याच नांवाचा जप करीत आहेत. फक्त फलाहार करून रहात आहेत." पुढें तो म्हणाला कीं सीता लंकेंत आहे हें कळल्याबरोबर ते इकडे येतील. सीता म्हणाली—"मारुती! रावणानें मला फक्त एक वर्षाचा अवधी दिला होता. त्यापैकीं फक्त एकच महिना आतां उरला आहे. त्याच्या आंत माझी सुटका झाली तर रामाची व माझी जिवंतपणें भेट होईल." सीतेनें मारुतीला आणखी एक गोष्ट सांगि-तली. लंकेंत तिच्याबाजूनें बोलणारे बिभीषण, त्याची बायको, त्यांची मोठी मुलगी नला,



अविन्ध्य नामक वगैरे कांहीं लोक आहेत. मारुती म्हणाला—"माते! चल, मी तुला आपल्या खांद्यावर बसवून एका क्षणांत समुद्रापलीकडे घेऊन जाईन. तूं मनांतलें दुःख, भय सर्व पार विसरून जा!"

मारुती त्या वेळीं वानराला शोभेल एवढेंच रूप घेऊन सीते समोर उभा होता. म्हणून सीतेच्या मनांत त्याच्या त्या शक्तीवर व पराक्रमावर विश्वास बसेना. ती म्हणाली—"अरे मी तुझ्या पाठीवर बसून समुद्र पार कशी काय जाऊं शकेन? किती झालास तरी तूं वानरच!"

मारुतीला त्यांत जणुंकाय त्याचा अपमान झाल्यासारखें वाटलें. तो थोडा दूर जाऊन उभा राहिला व त्यानें गरिमा शक्तीचा उपयोग करून आपलें विराट रूप दर्शविलें आणि म्हणाला—"हे माते! तुलाच काय ही सारी लंकाच उचलून घेऊन जाण्याची शक्ति आहे माझ्या अंगांत! तूं भिऊं नकोस, आणि माझ्याबरोबर चल."

पण सीता म्हणाली—"तूं मला घेऊन जाऊं लागलास म्हणजे राक्षस शस्त्रास्त्रें घेऊन तुझ्या अंगावर धांवतील व मी भिऊन समुद्रांत पडेन! आणि मग तुझ्यावर पण संकट येईलच. श्री रामचंद्र देखील रागावणार नाहींत का? आणि समज, तूंच राक्षसांचा वध एकट्यानें केलास तर रामचंद्राची अपकीर्ति नाहीं का होणार? म्हणून माझ्या मतें तूं रामाला जाऊन बोलावून आण."

सीतेच्या मनांत आणखी एक विचार आला. मारुती परपुरुष, त्याच्या अंगाचा स्पर्श होणें अइष्ट. ती म्हणाली—"तुला वाटत असेल कीं रावणानें नाहीं का माझ्या अंगाचा स्पर्श केला? पण तेव्हांची गोष्ट निराळी होती. तें माझ्या इच्छेविरुद्ध होतें व माझे पति त्या वेळीं तेथें नव्हते."



म्हणूनच कीं काय तो पुढल्या जन्मीं हरणाच्या योनींतच जन्माला आला. पूर्व पुण्याईमुळें त्याला पूर्व जन्म आठवत होता. त्यानें जन्मल्याबरोबर आपल्या आईला सोडलें आणि शालिग्राम क्षेत्रांत येऊन राहूं लागला. तेथेंच झाडाचा पाला खाऊन त्यानें आपलें जीवित घालविलें.

पुढल्या जन्मीं अंगीरस नामक ब्राह्मणाच्या पोटीं तो पुन्हां जन्माला आला. जन्मल्यापासून तो भोळसटच होता. बापानें गुरु गृहीं त्याला पाठविलें तरी विद्याभ्यास केला नाहीं. वैदिक कर्मकांडदेखील त्यानें सोडून दिलें. कोणी त्याचे सावत्र भाऊ पदोपदीं त्याचा अपमान करीत. त्याला धड कपडे देखील अंगांत घालायला मिळत नसत. सर्व लोक जणुं कांहीं त्याच्या सांवलीला देखील भीत व त्याला वेडा समजून दगड मारीत. परंतु त्यानें सर्व अपमान निमूटपणें सहन केले.

पुढें त्याचे वडील वारले. त्याच्या भावांनीं त्याला नोकरासारखें राबवलें. शेणगोठा, गवत कांपणें, गुरें चरायला घेऊन जाणें वगैरे सर्व कामें त्याला करावी लागत. तो सर्व कामें करी. दिवस किंवा रात्र येतां त्याला कधीं फरक वाटला नाहीं. एकाद दिवशीं त्याला जेवायला मिळे तर एकाद दिवशीं तेंहि नाहीं. पण त्यानें कधीं कोणाशीं तक्रार केली नाहीं.

त्या देशाचा राजा वृषल यानें कालीमातेला नरबळी देण्याचें ठरविलें. त्याचे नोकर एका गरीब माणसाला पकडून धरून घेऊन आले. पण तो पळून गेला. त्याच्या शोधार्थ ते हिंडत असतां सैनिकांना भरत दिसला. वृषल राजानें त्यालाच बळी द्यावयाचें ठरवून कालीसमोर उभें केलें. परंतु कालीमातेनें राजालाच खाऊन टाकलें. देवीच्या



अंगांतून ज्वाला बाहेर येऊं लागल्या आणि पुजारी पटापट मरून पडले. राजाचे शिपाई पळून गेले. भरत देखील पळून गेला.

त्यानंतर भरत देशोदेशीं हिंडला. सिंधु देशाचा राजा रहुण तत्वज्ञानाच्या प्राप्तीसाठीं पालखींत बसून कपिलमुनींच्या दर्शनास निघाला. वाटेंत मेणा उचलून नेणाऱ्या भोयांनीं त्याला पाहिलें आणि तो रिकामटेकडा कोणी तरी असावा असा विचार करून त्याला हांक मारली आणि मेण्याच्या दांड्याला खांदा द्यायला सांगितलें. भरत कांहींच बोलला नाहीं. त्यानें मेण्याचा दांडा इतर मजुरांबरोबर खांद्यावर घेतला आणि चालूं लागला. संवय नसल्यामुळें त्याला इतर भोयांबरोबर झपाझप चालतां येत नव्हतें. त्याचे पाय लटलटूं लागले. मेणा सरकूं लागला. राजानें भोयांना आंतून ओरडून विचारलें. भरताकडे बोट दाखवून ते म्हणाले–"याच्यामुळेंच मेणा डगमग होऊं लागला आहे."

राजानें त्याला थट्टेंत विचारलें–"फार चाललास नाहीं का रे? म्हणून मेणा डगमगूं लागला वाटतें? काय पण हल्लींचे तरुण थोडक्यांत धापा टाकूं लागतात!"



मारुती म्हणाला—“ माते! तुझें म्हणणें बरोबर आहे! माझ्या खांद्यावर बसून जाणें इष्ट नव्हे. पण मग मी तुला भेटून आलों या गोष्टीचें प्रमाण तरी काय आहे, माझ्याजवळ?”

सीता म्हणाली—“ द्यायला माझ्याजवळ खूण तरी काय आहे. पण एक जुनी आठवण आहे. ती मी तुला सांगतें. ती रामाला सांगितलीस कीं रामाच्या मनाची खात्री पटेल.”

“ चित्रकूट पर्वतावरची ती गोष्ट आहे. मंदाकिनीच्या काठीं एका आश्रमा शेजारीं रामलक्ष्मणासह आम्ही सर्व रहात होतों. एकदां फुलें आणायला मी गेलें होतें. अगदीं दमून गेलें होतें. रामचंद्र तेथें आले व आम्ही दोघे विश्रांतीसाठीं एका झाडाच्या सांवलींत झोंपलों. तेव्हां एका कावळ्यानें माझ्या छातींत चोंच मारली. मला राग आला. मी त्याला हाकलण्याचा प्रयत्न केला. पण तो लोचट कावळा पुन्हां पुन्हां येऊं लागला. कावळ्यानें मला त्रास दिलेला पाहून रामाला राग आला. कावळा रामाला पाहून दूर पळाला. आम्ही दोघे पुन्हां झोंपलों. दोघांना झोंप लागल्यावर तो कावळा पुन्हां आला आणि त्यानें टोंच मारून माझी छाती रक्तबंबाळ करून टाकली. त्यामुळें रामाची झोंप मोडली. त्याला राग आला. तो म्हणाला—“ कोण रे तो दुष्ट कावळा?” रामाला दूर एक कावळा दिसला. त्याची चोंच व पाय रक्तानें माखलेले होते. रामानें दर्भाचें एक पातें घेऊन ब्रह्मास्त्राचा मंत्र म्हटला. प्रलयाग्नीसारखें तें पातें कावळ्याकडे जाऊं लागलें.






फार प्राचीन काळीं ऋषभ नांवाचा एक राजा राज्य करीत असे. तो इतका शक्तिशाली होता कीं त्यानें इंद्राचा देखील पराभव केला होता. त्याला जयंती नांवाची राणी होती. जयंतीला अनेक मुलें झालीं. त्यांत सर्वांत मोठा भरत होता. त्याला, इलावर्त, कुशावर्त, ब्रह्मावर्त, आर्यावर्त, मलयकेतु, भद्रसेन वगैरे नांवाचे लहान भाऊ होते. त्यांनीं जेथें राज्य केलें त्या देशाचें नांव त्यांच्या नांवावरूनच पडलें.

भरताला पंचजनी नांवाची बायको होती. त्यांना सुमति, राष्ट्रभुक, सुदर्शन, आचरण, धूम्रकेतु नांवाचे मुलगे होते. ऋषभ वारल्यावर भरत गादीवर बसला. गादीवर त्यानें अनेक वर्षें राज्य केलें. त्यानें आपलें राज्य आपल्या मुलांना देऊन टाकलें आणि स्वतः तपश्चर्या करण्यासाठीं पुलस्त्यपुलह नामक आश्रमांत गेला. तो सालग्राम नामक पुण्यक्षेत्रांत रहात असे.

एकदां भरत चक्र नांवाच्या नदींत स्नान करून सूर्याला अर्घ्य देत असतां तेथें एक हरणी पाणी प्यायला आली. ती गाभीण होती. अकस्मात् सिंहगर्जना ऐकून तिनें घाबरून जाऊन टुणदिशी उडी मारली. पण ती जमिनीवर आदळली व तेथेंच मरून पडली. तिच्या पोटांतलें पाडस खालीं पडलें व तें नदीच्या प्रवाहांत वाहूं लागलें.

भरत त्या पाडसाला उचलून आपल्या आश्रमांत घेऊन आला. तो त्याच्या सेवेंत इतका मग्न झाला कीं आपली तपश्चर्या देखील विसरून गेला. मरण समयीं देखील त्याची दृष्टि त्या पाडसावरच होती.

'सौ. शारदाबाई मिसाळ



म्हणूनच कीं काय तो पुढल्या जन्मीं हरणाच्या योनींतच जन्माला आला. पूर्व पुण्याईमुळें त्याला पूर्व जन्म आठवत होता. त्यानें जन्मल्याबरोबर आपल्या आईला सोडलें आणि शालिग्राम क्षेत्रांत येऊन राहूं लागला. तेथेंच झाडाचा पाला खाऊन त्यानें आपलें जीवित घालविलें.

पुढल्या जन्मीं अंगीरस नामक ब्राह्मणाच्या पोटीं तो पुन्हां जन्माला आला. जन्मल्यापासून तो भोळसटच होता. बापानें गुरु गृहीं त्याला पाठविलें तरी विद्याभ्यास केला नाहीं. वैदिक कर्मकांडदेखील त्यानें सोडून दिलें. कोणी त्याचे सावत्र भाऊ पदोपदीं त्याचा अपमान करीत. त्याला धड कपडे देखील अंगांत घालायला मिळत नसत. सर्व लोक जणुं कांहीं त्याच्या सांवलीला देखील भीत व त्याला वेडा समजून दगड मारीत. परंतु त्यानें सर्व अपमान निमूटपणें सहन केले.

पुढें त्याचे वडील वारले. त्याच्या भावांनीं त्याला नोकरासारखें राबवलें. शेणगोठा, गवत कांपणें, गुरें चरायला घेऊन जाणें वगैरे सर्व कामें त्याला करावी लागत. तो सर्व कामें करी. दिवस किंवा रात्र येतां त्याला कधीं फरक वाटला नाहीं. एकाध दिवशीं त्याला जेवायला मिळे तर एकाध दिवशीं तेंहि नाहीं. पण त्यानें कधीं कोणाशीं तक्रार केली नाहीं.

त्या देशाचा राजा वृषल यानें कालीमातेला नरबळी देण्याचें ठरविलें. त्याचे नोकर एका गरीब माणसाला पकडून धरून घेऊन आले. पण तो पळून गेला. त्याच्या शोधार्थ ते हिंडत असतां सैनिकांना भरत दिसला. वृषल राजानें त्यालाच बळी द्यायचें ठरवून कालीसमोर उभें केलें. परंतु कालीमातेनें राजालाच खाऊन टाकलें. देवीच्या



अंगांतून ज्वाला बाहेर येऊं लागल्या आणि पुजारी पटापट मरून पडले. राजाचे शिपाई पळून गेले. भरत देखील पळून गेला.

त्यानंतर भरत देशोदेशीं हिंडला. सिंधु देशाचा राजा रहुण तत्वज्ञानाच्या प्राप्तीसाठीं पालखींत बसून कपिलमुनींच्या दर्शनास निघाला. वाटेंत मेणा उचलून नेणाऱ्या भोयांनीं त्याला पाहिलें आणि तो रिकामटेकडा कोणी तरी असावा असा विचार करून त्याला हांक मारली आणि मेण्याच्या दांड्याला खांदा द्यायला सांगितलें. भरत कांहींच बोलला नाहीं. त्यानें मेण्याचा दांडा इतर मजुरांबरोबर खांद्यावर घेतला आणि चालूं लागला. संवय नसल्यामुळें त्याला इतर भोयांबरोबर झपाझप चालतां येत नव्हतें. त्याचे पाय लटलटूं लागले. मेणा सरकूं लागला. राजानें भोयांना आंतून ओरडून विचारलें. भरताकडे बोट दाखवून ते म्हणाले—"याच्यामुळेंच मेणा डगमग होऊं लागला आहे."

राजानें त्याला थट्टेंत विचारलें—"फार चाललास नाहीं का रे ? म्हणून मेणा डगमगूं लागला वाटतें ? काय पण हल्लींचे तरुण थोडक्यांत धापा टाकूं लागतात !"












“मी दमलों नाहीं. माझ्या अंगांत शक्तीदेखील नाहीं. तुझा मेणा मी कोठें उचलला आहे? दुसराच कोणी उचलून घेऊन चालला आहे.” भरत म्हणाला.

“वेडा पीर दिसतोस! अरे, तुझ्या खांद्यावर मेणा आहे आणि म्हणतोस तूं उचलून नेत नाहींस?” राजानें स्मित करून विचारलें.

“राजा! तूं जें पाहतों आहेस तेंच तुला समजलें नाहींसें दिसतें. म्हणून तूं असत्य भाषण करीत आहेस. सत्य काय तें मी तुला सांगतों, ऐक! खांद्यावर मेणा आहे. त्याच्या खालीं हात, छाती, त्यांच्याहि खालीं पोट, पाय हे अवयव आहेत आणि सर्वांच्या खालीं जमीन आहे. हे सर्वच अनुक्रमें भार वाहून नेत आहेत. मग तूं कसें म्हणतोस कीं मी तुझा मेणा वाहून नेत आहें? कारणान्तर झाल्यानें जो भेद होतो तो नकळ्यानें जग मूळ सत्य कोण तें तेंच ओळखूं शकत नाहीं. आतां पहा तूं मेण्यांत बसला आहेस. मेणा लाकडाचा आहे. झाड लाकूड देतें. म्हणून तूं झाडावर बसला आहेस असें म्हटल्यास तें असत्य ठरेल का? पण जग तें मानायला तयार नाहीं. या अज्ञानामुळेंच तुला वाटतें कीं तूं मेण्यांत बसला आहेस आणि तुला कोणी तरी उचलून नेत आहे.”

भरताचा तो तर्क ऐकून राजा मेण्यांतून खालीं उतरला आणि भरताचे पाय धरून म्हणाला—“महात्मन! मी तत्वज्ञानाचा अभ्यास करण्यासाठींच निघालों आहें. तें ज्ञान आपण येथेंच दिलेंत. मी कृतार्थ झालों.” भरतानें त्याला उपदेश करून निरोप दिला.





## २७. पीसाचा स्तंभ

इटली देशांत आर्नो नांवाची नदीच्या मुखापासून प्रवाहाच्या उलट्या दिशेला थोड्या अंतरावर पीसा नगर आहे. एका काळीं दर्यावर्दी लोकांचें एक लोकसत्ताक राज्य तेथें होतें. शिल्पकलेसाठीं तें प्रसिद्ध आहे.

एकदां नौका युद्धांत विजय प्राप्ति मिळाल्यामुळें सन् १०६७ मध्यें पीसाच्या नागरिकांनीं एक कॅथेड्रल बांधायला सुरवात केली. श्वेत व कृष्णवर्ण संगमरवरी दगडाची ती इमारत सन् १११८ मध्यें बांधून तयार झाली. त्या इमारतीच्या शेजारींच जग प्रसिद्ध झुकलेला स्तंभ आहे. यांतील शिल्पकला फार नाजुक व वाखाणण्यासारखी आहे. याला धनगरांचा स्तंभ अशी देखील संज्ञा आहे. कारण याचा निर्माणकर्ता गियोटो हा एक धनगर होता.

याची उंची १७९ फुट आहे. हा जमिनींत एका बाजूला खचल्यामुळें त्याचा वरचा भाग एका बाजूला १४ फुट कललेला आहे. अलीकडे जी माहिती मिळाली आहे तीवरून हा स्तंभ ढासळणार कीं काय अशी शंका देखील वाटूं लागली आहे.





# भारताचा इतिहास



दिल्लीच्या सुलतानांची पर्वा न करणारा प्रांत म्हणजे बंगाल. हा एक अत्यंत सुपीक देश होता. या शिवाय हा दिल्लीपासून दूर. तेथील अंमलदार दिल्लीच्या सुलतानांशीं थोडेसे बेफिकीरपणानेंच वागत. सुलतान बल्बन याच्या कारकीर्दीनंतर बंगाल जवळ जवळ स्वतंत्रच झाला. त्यानंतर ग्यासुद्दीन तुघलक यानें पुन्हां बंगाल प्रांत आपल्या अमलाखालीं आणून त्याचे तीन भाग केले. या तीन भागांच्या राजधान्या अनुक्रमें लखनौती, सातगांव व सोनारगांव झाल्या. परंतु बंडाळी कमी झाली नाहीं. सन् १३३६ नंतर फकुद्दीन सोनारगांवचा शासक झाला. उत्तर बंगाल प्रांतांत अलाउद्दीन अलीशाह स्वतंत्र झाला व त्यानें आपली राजधानी लखनौतीहून हलवून पांडुवा येथें नेली.

सन् १३४५ मध्यें शम्सुद्दीन इलियास शाह यानें बंगालचा सर्व प्रदेश आपल्या अमलाखालीं आणला. त्याच्या कारकीर्दींत व त्याचा मुलगा सिकंदर शाह याच्या कारकीर्दींत बंगाल प्रांतांत दिल्लीच्या सुलतानांची डाळ शिजली नाहीं. सिकंदर शाह ३६ वर्षें राज्य करून सन् १३७८ मध्यें मरण पावला. त्याचा मुलगा ग्यासुद्दीन अजम याच्याकडे चीन देशाच्या चक्रवर्तीनें आपला दूत पाठविला व त्यानें पुढल्या वर्षी आपला दूत चीन देशांत पाठविला. १७ वर्षें राज्य करून तो मरण पावला. त्याचा मुलगा हंजा शाह नवाब झाला. राज्यसूत्रें राजा गणेश नामक एका हिंदू ब्राह्मण जमीनदाराच्या हातीं होतीं. गणेशनें आपला मुलगा जदु (यदु) याला गादीवर बसविलें. त्यानें मुसलमानधर्म स्वीकारला व जलालुद्दीन शाह या नांवानें राज्य करूं लागला. सन् १४३१ मध्यें तो मरण पावल्यावर त्याचा मुलगा शमसुद्दीन गादीवर बसला. त्यानें १४४२ पर्यंत राज्य केलें. तो एक अत्याचारी शासक होता, म्हणून कांहीं उमरावांनीं कट करून त्याचा वध केला. पुढें कटवाल्यांची आपसांत दुही झाली व त्यामुळें बंगालची गादी पुन्हां इलियास शाहच्या वंशजांच्या हातीं आली. नासिरुद्दीन अहंमद गादीवर बसला.

नासिरुद्दिनानें १७ वर्षें राज्य केलें. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा रुक्नुद्दीन यानें १४७४ पर्यंत व त्याच्या नंतर त्याचा मुलगा यूसुफ शाह यानें १४८१ पर्यंत राज्य केलें.

यूसुफ शाहचा मुलगा कर्तबगार नसल्यामुळें बंगालची गादी नासिरुद्दीनचा मुलगा पथशाह यानें बळकावली. परंतु हबशी लोकांनीं कट करून त्याचा खून केला. त्यांचा पुढारी बार्बक शाह हा गादीवर बसला. परंतु पथ शाहचा विश्वासपात्र नोकर इंदिल खान यानें त्याला ठार केलें. त्यानें १४८९ पर्यंत राज्य केलें व त्याच्यानंतर पथ शाहचा मुलगा महमूद द्वितीय गादीवर बसला. त्यानें जेमतेम एक वर्षच राज्य केलें



व सिद्दीबद्र नामक एका हबशी सरदारानें त्याचा वध करून बंगालची गादी बळकावली. तो एक अत्याचारी शासक होता. त्यानें तीन वर्षें राज्य केलें. राज्याच्या मुख्य अधिकाऱ्यांनींर याला कैद करून त्याचा वजीर अलाउद्दीन हुसेन याला गादीवर बसविलें.

अलाउद्दीन हुसेन अरब जातीचा होता. त्याच्या वंशजांनीं सुमारें पन्नास वर्षें राज्य केलें. त्यांपैकीं अनेकांनीं प्रजेच्या हिताचीं कामें केलीं. हुसेन शाहनें शिलालेख काढून जागोजागीं राजाज्ञा जाहीर केली. त्याचीं नाणीं आजपावेतों कोठें कोठें आढळतात.

बंगालच्या लोकप्रिय राज्यकर्त्यांपैकीं तो एक होय. त्यानें बंगाल राज्याची हद्द ओरिसा प्रांतापर्यंत नेऊन भिडविली. जोनपुरच्या शासकांच्या हातांतून मगधदेश जिंकून आपल्या राज्याला जोडला. आसाम मधील अहोम राज्यावर स्वारी केली व कूचबिहारचें कामतापूर नगर १४७८ मध्यें काबीज केलें. सन् १५१८ मध्यें तो मरण पावला.

त्याचा मुलगा नसीब खान हा नुसरत शाह या नांवानें गादीवर आला. त्याच्या कारकीर्दींत कला, शिल्प व साहित्य यांना प्रोत्साहन मिळालें. त्यानें बरासोना मशीद व कदमरसील नांवाची एक मोठी मशीद गौरजवळ बनविली. त्यानें महाभारताचें बंगाली भाषांतर करविलें. त्याच्या महालांतील नोकरांनींच १५३२ मध्यें त्याचा वध केला.

त्याच्यानंतर त्याचा मुलगा अल्लाउद्दीन फिरोज शाह गादीवर बसला. फक्त तीन महिन्यांनीं त्याचा चुलता ग्यासुद्दीन महंमद शाह यानें त्याचा वध करून त्याची गादी बळकावली. महंमद शाह हा हुसेन शाह वंशाचा शेवटचा नबाब. त्याला शेरशाह सूर यानें गादीवरून हुसकावून लावलें.

**जोनपुर :** तैमूरलंग याच्या काळांतच जोनपूरचें राज्य स्वतंत्र झालें होतें. बुलहाल लोदीच्या कारकीर्दींत तें पुन्हां दिल्लीच्या छत्रछायेखालीं आलें. या कालावधींत जे जे शासक आले त्यांत शर्की वंश प्रसिद्ध आहे. एकूण ८५ वर्षें या वंशाचें राज्य होतें. त्यांत इब्राहिम शाह शर्की हा सर्वांत प्रसिद्ध होता. तो १४०२ मध्यें गादीवर बसला व ३४ वर्षें राज्य केलें. तो विद्वान होता व त्याला साहित्याची गोडी होती.





# महाभारत

द्वारकेला त्यावेळीं यादव वंशाचा नाश झाला. त्यावेळीं हस्तिनापुरांत युधिष्ठिर गादीवर बसून ३७ वर्षें लोटलीं होतीं. द्वारकेला ज्या कांहीं अशुभ गोष्टी घडल्या त्याच हस्तिनापुरांत देखील घडूं लागल्या. आकाशांतून अग्निवृष्टि व हिमपात होऊं लागला. सूर्य व चंद्र तीन रंगाचे दिसूं लागले. त्याच वेळीं कृष्णाचा निरोप घेऊन दासक हस्तिनापुरीं पोंचला व त्यानें द्वारकेला घडलेल्या दैवी कोपाचें वर्णन पांडवांना सांगितलें.

श्रीकृष्णासह सर्व यादवांचा संहार अकस्मात कसा झाला या गोष्टीवर कोणाचा विश्वासच बसेना. युधिष्ठिरानें आपल्या धाकट्या भावांचा, पुढें काय करावें या विषयीं सल्ला घेतला.

अर्जुन द्वारकेला, आपल्या सासुरवाडीं जात आहे असें सांगून दासकच्या बरोबर रथांत बसून निघाला.

द्वारकेला वैधव्यकळा आली होती. अर्जुनाला आलेला पाहून अंतःपुरांतील स्त्रियांना शोकावेग आवरला नाहीं व त्या आक्रोश करून रडूं लागल्या. सत्यभामा व रुक्मिणीनें अर्जुनाला बसायला आसन दिलें. परंतु त्यांच्या तोंडावाटे एक शब्द देखील निघाला नाहीं. स्वतः अर्जुनाची तीच स्थिति होती. तरी अर्जुनानें दुःख आवरून सर्वांचें सांत्वन केलें व कृष्णाच्या शौर्यसाहसाची स्तुति करून वसुदेवाला भेटला.

वसुदेवानें शोक अनावर झाल्यामुळें अंथरूणच धरलें होतें. अर्जुनानें येऊन नमस्कार केल्यावर त्यानें त्याला आलिंगन



केलें व म्हणाला—"सर्व नाटक संपलें. सर्व डोळ्यासमोर घडलें व मी अजून जिवंत आहें. सात्यकी व प्रद्युम्न दोघांवर तुझें किती प्रेम होतें. स्वतःला कृष्णाचे अनुयायी म्हणविणाऱ्यांच्या अविचारानेंच हें सर्व घडलें. यादव वंशाच्या रक्षणासाठीं स्वतः कृष्णानें देखील कांहीं यत्न केला नाहीं. कोणाला दोष देण्यांत तरी काय अर्थ आहे? मुनींचा शाप होता तो. आतां जगण्याची मला इच्छा उरली नाहीं. मी अन्नत्याग केला आहे. कृष्ण मला सांगून गेला होता कीं तूं येशील व तुझ्यावर सर्व स्त्रियांची जबाबदारी टाकावी. तूं त्यांना घेऊन जा. त्यानंतर सर्व द्वारकापुरी समुद्रांत बुडून जाईल."

वसुदेवाच्या इच्छेप्रमाणें अर्जुनानें मंत्री व ब्राह्मण यांचा सल्ला घेतला. स्त्रियांनीं हस्तिनापुरीं जाण्यास तयार रहावें असें त्यानें अंतःपुरांतील सर्व स्त्रियांस कळविलें. "युवराज वज्र याला देखील मी बरोबर घेऊन जाणार आहें. रत्नमाणिक्यें सर्व नीट संभाळून बरोबर घ्यावीं. आज पासून बरोबर एका आठवड्यानें म्हणजे सातव्या दिवशीं सर्व द्वारकापुरी समुद्रांत बुडणार आहे. म्हणून सर्वांनीं सावध रहावें व त्यापूर्वी जें कांहीं बरोबर घ्यावयाचें असेल तें घेऊन द्वारका सोडावी!" अशी अर्जुनानें घोषणा करविली.

अर्जुन रात्रीं तेथेंच राहिला. दुसऱ्या दिवशीं वसुदेवानें योगसमाधि घेऊन देह सोडला. त्याच्या आवडत्या जागींच त्याचा दहनसंस्कार करण्यांत आला. त्याच्याबरोबर देवकी, भद्रा, रोहिणी व मदिरा सती गेल्या. वज्र आदि यादव राजकुमारांनीं तर्पण करून श्राद्धकर्म उरकलें.

नंतर यादवांचा संहार ज्या जागीं झाला होता, तेथें गेला. सर्वांचीं प्रेतें जागोजागीं विखुरलेलीं होतीं. त्रिदळ गवतानें त्यांचा हा संहार केला होता. अर्जुनानें यथाविधि त्यांचा दहन संस्कार करविला. कृष्ण व बलरामांचीं प्रेतें हुडकून काढविलीं व त्यांचा दहन संस्कार पण उरकला.

बरोबर सात दिवसांनीं अर्जुन हस्तिनापुरी निघाला. रथ चालू झाले. अश्व, रथ, हत्ती, उंट, बैल, जीं वाहनें मिळालीं तीं घेऊन द्वारकावासी स्त्रिया व वृद्ध लहान मुलांना घेऊन निघालीं. अर्जुन इकडे सर्वांना घेऊन जात होता आणि तिकडे द्वारकापुरी समुद्रांत बुडूं लागली. तें दृश्य खरोखरीच हृदयद्रावक होतें.

वन, पर्वत, नदी वगैरे पार करीत अर्जुन पंचनद प्रदेशांत येऊन पोंचला. वाटेंत चोर व डाकूंनीं त्यांच्यावर छापा मारला. अर्जुन एकटाच योद्धा असून सर्व अनाथ स्त्रिया व वृद्ध आहेत हें पाहून त्यांना जास्तच जोर चढला. अर्जुनानें त्यांना सावध करून मागें फिरायला सांगितलें. परंतु त्यांनीं त्याच्याकडे दुर्लक्ष केलें. अर्जुनानें गांडीव हातीं घेऊन त्यांच्यावर बाण ठेवण्याचा विचार केला. पण त्याला एक देखील अस्त्र आठवेना. स्वतःच्या या स्थितीवर त्यालाच



आश्चर्य वाटलें व स्वतःचा राग आला. त्यानें कांहीं चोरांचा वध केला. परंतु अर्जुनादेखत चोर यादव स्त्रियांना धरून घेऊन गेले.

अशा तऱ्हेनें अपमानित होऊन अर्जुन यादवांना घेऊन हस्तिनापुरास आला. द्वारकेहून आलेल्या लोकांची उतरण्याची व्यवस्था करण्यांत आली. कृतवर्मा, त्याची बायको व मुलगा तिघांना मृतिकावत येथें उतरण्यास जागा दिली. वज्र याचा राज्याभिषेक इंद्रप्रस्थ येथें करण्यांत आला. तेथेंच बहुतेक सर्व यादवांनीं राहण्याचें ठरलें. सरस्वतीच्या

मुलाला राज्य देण्यांत आलें. कृष्णाच्या पत्नींपैकीं जांबुवती, हैमवती वगैरे सती झाल्या. सत्यभामा वगैरे तप करण्यासाठीं हिमालय पर्वत ओलांडून कलाय नामक गांवीं गेल्या.

अर्जुन द्वारकेहून आणलेल्या यादव-स्त्रियांची उतरण्याची व्यवस्था झाल्यावर व्यासमुनींच्या आश्रमांत गेला. व्यासमुनींनीं कुशल क्षेम विचारून त्याला बसायला सांगितलें. अर्जुनाला दुःखी पाहून त्यांनीं दुःख करण्याचें कारण विचारलें.

अर्जुन म्हणाला—"महात्मन्! कृष्ण बलराम स्वर्गवासी झाले. यादवांनीं आपसांत भांडण करून स्वतःच्या हातींच आपला संहार करून घेतला. कृष्णसखा स्वर्गलोकीं गेल्यावर आतां मी जिवंत राहण्यांत काय अर्थ? तो माझा सारथी म्हणून रथ चालवीत असतांचें दृश्य आज देखील माझ्या डोळ्यासमोर उभें आहे. एवढेंच नव्हे, माझ्या अंगांत होती नव्हती ती शक्ति कृष्णामुळेंच होती. तो गेल्यापासून मी एक निष्प्राण चालतें बोलतें प्रेतमात्र राहालों आहें. माझ्या डोळ्यादेखत चोरांनीं यादव स्त्रियांना पळवून नेलें व मी कांहीं करूं शकलों नाहीं. आतां मी जगून तरी काय करूं?"

"अर्जुना! कृष्णानें ज्या कामासाठीं अवतार घेतला होता, तें अवतारकार्य संपतांच तो स्वस्थानीं निघून गेला. तुझी अशें देखील त्यांचें काम झाल्यावर स्वस्थानीं निघून गेलीं आहेत. तुलादेखील उत्तम गति मिळेल. ती वेळ जवळ आली आहे. तुला काळजी करण्याचें मुळींच कारण नाहीं." व्यासमुनींनीं काळ नेहमीं कसा बदलत असतो हें सांगून अर्जुनाला निरोप दिला. अर्जुन हस्तिनापुरीं परत आला.




[ २५ ]

[लखू व त्याच्या साथीदारांना रानटी मांत्रिकाच्या अनुयायांनीं धरण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांच्या डोळ्यांत धूळ फेंकून ते एका कड्यावर पोंचले. त्यांना तेथून भयानक दरी दिसली. एका वेलाच्या साहाय्यानें ते त्या कड्यावरून खालीं उतरत असतां रानटी मांत्रिकाच्या अनुयायांनीं त्यांना पाहिलें व वेल कापून त्यांना दरींत पाडण्याची खटपट सुरू केली. पुढें वाचा.]

रानटी मांत्रिकाचे अनुयायी वेल कापून तोडूं लागलेले पाहून लखू व त्याचे साथीदार अर्थातच थोडे घाबरून गेले. पण त्यांनीं धीर सोडला नाहीं. कारण प्रत्येकाला वाटत होतें कीं आतापर्यंत याहून मोठमोठीं संकटें आलीं व त्यां सर्वांतून नशिबानें आपलें संरक्षण केलें. मग या संकटांतून तें आपली सुटका कां करणार नाहीं? लखू सर्वांच्या मनांतलीच गोष्ट जणुं कांहीं या शब्दांत म्हणाला—"ज्या बलवत्तर भाग्याच्या बळावर आपण भयानक दरीच्या तोंडापर्यंत निर्विघ्नपणें येऊन पोंचलों आहों तें ऐन वेळीं आपल्याशीं दगा करील असें मला तरी वाटत नाहीं."



“ तूं म्हणतोस तें अगदीं बरोबर आहे. हें पहा, कांहीं तरी माझ्या पायांला आधार म्हणून मिळालें आहे. या कड्याचा बाहेर निघालेला हा एक दगड दिसतो आहे. मी या दगडाला हा वेल गुंडाळतों व खालीं जातों. तुम्ही लवकर खालीं येऊन या दगडाखालीं वेळ धरून उतरा. मग त्यांना वरून वेल कापून तोडून टाकला तरी कांहीं भिण्याचें कारण नाहीं.”

जयमलचें तें वाक्य पुरे होईपर्यंत लखू कसाबसा खालीं आला. पण गोमांग अजून वरच होता आणि त्या दुष्टांनीं तो वेल तोडून टाकला. गोमांग खालीं कोसळला व त्याच्याबरोबर तो वेल आणि लखू व जयमल पण खालीं जाऊं लागले. पण सुदैवानें वरून तुटलेला वेल त्या दगडाला अडकला. शिवाय तिघांच्या हातांतून वेल सुटला नव्हता, म्हणून ते वेलाला धरून बाहेर निघालेल्या दगडाखालीं लोंबकळूं लागले.

लखू व गोमांगला रानटी मांत्रिकाच्या अनुयायांचा आवाज ऐकूं येत होता—“ ते गेले खालीं दरीच्या तळाला. दगडावर आदळून त्यांच्या चिंध्या उडाल्या असतील. आमच्या गंडभेरंड पक्ष्यांचे पंख कापून चोरून नेणाऱ्यांची हीच गत होईल.”

त्यांच्या आवाजानें ती सर्व दरी दुमदुमली. झाडावर बसलेले. गंडभेरंड पक्षी मोठमोठ्यानें ओरडूं लागले. कोठें तरी सिंह गर्जना झाल्याचा भास पण झाला. लखू व त्याचे साथी त्या वेलाला धरून लोंबकळत असतां एका एकीं झालेली सिंहगर्जना ऐकून ते चकित झाले. इतक्यांत त्यांना कोणीतरी बोलत असल्याचा आवाज ऐकूं आला. “कायरे! कसला हा आवाज आणि ओरडा? मृगराज जागा झाला वाटतें?” आणखी एक आवाज ऐकूं आला—“ जग भोजी गुरु! रानटी मांत्रिकानें कोणाला तरी भयानक दरींत फेंकून दिलेलें दिसतें आहे. त्यांचाच ओरडा आहे. खालीं पडून मेले ते. ब्रह्मपुराच्या राजाचे राजगुरु व त्यांचे अनुयायी तर नाहींत ना?”

“ ते? त्यांना या दरीची वाट माहीत होऊन येथें पोंचायला जितका वेळ लागेल तेवढ्या वेळांत मी राजकन्येशीं विवाह करून घेऊन येथली अलोट संपत्ति पळवून घेऊन जाईन. नंतर ते इकडे येतील व गंडभेरंड पक्षी, अजगर व सांप आणि इतर रानटी श्वापदें यांना चांगलें सावज सांपडेल. त्यांत गैर काय?”

“ अरे हो, पण राजकन्या! शिष्या तूं, तिची गोष्ट पार विसरूनच गेलास कीं रे: अमावास्येला अजून तेरा दिवस बाकी आहेत. तोंपर्यंत तिची भेट घेणें देखील मला अशक्य. त्या हंस गामिनीची झोप या ओरड्यामुळें मोडली तर नसेल?” जगभोजी कोणाला तरी म्हणाला.

कोणीतरी मोठ्यानें हंसलें. तो जगभोजीचा शिष्य किंवा सेवक असावा. कांहीं वेळानें तो म्हणाला—“ गुरुवर्य! ती हंस-गामिनी नव्हे, कलकवली आहे. तिचा



बाप, ब्रह्मपुराचा राजा व त्याचा गुरु तिथे तिचें रक्षण करायला येतील असें अजून देखील तिला वाटत आहे. म्हणून तुम्हांला ती कमी लेखीत आहे. या भयानक दरींत आल्यापासून ती घाबरून गेली आहे, हें एका तऱ्हेनें बरेंच झालें.”

त्यानंतर पुन्हां बराच वेळ कोणाचा आवाज ऐकूं आला नाहीं. सर्वत्र सामसूम झालें. दरींतून वर ऐकूं आलेलें संभाषण व त्याचा संदर्भ दोन्हींचा विचार करून लखू, जयमल व गोमांग चकित झाले व थोडे भ्यालेंदेखील. तिघांना या विषयीं बोलावें



असें वाटत होतें. पण तोंडांतून व देखील निघत नव्हता. शेवटीं धीर करून कापऱ्या आवाजांत जयमल म्हणाला—“ कायरे लखू ! ऐकलेंस का तूं तें सर्व ? ”

“ ऐकलें ! यावरून आपल्या आधींच कोणी तरी मांत्रिक येथें येऊन दाखल झालेला दिसतो आहे आणि त्याच्या हातीं ब्रह्मपुराची राजकन्या कैद झालेली आहे. तो मांत्रिक आपण ज्या उद्देश्यानें येथवर आलों त्याच उद्देश्यानें येथें आला आहे.” लखू म्हणाला.

तें ऐकून जयमल कांहींच बोलला नाहीं. तो विचारांत पडला. त्यांना खालीं कड्यांतून बाहेर निघालेलें कांहीं दगड दिसले. वेळ धरून पसरत ते त्या दगडापर्यंत जाऊन पोंचले व तेथें उभे राहून काळोखांतच कोठें कांहीं दिसते का पाहूं लागले.

“ ब्रह्मपुराहून येऊन बरेच दिवस झाले. या अवधींत तेथें बराच फेरबदल झालेला दिसतो आहे. राजकन्या कल्पकवल्ली या दरींत आली कशी ? हा जगभोजी कोण ? राजकन्येचें संरक्षण करतां येईल का आपल्याला ? काय वाटतें तुला जयमल ? ” लखूनें विचारलें.

जयमल विचारांत गढून गेला होता. लखू काय म्हणाला, जणुं कांहीं तें त्याला ऐकूंच आलें नाहीं. तो जगभोजी व त्याचा शिष्य यांच्या संभाषणांतल्या गोष्टींचे धागे दोरे जुळवून काय गुपित आहे तें पहात होता. जगभोजी म्हणाला तो ‘ मृगराज ’ कोण, हा एकच विचार मुख्य करून त्याच्या डोक्यांत घोळत होता. शेवटीं तो लखूला विचारूं लागला.

“ कायरे लखू ? तुला आठवतें का, ब्रह्मपुरानजीकच्या डोंगराळ प्रदेशांत ब्रह्मदंडीनें तुझ्या अंगांत काळभैरवाचें आवाहन केलें होतें. त्यावेळीं तूं कांहीं तरी



बडबडलास. त्यांत अनेक गुपितें तूं सांगितलीस. नंतर मी तुला त्यांतली कांहीं सांगितली होतीं.”

लखू जयमलकडे न आठवल्यासारख्या मुद्रेनें पहात म्हणाला—“ कोणती गोष्ट ? मला नाहीं बुवा आठवत. या भयंकर दरींत अलोट धनराशी आहे, ही एकच एक गोष्ट मला आठवते.”

तोंपर्यंत गोमांग मौनपणें त्यांचें बोलणें ऐकत होता. एकदम कांहींतरी नवल घडलें असे दाखवीत लखूकडे वळून म्हणाला—“ मला दूर एक दिवा दिसतो आहे. दूर हत्तींचें ओरडणें पण ऐकूं येत आहे ! ”

“ मला नाहीं बुवा दिवा दिसला व आवाज पण नाहीं ऐकूं येत. मला गुंगी आल्यासारखें वाटत आहे. मला या दरींतलें सोनें नको कीं चांदी नको. मला मरणाची भीति नाहीं वाटत. पण मरण येण्यापूर्वी एकदां बाबांची भेट झाली तर किती बरें होईल ? ” लखू असें म्हणत पाठीमागें टेकून उभा राहिला.

जयमल लखूला हलवून म्हणाला—“ असा धीर सोडलास तर कसें चालेल लखू ? इतक्या संकटांना तोंड देऊन आपण



येथवर येऊन पोंचलों. जगभोजी व त्याच्या शिष्याचें संभाषण ऐकून मला असें वाटत आहे कीं आपण आतां फक्त शेवटची मजल गाठावयाची आहे. तुझ्या बाबांची भेटच काय मला तर ब्रह्मपुराचा राजा व राजगुरु सर्वांचीच भेट होणार असें वाटूं लागलें आहे. या दरींतली धनराशी आपल्याच मालकींतली आहे. कारण ती आपल्याला मिळणेंच शक्य आहे. यांत शंकेला जागा राहिली नाहीं.”

“ इतक्या आत्मविश्वासानें तूं बोलतो आहेस कीं जणुं कांहीं सर्व तुला मिळालेंच.



बोलतां बोलतां तूं थांबलास. कारण ब्रह्मपुराच्या राजगुरूनें मंत्रबळानें तुझें म्हणजे काळभैरवाचेंच तोंड बंद करून टाकलें होतें.

"एवढें कबूल कीं आपण भयंकर दरींत येऊन पोंचलों आहों. इतर गोष्टी कितपत खऱ्या ठरतात पहावयाचें आहे." लखूच्या आवाजांत निरुत्साह व निराशा झळकत होती.

"काळभैरव तुझ्या अंगांत आला असतां तूं जें कांहीं बोललास तें सर्व खरें होणार आहे, पहा थोड्या वेळापूर्वी जगभोजी म्हणाला होता तें तूं ऐकलेंच आहेस. मृगराज जागा झाला आहे. याचा अर्थ काय? आपण सूर्योदयाच्या सुमारास दरीच्या तळाला जाऊन पोंहचूं. त्या मृग-राजाचा वध करून त्याचें कातडें काढून तें...." जयमल बोलतच होता कीं ते उभे होते त्या दगडाखालींच दरींत सिंह गरजला. तिघांनीं खालीं डोकावून पाहिलें. त्यांना निखाऱ्यासारखे लाल लाल गरगरीत डोळे दिसले. "हाच तो सिंह, आपल्याला हे डोळे दिसत आहेत म्हणजे तो आपल्याकडेच पहात आहे." गोमांग म्हणाला.

"त्यानें आपल्याला ओळखलें आहे व आपण त्याला ओळखलें आहे. बरेंच झालें.

पण एवढा विश्वास तुझ्या मनांत कशाच्या बळावर उत्पन्न झाला?" लखूनें विचारलें.

जयमलनें लगेच उत्तर दिलें नाहीं. क्षणभरानें लखूलाच ऐकूं जाईल इतक्या हळू आवाजांत म्हणाला—"काळभैरव तुझ्या अंगांत आला होता तेव्हां तूं ब्रह्म-दंडीला म्हणाला होतास कीं "विन्ध्य पर्वतापलीकडे एक भयंकर दरी आहे. त्या दरींत एक उंच जागीं एक पिंपळाचें झाड आहे. त्याच्या खालीं एक वारूळ, एक बाळकें झाड, चांदणी रात्र, मृगराजाला ठार करून त्याचें चर्म काढून तें...." त्यानंतर



परस्परांची आतां भेट आहे. हुडकत बसण्याची गरजच नाहीं. गोमांग! तुझ्या-जवळ विषांत बुडवलेले बाण आहेत ना?" जयमलनें विचारलें.

"आहेत, पण आतांच त्याची शिकार करावयाची आहे का?" गोमांगनें विचारलें.

"शिकारीला ही वेळ चांगली नाहीं. या काळोखांत आपण सिंहाला मारलें तर जगभोजी त्याला उचलून घेऊन जाईल. सिंहला मारलेलें त्याला कळतां कामा नये. सिंहाला आपला वास लागला आहे. तो आपल्याला विसरणें शक्य नाहीं. त्याचे निखाऱ्यासारखे लाल डोळे आपण पाहिले आहेत. म्हणून आपण त्याला विसरणें शक्य नाहीं. कोण कोणाला ठार करून कोणाचें कातडें काढून घेतों हें उद्यां सकाळींच पाहूं" जयमल म्हणाला.

गोमांग व जयमल यांचें बोलणें चालू असतां लखू निःशब्दपणें बसला होता. दोघांचें बोलणें संपल्यावर तो जयमलला म्हणाला—"जयमल! मी झोपलों आहे कीं जागा हेंच माहीत नाहीं. दरींतून कसला तरी आवाज ऐकूं येत आहे मला." "तुला











हत्ती ओरडत असलेले ऐकूं येत आहेत का ?" जयमलनें विचारलें.

"हत्तींचें ओरडणेंच काय, घंटा वाजत असलेल्या देखील ऐकूं येत आहेत. गोमांग, तुला नाहीं का घंटांचा आवाज ऐकूं येत ?" लखूनें विचारलें.

"कांहीं तरी विचित्रच वाटत आहे सगळें. मला घंटांचा आवाजच नव्हे तर वाऱ्याबरोबर कोणाच्यातरी बोलण्याचा आवाज देखील ऐकूं येत आहे." गोमांग म्हणाला.

गोमांगचें बोलणें ऐकून जयमलच्या मनांत तऱ्हेतऱ्हेचे विचार येऊं लागले. गोमांग म्हणाला तसें खरोखरींच तेथें सर्वच विलक्षण होतें. त्या दरींतील प्रत्येक वस्तूवर मंत्राचा कांहीं तरी प्रभाव असावा असें वाटलें. जगमोजी, ब्रह्मपूरची राजकन्या कल्पकवल्लीला कसा घेऊन आला ? या दरींतुन एक पाऊलदेखील बाहेर टाकल्याशिवाय त्याला हें सर्व करतां आलें ?

तिकडे लखू विचार करीत होता कीं माझ्या बाबांची आज भेट झाली असती तर ? गोमांग विचार करीत होता कीं त्याच्या सरदाराची भेट झाली असती तर राजकन्येला जगमोजीच्या हातांतून सोडवितां आलें असतें.

भयानक दरीच्या एका बाजूला हे तिघे आपापल्या विचारांत अशा तऱ्हेनें बसले असतां पलीकडे मैदानांत ब्रह्मपुराचा राजा व त्याचा गुरु सैन्य जमा करून आपल्या राहुटींत बसून पुढें काय करावयाचें हा विचार करीत होते. सर्व सैन्य घेऊन दरींत उतरावें कीं निवडक वीर सैनिकांना घेऊन उतरावें. [पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# घातकी बहीण

कोशल देशाचा राजा मार्तंडवर्मा याला प्रमोदक नांवाचा मुलगा व मालिनी नांवाची मुलगी होती. मालिनी जन्मल्यापासूनच आपल्या आजोळीं कुश देशांत होती व तेथेंच ती लहानाची मोठी झाली. प्रमोद सर्व विद्याभ्यास संपूर्ण करून देशाटनास निघाला. वाटेंत आपल्या बहिणीला अनुरूप वर मिळाल्यास त्याला पाहून व परत येतेवेळीं बहिणीला बरोबर घेऊन यायचें ठरवून तो निघाला होता.

कित्येक देश पहात तो कुश देशांत येऊन पोंचला. त्यानें बहिणीजवळ पाहून आलेल्या राजकुमारांचें वर्णन केलें. पण तिला एक देखील पसंत पडला नाहीं. कांहीं दिवस आजोळीं राहून तो बहिणीबरोबर कोशल देशांत परत जाण्यास निघाला.

तीं दोघं रथांत बसून स्वदेशीं येत असतां एका रानांत चोरांच्या एका टोळीनें त्यांच्यावर हला केला. प्रमोदकनें आठ दहा चोरांना कापून काढलें. त्याचें शौर्य पाहून चोरांची घाबरगुंडी उडून गेली. चोरांचा सरदार हात जोडून प्रमोदकाच्यासमोर उभा राहिला.

"तूं हें जंगल सोडून बाहेर निघून गेलास तरच मी तुला माफ करीन." प्रमोदकनें त्याना बजावून सांगितलें.

"मी तुमच्या हुकमाबाहेर नाहीं." चोरांचा सरदार म्हणाला. नंतर हात जोडून पुढें म्हणाला—"आणखी एक विनंति आहे. दोघांनीं गरिबाच्या घरची झुणकाभाकर येऊन खावी." मालिनीनें नकार दिला नाहीं व आढेवेढे पण घेतले नाहींत म्हणून



प्रमोदकनें बहिणीबरोबर चोरांच्या सरदाराचें आतिथ्य स्वीकारलें.

तें चोराचें घर म्हणजे रानांतला एक मोठा वाडाच होता. राजकुमार व राजकन्या दोघांचें आतिथ्य करण्यांत चोरांच्या सरदारानें कांहीं उणीव राहूं दिली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मालिनी आपल्या भावाला म्हणाली—"दादा! माझें डोकें फार दुखतें आहे. मला स्वप्नांत एक भूत दिसलें. तें म्हणालें कीं या डोके दुखीमुळें मला मरण येणार आहे. नंतर स्वप्नांतच मला एक ऋषी दिसले. ते म्हणाले कीं पूर्वेकडील लाल टेंकडीपलीकडे एक तळें आहे. त्यातल्याचें पाणी प्याल्यास डोकें दुखी बंद होईल. त्या डोंगरापर्यंत मला कसें जावणार?" असें सांगून ती रडूं लागली.

"मी जाऊन पाणी घेऊन येतों. तूं अशी भितेस कां?" असें सांगून प्रमोदक निघाला. तो रानांत कांहीं अंतर चालून गेल्यावर त्याला एक अस्वल आडवें आलें. पण प्रमोदकनें त्याच्याकडे पाहिलें देखील नाहीं व पुढें निघून गेला. आणखी थोडें चालून गेल्यावर समोर एक वाघ गुरगुरत आला. प्रमोदकनें त्याच्याकडे देखील दुर्लक्ष केलें व पुढें निघून गेला. ती लाल टेंकडी त्याला दिसली. त्या टेंकडीपलीकडे जाऊन त्यानें बरोबर आणलेली लोटी भरून पाणी घेतलें आणि परत फिरला.

तो परत येत असतां त्याला तो वाघ आणि अस्वलच नव्हे, तर एक बिबळ्या वाघ पण दिसला. वाघ माणसासारखा बोलूं लागला. म्हणाला—"कोण रे बाबा तूं? बहादूर आहेस खरा! आमच्या भीतीनें आजपर्यंत कोणी या बाजूला फिरकला देखील नाहीं, आणि आलाच तर आम्हांला





पाहाल्याबरोबर उलट पावलीं पळून जाई किंवा आम्हांला ठार करायला धांवत येई. शेवटीं प्रत्येकाला आमच्या हातीं मरणच आलें. परंतु तूं एक विचित्रच धाडसी दिसतोस. आम्हीं तुला बोरूची ही काडी देतों, ती ठेवून घे. कधीं तुझ्यावर कांहीं संकट आलेंच तर तूं ही काडी फुंकणीसारखें फुंक. तुझें रक्षण होईल." असें सांगून वाघानें त्याच्या पाया जवळ पडलेली काडी दाखविली.

प्रमोदक ती काडी घेऊन चोरांच्या घरीं गेला. त्यानें आणून दिलेलें पाणी प्याल्यावर मालिनीची डोकेंदुखी बंद झाली. ती आपल्या भावाला म्हणाली—"दादा! मला चोरांच्या सरदारानें सांगितलें कीं तूं ज्या वाटेनें जाऊन आलास त्या वाटेनें कोणी जिवंत परत येत नाहीं. तुझ्यावर कांहीं संकट आलें का?" मालिनीनें विचारलें.

"नाहीं बुवा!" प्रमोदक म्हणाला.

नंतर चोरांच्या सरदारानें वाटमारी करून मिळविलेला खजिना प्रमोदकला दाखविला. त्यांतला लोखंडी साखळदंड काढून तो म्हणाला—"याला तोडून दाखविण्याचें साहस आजपर्यंत कोणी केलें नाहीं. तुमची बहीण म्हणाली—तुम्हांला यानें बांधून ठेवलें तर तुम्ही हा साखळदंड तोडून सुटका करून घ्याल. मी म्हटलें अशक्य. शेवटीं पैज ठरविली."

"माझा भाऊ खात्रीनें तोडून टाकील." मालिनी म्हणाली.

"अशक्य! माझें ऐका. उगाच पैज लावण्याचें साहस करूं नका. तुमच्या हातून हा साखळदंड तुटणें शक्य नाहीं. मीच ही पैज जिंकणार." चोरांचा सरदार म्हणाला.



"दादा! क्षत्रिय वीर असलेल्या गर्विष्ठांची मान खालीं करूनच माघार घेत असतो." मालिनीनें भावाला प्रोत्साहन दिलें.

प्रमोदकनें एक क्षणभर विचार केला व म्हणाला—"ठीक आहे. मी साखळदंड तोडून दाखवण्याचा प्रयत्न करून पाहातों." असें सांगून त्यानें हात पुढें केले. चोरानें ते साखळदंडानें बांधून टाकले. प्रमोदकनें लाख प्रयत्न करून पाहिला, पण सर्व फुकट.

मालिनीच्या तोंडावर भय किंवा दुःख झळकण्याऐवजीं प्रथम स्मित पाहून व त्यानंतर तिला खदखदां हंसतांना पाहून प्रमोदक चकितच झाला. ती पुढें म्हणाली—"मी पैज हारलें म्हणून मला कबूल केल्याप्रमाणें चोरांच्या सरदाराबरोबर लग्न करावें लागणार."

"तुला या चोरानें फंसविलें कीं तूं मला फंसविलेंस?" प्रमोदकनें आपल्या बहिणीस विचारलें.

"आतां जास्त लपवून ठेवण्याची तरी काय गरज? तर मग ऐक! हा चोर माझा लहानपणापासूनच मित्र आहे. दोघांचें परस्परांवर कित्येक दिवसांपासूनचें प्रेम आहे. मी याला चोरी करण्याचा धंदा सोडून द्यायला सांगितलें होतें. पण तो म्हणाला होता—"तुझ्या बापाचें राज्य मिळालें तर सोडीन." त्याला राज्य मिळण्याच्या मार्गावर तुझा कांटा होता. तो दूर करण्यासाठीं त्यानें आपल्यावर हल्ला केला. पण तो डाव फंसला. तुला ठार करण्याचा दुसरा उपाय म्हणून लाल टेंकडी पलीकडच्या तलावाचें पाणी आणायला आम्ही पाठविलें होतें. पण तो बेत देखील फंसला व तूं जिवंत परत आलास. म्हणून आम्ही हा शेवटचा उपाय केला. या काळकोठडींत पडून रहा भूक आणि तहान बाकी उरलेलें कार्य करतील." आपल्या भावाशीं विश्वासघात करून निर्लज्जपणानें मालिनी हें सर्व म्हणाली.

नंतर मालिनी व तिचा तो प्रियकर चोर दोघांनीं प्रमोदकाला काळकोठडींत ढकललें आणि बाहेरून दाराला कुलूप लावून घेतलें.

प्रमोदकला वाघानें दिलेल्या काडीची गोष्ट आठवली. त्यानें ती काडी काढून फुंकल्या बरोबर दारें धडाधड तुटून पडलीं. वाघ, बिबळ्या वाघ व अस्वल आंत आले. अस्वलानें साखळदंड तोडून प्रमोदकला मुक्त केलें. वाघानें त्या वाड्यांत जे लोक उरले होते त्या सर्वांना ठार केलें. मालिनी व तिचा प्रियकर चोर फार दूर गेले नव्हते. कांहीं गडबड ऐकून परत फिरले. त्यांना देखील वाघां अस्वलांनीं ठार केलें. अस्वलाच्या जागीं एक सुंदर स्त्री प्रमोदकाला दिसली. "कोण तूं?" प्रमोदकनें चकित होऊन प्रश्न केला.

"माझें नांव माधवी. इतर सर्व माझे आईवडील सांगतील." असें सांगून तिनें वाघाकडे व बिबळ्या वाघाकडे पाहिलें. दोघे जवळ येऊन माधवीला बिलगून उभे राहाले. तिनें दोघांच्या गळ्यांत घट्ट मिठी













मारून म्हटलें—" या दोघांना आपल्या तलवारीनें ठार करा." तें ऐकून प्रमोदकला माधवी मालिनीहून देखील जास्त भयंकर वाटली. माधवी, त्याच्या मनांतली शंका ओळखून म्हणाली—" माझ्यासारखाच यांना पण शाप आहे. तुम्ही तलवारीनें यांना ठार केलेंत तर दोघे शापमुक्त होतील."

तें ऐकून प्रमोदकनें दोघां वाघांना ठार केलें. त्याला एक राजा व राणी उभे असलेले दिसले. राजा म्हणाला—

" बाळ मी शूरसेन देशाचा राजा आहें. मी आपल्या राणीबरोबर आपल्या दोन वर्षें वयाच्या मुलीला घेऊन त्या लाल टेकडीवर गेलों होतों. तेथें एक ऋषी तपश्चर्याकरीत बसले होते. मी थट्टेत म्हटलें हें कोण बुवा जंगली जनावर बसलें आहे? मुनींना राग आला व त्यांनीं आम्हांला शाप देऊन रानटी जनावरें करून टाकलें. मी पायां पडून माफी मागितली तेव्हां मुनि म्हणाले—" आम्हांला पाहून जो भिणार नाहीं त्याच्याच हातून आम्हांला शापमुक्ति मिळेल. नंतर जर आमच्या मुलीचें मन कोणावर बसलें तर ती देखील शापमुक्त होईल? तिचें प्रेम तुझ्यावर आहे म्हणून ती मुक्त झाली. तूं आम्हांला पाहून भ्याला नाहींस. म्हणूनच तुझ्या हातून आम्हांला मुक्ति मिळाली."

शूरसेन देशाचा राजा आपल्या राणींसह राजकन्या व तिचा प्रियकर प्रमोदक याला घेऊन आपल्या राज्यांत परत गेला. राजा परत आलेला पाहून प्रजेला फार आनंद झाला. प्रमोदक व माधवीचा विवाह थाटा माटानें झाला. प्रमोदक कोशल व शूरसेन दोन्ही देशांचा राजा झाला.





# रत्नवती

सौराष्ट्राच्या वल्लभीपट्टण या गांवीं गुहगुप्त नामक एक श्रीमंत व्यापारी रहात असे. त्याचा व्यापार परदेशांशींच असे. म्हणून त्याच्याकडे अनेक मोठमोठीं जहाजें होतीं. त्याला रत्नवती नांवाची एक मुलगी होती. मधुमती नगरीचा एक तरुण व्यापारी बलभद्र याच्याशीं तिचें लग्न झालें. परंतु विवाहरात्रीच्या पहिल्याच दिवशीं तो रत्नवती-वर रागावला आणि तिला सोडून निघून गेला.

एका परित्यक्ता पत्नी सारखी दुःखांत रत्नवती आयुष्य कंठूं लागली. आईबापांच्या घरांत देखील तिचा आदर होते नसे. एकदां एक वृद्ध योगिणी तिला भेटली. ती देवळांत पूजेला फुलें घेऊन चालली होती. तिला पाहून रत्नवती रडूं लागली. त्या म्हातारीनें जवळ घेऊन प्रेमानें तिच्या पाठी-वर हात फिरवून विचारलें—" बाळ, काय झालें तुला डोळ्यांतून टिपें गाळायला?"

रत्नवती आपली करुण कथा सांगून म्हणाली—" पतीनें सोडून दिल्यावर स्त्रीची काय स्थिति होते, हें मी सांगायला हवें का? स्वतःच्या आईनें देखील मला जवळ करण्याचें नाकारलें तर मला जीव देण्या-खेरीज दुसरा उपाय नाहीं."

योगिणीचे डोळेदेखील ओले झाले. तिनें रत्नवतीला पोटाशीं धरून म्हटलें—" भिऊं नकोस बाळे! तुला जगानें सोडलें तरी मी तुझ्या पाठीशीं आहें. परंतु असला वेडेपणा करूं नकोस. तुला जगाचा वीट आला असेल तर चल, माझ्याबरोबर तपश्चर्या करूं लाग. मी तुझ्या पतीचें मन वळ-विण्याचा यत्न करून पाहतें."









"याहून जास्त मला कांहीं नको. पतीनें माझा स्वीकार केला तर मी जन्मोजन्मीं तुझे उपकार मानीन. आमच्या घरा शेजारींच नीधिदत्त नांवाचा एक व्यापारी राहातो. तो कुलीन आहे. राजा त्याचा आदर करतो. त्याची मुलगी कनकवती दिसायला अगदीं माझ्याच सारखी आहे. ती माझी मैत्रीण आहे. मी तिच्या बरोबर तिच्या घराच्या गच्चीवर फिरत राहीन. तूं येऊन तिला तिची आई बोलावते आहे असें सांगून बोलावून घेऊन जा. मी एक-टीच वर गच्चीवर राहीन. तूं कांहीं तरी युक्ति करून माझ्या पतीला बाहेर बोलावून घेऊन ये. मी चेंडू खेळतां खेळतां खालीं टाकून देईन. मी कनकवती आहें असें त्यांना तो चेंडू आणून द्यायला सांग. त्यानंतर मी पाहून घेईन." रत्नवतीनेंच ही युक्ति सुचविली.

वृद्ध योगिणीनें आपली कामगिरी ठीक बजावली. निधिदत्ताच्या गच्चीवरून चेंडू खालीं पडला. बलभद्र योगिणीच्या सांगण्या-वरून तो कनकवतीचा चेंडू आहे असें समजून तिच्याकडे पोंचता करण्यासाठीं गच्चीवर गेला. त्यानें रत्नवतीला कनकवती समजून चेंडू दिला. रत्नवतीनें स्मित करून त्याच्याकडे पाहिलें. बलभद्र तिच्या सौंदर्यावर मुग्ध झाला. ती त्याचीच बायको आहे हें देखील ओळखूं शकला नाहीं. दोघें परस्परांवरच्या प्रेमानें परस्परांकडे इतकीं आकृष्ट झालीं कीं एकदिवशीं दोघं परदेशीं पळून गेलीं.

गुहगुहाला रत्नवती नाहींशी झाल्याचें कळलें. तिच्या शोधार्थ तो नोकराचाकरांना पाठवणार इतक्यांत योगिणीनें त्याला येऊन सांगितलें कीं रत्नवती आपल्या पतीबरोबरच परदेशी गेली आहे. भिण्याचें कारण नाहीं. त्यानें रत्नवतीला सोडून दिलें होतें. पुन्हां तिला घरीं बोलावून आणलें तर लोक हंसतील म्हणून लोकलाजेस्तव तो तिला घेऊन परदेशी गेला आहे. अनुरूप वेळेवर त्यांची भेट होईल. तें ऐकून गुहगुहाच्या मनाचें समाधान झालें.

रत्नवतीनें वाटेंत एक दासी कामाला ठेवून घेतली. तिघें खेतक नामक एका गांवीं येऊन पोंचले. तेथें बलभद्रानें व्यापार सुरू केला. त्याचा धंदा तेथें खूप चालला आणि एका श्रीमंत व्यापाऱ्यांत त्याची गणना होऊं लागली.














एकदां रत्नवती व तिच्या दासीचें कांहीं कारणावरून भांडण झालें आणि तें विकोपाला गेलें. शेवटीं प्रकरण कोतवालाकडे गेलें. दासीनें रागाच्या भरांत एक गुपित म्हणून रत्नवतीच्या विरूद्ध कांहीं कोतवालाला सांगितलें. म्हणाली— "हा बलभद्र व्यापारी वल्लभीनगरच्या निधिदत्त नांवाच्या व्यापाऱ्याची मुलगी कनकवती हिला फुसलावून पळवून घेऊन आला आहे."

कोतवालानें विचार केला, बलभद्राची अब्रू चवाट्यावर आणण्याची भीति दाखवून त्याच्याकडून पैसे उकळतां येतील. गांवां-तल्या चार प्रमुखांना बोलावून दासीनें जें कांहीं सांगितलें होतें तें सांगून तो त्यांना म्हणाला—"आतां तुम्हींच सांगा, हा आपल्याला प्रतिष्ठित व्यापारी म्हणून बाजार पेठेंत आपलें दुकान काढून बसला आहे, आतां याला काय म्हणावें ?"

बलभद्राला पण तें कळलें व तो घाबरून गेला. पण रत्नवती त्याला म्हणाली— "कांहीं भिण्याचें कारण नाहीं. तुम्ही जाऊन सांगा कीं मी कनकवती नसून गुहगुप्ताची मुलगी रत्नवती आहें. आपलें लग्न झालेलें आहे."

बलभद्रानें बायकोनें सांगितलें होतें तसें जाऊन कोतवालाला सांगितलें. कोतवालानें वल्लभीनगरीं चवकशी करविली व बलभद्रानें जें सांगितलें तें खरें ठरलें. गुहगुप्त स्वतः आपल्या मुलीला भेटायला आला. तेव्हां बलभद्राला देखील खरें गुपित कळलें. मुलगी व जांवई सुखानें रहात आहेत हें पाहून गुहगुप्ताला आनंद झाला. तो त्यांना घेऊन वल्लभनगरीं निघून गेला.






# अंतरात्मा

कृष्णेच्या काठीं एका गांवीं व्यंकूशेट नांवाचा एक व्यापारी रहात असे. त्यानें पिठाची गिरणी ठेवली होती. गांवकरी व जवळपासच्या गांवचे लोक त्याच्याकडे आपलीं दळणें घेऊन येत. व्यंकूशेट एक इमानदार गिरणीवाला म्हणून गांवभर त्याची ख्याती होती. तो धान्यांतला दशांश दळ-णावळ घेत असे. परंतु तेवढ्यावर काम भागत नाहीं हें त्याला आढळून आलें.

व्यंकूशेटकडे शेजारच्या गांवचा एक श्रीमंत शेतकरी एकदम दोन दोन तीन तीन पोतीं दळण पाठवीत असे. एकदां दळण आणून टाकल्यावर व्यंकूशेटनें विचार केला कीं दळणावळीच्या दशांशाहून मी थोडें धान्य जास्त काढून घेतलें, तर मी किती गहूं काढून ठेवले आहेत हें त्याला काय कळणार ? इतर गिरणीवाले पहा छान लोडाला टेंकून कसे बसूं लागले आहेत ते. मीच एकटा आपल्या प्रामाणिकपणाचा टेंभा मिरवण्याची काय गरज आहे ?

व्यंकूशेटनें त्या दिवशीं दशांशाहून थोडे जास्त गहूं दळणावळीचे काढून ठेवले. परंतु त्याचें मन त्याला खाऊं लागलें. कारण त्यानें आजपर्यंत कधीं खोट्याचा व्यापार केला नव्हता. दशांशाहून जास्त घेतलेले गहूं दळून त्या शेतकऱ्याच्या पिठांत टाका-वेत असें एकदां त्याच्या मनांत आलें.

तितक्यांत त्याला आणखी एक गोष्ट सुचली. एका विधवा बाईनें अर्धे पोतें गहूं दळायला आणून टाकलें. व्यंकूशेटनें मनांत विचार केला, ही एक गरीब बाई आहे. हिच्याकडून मी दळणावळ



दशांशाहून कमी घेईन. गरीबांवर दया केल्यास पुण्य लाभ होईल. जें पाप जास्त दळणावळ घेऊन केलें आहे त्याचें ह्या तऱ्हेनें प्रायश्चित्त होईल. पापा-पुण्याचा जमाखर्च बरोबर होईल व मनाला लावून घेण्यासारखें कांहीं राहणार नाहीं. त्याप्रमाणें त्यानें केलें.

परंतु इतकें करूनदेखील त्याचा अंतरात्मा त्याला दोष देत होता.

कांहीं दिवसांनीं त्या श्रीमंत शेतकऱ्यानें पुन्हां दळण आणून टाकलें. या खेपेस सहा पोतीं त्यानें आणून टाकलीं. व्यंकूरोटनें दशांशाहून थोडी जास्तच दळणावळ घेतली. असेंच कित्येक वेळां त्यानें केलें. परंतु गरिबांकडून कमी दळणावळ घेण्याची गोष्ट मात्र तो विसरून गेला.

अशा तऱ्हेनें चोरीची दळणावळ घेऊन त्यानें चार पैसे जमविले. परंतु त्याचा अंतरात्मा आंतल्या आंत तळमळत होता. तो नेहमीं देवाच्या दर्शनासाठीं देवळांत जाई. देवळांत त्याला नित्य डोळ्यासमोर येणारीं नीतिवाक्यें व सूक्त्या दिसल्या. पण एका सूक्तीवर त्याची दृष्टि अडून राहाली—"चोरी कधीं करूं नये."

पूर्वी दळण ओतून व गिरणी सुरू करून तो आपल्या मित्रमंडळींशीं मोकळे-पणानें गप्पा मारीत असे किंवा कांहींतरी वाचीत बसत असे. कोणी चोरी केलेली ऐकून त्याला आश्चर्य वाटत असे व तो म्हणे—"बाबा! तो परमेश्वर वर बसून सर्व पहात असतो." परंतु आतां निधडक-पणें तें वाक्य त्याच्या तोंडांतून येत नासें झालें.

तो कधीं कधीं बाजारपेठेंत जाई. वाटेंतच एक तुरुंग होता. कोणकोणते अपराध करून लोक तुरुंगांत जातात हें त्याला



माहीत होतें. तो मनाशीं म्हणत असे, उघड्या डोळ्यांनीं तुरुंगाची ही उंच भिंत पाहून देखील लोक गुन्हा करायला धजतात तरी कसे?

हाच प्रश्न त्याच्या मनांत वारंवार स्वतःच्या गुन्ह्याबद्दलपण येऊं लागला. शेवटीं त्यानें आपली चूक त्या शेतकऱ्या-समोर जाऊन स्वतःच कबूल करावयाचें ठरविलें. पण मनाला धीर होईना. चोरी करून जमा केलेले पैसे आपल्याला पचणार नाहींत असें त्याला वाटूं लागलें. पण अपराध कबूल करायला देखील हिंमत हवी ना? ती त्याच्याजवळ नव्हती. पण विचार करून त्यानें एक तोड काढली.

त्यानें त्या शेतकऱ्याकडून दळणावळ जास्त घ्यायची सोडून दिली. प्रथम त्यानें मुळींच दळणावळ न घेण्याचें ठरविलें होतें. पण पीठ जास्त आलेलें लपायचें नाहीं व तो येऊन नक्की विचारील, म्हणून त्यानें आतांपर्यंत चोरी करून जी दळणावळ वसूल केली होती ती थोडी थोडी करून फेडण्याचें ठरविलें व तसें करूं लागला. दशांशापेक्षां थोडी कमी दळणावळ तो घेऊं लागला. अशा तऱ्हेनें हळू हळू सर्व















परत करतां येईल पीठ व माफी मागण्याची पण गरज उरणार नाहीं असा त्यानें विचार केला होता. त्या प्रमाणें सर्व कर्ज फिटेपर्यंत त्यानें विनभोभाट काम केलें. त्याच्या मनाला थोडें हलकें वाटलें.

परंतु त्या बिचाऱ्याला त्या शेतकऱ्याच्या घरीं काय होत होतें तें माहीत नव्हतें. माहीत झालें असतें तर त्याचे डोळे पांढरेच झाले असते.

त्या शेतकऱ्याची बायको संसारांत हुशार बाई होती. ती दळण मोजून पाठवी व परत आल्यावर मोजून टिपून ठेवी. पिठांत खोट आलेली तिच्या नजरेंतून सुटली नाहीं. तिनें नवऱ्याला त्याप्रमाणें विचारलें देखील.

"अग पण तो एक प्रामाणिक मनुष्य आहे! तुझीच कांहीं तरी चूक असेल." शेतकरी म्हणाला.

"बरें तर मी म्हण तें कीं आणखी कांहीं दिवस मी दळण व पीठ वजना करून पाहातें व दाखवतें पण." बायको म्हणाली. शेतकऱ्यानें होकार दिला.

या खेपेस तिनें नवऱ्यासमोर गहूं वजन करून पाठवले व पीठ दळून आल्यावर तें देखील वजन करून पाहिलें. या खेपेस पीठ जास्त भरलें. बिचारीला आश्चर्य वाटलें. नवरा थट्टा करून म्हणाला—"झाली खात्री? उलट त्या बिचाऱ्या कडलेंच पीठ तुझ्याकडे जास्त जमा झालें असेल!"

बायको निरुत्तर झाली. परंतु तिचें मन मानत नव्हतें. पुन्हां येईल तेव्हां वजन करून पाहीन असें तिनें मनाशी ठरविलें.

पुढें कांहीं दिवसांनीं पीठ बरोबर भरूं लागलें. व्यंकुशेट कर्ज फिटलें म्हणून खूष होता. पण शेतकरी व त्याची बायको पीठ बरोबर येऊं लागलेलें पाहून चकित झाले.



त्यांना हें कोडें उलगडेना. कांहीं दिवस कमी झालें. पुढें बरोबर आलें. नंतर वाढलें व आतां पुन्हां बरोबर येऊं लागलें. आहे तरी काय भानगड?

जेवायला बसला असतां शेतकऱ्याला एक गोष्ट सुचली. कदाचित त्याच्याकडच्या वजनांत किंवा तराजूंत तर कांहीं फरक नसेल ना? कदाचित त्याला माहीत नसेल आणि त्याचेंदेखील नुकसान होत असेल.

"बरोबर! आतां आलें ना तुमच्या लक्षांत. त्याची चूक त्याच्या पदरांत बांधून या आणि म्हणावें अरे, असा हलगर्जीपणा करून स्वतःचें नांव कां घालवून बसतोस?" बायको म्हणाली.

दुसऱ्यादिवशी उजाडतांच शेतकरी गिरणीजवळ गेला. त्याला पाहून व्यंकुशेटच्या चेहरा गोरामोरा झाला. नमस्कार दंडवत देखील करायला विसरला.

शेतकऱ्यानें सरळ शब्दांत विचारलें—"मी कां आलों आहें कळलें का तुला?"

व्यंकुशेट कांहींच बोलला नाहीं.

शेतकरी म्हणाला—"अरे गृहस्था तूं पीठ दळून पाठवतोस तें काय डोळे मिटून पाठतोस? वजनबिजन करून पाठवतोस कीं













नाहीं? हें काय कधीं कमी, कधीं जास्त, कधीं अगदीं बरोबर!"

व्यंकूशेट म्हणाला—"दादा! मी वजन करूनच पीठ पाठवतों!"

"मग पीठ वाढलें कसें रे? फुकटाचें दळून वर पसापसाभर आपल्या घरचे गहूं दळून देतोस कीं काय? हा निष्काळजी-पणा बरोबर नाहीं बुवा!"

त्या शेतकऱ्याच्या त्या गोड दटावण्यानें व्यंकूशेटच्या तोंडून एक शब्ददेखील येईना.

शेतकरी पुढें म्हणाला—"हें बघ व्यंकू! तूं लहान होतास तेव्हांपासून मी तुला ओळखतों. पूर्वी असें कधीं झालें नाहीं. मग अलीकडेच असें कां होत आहे? तूं सांगून टाक मी रागावणार नाहीं."

व्यंकूशेट म्हणाला—"दादा! आतां मी तुमच्याजवळ काय लपवूं? लवकर श्रीमंत होण्याची हाव माझ्या डोक्यांत शिरली होती. म्हणून मी चोरून गहूं काढून ठेवीत होतों. पण पुढें मला पश्चात्ताप झाला व मी चूक सुधारण्यासाठीं जास्त पीठ पाठवूं लागलों. तुमचें पुरें कर्ज फेडीपर्यंत माझ्या मनाचें समाधान झालें नाहीं." असें सांगून तो लहान मुलासारखा रडूं लागला.

शेतकऱ्यानें प्रेमानें त्याच्या पाठीवर हात फिरवला व म्हणाला—"देवानेंच तुला सद्बुद्धि दिली! फक्त माझ्या बायकोला पिठांत कमी जास्त होतें हें कळलें आहे. पण तूं निष्काळजीपणानें वजन करून घेत असशील व वजन करून पाठवीत असशील अशी तिची समजूत आहे. तूं ही गोष्ट कबूल करून माझ्या मनांत होती नव्हती ती शंका दूर केलीस. त्यामुळें तुझा आदर कमी होण्याऐवजीं वाढला आहे."



# वनदेवी

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं व तो परत झाडाजवळ गेला आणि प्रेत खांद्यावर काढून घेऊन नेहमीं प्रमाणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, देवलोकांतले देव देखील आपल्या निश्चयावर कायम रहात नाहींत व तूं तर या मर्त्यलोकांतला एक सामान्य माणूस आहेस. म्हणून तुझा हा अढळ निश्चय पाहून कौतुक वाटतें. देव-लोकांतल्या देवांचे चित्त देखील कसें चंचल असतें याचें एक उदाहरण म्हणून वनदेवीची गोष्ट सांगतों, ऐक." असें सांगून वेताळानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

चिंतामणि नामक राजाला शूरसेन नांवाचा एक मुलगा होता. त्याचा विद्या-भ्यास संपल्यावर त्याच्या आईवडिलांनीं त्याचा विवाह करून देण्याचें ठरविलें आणि

मुली पाहूं लागले. पण शूरसेनानें त्यांना सांगून ठेवले होतें कीं केतकी नगरची राजकन्या सुनंदिनीशीं विवाह करण्याचा त्याचा विचार आहे.

त्याच वेळीं अशी बातमी कळली कीं सुनंदिनीच्या स्वयंवराचा मुहूर्त ठरला आहे. त्या स्वयंवराच्या वेळीं हजर राहण्यासाठीं शूरसेन केतकी नगराच्या वेशीवर पोंचला. तो आपल्या सरदार सैनिकांपासून थोडा पुढें निघून गेला होता. एका वळणावर एक सुंदर स्त्री त्याची वाट अडवून उभी असलेली त्याला दिसली. ती एक अप्सरा होती.

"कोण आपण? जरा बाजूला व्हा. मला पुढें जावयाचें आहे." शूरसेन म्हणाला. तें ऐकून ती अप्सरा शूरसेनाकडे निःशंकपणें पाहून स्मित करून म्हणाली—"या मर्त्यलोकांत देवलोकांतील पुरुषाहून सुंदर पुरुष असतील हें मला माहीत नव्हतें. माझ्याशीं गांधर्वविवाह करून घेऊन तूं या वनांत राहलास तर तुला देवत्वाचा लाभ होईल."

"मला मनुष्य म्हणून राहण्यांतच जास्त श्रेयस्कर वाटतें. कारण कोणी दिलेलें देवपण किती दिवस टिकून राहणार?" शूरसेन म्हणाला.



त्या वनदेवीनें त्याचें मन वळविण्याचा अनेक प्रकारें यत्न करून पाहिला. पण तिला यश आलें नाहीं. तेव्हां मात्र तिला मनस्वी राग आला व तिनें शाप दिला कीं तूं ज्या स्त्रीकडे पाहून माझ्या प्रेमाचा तिरस्कार केला आहेस त्या स्त्रीचा स्पर्श होतांच तूं घोडा होशील." असें सांगून ती अदृश्य झाली.

वनदेवीच्या त्या शापामुळें शूरसेन निराश झाला. स्वयंवराच्या समारंभांत भाग घेण्याऐवजीं परत जाण्याचा विचार देखील त्याच्या मनांत आला. पण तेवढ्यांत बरोबरचे लोक तेथें येऊन पोंचले. वनदेवीची गोष्ट किंवा त्याविषयीं तो कांहींच बोलला नाहीं व त्यांच्याबरोबर केतकीनगरास गेला.

परंतु स्वयंवराच्या दिवशीं स्वयंवरासाठीं आलेल्या राजकुमारांबरोबर तो बसला नाहीं, इतर पाहुणे मंडळींत जाऊन बसला. तरी सुनंदिनीनें त्याला ओळखलें व त्यालाच जाऊन वर माळा घातली.

आतां शूरसेनासमोर पुन्हां तोच प्रश्न उभा राहिला. सुनंदिनीशीं एकांतांत भेटून बोलावें व तिला सर्व परिस्थिति समजावून सांगावी असें त्यानें ठरविलें. त्याप्रमाणें



तो भेटला व त्यानें वनदेवीच्या शापाची गोष्ट सांगून त्याला तोड म्हणून एक गोष्ट सुचविली. विवाहापूर्वी दुसऱ्या कोणाशीं तरी लग्नसंस्कार करून घ्यावा व त्यानंतर त्याच्याशीं ठरल्या प्रमाणें विवाह करून घ्यावा.

ती म्हणाली—"मी आपल्याला पति म्हणून केव्हांपासून मनानें वरलें आहे व स्वयंवराची माळा पण आपल्याच गळ्यांत घातली आहे. जें नशिबी असेल तें होईल. सावित्रीनें सत्यवानाला सर्व स्थिति ओळखून का वरलें नव्हतें? ज्याला मनानें वरलें त्याच्या सहवासांतच पुढील आयुष्य सुखानें



असो वा दुःखानें घालवावयाचें असतें. नाटकी लग्न केल्याचा दोष नाहीं का लागणार ?”

सुनंदिनीच्या इच्छेप्रमाणें शूरसेनाशींच तिचें शास्त्रोक्त विधीनें लग्न झालें. पाणि-ग्रहण संस्कार होतांच थोड्यावेळानेंच शूरसेन घोडा झाला. लग्नमंडपांत खळबळ उडून गेली. लग्नाला आलेली मंडळी तें अघटित घडलेलें पाहून आश्चर्य करीत निघून गेली.

सुनंदिनी अश्वरूपांत असलेल्या आपल्या पतीला म्हणाली—“ आतां आपण फार वेळ येथें थांबणें बरोबर नाहीं. मी आपल्या-बरोबर आपल्या गांवीं यायला तयार आहें. चलावें.” दोघें निघालीं.

ते केतकी वनाजवळून जात असतां ती अप्सरा आडवी आली. तिनें सुनंदिनीला विचारलें—“ कोण बाई तूं ? आणि हा घोडा कोण तुझ्याबरोबर ? ”

सुनंदिनी म्हणाली—“ हा घोडा नसून अश्वरूप मिळालेले माझे पति आहेत. कोणी तरी वनदेवी आहे. तिनें यांच्यावर राग आल्यामुळें त्यांना शाप दिला होता. म्हणून त्यांना हें रूप मिळालें.”

“ मीच ती वनदेवी ! मी याच्या रूपा-वर मुग्ध होऊन याच्याशीं लग्न करण्याचें ठरविलें. लग्न झाल्यावर देवपण मिळेल असें देखील सांगितलें. पण त्याचें मन तुझ्यावर बसलें होतें, व म्हणून त्यानें माझ्या प्रेमाचा तिरस्कार केला आणि आतां त्याचें फळ असें भोगीत आहे.” वनदेवी म्हणाली.

सुनंदिनीनें वनदेवीचे पाय धरून विनंति केली—“ माझ्या पतीचे सर्व अपराध विसरून त्यांना पुन्हां मनुष्यरूप दे. मी तुझ्या सुखांत कांहीं अंतर पडूं देणार नाहीं. तुझी दासी म्हणून आयुष्यभर तुझी सेवा करीन.”



“ तें मला कबूल नाहीं. तुझ्या मुळेंच तर मी तुझ्या पतीला तो शाप दिला होता.” वनदेवी म्हणाली.

“ तसें असेल तर मला अश्वरूप दे व त्यांना मनुष्य रूप दे. त्यांचें प्रेम तुला मिळालें तर त्याच्याबद्दल मी तुझ्यावर रागावणार नाहीं. उलट तुझे आभारच मानीन.”

वनदेवीनें क्षणभर विचार केला. नंतर शूरसेनाला मनुष्य रूप देऊन ती अंतर्धान पावली. शूरसेन आपल्या पत्नीसह आपल्या घरीं आला व पुढें त्यांचा संसार सुखाचा झाला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून राजाला विचारलें—“ मला हें कळत नाहीं कीं त्या अप्सरेनें एकदम आपला निश्चय कां बदलला ? सुनंदिनीला घोडी व शूरसेनाला मनुष्य करून तिनें आपल्या मनासारखें कां करून घेतलें नाहीं ? म्हणजे शूरसेनावर तिचें खरें प्रेम नव्हतें म्हणावयाचें कीं सुनंदिनीवर दया वाटली म्हणून ? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील.

विक्रमार्क म्हणाला—“ वनदेवीचें शूर-सेनावर प्रेम नव्हतें असें नाहीं. पण सुनंदिनीचें पतीवरचें प्रेम पाहून व त्याच्या-साठीं आपलें सर्वस्व पणाला लावण्याची तिची तयारी पाहून तिला माघार घ्यावी लागली. त्याग करण्यांत ती देखील मागें नाहीं हें तिला दर्शवावयाचें होतें. एवढेंच ! ”

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतावरोबर अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. [ कल्पित ]





# परोपकारार्थ मिदं शरीरम्

विन्ध्य प्रदेशांत एक शेतकरी रहात असे. त्याला भागीरथी नांवाची एक मुलगी होती. लहानपणापासून बकऱ्या व मेंढरें चरायला घेऊन जाण्याचें काम तिला तिच्या बापानें देऊन ठेवलें होतें. सकाळपासून संध्याकाळपर्यंत ती डोंगराळ प्रदेशांतच आपल्या मेंढरांच्या मागें हिंडे व काळोख पडल्यावर घरीं परत येई.

एकदां भागूला एक विचित्र रोंपटें दिसलें. त्या जागीं तें तसेंच राहालें तर बकऱ्या येऊन तें खाऊन टाकतील या भीतीनें तिनें तें एका ऊंच जागीं जाऊन लावलें. ती दररोज त्या रोंपट्याला पाणी घाली. हळूहळू त्याचें एक मोठें झाड झालें व त्याच्या सावलींत गुरें, मेंढरें व बकऱ्या येऊन बसूं लागलीं. हळू हळू उन्हाळ्यांत ती एक निवाऱ्याची जागा म्हणून जवळपासच्या गांवांत प्रसिद्ध झाली.

भागूनें ज्या ठिकाणीं तें झाड लावलें होतें त्या झाडापासून थोड्याच अंतरावर एक मोठा तलाव होता. आजूबाजूचे लोक त्याच तलावाचें पाणी पीत. उन्हाळ्यांत तलावाचें पाणी कमी झालें तरी अगदीं अटून जात नसे. कधीं अटून गेलें तर लोक तलावांत खळगे खणून पाणी जमा झालें कीं आपल्या घागरी भरून नेत. तो तलाव म्हणजे दहा पांच खेड्यांना एक जीवनाधार होता.

एके वर्षी पाऊसच पडला नाहीं व तलावांतलें पाणी पार अटून गेलें. वर्षभर लोक हवालदिल झाले. उन्हाळ्यांत तर दुष्काळच पडला. पाण्याच्या अभावी लोक गांव सोडून जाऊं लागले.

पण भागू आतां मोठी व लेकुरवाळी झाली होती. तिला गांव सोडून जाणें शक्य नव्हतें. ती नियमितपणें त्या झाडाला एक तांब्याभर पाणी घालीत असे. शेवटपर्यंत ती तो नियम पाळीत आली. एकदां तीच स्वतः दमून भागून तलावापर्यंत गेली. खळगा खणून पाहिला. पण फुकट! उन्हाळ्यामुळें अंगाची लाही होत होती. घसा कोरडा पडला होता. झाडाखालीं बसून क्षणभर दम घ्यावा म्हणून ती गेली. तिला भोंवळ आली व त्या झाडाखालीच घेरी येऊन पडली. शुद्धीवर आली. तेव्हां तिला झाडाच्या बुंधांतून कोणीतरी बोलत असल्याचा भास झाला.

“भागू, तूं इतके दिवस नित्य नियमितपणें मला पाणी घातलेंस आणि आज तुझाच जीव पाण्यांवाचून कासावीस झालेला मला कसा पहावेल? हें पहा माझें एक मूळ एका दगडाखालीं गेलें आहे. तो दगड बाजूला सारलास तर तुला खालीं पाणी दिसेल. तूं पोटभर पाणी पिऊन घे आणि पुन्हां दगड सारखा करून ठेव. कोणाला ही गोष्ट कळतां कामा नये. नाहींतर ती गोष्ट तुझ्या प्राणावर बेतेल.



भागूला तें सर्व ऐकून आश्चर्यच वाटलें. तिला तें सर्व खरेंच वाटेना. आपल्याला भ्रम तर झाला नसेल असें देखील तिला वाटलें. परंतु पाहूं या तर असा विचार करून तिनें झाडाचीं मुळें पाहिलीं आणि खरोखरच एक मूळ एका दगडाखालीं गेलें होतें. तिनें दगड बाजूला सारल्याबरोबर तिला स्फटिकासारखें स्वच्छ पाणी दिसलें. तो एक झरा होता. तिनें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं व गटागटा पोटभर पाणी पिऊन घेतलें. अंतरात्मा तृप्त झाला. तिनें भक्तिभावनेनें त्या झाडाला

नमस्कार केला आणि घरीं जायला म्हणून निघाली. इतक्यांत तेथें एक म्हातारा आला. तहानेनें त्याचा जीवदेखील कासावीस झाला होता. तो देखील भागूसारखा मोंवळ येऊन झाडाखालीं पडला. भागूनें त्या दगडाखालचें पाणी आणून त्याला प्यायला दिलें. झाडानें भागूला आठवण करून दिली—"जर तूं या पाण्याचें गुपित कोणाला कळूं दिलेंस तर तुझाच जीव जाईल. पण भागूनें तिकडे दुर्लक्ष केलें. त्या म्हाताऱ्याचा अंतरात्मा तृप्त झाला. त्यानें भागूला 'शतायुषी भव' असा आशीर्वाद दिला. तेव्हां भागू म्हणाली—"दादा, मला नाहीं, या झाडाला आशीर्वाद द्या." त्यानंतर तिनें त्या दगडाखालचें पाणी दाखवून गांवभरच्या लोकांचा जीव वांचविला.

गांवभरच्या लोकांना तें गुपित सांगून देखील तिच्या जिवाला कांहीं एक अपाय न झालेला पाहून तिला थोडें आश्चर्य वाटलें. ती म्हणाली—"हे उपकारकर्त्या वृक्ष! मी तुझ्या इच्छेविरुद्ध आपल्या गांवच्या लोकांच्या हितासाठीं हें केलें. स्वतःचा जीव देऊन इतक्या जणांचा जीव वांचविण्याचें भाग्य मिळेल एवढाच स्वार्थ मी त्यांत साधला. त्याबद्दल तूं देशील ती शिक्षा भोगायला मी तयार आहें."

बुंधांतून पुन्हां आवाज आला—"तुझी परीक्षा घेण्यासाठींच मी तें म्हणालों होतों. हें पाणी, खरें पाहिलें, तर, तूं घातलेलेंच मी सांठवून ठेवलें होतें. त्यांत मी थोडी भर घालीत आहें, एवढेंच."

त्या दिवसापासून त्या झऱ्याचें पाणी बारा महिने वाहूं लागलें तें आजतागायत वहात आहे. त्या झऱ्यामुळें तळें भरलें व तें पुढें कधींच आटलें नाहीं.





# पाण्याला उकळी फुटली

एका खेडेगांवांत कलपा व सरसी नांवाचे एक जोडपें रहात असे. कलपा म्हणजे दगडोबा आणि सरसी म्हणजे सरस्वती. देवानें नांवाप्रमाणेंच बुद्धिपण त्यांना दिली होती. तेव्हां घरची थोडीफार शेतीभाती होती. कलपा स्वतः शेतावर जात नसे व त्याला शेतकीच्या कामांत कांहीं गम्यपण नव्हते. म्हणून हळूहळू शेतीचें उत्पन्न कमी झालें. धान्याचा तुटवडा पडूं लागला. सरसीनें नवऱ्याला कांहीं तरी कामधंदा करायला सांगितला. कलप्पा म्हणाले, मला लिहितां वाचतां येत नाहीं. कांहीं कामधंदापण मी शिकलों नाहीं.

पण सरसीनें त्या दिवशीं नवऱ्याला घराच्या बाहेर काढण्याचें जणुं कांहीं मनाशीं ठरवूनच टाकलें होतें. ती त्याला म्हणाली—"काम वाटेल तें करा. आज घरांत धान्याच्या नांवानें एक दाणा नाहीं. तुम्ही कांहीं मिळवून आणलेंत तरच चूल पेटणार. मिळविण्याची शक्ति नाहीं तर चोरी तरी करतां येतें कीं नाहीं?"

"चोरी करूं म्हणतेस?" कलपानें चकित होऊन विचारलें व पुढें म्हणाला—"पण चोरी तरी करतां आली पाहिजे न?"

"हें सर्व नाहीं चालणार माझ्याकडे! मी सांगतें तसें करा, नाहींतर ती पहा केरसुणी!" असें सांगून तिनें कोपऱ्यांत ठेवलेल्या केरसुणीकडे बोट दाखविलें.

दगडूनें विचारलें—"चोरी कशी करूं व हें देखील तूंच सांग!"

"सूर्य चांगला डोक्यावर आला कीं शेतकऱ्यांच्या बायका जातील भाकऱ्या










घेऊन शेतावर. तुम्ही घरांत शिरून घेऊन या धान्य !" सरसीनें सुचविलें.

दगडू त्याप्रमाणें त्या दिवशीं एका शेतकऱ्याच्या घरीं गेला. बराच वेळ परत न आलेला पाहून बायको ओरडली—"पाण्याला उकळी फुटली !" दगडूनें चटकन घरीं येऊन तांदूळ आणून दिले.

तो याप्रमाणें दररोज करूं लागला. दररोज नवीन घर व धान्याशिवाय दुसऱ्या वस्तूला हात लावायचा नाहीं असा नियम त्यानें करून ठेवला होता.

परंतु कांहीं दिवसांनीं धान्याची चोरी होत असल्याची गांवांत कुणकुण सुरू झाली. ही भुताटकी आहे कीं कोणी चोर आहे हें कळेना. म्हणून सर्वांनीं चोराला पकडण्याचा चंग बांधला. सर्व आपापल्या घरांत लपून बसले.

त्या दिवशीं दगडोबा नेमके पाटलाच्या घरांतच चोरी करायला गेले आणि चोरी करीत असतां पकडले गेले. पाटलाच्या नोकरांनीं त्यांना एका खांबाला बांधून ठेवलें.

नवरा बराच वेळ परत न आलेला पाहून सरसी नित्याप्रमाणें आपल्या घरासमोर रस्त्यावर येऊन उभी राहिली आणि मोठमोठ्यानें ओरडूं लागली—"पाण्याला उकळी फुटली !"

"तें ऐकून दगडोबा ओरडले—"खांबाला बांधलें आहे !"

पाटलाला हें काय गौड बंगाल आहे कळेना. त्यांनीं दगडोबालाच विचारलें तेव्हां त्यांनीं सर्व खरें तें सांगून टाकलें. तें ऐकून सर्व पोट धरून हंसूं लागले.

पाटलांनीं सरसीला बोलावून तिची कान उघाडणी केली व दगडोबाला स्वतः शेतावर जाऊन काम करायला सांगितलें.





# एकाहून एक चतुर

**व**ज्रनाभ नांवाचा एक प्रजावत्सल राजा होता. त्याचें राज्य मणिपुर येथें होतें. त्याच्या राज्यांत नेहमीं शांतता नांदत असे. त्यामुळें विद्या, कला, व्यापार, शेतकी, उद्योगधंदे चहूबाजूंनीं राज्याची उन्नति झाली. राज्यांत प्रत्येक नागरिक हुशार, ज्ञानी व चतुर होते. आपल्या प्रजेसारखी चतुर व बुद्धिमान प्रजा इतर राज्यांत नाहीं ही गोष्ट पण राजाला माहीत होती.

एकदां राजाचा एक बालमित्र जयपुरचा राजा शतध्वज मणिपुरीं आला. त्यानें मणिपुरच्या प्रजेच्या बुद्धिमत्तेची परीक्षा घेण्याचें ठरविलें. तो आपल्या मित्राला म्हणाला—"मी तुझी व तुझ्या प्रजेची कीर्ति फार ऐकली आहे. पण मला तुझ्या प्रजेच्या बुद्धिमत्तेची परीक्षा करावयाची आहे."

वज्रनाभ म्हणाला—"मला अशी परीक्षा घेणें तेवढें बरोबर दिसत नाहीं. पण तुला पाहिजे तर पहा घेऊन परीक्षा !"

"हें पहा, वज्रनाभ ! अरे बुद्धिमत्ता ही काय शिक्षणानें वाढते ?—ती तर उपजतच असते." शतध्वज म्हणाला.

"तुझें म्हणणें अगदीं बरोबर आहे. शिक्षण व संस्कार या दोहोंची जोडी मिळाली म्हणजे ज्ञानवृद्धि होते. बुद्धि ही उपजतच असते." वज्रनाथ म्हणाला.

"बरें तर मी तुझ्या प्रजेच्या ज्ञानाचीच परीक्षा घेतों !" शतध्वज म्हणाला. तो पुढें असेंदेखील म्हणाला कीं तुझ्या प्रजेला पुरेसें ज्ञान देखील नाहीं हें मी दाखविणार आहें. त्यांत मला यश आलें नाहीं तर मी आपलें राज्य तुला देईन. मी म्हणतों



तें खरें ठरलें तर आपलें राज्य द्यायला तयार झालें पाहिजे !"

" अरे पण एवढी पैज कशाला एवढ्याशा गोष्टीसाठीं ? तरी या गोष्टीला माझी ना नाहीं." वज्रनाथ नम्रपणें म्हणाला.

दोघे आपल्या प्रधानांना बरोबर घेऊन वेश पालटून राज्यांत फिरावयास निघाले. राजधानीच्या बाहेर एका लहानशा खेड्यांत ते पोंचले. ती एक गरीब लोकांची वस्ती होती. एका झोंपडीजवळ एक धनगर उभा होता. त्याला शतध्वजानें नांव गांव विचारून नंतर त्याला एक प्रश्न केला—" सर्वांत ज्यास्त प्रकाश देणारी वस्तु कोणती ?"

" सूर्य ! " धनगर म्हणाला.

" सर्वांत श्रेष्ठ असें पाणी कोणतें ?"

" गंगेचें !"

" सर्वांत चांगली झोप म्हणजे काय ?"

" उजाडल्यावर मोडणारी झोप !"

" अक्षयपात्र म्हणजे काय ?"

" सार्थक श्रम."

" सर्वांत उत्तम फूल ?"

" लक्ष्मीला जन्म देणारें कमळ !"

तीं उत्तरें ऐकून शतध्वज चकित होऊन म्हणाला—" उत्तम ! सुंदर !" असें सांगून त्यानें धनगराला शंभर होन बक्षिस दिले. तें पाहून धनगराचा पांच वर्षांचा मुलगा हंसत झोपडीच्या बाहेर आला.

" कां रे बाबा, हंसतोस ?" शतध्वजानें त्याला विचारलें.

" तुम्ही कांहीं प्रश्न केले आणि माझ्या बाबांनीं कांहीं तरी उत्तरें दिलीं. तें ऐकून तुमचें समाधान झालें व तुम्ही त्यांना मोठें बक्षिस पण दिलें !"

" मगबरोबर उत्तरें तूं सांग बघूं !" शतध्वजानें त्याला विचारलें.

" सर्वांत जास्त प्रकाश म्हणजे ज्योति म्हणजे आनंद. माझ्या आईच्या डोळ्यांत आहे. आकाशांतून सरळ जमिनीवर पडतें तेंच उत्तम पाणी. मेहनती माणसाला लागते तीच उत्तम झोप. आमच्या आईचा हातच मुळीं अक्षयपात्र आहे. देवाला आपण वाहतों तेंच उत्तम फूल." मुलगा म्हणाला.

त्या लहान मुलाचीं उत्तरें ऐकून शतध्वज चकितच झाला. तो त्याला दुप्पट बक्षिस देऊं लागला, तें पाहून धनगराची बायको मोठ्यानें हंसत बाहेर आली. ती शतध्वजाला म्हणाली—" माफ करा, मी हंसते आहे म्हणून, पण या मुलानें जीं उत्तरें दिलीं त्यांनीं तुमच्या मनाचें समाधान झालें ? म्हणून तुमच्या या आज्ञानाबद्दलच मला आश्चर्य वाटलें."

" म्हणजे तुला या प्रश्नांचीं बरोबर उत्तरें माहीत आहेत, म्हणावयाची ?" शतध्वजानें विचारलें.

" अर्थातच ! अहो आरशांतून उजेड दिसतो तोच श्रेष्ठ उजेड. डोळ्यांतलीं टिपें हेंच सर्वोत्तम पाणी. जराशी चाहूल लागतांच किंवा नुसतें खुट्ट होतांच मोडते तीच उत्तम












झोप. भूमाताच अक्षयपात्र आहे व नवरा बायकोच्या प्रेमानें वेणींत खोवतों तेंच उत्तम फूल होय." धनगराची बायको म्हणाली.

तिचीं उत्तरें ऐकून शतध्वज तिला देखील बक्षिस द्यायला तयार झालेला पाहून धनगराची म्हातारी आई बाहेर हंसत आली व म्हणाली—"ह्या सर्वांचीं उत्तरें चुकलीं."

"तर मग तूं बरोबर उत्तर द्यायला तयार आहेस का?" शतध्वजानें विचारलें.

"होय, ऐक! काळोखांत जो उजेड पाडतो त्या दिव्याचा प्रकाश सर्वांत मोठा. खूप तहान लागली असतां जें पाणी मिळतें तेंच सर्वांत श्रेष्ठ पाणी. शरीर स्वास्थ्य उत्तम असल्यावर जी झोप येतें तीच सर्व श्रेष्ठ झोप. मनुष्याची बुद्धी तेंच अक्षयपात्र व एकदां फुलल्यावर वाळून गेलें तरी वर्षानुवर्षे उपयोगी पडणारें कापसाचें फूलच सर्वांत उत्तम फूल." धनगराची आई म्हणाली.

तिचें तें उत्तर ऐकून व खूष होऊन शतध्वजानें आपल्या गळ्यांतला मोत्याचा हार काढून तिला बक्षिस दिला.

दोघे मित्र राजवाड्यांत परत आल्यावर शतध्वज वज्रनाभाला म्हणाला—"मित्रा, मी हारलों तूं जिंकलास! झोपडींत राहणाऱ्या धनगराच्या घरांत लहानथोर बायका पुरुष सर्वच इतके शहाणे व ज्ञानी निघाले तर मग इतर सुशिक्षित उच्च कुलीन लोकांविषयीं चवकशी करण्याची जरूरच राहिली नाहीं."

"अरे पण! त्या सर्वांच्या उत्तरांत सारखेपणा कोठें होता? याचा अर्थ त्यांच्या शहाणपणांत कमीजास्तपणा उघडपणें दिसत होता. म्हणून तूंच पैज जिंकलास." वज्रनाभ म्हणाला.





# श्रीवत्स

एकदां शनि व लक्ष्मी दोघांची भेट झाली व दोघांत कोण मोठा या गोष्टीवर वाद झाला. दोघे श्रीवत्स राजाकडे गेले आणि आपली तक्रार सांगून निर्णय द्यायला सांगितलें. श्रीवत्स म्हणाला—"माझ्या देव्हाऱ्यांत मी दोघांना बसण्यासाठीं पाट करून ठेवले आहेत. ते पाहिलेत म्हणजे माझें उत्तर तुम्हांला कळेल. दोघांनीं देव्हारा जाऊन पाहिला. लक्ष्मीकरितां सोन्याचा व शनीकरितां चांदीचा पाट ठेवलेला होता.

शनीला राग आला. त्यानें श्रीवत्सचा राजवाडा भस्म करून टाकला. त्याच्याच प्रेरणेनें श्रीवत्स राजाचा शत्रू बाहुदेव यानें त्याच्या राज्यावर स्वारी करून त्याला सिंहासनावरून हुसकावून लावलें. श्रीवत्साला चिंतादेवी नांवाच्या राणीबरोबर राज्य सोडून निघून जावें लागलें. रात्रीं दोघे ज्या जागीं झोपलीं होतीं तेथली जमीन सोन्याची झाली. त्या सोन्याच्या विटा करून दोघे त्या विकायला घेऊन निघालीं.

समुद्रकांठीं एका व्यापाऱ्याचें जहाज नांगर टाकून उभें होतें. त्यांनीं त्या व्यापाऱ्याला विटा दाखविल्या. व्यापाऱ्यानें सोन्याच्या विटा व चिंतादेवी जहाजावर पोंचतांच जहाज सोडलें. व्यापाऱ्याच्या नोकरांनीं श्रीवत्साला समुद्रांत फेंकून दिलें. चिंतादेवीला एका खोलींत कोंडून ठेवलें.

तिकडे श्रीवत्साला शनीनें समुद्र किनाऱ्यावर आणून टाकून दिलें. तो तेथून उठून नगराबाहेरच्या देवीच्या देवळासमोर येऊन बसला. त्याचवेळीं बाहुदेव राजाची मुलगी भद्रा हिच्या स्वयंवराचा मुहूर्त ठरला होता.

ती आपल्या सखींबरोबर देवीच्या दर्शनाला गेली होती. देवीची पूजा करून ती बाहेर आली तेव्हां तिला श्रीवत्स दिसला. त्यालाच वरमाला घालण्याचें ठरवून तिनें तसें आपल्या सखींना व राजाला सांगितलें.

श्रीवत्स आपल्या पत्नीच्या शोधार्थ पुन्हां समुद्रकाठीं गेला. त्याचवेळीं व्यापारी एका लहानशा होडक्यांत बसून समुद्रकाठावर आला होता. तो किनाऱ्यावरच्या लोकांच्या विनवण्या करीत होता कीं माझ्या जहाजाला जागचें हलवायला हात लावून पुण्य मिळवा.

श्रीवत्स त्याला ओळखून म्हणाला—"तूं पापी आहेस. तूं माझ्या पत्नीला समुद्रांत टाकून आमचें सोनें अपहरण केलें आहेस. तुझें जहाज जागचें हलणें अशक्य."

व्यापाऱ्यानें श्रीवत्साची क्षमा मागितली व म्हणाला—"मी तुझ्या पत्नीला जहाजावरच एका खोलींत बंद केलें आहे. खोलीचें दार पण उघडत नाहीं व जहाज पण जागचें हालत नाहीं."

श्रीवत्स होडक्यांत बसून जहाजावर गेला. त्यानें हात लावल्याबरोबर खोलीचें दार उघडलें व जहाज चालू झालें. त्यानंतर श्रीवत्स पत्नीसह समुद्रकाठीं परत आला.

तिकडे बाहुदेव आपल्या मुलीच्या इच्छेप्रमाणें देवळासमोर बसलेल्या तरुणाचा शोध काढीत समुद्रकाठीं आला. ज्याचें राज्य आपण बळकावलें होतें तोच आपल्या मुलीनें वरलेला तरुण आहे हें कळल्यावर त्यानें श्रीवत्साला त्याचें राज्य परत करून मुलीचें लग्न त्याच्याशीं करून दिलें. त्यानंतर श्रीवत्सानें शनीसाठीं देखील सोन्याची वेदिका तयार करवून लक्ष्मी व शनि दोघांचा समान आदर केला.






तो कावळा दुसरा कोणी नसून इंद्राचा मुलगाच होता. तो पर्वतांत रहात असे व वायुवेगानें उडत असे. ब्रह्मास्त्र पाठीशीं लागतांच तो स्वसंरक्षणासाठीं त्रिलोकांत फिरला. देव, ऋषी किंवा स्वतः इंद्रदेखील त्याचें रक्षण करूं शकला नाहीं. शेवटीं निरुपाय होऊन त्यानें श्रीरामचंद्र चरणींच शरण मागितली. श्रीरामचंद्र शरणागत वत्सल म्हणून प्रसिद्ध होते. अर्थातच त्यांनीं त्याला क्षमा केली. परंतु ब्रह्मास्त्र सोडलें होतें तें मागें घेणें अशक्य होतें. तें त्या कावळ्याच्या डाव्या डोळ्याला लागलें.

सीतेनें ही गोष्ट मारुतीला सांगून रामाजवळ असा निरोप सांगायला सांगितला कीं अशा पराक्रमी व देवतुल्य पतीच्या हातून माझें रक्षण होऊं शकलें नाहीं तर त्याला कारण माझें पूर्वजन्मीचें कर्मच ठरेल.

तें ऐकून मारुती म्हणाला—"हे माते! मी रामाला तुझा हा निरोप पोंचता करीन. लक्ष्मण व वानरांचा राजा सुग्रीव यांना कांहीं निरोप सांगशील कीं नाहीं?"

"लक्ष्मणाला माझा आशीर्वाद सांग! मातेसमान मला मानून तो नित्य माझ्या सेवेला हजर असे. तो त्यावेळीं हजर असता



तर रावणाची छाती नव्हती जवळ यायची. पण ती माझीच चूक, राजा सुग्रीव हा रामचंद्राचा सखा व मित्र आहे. त्याला निराळा निरोप मी काय सांगूं! रामचंद्राला मदत करायला सांग!"

नंतर पदरांत बांधलेला चूडामणी काढून तो मारुतीला देत सीता म्हणाली—"विवाह प्रसंगीं माझ्या आईनें हा मला दिला होता. तेव्हां महाराज दशरथ देखील तेथें होते. खूण म्हणून हा श्री रामचंद्राला दे. हा पाहतांच त्यांना त्यांचे वडील व माझी आई दोघांची आठवण होईल."

मारुतीनें तो चूडामणी नमस्कार करून ठेवून घेतला. नंतर सीतेला म्हणाला—"एकदां रावणाला समोर भेटून जावें म्हणतो." लंकेला येऊन फक्त सीतेला पाहून परत जाण्यांत काय विशेष आहे? राक्षसांना थोडा पराक्रम दाखवून व त्यांचा पराक्रम पाहून जाऊं या. युद्ध झालेंच तर एक अंदाज राहील. सुग्रीवाला त्याप्रमाणें तयारी करतां येईल. वानरांचा पराक्रम दाखवून राक्षसांना त्यांची दहशत बसेल असें कांहीं तरी केलें पाहिजे. अशोक वन हें रावणानें फार हौशीनें तयार करविलें होतें. तेंच नष्ट केलें तर रावण चिडून जाईल व माझें पारिपत्य करण्यासाठीं राक्षस वीरांना पाठवील. तेव्हां दाखवितां येईल आपला पराक्रम, असा विचार करून मारुतीनें अशोक वनांतील वृक्ष वेली उपटून तोडून टाकायला सुरवात केली. झाडावर बसलेले पक्षी घाबरून ओरडूं लागले. बागेचे राखणदार रावणाकडे धांवले.

मारुतीनें चालविलेला अशोकवनसंहार राक्षस स्त्रियांनीं पाहिला. मारुतीनें आपलें शरीर जास्तच वाढवलें. त्यांनीं सीतेला विचारलें—"हा कोण? कोठून आला व तुला काय म्हणाला?"





सीता म्हणाली—"आतां हें सर्व मला काय माहीत? तो कोण हें तुम्हीच मला सांगा."

तें ऐकून राक्षसिणी जास्तच घाबरून गेल्या. त्यांच्यापैकीं कांहीं सीतेच्या संरक्षणासाठीं तेथेंच थांबल्या व कांहीं रावणाला तें वृत्त सांगण्यासाठीं धांवल्या. त्या रावणाला म्हणाल्या—"एक भयंकर महा बलशाली व महाकाय वानर सीतेजवळ कांहीं तरी बोलत गेला. तो अशोकवनांत शिरला व त्यानें वनाचा संहार चालू केला आहे. सीतेला आम्ही विचारलें कीं तो कोण? पण सीतेनें आम्हांला समाधान कारक उत्तर दिलें नाहीं. तो कोण, कोठून आला, त्याला कोणी पाठविलें, कांहींच कळत नाहीं. सीता ज्या अशोक वृक्षाखालीं बसते तो एक वृक्ष सोडून जवळ जवळ सर्व अशोकवन त्यानें उध्वस्त करून टाकलें आहे. सीता एका शिंशुपा वृक्षाखालीं जाऊन बसली आहे. तो सीतेशीं कांहीं तरी बोलला आहे व अशोकवन त्यानें उध्वस्त केलें आहे. या दोन्ही अपराधांबद्दल त्याला शिक्षा झाली पाहिजे."

तें ऐकून रावणाला क्रोध आला. त्यानें राक्षसवीरांना मारुतीचें पारिपत्यकरून त्याला धरून आणण्यासाठीं पाठविलें. ते जवळ आल्यावर मारुती आपली शेपटी जमिनीवर आदळून त्यांना भेडसावूं लागला व म्हणाला—"श्री रामचंद्राचा जय! वानरराज सुग्रीवाचा जय! मी रामाचा दास आहें. माझें नांव हनुमान, शत्रूचा नाश हें माझें ब्रीद आहे. सहस्र रावण युद्धांत माझ्यासमोर उभे राहाणें शक्य नाहीं. तुम्हां राक्षसां देखत या लंकेचा ध्वंस करून सीतेला नमस्कार करून प्रभु रामचंद्राकडे परत जाईन."

मेरूच्या पर्वतासारखा हनुमानाचा तो भयंकर देह पाहून व मारुतीचा तो घनगंभीर



धडधडाटासारखा आवाज ऐकून राक्षसांच्या हृदयांत धडकीच बसली. परंतु रावणाची आज्ञा होती. परत जावें तर मरणच व पुढें जावें तरी मरणच, असा विचार करून त्यांनीं हनुमानावर शस्त्रप्रहार करायला सुरवात केली. मारुतीनें अशोकवनाच्या फाटकाचे दोन लोखंडी स्तंभ उपटून त्यांचा दांडक्यासारखा प्रयोग केला आणि राक्षसांना जमिनीवर लोळविलें. राक्षसांना मारून पिटाळून लावलें तरी मारुती फाटकाजवळच उभा राहिला.

राक्षस घाबरून रावणाकडे पळाले आणि म्हणाले—"त्या माकडानें आमच्यापैकीं अर्ध्या अधिक राक्षसवीरांना ठार केलें आहे. कित्येक जखमी होऊन जमिनीवर लोळत आहेत."

रावणाला अर्थातच राग आला. त्यानें प्रवस्त राक्षसाचे पुत्र अजेय व जंबुमाळी दोघांना मारुतीशीं युद्ध करण्यास पाठविलें.

राक्षसांना ठार करून मारुती फाटकाजवळ उभा असतां त्याला अशोकवनांतील चैत्यासारख्या एका भवनाची आठवण झाली. त्यानें तें उध्वस्त केलें नव्हतें. तें उध्वस्त करण्याचें ठरवून चैत्यभवनावर त्यानें उडी मारली. त्याबरोबर चैत्यभवन कोसळलें. त्याच्या रक्षणासाठीं रावणानें नेमलेले शंभरावर राक्षस मारुतीवर शस्त्रें घेऊन धांवले. त्यांनीं शस्त्रप्रहार केल्यावर मारुतीला राग आला. त्यानें आपलें शरीर आणखी जास्त वाढवलें. त्यानें त्या कोसळलेल्या भवनाचा एक स्तंभ उचलून इतक्या जोरानें गरगर फिरवला कीं त्याच्या घर्षणानेंच अग्नि उत्पन्न झाला व चैत्य भवन जळून बेचिराख झालें. मारुतीनें तोच खांब घेऊन राक्षसांना ठार केलें.

नंतर हनुमान गरजला—"ऐका, नीट कान देऊन ऐका! मीच एकटा नसून





माझ्यासारख्या शतशत वानरांना आमचा राजा सुग्रीव यानें सीतेच्या शोधार्थ पाठविलें आहे. लक्षावधि वानरांचें सैन्य घेऊन स्वतः राजा सुग्रीव पण येत आहे. तुम्ही श्री रामचंद्राशीं वैर करून आत्मघाताची तयारी केली आहे. आतां तुमची लंकापुरी नष्ट झाली असें समजा. तुम्हां सर्वांचा संहार करून रावणाला देखील राम यमसदनाला पाठवील!"

लाल फुलांची माळ घालून डोक्याला पण लाल फुलें खोंचून जंबुमाली धनुष्यबाण घेऊन गाढवांच्या रथांत बसून आला तेव्हां मारुती अशोकवनाच्या फाटकांतच बसला होता. जंबु मालीनें मारुतीवर एका मागून एक अनेक बाण सोडले व त्याला जखमी पण केलें. मारुतीनें दगड व झाडें त्याच्या अंगावर फेंकली. जंबुमालीनें मध्येंच बाण सोडून तीं नष्ट करून टाकलीं. तेव्हां मारुतीनें तो खांब उचलून जंबुमालीवर टाकला. त्याच्या खालीं जंबुमाली, त्याचा रथ व घोडे सर्वांचा चक्काचूर होऊन गेला.

रावणाला जेव्हां जंबुमालीच्या वधाची बातमी कळली तेव्हां मात्र त्याला मारुतीच्या शक्तीची थोडी कल्पना आली. त्याला राग पण आला. त्यानें आपल्या सात शूर व अस्त्रविद्येंत निपुण अशा राक्षसवीरांना पाठविलें. सर्व शत्रूचा नाश करून रावणाकडून शाबासकी मिळविण्याच्या आशेनें ऐटींत अशोकवनापर्यंत येऊन दाखल झाले. सर्वांनीं एकदम मारुतीवर बाण सोडायला सुरवात केली. हनुमान स्वतःचा बचाव करीत आकाशांतच उडत राहिला आणि त्याच्यावर बाण सोडणाऱ्या राक्षसांना मधून मधून लाथाबुक्के मारूं लागला. मारुतीचे प्रहार असह्य होऊन राक्षस रक्त ओकूं लागले व पटापट जमिनीवर आदळूं लागले. त्यांच्या



किंकाळ्यांनीं लंकेवरचें आकाश देखील हादरलें. रावणाचे एक दोघे मंत्री व पुत्र देखील ठार झालेले ऐकून रावणाला भीति वाटली. परंतु त्यानें तें भ्याल्याचें सोंग करून विरुपाक्ष, कापाक्ष दुर्धर, बुधस, मासकर्ण वगैरे मुख्य मुख्य सेनापतींना बोलावून आज्ञा केली—"तुम्ही चतुरंग सैन्य घेऊन जा व त्या वानराची खोड मोडून या. तो मला वानर असावासा वाटत नाहीं. इंद्रानें आपल्या तपश्चर्येच्या जोरावर भूत उत्पन्न करून आपल्याला त्रास द्यायला पाठविलें असावें. मी एकाहून एक बलवान वानरांना—वाली, सुग्रीव, नील आदिकांना पाहिलें आहे. परंतु हा तर त्यांच्याहून भयंकर दिसतो आहे. वानररूपांत हें भूतच असलें पाहिजे. काय वाटेल तें करून त्याला कैद करून घेऊन या. युद्ध सावधपणें करा."

पांच राक्षसवीर अशोकवनाच्या फाटका जवळ पोंचले. मारुतीला त्यांनीं पाहिलें व त्याच्या चारी बाजूला उभे राहून त्याच्या अंगावर एकदम हल्ला सुरू केला. दुर्धरनें मारुतीच्या डोक्याला नेम धरून पांच बाण सोडले. मारुतीनें सिंहगर्जना करून आकाशांत उड्डाण केलें व दुर्धरच्या रथावरच उडी मारली. दुर्धरबरोबर त्या सर्वांचा चक्काचूर झाला.

दुर्धरला मेलेला पाहून विरुपाक्ष, कापाक्ष दोघांनीं आकाशांत उड्डाण केलें. त्यांनीं मारुतीच्या छातीवर गदाप्रहार सुरू केला. मारुतीनें झाड उपटून त्यांना झोडपून काढलें. दोघे क्षणार्धांत मरून पडले. आतां फक्त दोघे वीर उरले. ते आपापल्या तलवारी उपसून मारुतीवर धांवले व त्यांनीं मारुतीला जखमी करून सोडलें. मारुतीनें एक पर्वतच मुळापासून उपटून त्यांच्या अंगावर फेंकला.










ते दोघे त्याच्याखालीं चेंगरून मरून गेले. अशा तऱ्हेनें पांचहि राक्षस वीरांना ठार करून हनुमानानें त्यांच्याबरोबर आलेल्या राक्षस सैन्याची धुळदाण उडवून दिली. रस्त्यावर गल्ल्यांतून जिकडे पहावें तिकडे राक्षसवीर मरून पडले होते.

हें सर्व कळल्यावर रावणानें आपला शूर मुलगा अक्षयकुमार याला पाठविलें. तो आपल्या सुवर्ण रथांत बसून मारुतीशीं युद्ध करण्यास निघाला. त्याच्याबरोबर रावणानें एक मोठें सैन्य देखील पाठविलें.

मारुती अशोकवनांत जणुं कांहीं अक्षयकुमाराची वाट पहात बसला होता. त्याच्या चेहऱ्यावरच त्याचें शौर्य व साहस झळकत होतें. अक्षयनें मारुतीला पाहिलें व तो महाबली आहे हें ओळखायला त्याला वेळ लागला नाहीं. दोघांचें घनघोर युद्ध झालें. अक्षय वयानें फारच लहान होता. पण त्या तरुण वयांत त्यानें दाखविलेलें शौर्य व पराक्रम पाहून मारुतीला कौतुक वाटलें. अक्षयकुमाराच्या बाणवृष्टीपासून स्वतःचा बचाव करीत हनुमान आकाशांत उडत विचार करीत होता कीं पोरवयांतच हा इतका पराक्रमी आहे तर पुढें तो महा प्रतापी निघेल. तरीदेखील याचा शेवट केलाच पाहिजे.

अक्षयकुमाराचा रथ आकाशांत देखील उडत होता. मारुतीनें त्याचे घोडे बरच्या वर मारून टाकले आणि रथाचे तुकडे करून जमिनीवर फेंकून दिले. परंतु अक्षय अस्त्रबलानें आकाशांत उडाला. तो वर जात असतां मारुतीनें खालून त्याचे पाय धरले व त्याला गर गर फिरवून जमिनीवर आपटून ठार केलें.





# परोपकारी गोपाळ

एका गांवीं गोपाळ नांवाचा एक तरुण मुलगा रहात असे. लहान थोर सर्वांना तो निःस्वार्थ बुद्धीनें मदत करी. एकदां तो कांहीं कामासाठीं बाहेर गेला असतां एका गल्लींत एका घराच्या दारांत एक लहान मुलगी उभी असलेली त्याला दिसली. ती म्हणाली—"अहो काका ! माझी आई आजारी आहे. जरा आंत येतां का ?"

"येतो हं !" असें म्हणत गोपाळ मुली बरोबर घरांत गेला आणि विचारलें—"केव्हांपासून ताप आहे ? कोणाचें औषध चालू आहे ?"

ती बाई म्हणाली—"आम्हां गरिबाला कोण औषध देणार बाबा ? आम्हांला तर "औषधं जाह्नवी तोयं !" आणि "वैद्यो नारायणो हरिः !""

"बरं, मी लवकर औषध घेऊन येतो." असें सांगून गोपाळ वैद्यबुवांकडे गेला. त्या गांवांत तो एकच एक वैद्य होता. गोपाळनें हाक मारल्यावर एका पोऱ्यानें दार उघडलें.

"वैद्यबुवा आहेत का ?" गोपाळनें विचारतांच त्या मुलानें उत्तर देण्याऐवजीं हात पुढें केला. गोपाळला त्याचा अर्थ कळला नाहीं. म्हणून त्यानें विचारलें—"काय पाहिजे तुला ?"

"माहीत नाहीं का तुम्हांला ? वैद्यबुवांना भेटायचें असेल तर माझ्या हातावर प्रथम एक पावली ठेवा ! त्यांचा सल्ला हवा असेल तर अधेली द्यावी लागेल व औषध पाहिजे असेल तर एक बंधा रुपया द्यावा लागेल."

गोपाळनें त्याच्या हातावर एक पावली ठेवली व आंत गेला. वैद्यबुवांनीं त्याला पाहतांच हात पुढें केला. गोपाळनें वैद्-













बुवांच्या हातावर एक अधेली ठेवली. गोपाळनें जें कांहीं सांगावयाचें तें सांगितल्या वर वैद्यबुवा म्हणाले—"रोग्याला पाहाल्या-शिवाय औषध कसें देणार ?"

गोपाळ म्हणाला—"रोग्याला येथवर आणणें शक्य नाहीं. तुम्ही येऊन जरा पाहून गेलांत तर फार उपकार होतील."

"रोग्याला घरीं येऊन पहायचें झालें तर दोन रुपये अगाऊ द्यावे लागतील !" वैद्यबुवा म्हणाले. गोपाळनें कबूल केलें. वैद्यबुवांनीं त्याच्याबरोबर जाऊन त्या मुलीच्या आईला तपासून 'घरीं येऊन औषध घेऊन जा' म्हणून सांगितलें. वैद्यबुवांनीं औषध दिलें व एक बंधा रुपया हातांत पडल्यावर गोपाळला विचारलें—"तुमच्या कोण त्या बाई ?"

"माझें त्यांचें कांहीं एक नातें नाहीं ! गरीबीनें गांजलेली आजारी बाई आहे ती व मी एक तिच्याहून बऱ्या स्थितींतला मनुष्य. या पलीकडे आमचें कांहीं एक नातें नाहीं." गोपाळ म्हणाला.

गोपाळ मुलीला औषध केव्हां द्यायचें खाणें पिणें काय हें सर्व सांगून घरीं गेला. घरीं जाऊन त्यानें आपल्या बायकोला बोलावून आणलें आणि त्या बाईच्या मदतीला तेथें बसवून घरीं निघून गेला.

वैद्यबुवा दोन तीनदां येऊन गेले व नवराबायको त्या बाईची सेवा शुश्रूषा करीत आहेत हें पाहून "मूर्ख आहेत झालें !" असा विचार करून निघून गेले.

चार पांच दिवसांनीं त्या बाईची तब्येत छान सुधारली. गोपाळ बायकोबरोबर घरीं जात असतां वैद्य बुवा ओसरींत बसलेले दिसले. काळजींत होते बिचारे. गोपाळनें तें ओळखलें व विचारलें—"काय वैद्यबुवा ? असें काय बसलांत ?"



"गांवांत राहणें फुकट. कोणी शेजारी हांक मारली तर जवळ यायला देखील तयार नाहीं, पैशाचे लोभी आहेत सर्व !" वैद्य बुवा म्हणाले.

"बोला काय पाहिजे तुम्हांला ? मी आहें कीं !" गोपाळ म्हणाला.

"अरे, एकट्यानें काय काम होणार ? आमची गाय उठवणीला आली आहे. तिला उभी करून न्यायचें आहे. गुरांच्या दवा-खान्यांत !" वैद्य बुवा म्हणाले.

"त्यांत काय ? आम्ही दोघं आहो कीं ! कोठें आहे गाय ?" गोपाळनें विचारलें.

वद्यबुवा गोपाळला बरोबर घेऊन गोठ्यांत गेले. गोपाळनें खांद्याचें उपरणें कमरेला बांधलें व पाठीमागून शेपटी धरून गाईला उभी करूं लागला. पण एकट्यानें गाय कशी उभी राहणार ? त्यानें वैद्यबुवांना पण हात द्यायला बोलाविलें. ते आले. तिघांनीं प्रयत्न केला तरी गाय उभी राहीना.

वैद्यबुवांच्या घरासमोर गंमत पहायला पुष्कळ लोक जमा झाले होते. पैशावांचून त्यानें कधीं कोणाला औषध दिलें नाहीं, हें लोक कसे विसरणार ? गाईला गुरांच्या दवाखान्यांत न्यायला त्यांनीं मजुरांना बोला-



दिलें तेव्हां मजुरांनीं प्रत्येकी एकेक रुपया मागितला. जो दुसऱ्याला मदत करतो, त्याच्या मदतीला लोक धांवतात. या वैद्याला फुकटांत कोण मदत करणार? परंतु लोकांनीं पाहिलें कीं गोपाळ व त्याची बायको गाईला उभी करण्याचा प्रयत्न करीत आहेत तेव्हां ते पुढें आले व हातभार देऊन गाईला उभी केलें. ते गोपाळला म्हणाले- "या वैद्यबुवांच्या मदतीला नाहीं, आम्ही तुमच्या मदतीला आलों आहों. अहो, कोणी मरत असला तरी हा पैशाशिवाय त्याला येऊन पहात नाहीं. पुरा यमराज आहे." लोकांनीं खडसून वैद्यबुवांची हजेरी घेतली.

गोपाळ गाईला घेऊन शेजारच्या गांवीं गुरांचा दवाखाना होता तेथें गेला व गाईचें औषध पाणी पुरें करून संध्याकाळीं घरीं परत आला.

वैद्यबुवा काळजी करीत घरीं बसून होते. गाय आलेली दिसल्याबरोबर धांवत पुढें आले व गोपाळचे आभार मानून त्याला विचारूं लागले, "काय देऊं आपल्याला?"

गोपाळ स्मित करून म्हणाला—"गाईची थोडी सेवा घडली! त्याचें जें पुण्य मिळालें तेंच पुरे मला! मुक्या प्राण्याच्या मदतीला आपण माणसांनीं नाहीं धांवलें तर कोण धांवणार? गरीबाचें देखील तसेंच आहे! तीं देखील परमेश्वराचींच लेंकरें त्यांची सेवा केली कीं नारायणाची सेवा आपो-आप होते."

वैद्यबुवांनीं त्या दिवसापासून कोणाकडे औषधाकरितां पैसे मागितले नाहींत. कोणी स्वतः होऊन जें दिलें त्यांतच मनाचें समाधान करून घेण्याचें ठरविलें.



# "कॅक्टस"

हें एक तऱ्हेचें निवडुंग आहे. पण वाळवंटांत ६० फूट उंच वाढलेला निवडुंग म्हणून जगांतील एक आश्चर्य व्हावला तो कारण झाला. मेक्सिकोच्या एका वाळवंटांत हा वाढतो. मेक्सिकोचे रहिवाशी याचा घराच्या तुळयांसारखा देखील उपयोग करतात. पक्षी यावर आपलें घरटें सुद्धां बांधतात



# भारताचा इतिहास



महंमद बिन तुघलकाच्या साम्राज्यांत खान-देश नांवाचें एक छोटेखानी राज्य होतें. त्याचा अधिकारी मलिक राजा फारूकी यानें फिरोजखान याच्या कार-कीर्दींनंतर राज्यांत जी थोडी अराजकता माजली त्याचा फायदा घेऊन खानदेश स्वतंत्र झाल्याची घोषणा केली होती. २७ एप्रिल १३७९ या रोजीं तो मरण पावल्यावर त्याचा मुलगा मलिक नासिर गादीवर बसला. बहमनीच्या सुलतानांनीं त्याच्या हातांतून गुजरात घेतलें. सन १४३७-३८च्या सुमारास तो वारल्यावर १६०१ पर्यंत खानदेशावर त्याचीं मुलें व नातवंडें राज्य करीत होतीं. शेवटीं गुजरातच्या पाठोपाठ खानदेश देखील अकबर बादशाह-च्या साम्राज्यांत आला.

**बहमनी राज्य :**

दिल्लीच्या सुलतानांच्या सत्तेला न जुमानणारें असें दक्षिणेकडील बलाढ्य मुस्लिम राज्य म्हणजे बहमनी राज्य. तुघलक वंशाची सत्ता दिल्लीच्या गादीवर होती त्या-वेळीं हें राज्य स्वतंत्र झालें होतें. दक्षिणच्या प्रमुखांनीं दौलताबाद काबीज करून एका अफगाण सरदाराला नासिरुद्दीन शहा या नांवानें गादीवर बसविलें. त्यानें स्वतःच जफरखान नांवाच्या एका सरदाराला गादीवर बसविलें. ३ ऑगस्ट १३४७ या रोजीं जफरखानानें अबुल मुजफ्फर अल्लाउद्दीन बहमन शाह या नांवानें राज्याभिषेक करवून घेतला. तोच बहमनी वंशाचा संस्थापक.

गुलबर्गा येथें त्याची राजधानी होती. त्यानें अनेक हिंदू राज्यें बहमनी राज्याला जोडलीं. ११ फेब्रुवारी १३५८ रोजीं तो मरण पावला, तेव्हां राज्याची सीमा उत्तरेला वेण गंगेपासून दक्षिणेकडे कृष्णेपर्यंत व पश्चिमेकडे दौलताबाद पासून पूर्वेकडे भुवनगिरी (तेलंगाणा)पर्यंत पसरली होती. त्यानें मरतेवेळी त्याचा मुलगा महंमद शाह याला वारस नेमलें.

१३७७ मध्यें मुहंमद शाहच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा मुजाहिद शाह गादीवर बसला. त्यानें विजयनगरावर स्वारी केली. परंतु त्याला यश मिळालें नाहीं. म्हणून विजयनगराच्या राजाशीं संधी करून तो परत फिरला. त्याच्यानंतर मुहंमद शाह द्वितीय गादीवर बसला.

त्यानंतर १३९७च्या नोव्हेंबर महिन्यांत ताजुद्दीन फिरोज शाह यानें विजयनगरचा राजा व दक्षिणेकडील इतर हिंदू राज्य-कर्त्यांशीं युद्ध आरंभ केलें. विजयनगरच्या राजकन्येचें अपहरण करून तिला आपल्या अंतःपुरांत आणून ठेवलें. परंतु सन १४२० मध्यें पानगल जवळ विजयनगराच्या राजाशीं युद्ध करीत असतां त्याचा पराभव झाला. या पराभवाचें प्रायश्चित्त करण्यासाठीं म्हणून त्याचा भाऊ अहमदशाह यानें गादीवर



येतांच विजयनगराच्या राजाशीं युद्ध करून त्याचा पराभव केला. सन १४२४ मध्यें त्याच्या सेनापतीनें वरंगलवर स्वारी करून वरंगलचा किल्ला जिंकला. तेथील राजा युद्ध करीत असतांच मरण पावला, अहमद-शाह १४३५ मध्यें मरण पावला.

त्यानंतर बहमनी साम्राज्यांत भाऊबंदकी सुरू झाली. तरी देखील १५२७ पर्यंत बहमनी राजवंशाचें राज्य चालू राहिलें.

**दक्षिणेकडील सुलतान :**

त्यानंतर बहमनी साम्राज्याचे पांच तुकडे झाले—१. बरारची इमामशाही, २. अहमद

नगरची निजामशाही, ३. बिजापूरची आदिल शाही, ४. गोवलकोंड्याची कुतुबशाही व ५. बीदरचीं बीदर शाही अशीं पांच घराणीं कायम झालीं. सन् १४८४ मध्यें बरारचें राज्य स्वतंत्र झालें. १५७४ मध्यें तें अहमद नगरच्या राज्यांत जोडलें गेलें. १४८७-७० मध्यें यूसुफ आदिलखान यानें विजापूर स्वतंत्र झाल्याची घोषणा केली. त्याच्या मागून आदिलशाही वंशांत प्रसिद्ध सुलतान इब्राहीम आदिलशाह झाला. १६८६ मध्यें औरंगजेबानें बिजापूरचें राज्य खालसा करून मोगल साम्राज्यांत शामील केलें.

अहमदनगरचें राज्य अहमदशाहनें १४७० मध्यें स्थापन केलें. १४८७ मध्यें त्यानें दौलताबाद जिंकून आपलें राज्य वाढविलें. अहमदशाह गादीवर असतां निजामशाहनें विजापूरचें राज्य जिंकण्यासाठीं विजयनगरच्या राजाशीं सख्य केलें. त्याच्या-नंतर अहमदनगरचा सुल्तान विजयनगर राज्याविरुद्ध झालेल्या कटांत सामील झाला. १४७६ मध्यें अकबरचा मुलगा मुराद यानें अहमद नगरच्या किल्याला वेढा दिला तेव्हां चांदबीबीनें शौर्य दाखवून त्याच्याशीं युद्ध केलें. १६३३ मध्यें शाहजहानीं बादशाहनें हें राज्य खालसा केलें.

बहमनी सुलतानांनीं जिंकलेल्या वरंगल राज्याच्या पडक्या भिंतींवरच जणुंकांहीं गोवलकोंडा राज्याचा पाया पडला. महंमद-कुली कुतुब शाह हा या राज्याचा संस्थापक. १५६५ मध्यें विजयनगरच्या राज्याच्या विरुद्ध जो कट झाला त्यांत त्याचा मुलगा इब्राहीम सामील झाला. त्यानें हिंदूंना मोठ-मोठ्या हुद्यांवर नेमलें. १६८७ मध्यें औरंग-जेबनें गोवलकोंड्याचें राज्य खालसा केलें.





# प्रल्हाद चरित्र

ब्रह्मदेवाचे मानसपुत्र सनत सनंदादिक त्रिलोकाची यात्रा करीत एके दिवशीं वैकुंठलोकीं श्रीविष्णूच्या दर्शनासाठीं गेले. पांच वर्षाच्या मुलांसारख्या त्या महामुनींना न ओळखून विष्णूचे द्वारपाल जय विजय यांनीं त्यांना आंत प्रवेश करूं दिला नाहीं. यावर मुनींनीं रागांत येऊन शाप दिला कीं तुम्हांला राक्षस योनींत जन्म मिळेल.

जयविजयांना त्यांची चूक लक्षांत आली व त्यांनीं मुनींचे पाय धरून चुकीची माफी मागितली व शाप मुक्त करण्यास विनंति केली. पण मुनि म्हणाले—“आम्ही शाप दिला तो परत घेणें शक्य नाहीं. तीन जन्म मर्त्यलोकांत राक्षस योनींत जन्म घेतल्यानंतर तुम्ही शापमुक्त व्हाल व तुम्हांला पुन्हां विष्णूच्या सेवेचा लाभ मिळेल. मुनींचा शाप लागल्यानें जय व विजय कश्यप व अदितीच्या पोटीं हिरण्यकश्यपु व हिरण्याक्ष नांवानें जन्माला आले.

हिरण्याक्ष जन्मल्यापासूनच त्रास्य व अत्याचारी निघाला. त्यानें वरुणादिकांना युद्धास आह्वान केलें. पण कोणी युद्धास आला नाहीं. त्यानें रागाच्या भरांत सर्व पृथ्वी उचलून समुद्राच्या खालीं पाताळ लोकांत नेऊन ठेवून दिली. तेव्हां हिरण्याक्ष व वराह रूप विष्णु दोघांचें युद्ध झालें व त्या युद्धांत हिरण्याक्षाचा वध झाला.

भावाचा वध विष्णूनें केल्याचें ऐकून हिरण्यकश्यपूला फार राग आला. त्यानें दानव वीरांना बोलावून वंश रक्षणासाठीं










तयार होण्यास सांगितलें. म्हणाला–"गुप्त रूपानें येऊन ज्या विष्णूनें माझ्या धाकट्या भावाचा वध केला आहे. मी त्या विष्णूचा वध करून त्याच्या रक्तानें आपल्या भावाचें तर्पण करणार आहें. तुम्ही जगांत कोठें ऋषी-मुनी, तप, व्रत, दान आदि कार्यें करतांना दिसले तर त्यांना ठार करा. त्यांचे आश्रम व गांवें जाळून टाका व तपश्चर्या पूजा वगैरे धर्म कार्यें बंद करा."

माकडाच्या हातांत कोलीत दिल्यावर मग काय उशीर. राक्षसांनीं धर्मभीरू व देव भक्त प्रजेवर अत्याचार सुरू केले. नगर, गांव, उद्यान, उपवन, आश्रम सर्व जाळून टाकले.

हिरण्यकश्यपूनें आपल्या मृत भावाचा दहन संस्कार केला. अदिति माता व हिरण्याक्षाची बायको व मुलें सर्वांकडे जाऊन आपली सहानुभूति व्यक्त करून त्यांच्या मनाचें सांत्वन केलें.

नंतर मंदर पर्वताच्या एका दरींत एका पायाच्या फक्त आंगठ्यावर उभें राहून त्यानें खडतर तपश्चर्या सुरू केली. त्याच्या शरिराची उष्णता इतकी वाढली कीं समुद्राला देखील उकळी फुटली व पृथ्वी थरथर कांपूं लागली. देव लोक त्या तापानें घाबरून ब्रह्मदेवाला शरण गेले व प्रार्थना केली कीं ब्रह्मदेवा, या संकटांतून आम्हांला मुक्त करण्याची शक्ति फक्त तुलाच आहे, तरी हिरण्यकश्यपूचा तपोभंग होईल असें कांहीं तरी कर. ब्रह्मदेवाला त्यांची दया आली व त्यानें विनंती स्वीकारून त्यांच्या मनाचें समाधान करून त्यांना निरोप दिला.

ब्रह्मदेव हिरण्यकश्यपूच्या शोधार्थ आला. पण त्याला तो कोठें दिसला नाहीं. कारण त्याच्या अंगावर वारूळ वाढलें होतें व झाडा झुडपांबरोबर वेळूचें एक बेट पण तेथें वाढलें होतें. हिरण्यकश्यपूचें अर्धें अधिक शरीर मुंग्यांनीं व वाळवीनें खाऊन टाकलें होतें.

ब्रह्मदेवानें हिरण्यकश्यपूजवळ जाऊन त्याला आशीर्वाद दिला व म्हणाला–"हिरण्यकश्यपू! तुझी तपश्चर्या पूर्ण झाली आहे. तुला जो हवा असेल तो वर मागून घे. असें सांगून ब्रह्मदेवानें कमंडलांतलें पाणी घेऊन हिरण्यकश्यपूवर शिंपडलें. त्याबरोबर हिरण्यकश्यपु बाहेर आला. त्यानें ब्रह्मदेवाला नमस्कार केला. त्याचें सर्व अंग त्यावेळीं सोन्यासारखें स्वच्छ व चकचकीत होतें. ब्रह्मदेवाचें स्तोत्र





      

करून तो म्हणाला–" देवा, तूं मला वर देणार असशील तर असा वर दे कीं त्या योगें पंचभूतांपैकीं एकाच्याहि हातून माझा मृत्यू होऊं नये. जडचेतन अशा या जगताची जी सृष्टि तूं केली आहेस त्यापैकीं एका वस्तुमुळें देखील मला मरण येऊं नये, युद्धांत माझा पराभव होऊं नये, माझ्या राज्यांत माझ्याविरुद्ध कोणी उलटूं नये आणि जें ऐश्वर्य स्वर्गांत देवांना प्राप्त आहे तें मला मिळावें."

ब्रह्मदेव 'तथास्तु' म्हणून ब्रह्मलोकीं निघून गेला.

ब्रह्मदेवाकडून वर मिळाल्यावर हिरण्यकश्यपूला गर्व चढला व तो विष्णूची निंदा करीत त्रिलोकाचा दिग्विजय करण्यास निघाला. देव, गंधर्व, सिद्ध, यक्ष, भूतप्रेत, राजा, ऋषी, मुनी इत्यादिकांस त्यानें आपले दास करून घेतलें. स्वर्गलोक काबीज करून तो तेथेंच राहूं लागला. लोकपालांनीं व अष्टदिक्पालांनीं येऊन त्याची चरणवंदना केली. गंधर्व, नारद व तंबरू त्याचें स्तोत्र गाऊं लागले व त्याच्या मनोरंजनासाठीं अप्सरा नृत्य करूं लागल्या. स्वर्ग, मृत्यु व पाताळ, सप्त नदी व सप्त समुद्र त्याच्या आज्ञेप्रमाणें वागूं लागले.

देव व दिग्पाल घाबरून जाऊन वैकुंठ लोकीं विष्णूला शरण जाऊन म्हणाले– " देवाधि देवा ! या राक्षसाच्या अत्याचारापासून आमचें रक्षण कर !" तेव्हां आकाशवाणी झाली–" घाबरूं नका. धीर धरा. मी त्या राक्षसाला ओळखतों. मी संधी पाहून त्याचा गर्वपरिहार करीन. त्याचा मुलगा प्रह्लाद याच्यावर तो अत्याचार करूं लागला कीं मी ब्रह्मदेवानें दिलेला वर न मोडतां त्या राक्षसाचा वध करीन."






[ २७ ]

[लखू व त्याच्या अनुयायांनीं भयानक दरींत शिरून मृगराजाला ठार केलें. त्याच वेळीं ब्रह्मदंडी दरींत येऊन पोंचला. जगभोजीला बरोबर घेऊन तो दरीच्या मध्यभागीं आला. जगभोजीच्या आज्ञेनें त्याचा सेवक कल्पकब्रह्मीच्या गुहेसमोर पाहारा देत होता. लखूनें त्याच्या गळ्यांत फांस टाकून त्याचा गळा आवळला. जयमल गुहेजवळ आला. पुढें वाचा.]

जयमल गुहेसमोर जाऊन मोठ्यानें ओरडून म्हणाला—" राजकन्या ! नमस्कार ! आम्ही तिघे आपलीच प्रजा आहों. आमच्या नायकाचें नांव लखू, माझें नांव जयमल व आमच्या या मित्राचें नांव गोमांग असे आहे. दुष्टांच्या सल्ल्यानें महाराजांनीं आम्हांला देशद्रोही समजून धरून आणण्याची आज्ञा काढली होती. पण आमची राजभक्ति अजून कायम आहे. आम्ही त्या दुष्ट ब्रह्मदंडीचें व जगभोजीचें पारिपत्य करून त्यांना यमसदनीं पाठविण्याचें व्रत घेतलें आहे. आतां आपली आज्ञा होईल तसें करावयास आम्ही हजर आहों."



जयमलनें तसें म्हटल्यानंतर गुहेंत हाल-चाल सुरू झाल्यासारखें बांगड्यांच्या आवाजावरून कळलें. काळोखाला मात करून अरुणोदय व्हावा तशी गुहेंतून एक षोडष वर्षीया चंद्रमुखी बाहेर आली. लखू तिचें सौंदर्य पाहून जागच्याजागीं थक्क उभा राहिला.

कल्पकवल्लीनें प्रथम लखूला व नंतर त्याच्या हातीं बंदी असलेल्या जगभोजीच्या सेवकाला पाहिलें. जगभोजीनें तिच्या इच्छे विरुद्ध तिच्या डोक्याला जो हस्तीदंती मुकुट घातला होता तो काढून तिनें दूर फेंकून दिला आणि म्हणाली—"तुमच्या सहाय्यानेंच मला या नरकयातनेंतून सुटका मिळाली. ब्रह्मदंडीच्या लबाडीमुळें माझ्या वडिलांनीं तुम्हांला देशद्रोही समजून कैद करण्याचें त्यांनीं ठरविलें. पण ती चूक होती हें मला माहीत होतें. राज्यांतील इतर दरबाऱ्यांचें तेंच मत होतें. तुम्हीं माझें रक्षण केलें आहे, म्हणून तुम्हांला मी आज्ञा कशी करूं ? मला कांहीं तरी शस्त्र द्या. मी तुमच्या-बरोबर त्या दुष्टांचा संहार करण्यास येतें."

लखूनें आपली तल्वार कल्पकवल्लीला दिली व म्हणाला—"ही तलवार स्वरक्षणासाठीं आपण बाळगावी. या 'रानटी जनावरांची शिकार करण्यास माझ्याकडे धनुष्यबाण आहेत."

जयमलनें लखूच्या हातांतून गळफांस केलेल्या वेलाचें टोक घेतलें आणि जगभोजीच्या सेवकाला विचारलें—"बोल, तुला स्वतःचा जीव वांचविण्याची जास्त फिकीर आहे कीं आपल्या मालकाचा जीव ?"

सेवक धापा टाकीत म्हणाला—"बाबारे ! मी तुझ्या पायां पडतों. माझा जीव घेऊं नकोस. स्वतःच्या जिवाहून जास्त महत्वाचें दुसरें या जगांत काय आहे ?"



"तर मग तें पिंपळाचें झाड कोठें आहे, मुकाट्यानें दाखव. तूं दगा केलास तर तुझी मानगुटी माझ्या हातांत आहे हें विसरूं नकोस." जयमलनें हातांतला वेल दाव्यासारखा जरा हासडून विचारलें.

"ओय ! ओय !" करून सेवक ओरडला व म्हणाला—"जवळची वाट दाखवूं कीं दूरची ?" "जवळची असूं दे किंवा दूरची, तुझ्या मालकाला व त्याच्या बरोबर जाणाऱ्या त्या पिशाचाला कळूं नये कीं आम्ही तेथें जात आहों." जयमल म्हणाला.

"ठीक ! अगदीं तुझ्या हुकमाप्रमाणें काम बजावतों. पण काम भागल्यावर माझा गळा आवळून मला ठार मात्र करूं नकोस." सेवक गयावया करींत म्हणाला आणि त्यांना दरीच्या मध्यभागीं घेऊन गेला. तो एका झाडाजवळ थांबला व दूर उंचावर दिसणारें पिंपळाचें झाड दाखवीत म्हणाला—"तेंच झाड तें. त्याच्या बुंधाशीं अलोट धनाचा ढीग पडला आहे. पण त्याच्या रक्षणासाठीं एक नाग बसला आहे. मला व माझ्या जुन्या गुरूला ही गोष्ट माहीत आहे. परंतु त्याजागीं जाण्याचा अधिकार जन्मल्यापासून ज्याला आहे त्याची वाट पहात होतों."



गोमांगनें तलवार दिल्यावर लखू त्या पिंपळाच्या झाडाकडे निघाला. जयमल व इतर लोक त्याच्या पाठोपाठ थोड्या अंतरावर चालत होते. सेवकाच्या गळ्यांतल्या फांसाचा वेल गोमांगनें आपल्या हातांत धरला होता.

लखू पिंपळाच्या झाडाजवळ पोंचला. त्याच्या बुंधाशीं एक मोठें वारूळ होतें. झाडावर गंडभैरण्ड पक्षी पंख फडफडवून मोठ्यानें ओरडत होते. लखू वारूळाजवळ गेला व त्यानें तलवारीनें त्यावर दोन वार केले. त्या बरोबर नागसांप फूत्कार करीत








बाहेर आला फडा काढून उभा राहिला. सांप चावायला पुढें येण्यापूर्वींच तलवार उगारून लखूनें एक पाऊल पुढें टाकलें. सांपानें फूत्कार करण्याचें सोडलें व स्वतःचें अंग चोरून तो दुसऱ्या वाटेनें वारुळाबाहेर निघून गेला. पिंपळावरचे पक्षी ओरडत त्याच्या पाठोपाठ वर आकाशांत उडत जाऊं लागले.

लखू कांहीं वेळ तें दृश्य आश्चर्य चकित होऊन पहात उभा राहिला. त्यानंतर त्यानें वारूळ खणून काढण्यासाठीं तलवारीनें टोंचून तें फोडले. दोन तीन मिनिटें निस्तब्धता होती. पण शेजारींच झाडीच्या आड कोणी तरी चाबकानें मारीत असावा असा आवाज ऐकूं आला. लखूनें तिकडे पाहिलें.

**ब्रह्मदंडी,** जगभोजी व त्यांच्या पाठीमागून गरुडराज, महाकाय, जितवर्मा व शक्तिवर्मा सर्वांनीं हंसत खिदळत प्रवेश केला. महाकाय आपल्या चाबकानें नुसता आवाज काढीत होता. लखू व ब्रह्मदंडीची दृष्टादृष्ट होतांच ब्रह्मदंडी स्मित करून म्हणाला—"लखू, तुला कोट्याधीश कुबेर करण्यासाठीं मी स्वतःचा जीव धोक्यांत घातला. कांहीं असो त्या झाडाच्या बुंधाशी असलेल्या अलोट



संपत्तिचा वारस एकटा तूंच आहेस. काळ-भैरवानें त्या दिवशीं सांगितलेलें भविष्य आज खरें झालें. तो नागसांप पहा, तुला पाहतांच कसा फडाखालीं करून निमूटपणें बाजूला सरकला. आतां तूं हो बाजूला पुढलें काम आम्ही पाहून घेऊं." असें म्हणत तो लखू उभा होता तिकडे येऊं लागला.

जितवर्मा व शक्तिवर्मानें तलवारी उप-सल्या. महाकाय चाबूक घेऊन पुढें सरसावला.

पण लखू तलवार घेऊन आडवा उभा राहिला. ब्रह्मदंडी व त्याच्या बरोबरच्या लोकांकडे पाहून म्हणाला—"तुम्ही जागच्या जागीं उभे रहा. एक पाऊल देखील पुढें टाकलेंत तर जागच्या जागीं जमिनीवर तुमचीं प्रेतें लोळूं लागतील."

तें ऐकून जगभोगी आणि ब्रह्मदंडी जोर जोरानें हंसूं लागले. "याला आमच्या गरुड वंशीयांचा प्रताप अद्याप कळलेला दिसत नाहीं!" गरुडराज म्हणाला.

"तो माझा जुना गुलाम आहे. तो इतक्या धैर्यानें तें बोलत आहे त्याचा कांहीं ना कांहीं तरी अर्थ असला पाहिजे. त्या वायफळ गप्पा नाहीं वाटत मला. या जागीं





रक्तपात झाल्यास आपण त्याची जबाबदारी घ्यायला तयार नाहीं." असें म्हणत त्यानें चाबूक खांद्यावर टाकला.

पण जितवर्मा व शक्तिवर्मा पुढें येत म्हणाले—"आपल्या पकीं एक जण याचें मुंडकें उडवूं या आणि दुसरा पाय कापील."

लखू तें ऐकून जितवर्मा व शक्तिवर्मा दोघाशी चार हात करण्यासाठीं पुढें सरसावला मात्र "गुरु मौनानंद की जय!" चा जयघोष ऐकूं आला. लखूचा म्हातारा बाप व त्याच्या पाठीमागून मार्जार जातीचा नायक व श्वानकर्णी झाडीच्या आडून पुढें आले. त्यांना पाहून स्वतःच्या बचावासाठीं ब्रह्मदंडी एका बाजूला पळत ओरडला—"काळभैरवा! हा काय रे अनर्थ!"

त्याच बाजूनें जयमल व गोमांग सेवकाला धरून आले. आतां ब्रह्मदंडीला पळवाट मिळणें अशक्य झालें.

कल्पकवल्लीला तलवार घेऊन पुढें येत असलेली पाहून जगभोजी ओरडला—"दगा! दगा! माझी भावी पत्नी गुहेच्या बाहेर कशी आली? कोठें आहे तो स्वामिद्रोही सेवक?" "मालक! मी इकडे आहें! गळ्यांत फांस पडला आहे. हे लोक मला धरून आहेत. स्वतःचा जीव कोणाला नको आहे?" सेवक म्हणाला. इतक्यांत सर्व थक होऊन पहात असतां कल्पकवल्ली सिंहणीसारखी झडप मारून जगभोजी होता तिकडे गेली, तलवारीचा वार करून जगभोजीचें मुंडकें उडविलें.

जगभोजी मरून पडलेला पाहून ब्रह्मदंडी हात जोडून गयावया करून म्हणाला—"लखू! मी तुझ्या पायां पडतों. मला जीवदान दे! जयमल तूं कित्येक वर्षें माझें शिष्यत्व करून मंत्रविद्या शिकून घेतली आहेस. तें सर्व आठव."



लखू आपल्या म्हाताऱ्या बापाकडे धांवत गेला व त्याला मिठी मारून म्हणाला—"बाबा! या जन्मीं पुन्हां तुमची भेट होईल असें नव्हतें मला वाटलें.

म्हाताऱ्याचा कंठ गहिंवरून आला. तोंडा वाटे एक देखील शब्द आला नाहीं. डोळ्यांतून आनंदाश्रु वहात होते. त्या पिता पुत्रांची भेट पाहून तेथें हजर असलेल्या सर्वांचे डोळे आनंदातिरेकानें ओले झाले.

मार्जार व श्वानकर्णी लखूजवळ येऊन येऊन म्हणाले—"लखू तूं व तुझ्या साथ्यांनीं गरुड जातीच्या पंखवाल्या नरराक्षसांच्या हातून आमच्या जातीचें रक्षण करण्यास जें सहाय्य केलें तें आणि आमचें आपसांतील भांडण मिटवून तूं मार्जार व श्वानकर्णी जातीचें सख्य घडवून आणलेंस तें आम्ही जन्मोजन्मीं विसरणार नाहीं."

ब्रह्मदंडी मांत्रिक, गरुडराज, गुलामांचा मालक महाकाय वगैरेंना कैद करण्यांत आलें. जगभोजीच्या सेवकानें आपलें वचन पाळलें म्हणून त्याला मुक्त करण्यांत आलें. तेथें जमा असलेल्या सर्वांचा परिचय राजकन्येशीं करून देण्यांत आला. नंतर मार्जार व श्वानकर्णी दोघांच्या अनुयायांनीं ब्रह्मपुराचा



राजा व राजगुरु यांना कल्पकवल्लीच्या सुटकेची बातमी देऊन बोलावून आणलें.

लखूनें पिंपळाच्या बुंधाशीं असलेल्या वारुळाकडे बोट दाखवून त्याच्या खालीं अलोट धनराशी आहे हें सांगितलें. म्हणाला—"हें वारूळ खणून काढल्यास त्याचें मालक महाराज होतील! मला त्या धनाचा मोह नाहीं. मी यानिमित्तें आपल्या राजाची थोडी सेवा करूं शकलों याबद्दल धन्यता वाटते."

राजानें एकदां लखूकडे व एकदां राजकन्येकडे सार्थक दृष्टीनें पाहिलें. दोघें स्मित

करीत असलेले पाहून त्याच्या मनाला आनंद झाला. तो स्मित करून लखूला म्हणाला—"लखू! माझ्यावर रागावलास तर नाहींस ना! मी तुला, तुझ्या बापाला व तुझ्या मित्रांना देशद्रोही समजून रानोमाळ हिंडायला लावलें याबद्दल तुला राग येणें साहजिक आहे. चूक माझी आहे. त्या चुकीची दुरुस्ती म्हणून मी एक गोष्ट सांगतों. राजकन्येचें अपहरण झाल्यानंतर मी घोषणा केली होती कीं जो कोणी राजकन्येला सोडवून आणील त्याच्याशीं तिचें लग्न करून आपलें अर्धें राज्य पण देईन."

राजगुरु लखू व जयमल दोघांच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला—"तुम्हांला जे कष्ट सहन करावे लागले त्याबद्दल महाराजांपेक्षां मीच जास्त जबाबदार आहें. ब्रह्मदंडीच्या बोलण्यावर विश्वास करून मी तुम्हांला देशद्रोही मानलें. पण तूं आपल्या कर्तव्यास जागलास व स्वतःच्या प्राणाची पर्वा न करून महाराजांची सेवा केलीस."

नंतर वारूळ खणण्यांत आलें. तेथें एक मोठें भुयार मिळालें आणि त्यांत मणि, माणिक्यें व अनेक प्रकारचीं रत्नें सोनें, चांदी पाहून सर्व चकित झालें. ते सर्व धन हत्ती, घोडे व उंटाच्या पाठीवर ठेवून सर्व राजधानीला परतले. राजकन्या कल्पकवल्लीशीं लखूचा विवाह झाला. त्याला "राव लक्ष्मणराव बहादूर" म्हणून ब्रह्मपूरचें अर्धें राज्य मिळालें.

म्हातारपणीं लखूच्या बापाचें मन हरि-भजनांत रमलें. मरणसमयीं राजानें लखूलाच आपला वारस नेमलें. जयमल त्याचा मंत्री झाला. गोमांग व गडेजंग यांना सेनापति नेमण्यांत आलें.

[संपूर्ण]



# चोरांचा पाठीराखा

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं झाडाजवळ जाऊन त्यानें तें प्रेत उतरविलें व खांद्यावर टाकून स्मशानाकडे जाऊं लागला. चार पावलें जातांच प्रेतांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा मौन व्रताचें महात्म्य फार मोठें आहे. पण फक्त मौन व्रतानें काम भागत नाहीं. त्यांत सुद्धां बरींच संकटें उद्भवतात. शमिक ऋषीच्या गळ्यांत त्याच्या मौनपणामुळेंच परीक्षित राजानें सांप अडकविला आणि त्याचा जो परिणाम झाला तो तुला माहीतच आहे, शमिकुमार शृंगीनें त्याला सर्प दंशाचा शाप दिला. ह्या शमिक ऋषीप्रमाणेंच आणखी एक मौन व्रती होता. त्याला देखील आपल्या मौनपणामुळेंच अनेक विघ्नांना तोंड द्यावें लागलें. मी तीच गोष्ट तुला आज सांगणार आहें. तूं लक्ष देऊन

वेताळाच्या गोष्टी

ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगून लागला.

एक माणूस सर्व माया मोह सोडून तप करण्यासाठीं वनांत गेला. तेथें त्यानें एका निर्जन स्थानीं तपश्चर्या सुरू केली. कंदमुळें खाऊन, झऱ्याचें पाणी पिऊन, मौन व्रत धारण करून तो तपश्चर्येमध्यें मग्न झाला. त्या जागीं कधीं कोणी माणूस आला कीं तो आपली जागा बदलून दुसऱ्या निर्जनस्थळीं जात असे.

त्याला सारखी जागा बदलावी लागे. असे होतां होतां तो मराळ देशांतील घनदाट अरण्यांत जाऊन पोहोंचला. तेथें त्यानें अशी जागा हुडकून काढली कीं त्या ठिकाणीं मनुष्य येणें अशक्य होतें. ज्या गुहेंत तो राहूं लागला तेथून जवळच एक झरा वाहात होता. चारी बाजूनें निबिड अरण्य होतें. किरें झाडीमुळें दिवसांसुद्धां तेथें काळोख असे. अशा जागीं बसून तो निर्धास्तपणें तपश्चर्या करूं लागला.

वास्तविक ती जागा चोरांची गुप्त जागा होती. चोर तेथील एका गुहेंत आपला खजीना ठेवीत असत आणि गुप्त मसलती करण्यासाठीं तेथें जमत असत.

एक दिवस तो असाच तप करीत बसला असतां चोरांची टोळी तेथें आली. समाधिस्थ मुनीला पाहून चोरांना आश्चर्य वाटलें.

"अरे, हा कोणी तरी येथें ढोंग करून बसला आहे!" एक जण म्हणाला.

"हा आपली माहिती शिपायांना सांगील. ह्याला येथून हाकलून लावला पाहिजे." दुसरा म्हणाला. "मुनि म्हणून ह्याच्यावर विश्वास ठेविण्यांत अर्थ नाहीं. ह्याला मोक्ष दाखविला पाहिजे." आणखी एकजण म्हणाला.

सरदार सर्वांचें बोलणें ऐकत होता. त्यानें आपल्या साथीदारांना कांहींच उत्तर





दिलें नाहीं व शांतपणें त्या मुनीला म्हणाला— "मुनिवर! आपण तपश्चर्या करण्यास येथें आला आहांत. परंतु ही जागा आमची आहे. आम्ही येथें रहात असतों. हें अरण्य आमचें आहे. आम्ही येथील राजे आहोंत. आपल्या दोघांची ध्येयें वेगवेगळीं असल्यानें एकत्र राहाणें आपल्याला जमणार नाहीं. म्हणून मी आपणांस नम्र विनंति करतों कीं आपण येथून दुसरीकडे जाऊन तप करावें."

मुनीचें तप भंग झालें. त्यानें डोळे उघडून पाहिलें. परंतु तो कांहीं एक बोलला नाहीं. कारण मौनव्रत होतें. मुनि बहिरा आहे असें समजून चोरांच्या सरदारानें तेंच पुन्हां ओरडून सांगितलें. तरी सुद्धां मुनि गप्प.

"बघत काय बसलां आहेस? तो जर कांहीं बोलत नाहीं तर काढ तलवार आणि उडव डोकें." दुसऱ्या चोरांनीं सरदाराला सल्ला दिला.

"सरदारानें तलवार उपसली आणि मुनीचें डोकें उडवण्यासाठीं हात वर उगारला. त्याबरोबर मुनीनें हात वर करून त्याचा हात धरला व त्याला थांबविलें. मुनीचा हात लाल लाल झालेला होता आणि तो अगदीं लाल तापलेल्या लोखंडाप्रमाणें त्याला लागला. हाताला चटका बसतांच सरदारानें आपला हात झटकन मागें घेतला.

एवढें झाल्यावर मुनीनें आपलें मौन सोडलें व त्याला म्हणाला—"बाबा रे! घोर नरक यातनेंतून सोडविण्यासाठींच मी तुला हत्या करूं दिली नाहीं. मरणाचें मला भय वा दुःख नाहीं. परंतु तुला जें ब्रह्म-हत्येचें पाप लागलें असतें त्यांतून तुला जन्म जन्मां-तरी सुद्धां मुक्ति मिळाली नसती. माझा कोणावरहि राग नाहीं. जा आतां तुम्ही आपल्या वाटेनें."












सरदारानें मुनीला साष्टांग नमस्कार करून म्हटलें—"आम्हांला आमचें गुपित फुटण्याची शंका वाटते. म्हणून आपण आम्हांला वचन देत असाल तर खुशाल निश्चितपणें येथें राहून तपश्चर्या करा. आम्हांला हरकत नाहीं. तुम्हांला त्रास होणार नाहीं व आम्हीं निर्भय होऊन राहूं."

"मी कशाला कोणाचें नुकसान करीन? ज्याला त्याला आपापल्या पापपुण्याचें फळ मिळत असतेंच. तुम्ही जर पाप केलें नाहीं तर तुम्हांला कसली काळजी?"

ह्या नंतर चोर त्या मुनीच्या वाटेस गेले नाहींत. त्यांचें चोरीचें काम चालू होतेंच.

असे कांहीं दिवस गेले. एक दिवस एक कोतवाल आपल्या कांहीं शिपायांना बरोबर घेऊन चोरांच्या सरदाराचा पाठलाग करीत करीत तेथें आला. सरदार आपल्या गुप्त जागीं येऊन गुहेंत लपून बसला होता.

कोतवालानें त्या मुनीला विचारलें कीं येथें तुम्हीं कोणाला पाहिलेंत का? एक चोर जोर जोरानें पळत पळत ह्याच बाजूला आलेला आम्ही पाहिला.

त्याच वेळीं मुनि आपली समाधि उतरल्यावर उठत होता. कोतवालानें बोलणें त्याला ऐकूं आलें. परंतु त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. कोतवालानें विचारलें कीं येथें कोणी आला आहे का? तरी देखील मुनि मौनच. शेवटीं कोतवालानें दरडावून विचारलें. तो म्हणाला—"ए गोसावड्या! तूंच ह्या चोरांचा गुरु आहेस असें दिसतें. हें बघ आम्ही ज्या चोराचा पाठलाग करीत आहोंत तो एका चोरांच्या टोळीचा सरदार आहे. तो कोठें लपून बसला आहे, नक्की तुला माहीत असणार. त्याला पकडण्यास तूं जर आम्हांला मदत केली नाहींस तर आम्हीं तुझेंच डोकें उडवूं." असें म्हणत त्यानें आपली तलवार बाहेर काढली.

तरी देखील मुनीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. तो मौनच राहिला. एवढेंच नव्हे तर त्यानें आपली मान कोतवालापुढें वांकविली.

कोतवाल त्या मुनीला मारणार एवढ्यांत झाडांच्या आड लपलेला चोरांचा सरदार पुढें येऊन म्हणाला—"ह्या बिचाऱ्याला कां मारतां? हा तर एक पुण्यवान महात्मा आहे. तुम्हांला पाहिजे असलेला चोर मी















आहें. मला पकडा. त्या थोर पुरुषाच्या वाटेस जाऊं नका."

कोतवालानें लगेच त्या चोराच्या हातांत हतकड्या बेड्या अडकविल्या आणि त्याला घेऊन गेला.

एवढी गोष्ट सांगून वेताळ थांबला व त्यानें राजाला विचारलें—"त्या मुनीनें असें कां केलें? चोराच्या सरदारानें त्याला मारण्यासाठीं तलवार उगारल्यावर त्यानें सरदाराचा हात धरून त्याच्या हातून ब्रह्महत्येचें पाप घडूं नये म्हणून त्याला वांचविलें. मग तेंच पाप कोतवालालाहि लागलें असतें. मग तेव्हां मात्र त्यानें मान कां वांकविली? त्या मुनीला चोरांचीच कां एवढी दया आली? चोरांना वांचवण्यांत त्याला कां अभिमान वाटला? ह्या प्रश्नांची उत्तरें माहीत असल्यास तूं दिलीच पाहिजेत. नाहींतर परिणाम तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"शांत मुनीनें पक्षपात मुळींच केला नव्हता. जर चोरानें त्याला मारलें असतें तर त्याला ब्रह्म हत्येचें पाप लागलें असतें. पण कोतवालानें त्याला ठार केलें असतें तें न्याय्य ठरलें असतें. कारण कोतवालाच्या दृष्टीनें तो चोर होता आणि पुन्हां चोराचा पत्ता माहीत असून त्यानें कोतवालाला तो सांगितला नव्हता. म्हणजे त्या मुनीला पाप लागलें असतें. म्हणून त्यानें मुकाट्यानें आपली मान खालीं वांकविली."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ अदृश्य झाला व प्रेतासकट पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# मत्स्य मनुष्य

फार प्राचीन काळीं हिंदुस्थानाच्या पश्चिमेकडे समुद्रकांठापासून सुमारें पन्नास-पाऊणशें मैलांवर लकदीव बेटानजीक एक बेट होतें. तें बेट खडकाळ असल्या-कारणानें त्यावरची बरीचशी जमीन शेतीला किंवा इतर दृष्टीनें देखील उपयोगी नव्हती. म्हणून बेटावरचे रहिवाशी मासे मारीचा धंदा करीत. उत्तम नावाडी म्हणून देखील ते प्रसिद्ध होते. कित्येक बुडी मारून समुद्रतळाच्या रंगारंगाच्या शिंपा व मोती काढून आणून व ते व्यापाऱ्यांना विकून आपला उदर निर्वाह करीत.

एक म्हाताऱ्या रहिवाशाला पुष्कळ मुलें होतीं. कांहीं मुलें मासे धरण्याचें काम करीत व कांहीं मोती काढण्याचा धंदा करीत. एका दोघाला मोठ्या व्यापाऱ्यांच्या पदरीं याच कामासाठीं नोकरी पण मिळाली होती. सर्वांत धाकटा मुलगा लहानपणा-पासूनच विचित्र स्वभावाचा निघाला. त्याला मासे तडफडून मरत तें पाहवत नसे. बाप व मोठे भाऊ टोपलें भरून मासे धरून पाटींत ठेवीत. तेव्हां तडफडत असलेला मासा दिसला कीं तो त्याला उचलून समुद्रांत टाकून देई. किनाऱ्याला होडी लागेपर्यंत पाटी अर्धीच राहून जाई. त्याच्या या स्वभावामुळें अर्थातच तो मासे धरण्याचें काम शिकला नाहीं. परंतु त्याचें माशांवर व समुद्रावर फार प्रेम होतें. बाप व भाऊ त्याला "बावळट व मूर्ख" म्हणून रागावत तेव्हां तो समुद्रकाठीं तासन तास बसून राही. समुद्राच्या तळाला जाऊन तेथील गमतीच्या वस्तु पाहून त्या उचलून

श्री. का. म. पवार










आणण्यांत मात्र त्याला मजा वाटे. म्हणून त्यानें समुद्राच्या तळाला जाऊन जास्तच जास्त वेळ राहण्याची संवय लावून घेतली. तेथें त्याला विचित्र वनस्पती व मासे बघायला मिळत व गंमत वाटे.

तो वयांत आला तेव्हां पाण्यांत बुडी मारून जास्तच जास्त वेळ राहण्यांत त्याचा हात धरूं शकेल असा एक देखील तरुण त्या बेटावर नव्हता. म्हणून लोक त्याला 'मत्स्य मनुष्य' म्हणूं लागले. तो उजाड-तांच घरांतून बाहेर पडे समुद्रांतच सारा दिवस घालवून संध्याकाळीं काळोख पडल्यावर घरीं परत येई. दिवसभर त्यानें समुद्राच्या तळाशीं ज्या कांहीं विचित्र विचित्र वस्तू पाहिल्या त्यांचें वर्णन करून आपल्या भावांना सांगे. समुद्राच्या तळाला कित्येक नावा, होडक्यां व जहाजें त्याला आढळलीं. त्यांत समुद्रांतले वनस्पती वाढलेले दिसत. एकदां पांढऱ्या शुभ्र पन्ना जातीच्या हिऱ्याला तांबड्या व पांढऱ्या फांद्या लाग-लेल्या पाहून व नक्षत्रासारखे सुंदर मासे पाहून तर त्याला फारच आश्चर्य वाटलें.

त्यानें आपल्या भावांना त्या विचित्र पन्नाच्या रोपट्याचें व नक्षत्र मत्स्याचें वर्णन करून सांगितलें. तेव्हां त्याच्या भावांना वाटलें कीं याचें डोकें तर फिरलें नाहीं. त्याला वेड लागूं नये म्हणून त्याच्या आईनें त्याच्या गळ्यांत मंत्रवलेला ताईत व हातांत गंडा बांधला. परंतु त्याच्या स्वभावांत कांहीं एक फरक पडला नाहीं. उलट त्याची कीर्ति बेटावर सर्वत्र पसरली व शेवटीं ती मत्स्य मनुष्यांची ख्याती राजाच्या कानावर जाऊन पोंचली. म्हणून राजानें त्याला राजवाड्यांत भेटायला बोलाविलें.

तो राजवाड्यांत गेला तेव्हां राजाच्या बरोबर धाकटी राजकन्या पण बसली होती.



राजानें त्याला विचारलें—"तूं समुद्राच्या तळाला जाऊन बराच वेळ तेथें राहतोस म्हणे. आणि दुसरा कोणी तुझ्या इतका तरबेज या कामांत नाहीं असें देखील ऐकलें आहे."

"मला इतरांच्या विषयीं कांहीं माहीत नाहीं, महाराज!" मत्स्य मनुष्य म्हणाला.

"मी तुझी परीक्षा घेणार आहें!" असें म्हणत राजा आपल्या विहार नौकेंत मुलीला घेऊन त्या मत्स्य मनुष्याबरोबर निघाला. समुद्रांत खोल पाण्यांत विहार नौका पोंचल्यावर राजानें एक सोन्याचें भांडें समुद्रांत टाकलें व तें घेऊन यायला मत्स्य मनुष्याला सांगितलें.

त्यानें समुद्रांत बुडी मारली. तो सोन्याच्या भांड्याबरोबर पन्ना वनस्पतीची एक फांदी देखील तोडून घेऊन आला. सोन्याचें भांडें राजाला व पन्ना वनस्पतीची फांदी राजकन्येला तो देऊं लागला.

"तें तूं आपल्याजवळच स्वतःसाठीं ठेवून घे. याहून मोठी परीक्षा घेणार आहें मी!" राजा म्हणाला.

"आज्ञा करावी, महाराज!" तो म्हणाला.














"तूं बेटाच्या काठा-काठानें समुद्राच्या तळाशीं महत्वाचें असें काय आहे हें सांग!" राजा म्हणाला.

"आपल्याला विनाकारण फार वेळ थांबावें लागेल." मत्स्य मनुष्य म्हणत असतां मध्येंच राजा म्हणाला–"हरकत नाहीं. किती दिवस लागले तरी हरकत नाहीं. तूं पाहिजे तर मधून मधून विश्रांती घे. पण बेटाच्या काठाकाठानें समुद्रांत काय काय आहे हें कळलें पाहिजे."

"बरें तर येथेंच थांबावें महाराज!" असें सांगून व राजकन्येकडे एकदां पाहून त्या मत्स्य मनुष्यानें समुद्रांत बुडी मारली. त्याला परत यायला तीन महिने लागले.

त्यानें बाहेर येऊन महाराजांना नमस्कार करून निवेदन केलें–"महाराज! समुद्राच्या तळाला तीन मोठे पर्वत आहेत. त्या पर्वतांवरचे दगड डोंगरावर आढळणाऱ्या दगडाहून अगदीं वेगळ्या तऱ्हेचे व रंगाचे आहेत. त्यांतला एक वितळून जाऊं लागला आहे."

"वितळून जाऊं लागला आहे? कां?" राजानें विचारलें.

"त्याच्या बुडाला अग्नि आहे व त्यामुळें दगड वितळून डोंगर लहान होत आहे. जवळपास एक देखील वनस्पति नाहीं की मासा फिरकत नाहीं." मत्स्य मनुष्य म्हणाला.

"पाण्यांत विस्तव?" राजानें विचारलें.

"होय महाराज! तो सामन्य अग्नि नसून वडवाग्नि आहे. पाण्यानें तो विझत नाहीं." तो म्हणाला.

"वडवाग्नीचें वर्णन मी ऐकलें आहे. पण प्रत्यक्ष डोळ्यानें कधीं तो पाहिला नाहीं. तूं थोडा वडवाग्नि घेऊन ये." राजा म्हणाला.



"पण अग्नि आणायचा कसा महाराज?" त्या तरुण मत्स्य मनुष्यानें विचारलें.

"तें आतां मीं काय सांगूं? तें तुलाच माहीत असलें पाहिजे." राजा म्हणाला.

त्यानें पुन्हां बुडी मारली. वडवाग्नीजवळ जाण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. हात पाय भाजले. तो तसाच बिहार नौकेजवळ येऊन म्हणाला–"महाराज! अग्नि आणणें कांहीं मला शक्य झालें नाहीं. पण अग्नि असल्याचें प्रमाण मात्र बरोबर घेऊन आलों आहें." असें सांगून त्यानें भाजलेले हात पाय राजाला दाखविले.

"आतां तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास बसला. 'मत्स्य मनुष्य' म्हणून तुला तुझे जातभाई हाक मारतात ते उगीच नाहीं हें मला आतां कळलें.

"महाराज! या खेपेस मी वडवाग्नि जवळून पाहिला." अग्नीनें डोंगराच्या बऱ्याचशा भागाचें भक्षण केलें आहे. आपल्या बेटावर लवकरच मोठें संकट येणार आहे असें मला वाटूं लागलें आहें." तो म्हणाला.

राजाला त्याचें म्हणणें खरें वाटलें व राजानें त्याच दिवशीं बेट सोडून दुसऱ्या बेटावर जाण्यास बेटावरील रहिवाशांना सांगितलें व स्वतः देखील त्यांच्याबरोबर दुसऱ्या बेटावर निघून गेला. आणि दैव योग असा कीं इकडे राजानें प्रजेसह बेट सोडलें आणि एक मोठा भूकंप होऊन तें बेट समुद्रांत बुडून गेलें.

राजानें मत्स्य मनुष्यावर राजकन्येचें प्रेम आहे हें ओळखून त्याच्याशीं तिचा विवाह करून दिला व त्यालाच आपला वारस पण नेमलें.







# हुशार मुलगी

वज्रदत्त नांवाचा एक प्रजावत्सल राजा प्रजेला सुखी करण्यासाठीं नित्य झटत असे. तो वेश पालटून राजधानींत व खेडोपाडीं हिंडे व प्रजेला कष्ट असेल तें निवारण करीत असे. राजाच्या मंत्र्याचें नांव सूक्ष्मबुद्धि असें होतें.

एकदां राजा आपल्या मंत्र्याला बरोबर घेऊन एका परदेशी व्यापाऱ्याचा वेश करून एका गांवीं गेला. एका झोंपडींतून कोणी-तरी कण्हत असल्याचा आवाज ऐकून दोघे बाहेर उभे राहून ऐकूं लागले. एक पुरुष आपल्या मुलीला म्हणाला—"काय करावें हें मला देखील सुचत नाहीं. त्या परमेश्वरानें तुझ्या आईला वांचविलें तरच ती वांचणार!"

तें ऐकून राजा झोंपडीच्या दरवाज्या-समोर जाऊन उभा राहिला. आंत एक म्हातारी कण्हत असलेली व शेतकरी डोकें धरून बसलेला दिसला. खांबाला टेकून त्याची मुलगी मान खालीं करून रडत उभी होती. एका परदेशी व्यापाऱ्याला दारासमोर उभा पाहून शेतकरी पुढें आला.

"कां रे बुवा तूं एवढा दुःखी? आम्ही तुला मदत करण्यासारखें कांहीं असलें तर सांग" राजा म्हणाला.

"मी गरीब शेतकरी आहें. माझी बायको आजारी आहे. औषध पाण्याला कमींत कमी वीस रुपये तरी पाहिजेत. मला गरिबाला कोण कर्ज देणार? कोणी दिलें तर तें मी एका महिन्यांत फेडीन एवढें वचन देतों. किल्येकांच्या पायधरण्या केल्या पण कोणी मदत करायला तयार नाहीं. गहाण ठेवायला देखील माझ्याकडे कांहीं नाहीं." शेतकरी म्हणाला.

"हे घे वीस रुपये! पण कर्जाची फेड एका महिन्यांत कशी काय करणार तूं?" राजानें विचारलें.

"मोलमजुरी करून, स्वतःला गहाण ठेवून मी एका महिन्याच्या आंत कर्जाची फेड करीन." शेतकरी म्हणाला.

राजानें मंत्र्याला सांगून शेतकऱ्याला वीस रुपये दिले. शेतकरी चकित होऊन म्हणाला—"आपण कोण, कोठें राहतां, मला माहीत नाहीं. केवढी कृपा केली या गरिबावर? किती व्याज द्यायचें हें नाहीं सांगितलेंत."

"व्याजबीज देण्याची जरूर नाहीं. वीस रुपये मात्र न विसरतां महिनाअखेर परत कर. पुढल्या शुक्ल चतुर्थीला राज-धानींतल्या गणपतीच्या देवळांत गणपतीच्या पूजेच्या वेळीं आम्ही हजर राहूं. तेथें आणून दे." असें सांगून राजा मंत्र्याबरोबर पुढें निघून गेला.

स्वतः देवानेंच गरिबावर करुणा भाकून हात दिला आहे असें समजून त्यानें देवाला नमस्कार केला आणि बायकोची चिकित्सा



एका चांगल्या वैद्याकडून करविली. त्याच्या बायकोला लवकरच आराम पडला. त्यानें देवाचे आभार मानले. परंतु वचन दिल्या-प्रमाणें तो गणेश चतुर्थीला कर्जफेड करण्यासाठीं गणपतीच्या देवळांत गेला नाहीं. कांहीं पैसे कमी पडले म्हणून त्याला कर्ज देणाराला तोंड दाखविणें अवघड वाटलें. पैसे पुरे जमा झाल्यावर कर्ज देणाराची माफी मागावी व कर्जफेड करावी असा त्यानें विचार केला.

गणेश चतुर्थीला शेतकरी न आलेला पाहून राजा मंत्र्यासह दुसऱ्या दिवशीं

सौ. कमलाबाई देशमाने









त्याच्या घरीं गेला व हाक मारून 'आंत कोण आहे' म्हणून त्यानें विचारलें.

"मी आहें!" त्यांना दरवाज्यांत उभे पाहून शेतकऱ्याची मुलगी म्हणाली. ती पुढें म्हणाली—"जें दिसत नाहीं तें ठीक आहे. सर्वत्र प्रकाश आहे. काळोख कोठें देखील नाहीं."

परंतु राजाला तें कांहीं कळलें नाहीं. त्यानें मंत्र्याच्या तोंडाकडे पाहिलें. त्याला सर्व कळलें असल्यासारखें दिसत होतें.

"तुझे बाबा कोठें आहेत?" मंत्र्यानें विचारलें.

"वर चढून सूर्याचे डोळे बंद करायला गेले आहेत." ती मुलगी म्हणाली.

"तुझी आई कोठें आहे?" मंत्र्यानें विचारलें.

"विहिरीच्या खांबाच्या पाण्यांतून पैसे वेंचायला गेली आहे." मुलगी म्हणाली.

"अन् तूं काय करते आहेस?" मंत्र्यानें विचारलें.

"सोन्यांतून चांदी काढून विस्तवांत टाकली आहे." मुलगी म्हणाली.

"आम्ही येऊं हें तुझ्या बाबांना माहीत नव्हतें का? काल आम्ही वाट पाहिली!" मंत्री म्हणाला.

"माहीत होतें. दहा जोड्यांत एक जोडी कमी असल्यानें तोंड उघडायला लाज वाटली. त्यानें तुम्हांला दहा वेळ डोळे झांकून उघडल्यावर भेटण्याचें ठरविलें आहे." मुलगी म्हणाली.

"आम्ही कोण हें माहीत आहे का तुला?" मंत्र्यानें विचारतां ती म्हणाली—"तीन लक्ष!" आणि तिनें दोघांना नमस्कार केला.

"बरें तर जा, कर आपलें काम!" असें सांगून मंत्र्यानें राजाला परत चलण्यास खूण केली.

राजानें चकित होऊन मंत्र्याला विचारलें—"तीं उत्तरें तुम्हांला कळलीं का? मला कांहींदेखील अर्थबोध झालेला नाहीं."

"मुलगी गरिबाच्या घरीं जन्माला आली असली तरी आहे हुशार!" मंत्री म्हणाला.

"पण ती म्हणाली त्याचा अर्थ काय?" राजानें पुन्हां विचारलें.

"तिच्या बोलण्याचा अर्थ असा कीं आईची प्रकृति चांगली सुधारली आहे. सर्व सुखी आहों. कष्टाचे दिवस संपले. दिसत नाहीं तें म्हणजे प्राण अर्थात प्रकृति. प्रकाशाचा अर्थ सुख व काळोख म्हणजे













दुःख कष्ट! सूर्याचे डोळे बंद करायला तिचा बाप गेला आहे, याचा अर्थ छपराला भोकें आहेत तीं वर चढून बंद करायला गेला आहे. छपराच्या भोकांतून सूर्य पाहातो ना? तें काम शेतकरी त्या वेळीं करीत होता. तिची आई विहिरी शेजारच्या ताडावरची ताडी काढून विकायला बसली आहे. खांब म्हणजे ताड. त्यावरचें पाणी म्हणजे ताडी. त्यांतून पैसे वेंचणें म्हणजे ती विकणें. नंतर ती मुलगी स्वतः काय करीत होती हें विचारतां म्हणाली—"सोन्यांतून चांदी काढून" म्हणजे धान्य कुटून त्यांतले तांदूळ काढून ते चुलीवर ठेवले आहेत. नंतर काल बाप कां नाहीं आला तेव्हां म्हणाली—वीस रुपयांत दोन कमी पडले म्हणून त्यांना लाज वाटली. दोन रुपये मिळवून नंतर भेटावें. दहा दिवसांनीं तो येऊन भेटणार आहे. तिनें दहा वेळां डोळे मिटून उघडण्याची गोष्ट सांगून म्हणजे दहा रात्री गेल्यावर पैसे परत करूं हें सुचविलें."

कांहीं वेळ विचार करून राजानें विचारलें—"हें सर्व ठीक! पण 'तीन क्षक' म्हणून आम्हांला ओळखलें त्याचा काय अर्थ?"

"अगदीं बरोबर नाहीं का तिनें ओळखलें आपल्याला? आपण दोघे रक्षक आहों तर भक्षक देखील आहों आणि शिक्षक देखील आहों! तीन क्षकचा अर्थ असा आहे." मंत्री म्हणाला.

त्या मुलीचें तें चातुर्य पाहून राजा इतका खूष झाला कीं त्यानें त्या शेतकऱ्याला आदरपूर्वक दरबारीं बोलावून त्याला वीस रुपये परत करण्याची गरज नाहीं असें सांगितलें व इतक्या हुशार मुलीचा बाप म्हणून त्यानें त्याचें अभिनंदन केलें व मुलीला वस्त्रें व दागिने पाठविले.





# चप्पल चोर

एका गांवांत सखाराम नांवाचा एक शेतकरी राहात असे. त्याच्याजवळ थोडीशी जमीन होती. तींत तो भाजीपाला लावून आठ दिवसांनीं एकदां बाजारांत जाऊन विकत असे. अर्थातच येतांना तो गरजेचें सामान विकत घेऊन येत असे. जेव्हां जेव्हां तो बाजारांत जाई येतांना नियमितपणें देवदर्शन करून येई.

सखारामाची वहाण फार जुनी झाली होती. तो बाजारांतुन नवीन वहाण आणणार होता. म्हणून तो अनवाणीच गेला. भाजीपाला विकून आलेल्या पैशांत त्यानें वहाणा विकत घेतल्या व देवळांत गेला.

वहाणा बाहेर काढून तो आंत गेला. त्याच वेळीं शेट बनवारीलाल दर्शन घेऊन बाहेर पडला. समोर नवी वहाण पाहतांच चटदिशी पायांत घालून, कोणी पाहिले तर नाहीं ना? अशी मनाची खात्री करून घेऊन निघाला? त्याला कोणी दिसलें नाहीं. कारण सखारामाशिवाय देवळांत दुसरें कोणीच नव्हतें. त्याला कोणी विचारलें नाहीं. तो मुकाट्यानें आपल्या दुकानाकडे वळला. त्याचें दुकान देवळाच्या जवळच होतें. तो सुद्धां नित्य नेमानें एकदां देव दर्शन करून येत असे.

बनवारीलाल निघून गेल्यावर थोड्या वेळानें सखाराम दर्शन घेऊन बाहेर पडला व वहाणा पाहूं लागला. पण काय नव्या विकत घेतलेल्या वहाणा नाहींशा झालेल्या! त्याला फार वाईट वाटलें. कष्टानें मिळविलेल्या कमाईच्या वहाणा देवाच्या देवळांत हरवलेल्या पाहून त्याच्या मनाला





फारच धक्का बसला त्यानें निश्चय केला कीं वहाणा शोधूनच घरीं जायचें.

देवळाच्या बाहेर पडून तो सडकेवर आला. इकडे तिकडे पाहिलें तो एक गृहस्थ तसल्याच वहाणा घालून जात असलेला त्याला दिसला. त्याबरोबर तो त्याच्या पाठोपाठ गेला. आपल्या वहाणांची ओळख त्याला पटली. तो मनुष्य त्याला देवळांत भेटल्यासारखाच दिसला. म्हणून तो तसाच मागोमाग दुकानापर्यंत गेला.

बनवारीलालनें वहाण बाहेर काढून ठेवली आणि आपल्या दुकानांत शिरला. सखारामानें वहाणा निरखून पाहिल्या. त्याची खात्री पटली कीं ह्या वहाणा आपल्याच आहेत. तो त्या दुकानदाराला विचारणार एवढ्यांत दुकानदारच त्याला म्हणाला—"असा बघतोस काय? तुला काय पाहिजे? बघ नवी चिंच, नव्या मिरच्या आल्या आहेत. किती देऊं?"

"मला होय! सध्यां कांहीं नको. मी माझ्या वहाणा घेण्यासाठीं आलों आहे." सखाराम म्हणाला.

प्रथम सखारामाकडे पाहून तो चपापला. वहाणाच्या मालकानें आपल्याला नेमकें गांठलें हें पाहून तो शरमला सुद्धां. पण त्या खेडवळ माणसासमोर आपण चोर ठरणार आणि क्षुल्लक वहाणासाठीं. हें त्याला सहन होईना. म्हणून एकदम त्याच्याच अंगावर धसकन ओरडला—"काय! काय म्हणालास? चल चलता हो."

हा चार चौघांत आतां आपला अपमान करणार म्हणून तो त्याला तेथून शक्य तो लवकर हांकलून देण्याचा प्रयत्न करूं लागला. पण त्याच्या धमकावण्यानें सखाराम मुळींच घाबरला नाहीं. तो शांतपणें म्हणाला—"मी देवळांत आंत जातांना वहाणा बाहेर





काढून ठेवल्या होत्या. आपण बाहेर येतांना चुकून त्या घालून आलांत. त्या माझ्या आहेत. म्हणून मी त्या घेऊन जातों." असें म्हणत वहाणा घालून तो जाऊं लागला.

खरें पहिलें तर बनवारीलाल येथेंच थांबायला पाहिजे होतें. पण आपली ऐट दाखविण्यासाठीं तो म्हणाला—"मी रे तुझी वहाण कशाला घालीन? चोरी करायला मी काय चोर आहे कीं तुझ्यासारखा भिकारी आहे? मी चोरली होय तुझी वहाण?"

"मी तुम्हांला चोर कशासाठीं म्हणेन? अहो, ह्या वहाणा माझ्या आहेत. त्या मी घेऊन जातोय. होते कधीं कधीं माणसाच्या हातून चूक. त्यासाठीं एवढा कांगावा कशाला करतां. उगाच चार चौघांत मान खालीं होईल." सखारामाचें हें म्हणणें तर त्याला मुळींच आवडलें नाहीं.

एवढें होईपर्यंत चार चौघे भोंवतालीं गोळा झाले होते. आतां तर बनवारीलाल हार मानायला मुळींच तयार नव्हता. त्याला वाटलें कीं हा खेडवळ माणूस ह्या वहाणा खरोखरच त्याच्याच आहेत हें कसें काय दाखवूं शकेल? सर्व माझ्यावरच विश्वास करतील. ह्या ऐटींत तो म्हणाला—"आलाय मोठा वहाणा नेणारा. चल हो चलता कुठला." असें म्हणून तो सखारामाला धक्के देऊन बाहेर ढकलूं लागला.

आरडा ओरडा ऐकून तेथें आणखी बरीच गर्दी जमली. "माझ्या आहेत ह्या नव्या वहाणा. आजच मी विकत घेतल्या आणि पायांत घालून देवळांत गेलों." सखाराम ओरडूं लागला.

"कोठून विकत घेतल्यास रे?" एकानें विचारलें. "टोपलींतल्या आहेत. एक चांभार रस्त्यावरून विकत चालला होता त्याच्याकडून." सखाराम म्हणाला.



"ह्या वहाणा तुझ्याच म्हणून तू कसें रे पटवून देणार पुरावा काय? आणि हे एवढे मोठे शेट त्या त्यांच्या म्हणून सांगताहेत ते काय खोटें असेल?" दुसरा एकजण म्हणाला.

"हो! आम्ही गरीब झालों म्हणून आम्ही खोटे काय? निढळाच्या घामाच खातोय उगाच नाहीं." सखाराम करड्या स्वरांत म्हणाला. "ह्यापेक्षां कचेरींत जा कसे, त्याशिवाय नाहीं काम होणार. मग जें होईल तें होईल." तिसराच एक आवाज आला, सर्वांनीं 'तेंच' म्हटलें.

सर्वांच्या सांगण्यावरून सखाराम खरोखरच न्यायाधिशाकडे गेला आणि त्यानें फिर्याद केली कीं अमूक दुकानदारानें माझ्या नव्या वहाणा चोरल्या आहेत. न्यायाधिशानें बनवारीलालला त्या वहाणासह येण्यास सांगितलें. न्यायाधिशानें वहाणा पाहिल्या. दोघांच्याहि पायांत बरोबर बसत होत्या. "वहाणा विकत घेतांना साक्ष कोण ठेवणार?" अशी सफाई देत बनवारीलाल मोठ्यानें ऐटींत म्हणाला—"असल्या बाबतींत साक्षी पुरावा म्हणजे झालेंच."

न्यायाधिश म्हणाला—"ठीक आहे. तुम्ही दोघे आपापल्या जुन्या वहाणा घेऊन या. पाहतो कोणाच्या आहेत त्या."

"जुन्या वहाणा कोण बाळगून ठेवणार, त्या केव्हांच ह्याच्या सारख्या कंगालाला देऊन टाकल्या." बनवारीलाल म्हणाला.

"मी आणतो. माझ्या जुन्या वहाणा. गरीब असलों तरी खोटा नाहीं. न्याय मिळाला पाहिजे." सखाराम म्हणाला.

"चालेल, तुझ्या जुन्या वहाणा सुद्धां पुरे होतील." न्यायाधिश म्हणाला.

बनवारीलालच्या वहाणा चांगल्या होत्या. त्याच त्यानें न्यायाधिशाला दाखवल्या असत्या तर तो म्हणाला असतां कीं ह्या अजून चांगल्या आहेत मग नव्या कशाला घेतल्यास? म्हणून तो आपल्या वहाणा दाखवण्यास तयार नव्हता.



बनवारी आणि सखाराम दोघांना पाठवून दिल्यावर न्यायाधिशानें कोतवालाला सांगितलें कीं बनवारीलालवर जरा नजर ठेव. आज रात्रीं तो अमूक गावांत जाऊन चोरी करण्याची शक्यता आहे.

बनवारीलाल विचार करूं लागला कीं उगीच मी ह्या वहाणेच्या आणि अभिमानाच्या मोहाला बळी पडलों. सखारामाची वहाण तेव्हांच देऊन टाकली असती तर एवढ्यापर्यंत प्रकरण गेलेंच नसतें. न्यायाधिशानें जर सखारामाच्या बाजूनें न्याय दिला तर मी चोर ठरेन. मग मला गावांत तोंड दाखवतां येणार नाहीं. माझ्याकडे सर्वलोक तुच्छतेनें बोटें दाखवतील. किती लाजिरवाणी गोष्ट हे! ह्यांतून सुटण्याचा एकच मार्ग दिसतोय. तो म्हणजे सखारामाची जुनी वहाण नाहींशी करणें. म्हणजे पुराव्याच्या अभावीं न्याय माझ्यासारखा होईल. 'हो ठरलं, आज रात्रीं जाऊन सखारामची वहाण चोरायची.' बनवारीलालनें निश्चय केला.



सखारामच्या पाठोपाठ बनवारीलाल त्याच्या घरापर्यंत गेला. तोपर्यंत चांगला अंधार पडला होता. सखाराम घरांत गेला आणि आपल्या बायकोला झालेली सर्व हकीगत सांगून म्हणाला—"माझ्या जुन्या वहाणा कुठें आहेत उद्यां मला त्या न्यायाधिशाला दाखवण्यासाठीं न्यायच्या आहेत. मला कांहीं नव्या वहाणा मिळणार नाहींत. ह्याचा निकाल लागे पर्यंत."

"परसांत कड्यावरच आहेत." त्याच्या बायकोनें सांगितलें.

बनवारीलालनें ह्यांचें संभाषण बाहेरून ऐकलें, आणि हळूंच मागील बाजूस जाऊन त्यानें सखारामाची जुनी वहाण घेतली आणि सरळ घरीं परतला. वाटेंत एके ठिकाणीं झुडपांत त्यानें त्या फेंकून दिल्या.

न्यायाधिशाच्या हुकुमावरून कोतवालानें त्याच्यामागें माणसें सोडलीच होतीं. त्यांनीं त्याला पकडलें. त्याच्या हाताच्या बोटांतील चारी अंगठ्या काढून घेतल्या.

दुसऱ्या दिवशीं दोघे रिकाम्या हातानेंच न्यायाधिशासमोर हजर झाले. न्यायाधिशानें विचारल्यावर सखाराम म्हणाला—"काल संध्याकाळपर्यंत त्या परसांत होत्या. पण सकाळीं कांहीं कोठें सांपडल्या नाहींत."

नंतर न्यायाधिशानें आपल्या नोकराला इशारा केला. त्यानें जुन्या वहाणांचा एक जोड समोर आणून ठेविला. त्याबरोबर सखाराम आश्चर्यानें म्हणाला—"ह्याच कीं माझ्या वहाणा इथें कशा आल्या?"

न्यायाधिशानें सांगितलें कीं ह्या वहाणा चोरून नेऊन झाडींत फेकणाऱ्याला वाटेंत चोरानें लुबाडल्याचेंहि कळतें. "तुमची कांहीं वस्तु चोरीस तर नाहीं गेली का?" न्यायाधिशानें बनवारीलालला विचारलें. त्यानें नकारात्मक "नाहीं बोवा" म्हटलें.

त्याबरोबर न्यायाधिशानें चोरांनीं लुटून आणलेल्या अंगठ्या त्याला दाखविल्या व म्हणाला—"ह्या अंगठ्या तुमच्याच आहेत. ह्याच मिळाल्या त्या वहाणा चोरणाराकडे."

बनवारीलाल पुराव्यासकट पकडला गेल्या-मुळें त्या चोरी बद्दल दंड भरावा लागलाच-पण त्याचें नांव कायमचें चप्पल चोर पडलें.

सखाराम आपल्या वहाणा घेऊन आनंदानें घरीं गेला.





# गहाण ठेवलेलें टेंगूळ

जपान देशांत डोंगराळ प्रदेशांतील एका रानांत एक खेडेगांव होतें. लाकडें तोडून विकणें हा त्या गांवकऱ्याचा मुख्य धंदा होता. दोघां गांवकऱ्यांच्या कानशिलावर एकेक टेंगूळ होतें. एकाच्या डाव्या कानशिलावर होतें तर दुसऱ्याच्या डाव्या कानशिलावर. म्हणून लोक त्यांना अनुक्रमें 'डावी कानशील' व 'उजवी कानशील' या नांवानें हांक मारीत.

'उजवी कानशील' स्वभावानें सुशील होता. इतरांशी त्याची वागणूक प्रेमळ होती. कोणाशीं वैरवांकडें होऊं नये याची तो काळजी बाळगी. त्याच्या उजव्या कानशिला-वरचें टेंगळ घालवायला औषध नाहीं म्हणून त्याला वाईट वाटे. तरी मनाचें समाधान करून घेऊन त्यानें लग्न करून घेतलें.

परंतु 'डावी कानशील' चा स्वभाव अगदीं निराळा होता. 'उजवी कानशील' सोडून प्रत्येक गांवकऱ्याशीं त्याचें वांकडें होतें. कारण लोक त्याला 'डावी कानशील' म्हणून चिडवीत हें त्याला आवडत नसे. त्याला वाटे यांना देखील टेंगूळ असतें. तर बरें झालें असते. वांकडे असून देखील तो निर्लज्जपणानें इतरांकडून उधार कर्ज वगैरे मागायला मागें पुढें पहात नसे. स्वभावानें एकल कोंडा असल्यामुळें त्याला उजवी कानशीलकडे लोक येतात जातात हें पाहून त्याच्या मनांत 'उजवी कानशील' विषयीं अढी पडली होती. परंतु इतरांच्या मनानें 'उजवी कानशील'चा तो कमी द्वेष करी. त्याला एखाद्या वस्तूची गरज असली तर तो प्रथम 'उजवी कानशील'कडें प्रथम जाई.













केरसुणी किंवा चाळणी किंवा अशीच एखादी वस्तु मागून घेऊन येतांना तो उजवी कानशीलला म्हणे—"तूं केरसुणी दिलीस खरी, पण केरतर मलाच काढावा लागणार. तुझ्या सारखी घर काम करायला घरांत बायको नाहीं माझ्याकडे !"

एकदां 'उजवी कानशील' आपली कुऱ्हाड घेऊन रानांत लाकडें तोडायला गेला. लाकडें तोडून व फोडून झाल्यावर त्यानें त्यांची एक मोळी केली व डोंगर उतरूं लागला. परंतु थोड्या वेळानें पाऊस पडूं लागला व हळूहळू मुसळधार वृष्टी होऊं लागली. त्याबरोबर जोराचा वारा देखील सुरू झाला. विजांचा कडकडाट ऐकून 'उजवी कानशील' घाबरून गेला. घरीं पोंचल्यावर किती का पाऊस पडेना, हरकत नाहीं असा मनाशीं विचार करीत तो चालत होता. पण पाऊस थांबायचें नांव घेईना. त्या पावसांत घरीं पोंचणें अशक्य आहे, असें मनाशीं ठरवून तो निवाऱ्याची जागा कोठें दिसते का पाहूं. सुदैवानें त्याला एक देव-दाराचें मोठें झाड दिसलें. त्याच्या बुंधांत मोठी पोकळी होती. त्यानें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं व त्या पोकळींत शिरला. डोक्यावरची मोळीखालीं ठेवून तो एका बाजूला बसला थोड्या वेळानें झोंप आली. म्हणून तो थोडा आडवा झाला.

संध्याकाळच्या सुमारास पाऊस व वारा ओसरला. तेव्हां मोळी डोक्यावर घेऊन तो घरीं निघाला. काळोख पडण्यापूर्वीं रानांतून बाहेर निघून जाण्याचा विचार होता. म्हणून जवळ जवळ धांवतच तो चालला होता. परंतु काळोख पडलाच व त्याला सावकाश चालावें लागलें. वाट कोठवर दिसते आहे हें पाहण्या-साठीं त्यानें दूर वर दृष्टि फेंकली तेव्हां त्याला दूर काळोखांत एक मशाल दिसली. कोण असावा बरें तो मशाल घेऊन येणारा, असा तो विचार करीत क्षणभर उभा राहिला. त्याला आणखी एक मशाल दिसली व त्यानंतर एकीमागून एक अनेक मशाली दिसल्या.

त्याला वाटलें कीं आपल्याच गांवचे लोक कदाचित आपल्या शोधार्थ येत असतील. असा विचार करून तो मोठ्यानें ओरडून म्हणाला—"थांबा! मी इकडे आहें!" परंतु मशाली थांबल्या नाहींत व उत्तरा-दाखल कोणी बोललें देखील नाहीं. पुन्हां ओरडून त्यानें थांबायला सांगितलें, पण त्याचें देखील उत्तर मिळालें नाहीं.

'उजवी कानशील'ला हें पाहून आश्चर्य वाटलें कीं त्या मशाली तो उभा होता त्याच बाजूला येऊं लागल्या. मशाली धरणारा कोणी दिसत नव्हता. खात्रीनें तीं भुतें असणार असा विचार करून तो ज्या वाटेनें आला होता त्या वाटेनें मागें परत फिरला. मोळी डोक्यावर ठेवून धांवत चढणें शक्य नाहीं असा विचार करून त्यानें मोळी एका बाजूला टाकून दिली आणि पळत जाऊन त्या देवदार वृक्षाच्या पोकळींत बसला.

मशाली त्याच झाडाजवळ बाहेर येऊन उभ्या राहिल्या. पोकळींतून मशाली





घरणारांची आकृति त्याला पुसट दिसूं लागलीं. एकाला बेडकासारखे पाय होते तर एकाला पक्ष्याचें तोंड होतें. एकाला अस्वलासारखेंच डोकें होतें. मनुष्य, पशु व पक्षी यांच्या एक वर्णसंकर विलक्षण जातीचे ते प्राणी असावेत असें त्याला वाटलें.

"आग पेटवा!" एक आवाज ऐकू आला.

"बरें झालें, कोणी तरी लाकडाची मोळी येथें टाकलेली दिसते आहे." आणखी एक आवाज ऐकूं आला.

आग पेटली व मोठा जाळ झाला. त्या विचित्र आकृती त्या जाळा सभोंवती मशाली घेऊन नाचूं लागल्या. त्यांना नाचतांना पाहून 'उजवी कानशील'च्या मनांतली भीति थोडी कमी झाली व धीर करून तो त्या पोकळींतून बाहेर आला. त्याला पाहून त्या आकृति जोरजोरानें 'मनुष्य' 'मनुष्य' असें ओरडूं लागल्या.

"कोण तूं? काय काम करतोस?" एक आकृतीनें त्याला विचारलें.

"मी लाकूडतोड्या आहें. मीच लाकडें तोडून ती मोळी केली होती व ती पेटवून तुम्ही शेकोटी तयार केलीत. माझें नांव 'उजवी कानशील.' माझ्या उजव्या कान-शिलावर टेंगूळ दिसतें का तुम्हांला?" उजवी कानशीलनें विचारलें.

"हें टेंगूळ किती सुंदर आहे?" एका आकृतीनें विचारलें.

"कोण तुम्ही?" उजवी कानशीलनें विचारलें. त्याचें टेंगूळ त्यांना आवडलें हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

"आम्ही भूत, पिशाच वगैरे जातीचे नाहीं. आम्ही या मर्त्य लोकांतले पण नाहीं." एक आकृतीनें उत्तर दिलें.

"तुमचें नृत्य फार आवडलें मला. इतकें सुंदर नृत्य मी पूर्वी कधीं पाहिलें नाहीं. परंतु आमचें लाकूडतोड्यांचें नृत्य अगदीं निराळें असतें." उजवी कानशील म्हणाला.

"लाकूडतोड्यांचें नृत्य? तें आम्हांला पाहालेंच पाहिजे." एक आकृति म्हणाली.

'उजवी कानशील' एका हातांत कुऱ्हाड व एका हातांत करवत घेऊन झाडाचा बुंध व फांद्या तोडण्याचा अभिनय तालावर करूं लागला. फारच सुंदर होतें त्याचें नृत्य. त्या आकृतींनीं टाळ्या वाजवून 'उजवी कानशील'ची वाहवा केली व "आम्हांला शिकवितोस का हें नृत्य?" असें त्याला विचारलें.

"आतां नाहीं. उजाडण्याची वेळ झाली आम्हांला घरीं परतलें पाहिजे." मनुष्याचें तोंड असलेली आकृति म्हणाली.

"मग उद्यां! याच जागीं येशील ना?" त्या आकृतींनी 'उजवी कानशील'ला विचारलें.

"येईन व तुम्हांला आमचें नृत्य शिकवीन!" उजवी कानशील म्हणाला.

"पण तुझा विश्वास कसा करायचा?" एका आकृतीनें विचारलें.

"त्याची कुऱ्हाड व करवत ठेवून घेऊं या!" आणखी एका आकृतीनें सुचविलें.













"त्याला दुसरी कुऱ्हाड किंवा करवत मिळणार नाहीं वाटतें ? त्याचें टेंगूळ काढून ठेवून घेऊं या. तो उद्यां आला कीं त्याला परत करूं." असें सांगून त्या आकृतीनें उजवी 'कानशील'च्या टेंगळाला हात लावला मात्र तें सुटून निराळें झालें व सर्व आकृति अदृश्य झाल्या.

'उजवी कानशील'नें आपल्या दोन्ही बाजूच्या कानशिलांवर हात फिरवून पाहिला. दोन्ही बाजूला कानशिलाच्या जागीं सपाट गुळगुळीत त्वचा हाताला लागली. त्याला बरें वाटलें. त्याला तें सर्व खरेंच वाटेना. जणुं कांहीं कोणी मंत्रानें त्याचें टेंगूळ काढून घेतलें असें त्याला वाटलें.

तो घरीं परतला. त्याचें टेंगूळ गेलेलें पाहून त्याच्या बायकोला आनंद झाला. त्याचवेळीं 'डावी कानशील' त्याच्याकडे आला व उजवी कानशीलचें टेंगूळ गेलेलें पाहून त्याला हेवा वाटला. 'उजवी कानशील'च्या तोंडून सर्व वृत ऐकून तो म्हणाला—"तरमग आज रात्रीं तुझ्या ऐवजीं मी जातों रानांत." 'उजवी कानशील'नें नकार दिला नाहीं.

त्या रात्रीं डावी कानशील झाडाच्या पोकळींत जाऊन बसला. काळोख पडल्यावर त्यानें स्वतःच मोठा जाळ केला व पोकळींत जाऊन वाट पहात बसला. अर्धी रात्र उलटून गेल्यावर त्या आकृति आल्या. एक जण म्हणाला—"आपल्यासाठीं त्या लाकूड-तोड्यानें स्वतःच आग पेटवून शेकोटी तयार करून ठेवलेली दिसते आहे. परंतु आलेला मनुष्य उजवी कानशील दिसत नाहीं.

त्या आकृती नाचूं लागल्या 'डावी कानशील'ला गंमत वाटली, परंतु बाहेर येण्याची छाती होईना. तरी धीर करून नृत्य संपल्यावर तो पोकळींतून बाहेर आला. तेव्हां त्या आकृतींना तो दिसला.



"कोण तूं ? उजवी कानशील कां नाहीं आला ? त्यानें येण्याचें वचन दिलें होतें." मनुष्याचें तोंड असलेल्या आकृतीनें विचारलें.

"उद्यां येईन असें सांगितलें आहे त्यानें" डावी कानशील भीत भीत उत्तरला.

"लाकूडतोड्याचें नृत्य शिकवीन म्हणून त्यानें वचन दिलें होतें आम्हांला."

"तें नृत्य मला देखील माहीत आहे. मी शिकवितों तुम्हांला." डावी कानशील म्हणाला.

"बरें पाहातों तुझें नृत्य !" आकृती म्हणाल्या.

'डावी कानशील'नें लाकूडतोड्याचें नृत्य सुरू केलें व म्हणाला—"कुऱ्हाड अशी धरून एक पाऊल पुढें टाकून अशी टाकण्याचा अभिनय करावयाचा."

"तें सब मागाहून शिकूं. पहिल्यानें आपलें नृत्य दाखव आम्हांला." मनुष्याचें मुंडकें असलेली आकृति म्हणाली.

डावी कानशील नृत्य करूं लागला. पण कोणी टाळी वाजविली नाहीं कीं वाहवा केली नाहीं. 'उजवी कानशील' सारखें नृत्य नाहीं येत तुला. त्यानें वचन देऊन तें मोडलें. त्यानें गहाण ठेवलेलें टेंगूळ त्याचें त्याला नेऊन दे." असें म्हणत त्यांनीं 'डावी कानशील'च्या उजव्या कानशिलाला लावलें. आतां उजव्या कानशिलावर देखील एक टेंगूळ झालें.

"हें टेंगूळ नको मला. उद्यां उजवी कानशील येईल तेव्हां द्या त्याला." डावी कानशील गयावया करून म्हणाला.

पण "चला, उजाडण्याची वेळ झाली !" असें म्हणत सर्व अदृश्य झालें.



      





# विजय दुंदुभी

विभांडक नांवाचा एक राजा होता. तो फार पराक्रमी व शूर होता. युद्धाचें नांव ऐकूनच त्याला स्फुरण चढत असे. युद्ध करण्याची त्याला खुमी खुमी पण फार होती.

लहान सहान गोष्टी बद्दल तो शेजार पाजारच्या राजांशीं भांडणें उकरून काढी व युद्ध करून त्यांचा पराभव करी. दर महिन्यांत एक स्वारी तरी केल्याशिवाय त्याच्या मनाचें समाधान होत नसे. आपली विजय दुंदुमी सारखी वाजत रहावी असें त्याला वाटे.

कधीं युद्धाचा प्रसंग उद्भवला नाहींतर तो शिकारीस जाई व विजय दुंदुभी वाजवीत गर्वांत घरीं परत येई. विजय दुंदुभी वाजवून विजयोत्सव सतत करीत राहण्यांतच त्याला एक तऱ्हेचा आनंद वाटे.

त्याची विजय दुंदुभी पण लहान सहान नव्हती. प्रचंड मोठी होती व वाजूं लागली कीं राजधानीच काय आकाश देखील दुमदुमूं लागे. विजय प्राप्तीची घोषणा राजधानीभर करण्यासाठीं त्यानें मोठमोठे डफ व ढोल वगैरे पण तयार करून ठेवले होते. हें सर्व एकदम वाजूं लागलें कीं त्यांचा आवाज इतका मोठा होई कीं पृथ्वी हादरूं लागे व गरिबांच्या झोपड्या हादरून पडत. भिंती दुभंगून जात. कानठळ्या बसून लोकांना वेड लागतें कीं काय असें वाटूं लागे. मग झोंप कशी लागणार?

सर्वांत जास्त नुकसान होई तें कुंभारांचें. कारण विजयदुंदुभी वाजूं लागली कीं मडक्यांचा ढीगच कोसळून पडे व सर्व मडकीं फुटून जात. दर महिन्यांत होणारें हें नुकसान त्यांना असह्य वाटूं लागलें. म्हणून कुंभारांनीं मंत्र्याकडे आपलें गाऱ्हाणें नेलें कीं दर महिन्यांत होणारा हा दुंदुभी नाद थांबवावा. मंत्र्यानें गोड शब्दांत आपली सहानुभूति दाखवून व राजाशीं याविषयीं बोलतों असें सांगून त्यांना निरोप दिला. त्यानें त्या प्रमाणें राजाच्या कानावर ही गोष्ट पोंचती केली.

परंतु राजाला मंत्र्याकडून तें सर्व कळलें त्यावेळीं त्याला फार राग आला व तो म्हणाला—"या कुंभारांसाठीं मी काय विजय दुंदुभी वाजवायची बंद करूं म्हणतां? त्यांना या धंद्यांत यामुळें नुकसान होत आहे असें वाटत असेल तर त्यांनीं दुसरा धंदा कां करूं नये? नाहीं तर देश सोडून जा म्हणावें. मला त्यांची गरज नाहीं."

मंत्र्यानें कुंभाराच्या नायकाला बोलावून सांगितलें कीं राजा आपला हट्ट सोडणार नाहीं. तुम्ही जास्त तक्रार केलींत तर तो तुम्हांला उभा कापून काढील."

कुंभारांनीं देश सोडून जाण्याचें ठरवलें व परदेशीं जाऊन आपला धंदा करूं लागले. परंतु त्यामुळें आणखी एक प्रश्न उभा राहिला. मडक्यांत सैंपाक करणाऱ्या












गोर गरिबांना मडकीं मिळतनाशीं झाली. पाण्याला मातीच्या घागरी व माठ कोठें मिळणार? म्हणून गोरगरीब हट्टी राजाशी भांडण करण्याऐवजीं देश सोडून गेले.

कुंभार निघून गेल्यामुळें वैद्यांना पण औषधें तयार करण्यासाठीं व सांठवून ठेवण्या जोगीं मातीचीं भांडीं मिळतनाशीं झालीं. त्यांच्याकडे मातीचेच दिवे पण असते ते देखील मिळतनासे झाले. कुंभार नसल्यामुळें वैद्यांचा धंदा पण पडला.

परंतु राजाला हें कांहीं माहीत नव्हतें व त्याला त्याची फिकीर देखील नव्हती कीं कुंभार देश सोडून निघून गेल्यामुळें राज्याचें किती नुकसान होत आहे. लहरी स्वभावाच्या राजाला या सर्व गोष्टींची काम पर्वा असणार? त्याला पुन्हां एकदां युद्धाची खुमखुमी आली व त्यानें एका देशावर स्वारी केली. युद्धांत त्याला जय देखील मिळाला. परंतु जखमी होऊन तो परत आला. चिकित्सा करण्यासाठीं वैद्यांकडे राजदूत गेले. पण त्यांच्याकडे आवश्यक औषधेंच नव्हतीं. होतीं तीं संपून गेली होतीं व मडक्यांच्या अभावीं नवीन तयार करणें शक्य नव्हतें. म्हणून त्यांनीं महाराजांसमोर हात जोडून निवेदन केलें कीं कुंभारांच्या बरोबर आमचें नशीब देखील निघून गेलें आहे. चिकित्सा वेळेवर होऊं शकली नाहीं म्हणून राजानें अंथरूण धरलें. दिवस दिवस प्रकृति जास्तच बिघडत गेली. तेव्हां त्याचे डोळे उघडले व त्यानें पुन्हां कुंभारांना बोलावून सांगितलें कीं विजयदुंदुभी या पुढें वाजणार नाहीं.

त्यानंतर पुन्हां सुख व शांति नांदूं लागली व प्रजा सुखी झाली.






साऱ्या लंकेला आग लावून मारुती अशोक वनांत आला व हात जोडून सीतेला म्हणाला—"श्री रामचंद्र लौकरच वानर सैन्य घेऊन लंकेवर स्वारी करतील."

सीतेचा निरोप घेऊन अरिष्ट पर्वतावर उडी मारून मारुती उभा राहिला. त्यानें आपलें शरीर वाढविलें व समुद्र पार ओलांडून गेला. त्या धक्क्यानें अरिष्ट पर्वताचीं बरींच छकलें उडालीं आणि त्याच्यावर राहाणारे प्राणी सैरावैरां पळूं लागले.

समुद्रावरून जात असतां तो मध्येंच मेघांत अदृश्य होई मध्येंच थोडें उंच जाऊन किनाऱ्याचा होरा घेई. येते वेळीं त्याला वाटेची कल्पना झाली होती. महेंद्र पर्वत दिसतांच त्यानें हुंकार गर्जना केली.

अंगदादि वानर त्याची वाट पाहात बसले होतेच. हुंकार ऐकतांच त्यांना मारुतीची ओळख पटली व त्यांना आनंद झाला. मारुती आपलें काम पूर्ण करूनच परत येणार होता. म्हणून त्याला येत असतांना पाहून सर्वांना आनंद वाटणें साहजिक होतें. त्या सर्वांत जांबवंत मोठा. तो सर्व वानरांना एकत्र करून म्हणाला—"आपला मारुती काम पुरें केल्याशिवाय कधीं परतणें शक्यच नाहीं."

सर्व वानरसेना आनंदानें उड्या मारूं लागली. कांहीं वानरें झाडावर चढून फळें



तोडूं लागलीं. कांहीं झाडाचीं पानें ओरबाडून आकाशांत उडवूं लागलीं. कांहीं झाडाच्या फांद्या ध्वजेसारख्या आकाशांत उंच उभारून त्याचें स्वागत करूं लागलीं. मारुती महेंद्र पर्वतावर उतरतांच सर्व वानरांनीं त्याला चारी बाजूंनीं घेरलें. कांहींनीं त्याला फळेंमुळें खाण्यास दिलीं. तो काय सांगतो हें ऐकण्यासाठीं सर्व मोठ्या उत्सुकतेनें त्याच्याकडे पाहूं लागलीं.

हनुमानानें युवराज अंगद व जांबवंत यांना नमस्कार केला आणि म्हणाला—" मी सीतामाईला पाहून आलों." त्याच्या तोंडून एवढे शब्द ऐकतांच सर्व वानरें उंच उंच उड्या मारून आनंदानें सिंह गर्जना करूं लागलीं.

अंगदानें मारुतीला आलिंगन देऊन त्याची पाठ थोपटली. म्हणाला—" बलभीमा तूं शंभर योजन पसरलेला समुद्र पार करून गेलास काय आपल्या पराक्रमाचा जणुं काय साक्षात्कारच तुला व आम्हां सर्वांना झाला. धन्य आहेस तूं."

जांबवंत म्हणाला—" तूं सीतेला पाहून आलास म्हणालास, पण ती कोठें आहे? कशी आहे? काय करते आहे? रावण तिच्याशीं कसा वागला? तें कांहींच सांगितलें नाहींस. तूं काय काय पाहिलेंस तें सर्व सविस्तर सांग. म्हणजे त्या प्रमाणें रामाला बऱ्या-वाईटाची निवड करून कळवायला बरें."

सर्व वानरें मारुती काय सांगतो तें ऐकण्यास उतावीळ झालीं होतीं. सर्व शांतपणें त्याच्या तोंडाकडे पहात उत्सुकतेनें बसलीं. मारुतीनें लंकागमन व सीतेच्या दर्शनाचा वृत्तांत आरंभ केला—" मी येथून उडी मारून जातांना तुम्ही सर्वांनीं मला पाहिलेंच होतें. थोडें पुढें गेल्यावर एक उंच आणि सोनेरी पर्वत शिखर मला दिसलें. मोठ्या प्रेमानें तो पर्वत मला म्हणाला—' माझें नांव मैनाक. तुझ्या पित्यानें मला एकदां इंद्राच्या तडाख्यांतून वांचवलें होतें. तुला पाहून मला फार आनंद झाला. त्या उपकाराची फेड म्हणून नव्हे, तर ते उपकार मी विसरलों नाहीं हें स्वतःच्या मनाला पटवून देण्यासाठीं आणि तुला थोडा आराम व्हावा म्हणून वर डोकें काढलें आहे. तूं थोडी विश्रांति घेऊन पुढें जा.' तेथून पुढें गेलों तर सुरसा नांवाची सर्पमाता समोर तोंड वासून बसली होती. ती मला गिळून टाकणार होती. म्हणून मी अगदीं लहान रूप घेतलें आणि तिच्या तोंडांत शिरलों आणि तिला न कळत चटकन बाहेर पडून पुढें निघून गेलों. संध्याकाळ झाल्यावर चांगला काळोख पडल्यानंतर मी लंकेंत प्रवेश केला." लंकिणीशीं भेट झाल्यावर जें जें त्यानें पाहिलें व ऐकलें तें सांगून मारुती पुढें म्हणाला—" सारी लंका हिंडून सीतेचा शोध केला. शेवटीं अशोक वनांत शिंशुपाच्या झाडाखालीं बसलेली सीता मला दिसली. अगदीं उदास बसून ती रामाचें ध्यान करीत होती. कांहीं म्हणा, सीता महा-



पतिव्रता आहे यांत शंका नाहीं. ती इतके कष्ट सोसून सुद्धां केवळ रामासाठींच जीव धरून आहे!"

नंतर मारुती अशोकवन कसें उध्वस्त झालें, रावणाच्या शूरवीर अनुयायांचा त्यानें कसा संहार केला आणि रावणाच्या आज्ञेनें राक्षसांनीं शेपटीला आग लावल्यावर त्यानें लंका कशी जाळली याचें वर्णन करून म्हणाला—" जांबुवंता, अरे मी एकट्यानेंच जर त्या रावणाला पुरे पुरे करून सोडलें आहे तर आपल्यासारखे मोठमोठे पराक्रमी वीर मिळून रावणाच्या सैन्यासह त्याचा



पराभव करूं शकणार नाहीं ? तूं अंगद, पनस, नील, अजेय किती तरी शूर वानर आपण येथें आहोत. मग आपण सर्वांनीं मिळून रावणाला मारून सीतेला सोडवून आणूं आणि रामाकडे पोंचती करूं."

अंगदाला मारुतीचा विचार पटला. तो म्हणाला—"एका दृष्टीनें तुझें म्हणणें बरोबर आहे. सीतेला पाहून सुद्धां, तिला सोडवून न आणतां, 'आम्ही सीतेला पाहून आलों' असें रामाला सांगणें म्हणजे आपल्याला तें लाजिरवाणेंच नव्हे का ? एकट्या मारुतीनेंच रावणाच्या शेंकडों पराक्रमी वीरांना यम-लोकीं पाठविलें आणि स्वतः रावणाला 'त्राहि त्राहि' करून सोडलें म्हणजे अर्धे अधिक काम तर त्यानें करूनच टाकलें आहे. मग आपण सीतेला सोडवून आणून रामाकडे कां पोंहोंचवूं नये मला देखील हेंच ठीक वाटतें."

पण जांबुवंत त्या सर्वांत मोठा व अधिक अनुभव असलेला होता. गंभीरपणें विचार करून तो अंगदाला म्हणाला—"युवराज, तुमचे विचार ठीक आहेत. परंतु ह्याविषयीं रामाचे काय विचार आहेत. तें नको का पहायला ?"

अंगदानें व इतर सर्वांनीं जांबुवंताच्या सूचनेला आपली संमति दिली.

सीतेचा शोध लावण्यांत यश आल्यानें सर्वांना आनंद झाला होता. रामाला सांगायला त्यांच्याकडे शुभ समाचार होता. शिवाय पुन्हां युद्ध मारामारीचा योग देखील होता. म्हणून ते सर्व मोठ्या उत्साहानें रामाच्या भेटीला निघाले आणि सुग्रीवाच्या मधुवनांत येऊन पोंहोंचले. तेथं अंगदाच्या परवानगीनें सर्व मधुवनांत शिरले. पोळ्यांतील मध मनसोक्त प्यायले आणि झाडांची नासधूस करूं लागले. मधुवनाचा राखणदार



दधिमुख होता. तो सुग्रीवाचा मामाच होता. त्यानें पाहिलें कीं हीं माकडें सर्व नासधूस करीत आहेत. तेव्हां त्यानें त्या सर्वांना वन सोडून चालते होण्यास सांगितलें. पण त्याचें कोणीच ऐकलें नाहीं. दधिमुखानें परोपरीनें त्यांना समजावून सांगण्याचा प्रयत्न केला तरी कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं त्यानें दंडुकाचा प्रयोग केला. पण वानरें त्यालाच उलट मारूं लागलीं आणि पळून जाऊं लागलीं. अंगदानें आणि मारुतीनें त्यांना अधिकच प्रोत्साहन दिलें. मग विचारायलाच नको. त्यांनीं जास्तच धुमाकूळ सुरू केला. तेव्हां नाइलाजानें दधिमुखानें शेवटीं आपल्या साथीदारांना एकत्र करून युद्ध सुरू केलें.

अंगद देखील देहभान विसरून लढूं लागला. आपण कोणाशीं लढत आहोत ह्याचें त्याला भान न राहून त्यानें दधिमुखाला एक जोराचा धक्का देऊन खालीं पाडलें.

बिचारा म्हातारा बेशुद्ध होऊन पडला. थोड्या वेळानें शुद्धीवर आल्यावर त्यानें हाताला सांपडलें त्यानें मारहाण करण्यास सुरवात केली. अखेरीस तो आपल्या लोकांना म्हणाला—"राहूं दे ह्यांना इथें असेच. मी



सुग्रीवाला जाऊन सांगतों तोच येईल ह्यांचा समाचार. स्वतः युवराजानेंच प्रोत्साहन दिल्यावर कोण कोठवर अडवणार ?"

अचानक मामाला आलेला पाहून सुग्रीवानें कारण विचारलें. त्यावर तो म्हणाला—"ह्या सर्व मधुवनाचा ह्यांनीं ध्वंस करून टाकला आहे. कोणी अडविलें तर ते त्यालाच मारतात नाहींतर बांधून ठेवतात. नाना तऱ्हेनें त्रास देत आहेत. आणि हें सर्व स्वतः युवराजाच्या सल्ल्यानें चालू आहे. तुमच्या भीतीनें मी कांहीं बोललों नाहीं. आतां तुम्हीच जाऊन संभाळा आपलें मधुवन."



दधिमुखानें केलेली तकार सुग्रीवानें ऐकून घेतली आणि शांतपणें म्हणाला— “अहो मामा! मला वाटतें कीं सीतेच्या शोधार्थ गेलेली सेना परत आलेली आहे. कार्यसिद्ध झाल्याशिवाय ते असलीं कामें करणार नाहींत. सीतेचा शोध लागलेला दिसतो आहे. त्याचा हा आनंद आहे. मारुती सुद्धां असेल त्या घोळक्यांत? तोच हें काम करणारा आहे.” सुग्रीव म्हणाला.

सुग्रीवाचें बोलणें रामलक्ष्मणाला आवडलें. त्यांचे चेहरे एकदम खूप दिसूं लागले. नंतर सुग्रीवानें दधिमुखाबरोबरच उलट निरोप पाठविला कीं पोटभर मद्य पिऊन झाला व फळें खाऊन झालीं म्हणजे या भेटायला. रामलक्ष्मण तुमच्या निरोपाची वाट पाहात आहेत. तरी लवकर जाऊन त्यांची भेट घ्या.”

म्हातारा दधिमुख सुग्रीवाचें तें बोलणें ऐकून थकच झाला. तो आला होता, सुग्रीवाकडून त्यांना चोप देववून त्यांच्या माकडचेष्टा बंद करायला आणि आतां उलट त्यालाच सुग्रीवाचा निरोप घेऊन माकडांकडे जावें लागलें.

दधिमुखानें अंगदाला सुग्रीवाचा निरोप सांगितला म्हणाला—“माझ्याकडून आपल्याला थोडा त्रास झाला त्याची माफी असावी. सर्वांना रामानें बोलावलें आहे.”

दधिमुखाचा निरोप ऐकून अंगदानें आपल्या सैन्याला इशारा दिला. म्हणाला— “आपण आल्याची बातमी रामाला अगोदरच समजलेली आहे. खाऊन पिऊन विश्रांति घेऊन तुम्ही सर्व ताजेतवाने झालांत. आतां आपल्याला रामाकडे गेलें पाहिजे. चला निघा.” सैन्याला निघायला सांगून अंगद व मारुतीनें हुंकार करीत आकाशांत उड्डाण केलें व ते दोघे आकाश मार्गानें

जाऊं लागले. सर्व सेना पण मागोमाग निघाली. त्यांची गर्जना किष्किंधेमध्यें सुग्रीवाला ऐकूं गेली. तो शेपटी हालवीत त्यांना सामोरा गेला. अंगद मारुती वगैरे सर्वांनी रामलक्ष्मण व सुग्रीव यांना नमस्कार केला व हात जोडून पुढें उभे राहिले.

"सीता कोठें आहे? काय करते आहे?" रामानें विचारलें.

सर्व वानरांनीं मारुतीला पुढे केलें. मारुतीनें रामाला सविस्तर माहिती सांगून सीतेनें खूण म्हणून दिलेले अग्रफूल रामाच्या हातांत दिलें आणि म्हणाला—"सीतेनें चित्रकूटांतील कांहीं जुन्या आठवणीपण सांगितल्या. शेवटीं दुखानें तिनें सांगितलें कीं आतां फक्त एक महिनाच बाकी आहे. त्याच्या आंत मला सोडवून घेऊन जा."

सीतेच्या वेणींतील अग्रफूल पाहतांच रामाचें दुःख अनावर झालें व तो रडूं लागला—"सीता एक महिनाभरच जिवंत राहाणार? हाय रे दैवा! लक्ष्मणा, चल, आतांच्या आतां आपल्याला निघालें पाहिजे तिचा शोध लागल्यानंतर सुद्धां तिची सुटका झाली नहीं तर तिला काय वाटेल! त्या राक्षसिणींच्या मध्यें ती....! लक्ष्मणा लक्ष्मणा!!"

लक्ष्मण सुग्रीव आदिकांनीं रामाला सावरलें. मारुती पुढें होऊन म्हणाला—"महाराज, दुःख करीत बसण्यास आतां वेळ नाहीं. सर्व सेना तयार आहे. आपण आज्ञा करावी. सुग्रीवाप्रमाणें पराक्रमी अनेक वीर आपल्याकडे आहेत. मग उशीर कशाला? रावणाचा वध करून सीतेला सोडून आणूं या."

[ सुंदरकांड संपूर्ण ]





# परोपकारी गोपाळ

गोपाळ आपल्या एका मित्राच्या मदतीला म्हणून शेजारच्या गांवीं गेला होता. संध्याकाळीं परत येत असतां वाटेंत एका घराला आग लागलेली त्याला दिसली. त्या घराजवळ खूप गर्दी जमली होती. बरेच लोक घरांतील सामान बाहेर काढण्यांत आणि आग विजवण्यांत गुंतले होते. घराच्या मागील बाजूस एक बाई मोठमोठ्यानें ओरडत रडत सांगत होती—"माझा तान्हा आंतच स्वयंपाक घरांत राहिला आहे. त्याला बाहेर आणा ना कोणी तरी!" पण तिच्याकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें.

आग लागलेली पाहून आणि आरडा ओरडा ऐकून गोपाळ त्या बाजूला वळला. त्या घराजवळ जातांच त्याला लहान मुलाच्या रडण्याचा आवाज आला. लगेच तो ज्वाळांमधून वाट काढीत आंत शिरला. त्या मुलाला उचललें व बाहेर पडला. बाहेर पडतांच त्याच्या हातांतून त्या मुलाला कोणीतरी घेतलें. कोणी घेतलें तें मात्र त्याला कळलें नाहीं.

त्या गांवच्या पाटलाच्या घराला आग लागली होती व तो मुलगा त्या पाटलाचाच होता. गोपाळनें मुलाला बाहेर काढल्या-बरोबर पाटलाच्या नोकरानें त्या मुलाला घेतलें व आपल्या मालकाकडे जाऊन म्हणाला—"मालक, धाकटे मालक आंतच राहून गेले होते. मी आंत जाऊन बाहेर आणलें म्हणून बरें झालें."

आतुरतेनें मुलाला पोटाशीं धरून पाटील म्हणाला—"तूं माझ्या मुलाला जिवदान दिलेंस, मला पुत्र भिक्षाच दिलीस. तुझे हें



उपकार जन्मजन्मांतरी फिटणार नाहींत. परमेश्वर तुझें भलें करो.'' पाटलानें कृतज्ञता व्यक्त केली.

गोपाळ घरीं पोचेपर्यंत चांगला काळोख पडला होता. आगीमुळें त्याचे कपडे जळले होते. अंगाला जागोजागीं पोळलें होतें. अंगाची आग होत होती. घरीं पोहोंचतांच त्याच्या आईनें विचारलें—"कुठें जाऊन भाजून घेऊन आलास? तुझ्यावांचून काय काम खोळंबलें होतें कोणाचें?"

त्यानें घडलेला वृत्तांत आईला सांगितला आणि "परोपकारार्थ सदा झिजावें" म्हणत कपडे बदलण्यास गेला. सदरा बदलतांना झटकन् खालीं काय पडलें म्हणून पाहिलें तों सोन्याची साखळी सांपडला. त्यानें तो आपल्या आईजवळ दिला आणि म्हणाला—"त्या मुलाच्या कमरेंतला करगोटा गळून पडला आहेसें वाटतें त्या गडबडींत. नीट ठेव. उद्यां परत करूंया."

गोपाळला थोडे चटके बसले होते. दुसऱ्या दिवशीं त्याला ताप देखील आला. पुढें तीन चार दिवस तो अंथरुणा-वरच होता. चार दिवसानंतर तो ती कमरेंतली सोन्याची सांखळी देण्यास निघाला. अंगातोंडावर अजून जळल्या-पोळल्याचे डाग तसेच होते.

तो जळलेल्या घराजवळ आला तो तिथें त्याला पाटलाचा तोच नोकर दिसला. गोपाळनें त्याला विचारलें कीं ह्या घरांतील माणसें कोठें राहातात.

नोकर म्हणाला—"पाटील सध्यां त्या समोरच्या घरीं राहतात. दोन दिवसांत हें घर पुन्हां नीट बांधून होईल. मग येतील पुन्हां आपल्या घरीं राहावयाला." नोकर तेथें उभा राहून गवंड्यांची देखरेख करीत



होता. "काय काम आहे पाटलांकडे?" नोकरानें विचारलें.

"कांहीं नाहीं, त्या दिवशीं हें घर जळत होतें तेव्हां एका मुलाला मी घरांतून बाहेर काढलें. तेव्हां केव्हांतरी त्याच्या कमरेंतील सोन्याची सांखळी गळून पडली. ती माझ्याजवळच राहिली. मुलाला त्यांनीं नेलें. त्यावेळीं मला सुद्धां ती दिसली नाहीं. घरीं गेल्यावर मला दिसली. त्यांचें ह्याकडे लक्ष सुद्धां गेलें नसेल. तेव्हांच परत करायला हवी होती. पण अंग भाजल्यामुळें मला चार दिवस बरें नव्हतें."

हें ऐकतांच नोकर थोडा चपापला. त्याला वाटलें जर ह्या माणसानें स्वतः जाऊन ती सांखळी दिली तर ती त्याच्याजवळ कशी आली म्हणून पाटील विचारणार. घडलेला सारा वृत्तांत हा सांगणार. ह्याच्या अंगावरचे तोंडावरचे डाग आहेतच साक्ष द्यायला आणि तसें झालें कीं मी खोटा ठरणार व माझी नोकरी जाणार. माझ्या कामगिरीबद्दल त्यांनीं मला शाबसकी दिली व वर बक्षीसहि दिलें. आतां खाशी शिक्षा भोगावी लागणार. त्यानें क्षणभर विचार केला आणि म्हणाला—"मी त्यांचाच नोकर



आहें. द्या ती माझ्याजवळ मी देतों ती मालकाला."

"येथपर्यंत तर आलों आहे. चार पावलें आणखी जाऊन मी स्वतःच नेऊन देतों त्यांच्या हातांत. सोन्याची वस्तू हातोहात नको जायला."

नोकर विचारांत पडला. त्यानें गोपाळला जरा एकीकडे बोलावून नेलें आणि त्याला म्हणाला कीं मालकांनीं मुलाला वांचवल्या-बद्दल मला चांगलें बक्षीस दिलें आहें. मी त्यांना सांगितलें कीं मी धाकट्या मालकांना आगींतून उचलून आणलें. आतां जर त्यांना







खरी गोष्ट कळली तर माझी धडगत नाहीं. म्हणून कृपा करून तुम्हीं माझें रक्षण करा.

परोपकारी गोपाळला दया आली आणि त्यानें ती सांखळी नोकराच्या हवालीं केली व घरीं निघून गेला.

ही सांखळी अशीच्या अशीच जर दिली तर पुन्हां पंचाईत. म्हणून नोकर सोनाराकडे गेला आणि ती गाळून देण्यास सांगितलें.

सोनारानें ती सांखळी ओळखली. कारण त्यानेंच ती घडविली होती. नोकराच्या हातून घेऊन त्यानें विचारपूस करण्यासाठीं पाटलाकडे निरोप पाठविला. तेव्हांच त्यांना सांखळीची गोष्ट आठवली.

आगींतून वांचवतांना आपल्या नोकरानेंच सांखळी चोरल्याचें पाहून पाटील रागावला. त्यानें खरी माहिती गोळा केली. नोकरानें मुलाला वांचवलें नसून गोपाळनें वांचवले होतें. हें ऐकून तर पाटलाच्या तळव्याची आग मस्तकाला भिडली. त्याच क्षणीं त्यानें त्या नोकराला पन्नास फटक्यांची शिक्षा सुनावली. त्याला कर्ज फेडीची दिलेली सूट मागें घेतली. शंभर रुपये दंड केला आणि नोकरीवरून काढून टाकलें.

गोपाळला हें सर्व माहीत नव्हतें. एक दिवस तो आपल्या घराच्या ओसरीवर बसला असतां पाटील त्याच्याकडे आला व भेट पुढें केली.

"तुमचा बाळ सुखरूप आहे ना? त्याला कुठें इजा नाहीं ना झाली? बस, तेवढी भेट मला पुरे." गोपाळ म्हणाला.

गोपाळच्या या निरपेक्षी स्वभावाचें पाटलाला कौतुक वाटलें. त्यानें गोपाळ नाहीं म्हणत असतां सुद्धां बरेच इनाम देऊन त्याचा सत्कार केला.



## "बिगबेन"

जगांतील प्रसिद्ध घड्याळांतील एक घड्याळ लंडनच्या पार्लमेंट हाऊस मध्यें आहे. त्यालाच 'बिगबेन' म्हणतात. कसल्याहि प्रकारच्या दुरुस्तीशिवाय हें शंभर वर्षांवर होऊन गेली तरी न थांबतां सतत चाललें आहे. त्याचा लंबक १३ फूट आहे. मिनीट कांटा १४ फूट आहे व तास कांटा ९ फूट आहे.










# भारताचा इतिहास



विजयनगर साम्राज्याची स्थापना कशी झाली याविषयीं अनेक किंवदंती व गोष्टी रूढ आहेत.

असें सांगतात कीं संगम नांवाच्या एका गृहस्थाला पांच मुलें होतीं. त्यांत हरिहर राय व बुक्कराय पुढें प्रसिद्ध झाले. पांच भावंडांनी मिळून तुंगभद्रा नदीच्या दक्षिण तीरावर, उत्तरी तीरावरच्या अनेगोन्दी कोटासमोर विजयनगर शहर निर्मिलें व विजयनगर राज्य स्थापन केलें.

या भावंडांना या नगराची व साम्राज्य स्थापन करण्याची प्रेरणा माधव विद्यारण्य व त्यांचा भाऊ सायन यांच्या कडून मिळाली. दोघे ब्राह्मण होते व विद्वान पंडित होते. वेदांचें सायन भाष्य याच सायननें लिहिलें.

कांहीं लोकांच्या मतें हे पांच भाऊ तेलुगु भाषी प्रांतांतले निवासी होते. काकतीयांच्या राज्यांतून येऊन तुंगभद्रेच्या काठीं येऊन राहूं लागले होते.

एवढें खरें कीं हरिहरराय, बुक्कराय व त्यांच्या तिघां भावांनीं उत्तरेकडून मुसलमानांच्या ज्या स्वाऱ्या झाल्या त्यांना आपलें शौर्य व साहस दाखवून तोंड दिलें व त्यांना या कामीं बरेंच यश पण मिळालें.

या भावांनीं परकीय सत्ता, धर्म, सभ्यता व संस्कृति यांचा प्रभाव कमी करण्याच्या कामीं आपली सर्व शक्ति खर्ची घातली व सुमारें तीन शतकें भारतीय संस्कृतीचें रक्षण केलें. त्याचप्रमाणें बहमनी राज्य दक्षिणेकडे किंवा उत्तरेकडे वाढूं दिलें नाहीं. त्या वेळच्या देशाच्या राजनैतिक स्थितीची गुरुकिल्लीच जणुं कांहीं विजयनगरच्या हातीं होती, असें ऐतिहासिकांचें मत आहे. भारताच्या इतिहासांत विजयनगर साम्राज्याला महत्व मिळण्याचें मुख्य कारण हेंच होय.



विजयनगरच्या गादीवर संगम घराण्याचे राजपुरुष राज्य करीत होते. पहिल्या बुक्कराय व पहिल्या हरिहरराय यांच्या कारकीर्दींत होयसळांच्या राज्याचा बराच भाग विजयनगर साम्राज्यांत सामील झाला. १३७४ मध्यें बुक्करायनें चीन देशांत आपला राज्यदूत पाठविला. सन् १८७८-७९ मध्यें त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा द्वितीय हरिहरराय हा गादीवर बसला. त्यानें आपल्या नांवाबरोबर 'महाराजाधिराज राजपरमेश्वर' ही उपाधि धारण केली. त्याच्या राज्यांत सर्वत्र शांतता नांदत होती. शिलालेखांच्या आधारें असें कळतें कीं त्याच्या कारकीर्दींत विजयनगर व मुसलमान यांचीं परस्पर युद्धें झालीं होतीं.

बहमनी राज्यासारखीच विजयनगराचें राज्य व इतर राज्यें यांचीं आपसांत युद्धें होत होतीं. सन् १३७८ मध्यें द्वितीय हरिहरराय याचा मुलगा द्वितीय बुक्कराय यानें आपल्या बापाच्या परवानगीनें कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांच्या मधील रायचूर हा प्रदेश आपल्या राज्याला जोडण्यासाठीं बहमनी साम्राज्यावर उत्तरेकडे स्वारी केली. या प्रदेशासाठीं विजयनगर व बहमनी राज्यें यांचीं युद्धें कित्येक वर्षांपासून चालू होतीं. परंतु या युद्धांत द्वितीय बुक्कराय याचा फिरोज शाह बहमनी याच्या हातीं पराभव झाला. सन १३७७ मध्यें द्वितीय बुक्कराय याला या युद्धाबद्दल नुकसान भरपाई देऊन संधी करावी लागली.

तरी द्वितीय हरिहरराय याच्या कारकीर्दींत विजयनगरचें साम्राज्य दक्षिण हिंदुस्थानांत पसरलें. म्हैसूर, कर्नाटक प्रांत, चंगलपेठ, त्रिचनापल्ली, कांजीवरम वगैरे

राज्यें विजयनगर साम्राज्याला जोडली गेलीं. द्वितीय हरिहर हा शैव होता. तो विरूपाक्ष स्वामीचा भक्त होता. परंतु इतर पंथ व धर्म यांचा तो आदर करी. सन १४०६ च्या ऑगस्ट महिन्यांत तो मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्यामुलांत गादीसाठीं भांडणें सुरू झालीं. शेवटीं ५ नोव्हेंबर १४०६ मध्यें प्रथम देवराय गादीवर बसला. बहमनी सुलतानांबरोबर युद्ध करीत असतां अनेक वेळां त्याचा पराभव झाला. सन् १४२२ मध्यें तो मरण पावला.

त्याच्यानंतर त्याचा मुलगा विजय बुकराय (अथवा वीर विजय) यानें फक्त कांहीं महिनेच राज्य केलें. त्याच्या नंतर त्याचा मुलगा द्वितीय देवराय हा गादीवर बसला. बहमनी सुलतानांच्या हातीं याचा पराभवदेखील अनेक वेळां झाला. परंतु यानें राज्य व्यवस्थेंत पुष्कळ सुधारणा केल्या. बहमनी सुलतानांशीं युद्ध करण्या-साठीं त्यानें आपल्या सैन्यांत मुसलमानांना देखील भर्ती केलें. व्यापार वाढविण्यासाठीं त्यानें लक्ष्मणा नांवाच्या एका व्यक्तीला 'दक्षिण समुद्राधिपति' नेमलें. राज्यकार्यांत तो त्याचा उजवा हात पण होता. त्यानें त्याला समुद्र पार व्यापाराची देखरेख करण्याच्या कामावर नेमलें होतें. सन् १४२० मध्यें एक इटलीचा प्रवासी व त्या-नंतर १४४३ मध्यें इराण देशाचा राज्यदूत विजयनगरच्या दरबारीं आले. त्या दोघांनीं विजयनगर राजधानी व विजयनगर साम्राज्य यांची फार प्रशंसा केली. तोंपर्यंत विजयनगर साम्राज्य सर्व दक्षिण हिंदुस्थानांत लंकेपर्यंत पसरलें होतें. विजयनगरसाम्राज्याची कीर्ति त्यावेळीं कळसाला पोंचली होती.





# प्रल्हाद चरित्र

[ २ ]

हिरण्यकश्यपु तपश्चर्येसाठीं निघाला त्या वेळीं त्याची बायको लीलावती गरोदर होती. त्याच वेळीं इंद्रानें राक्षसांच्या राज्यावर स्वारी केली. त्यानें राक्षसांचा पराभव केला व लीलावतीचें हरण करून तिला बरोबर इंद्रलोकीं घेऊन गेला.

तेव्हां नारदानें इंद्राच्या दरबारीं जाऊन त्याला सांगितलें कीं तूं हिरण्यकश्यपूच्या बायकोला हरण करून घेऊन आला आहेस. पण लक्षांत ठेव ती एक पतिव्रता साध्वी आहे. तिला सोडून दे."

परंतु इंद्रानें नारदाचें ऐकलें नाहीं व म्हणाला—"तिला मुलगा झाला म्हणजे त्याचा वध करून मी तिला सोडून देईन."

तेव्हां नारदानें त्याला सांगितलें कीं तिच्या पोटांत एक हरिभक्त आहे. तें कळल्यानंतर त्यानें तिला सोडून दिलें. नारद लीलावतीला आपल्या आश्रमांत घेऊन गेला आणि त्यानें तिला ज्ञानोपदेश केला. तो उपदेश लीलावतीच्या पोटांत असलेल्या त्या अर्भकाला सहजीं मिळाला.

हाच बालक पुढें भक्त प्रह्लाद या नांवानें प्रसिद्ध झाला. हिरण्यकश्यपूला एकंदर चार मुलें. अनुह्लाद, संह्लाद व ह्लाद अशीं इतर तिघांचीं नावें होतीं. प्रह्लादच सर्वांत प्रसिद्ध झाला. तो एक सुशील मुलगा होता. जन्मल्यापासूनच तो हरिभक्त निघाला. खेळते वेळीं, झोंपते वेळीं, खातांपितांना त्याचें चित्त सदा हरिचरणींच वसत असे.



हरिभक्तीच्या आनंदांत तो कीर्तन करी व नाचे. तो कोणाला तरी उत्तर देई, पण तो कोणाशीं बोल तो हें मात्र दिसत नसे. कधीं त्याच्या डोळ्यांतून आंसवें येत, तर कधीं तो मौनव्रत घेऊन हरीचें ध्यान करी. रात्रं दिवस तो हरिभक्तींत लीन राही.

राक्षसांचा गुरु शुक्राचार्य याला चंड व अपर्क असे दोन मुलगे होते. ते हिरण्यकश्यपूच्या घरींच रहात व इतर मुलांबरोबर प्रह्लादाला पण राजनीति शिकवीत.

विद्याध्ययन करीत असतां प्रह्लाद सर्व ऐकून घेई. परंतु त्याचा त्या विद्येवर कधींच विश्वास बसला नाहीं.

एकदां हिरण्यकश्यपूनें प्रह्लादाला मांडीवर घेऊन विचारलें—"बाळ, तूं इतके दिवस विद्याध्ययन करीत आहेस. तुला सर्वांत उत्तम विद्या कोणती वाटते?"

प्रह्लाद म्हणाला—"बाबा! काम, क्रोध, मद, मत्सर या षड्रिपूंनीं मला चारी बाजूंनीं घेरलें आहे. रानांत जाऊन एकांत स्थानीं हरीचें भजन करावें असें मला फार वाटतें."

हिरण कश्यपूला तें उत्तर ऐकून मनस्वी राग आला. तो लीलावतीला म्हणाला—"मुलांचीं मनें कोवळीं असतात जिकडे वळवावीं तिकडे वळतात. हा मुलगा बिघडतो आहे. वेळींच काळजी घे."

चंड व अपर्क यांना ही बातमी कळली. ते प्रह्लादाला बोलावून एकांत स्थानीं बसले आणि त्याला प्रेमानें कुरवाळून म्हणाले—"बाळा! तूं बुद्धिमान आहेस. नेहमीं खरें बोलतोस. हरिभजनाचें हें खूळ तुला कोणी लावलें? इतर मुलांच्या डोक्यांत हें खूळ कसें नाहीं शिरलें?"



"देवाची मायाच अशी कांहीं आहे कीं तीमुळें मनुष्याच्या हृदयांत आप-पर भाव उत्पन्न होतो. हा भ्रमाचा फेर ब्रह्मदेवाला देखील त्रास देतो. मग तुमच्या आमच्या सारख्या मर्त्यलोकांतील लोकांची गोष्टच नको सांगायला. लोहचुंबकासारखा हरि माझें मन व हृदय आकृष्ट करतो. म्हणून तुम्ही जें कांहीं बोलतां व मला स्वतःला जें कांहीं सुचतें त्यांतला भेद मला कळतो." प्रह्लाद म्हणाला.

तें उत्तर ऐकून दोघा गुरूंना प्रह्लादाचा जास्तच राग आला. म्हणाले—"चंदन वनासारख्या या दैत्य वंशाचा नाश करण्यासाठीं त्या विष्णूनें स्वतः कुऱ्हाड होऊन तुला तिचा दांडा केलेला दिसतो आहे." प्रह्लाद गुरू जे सांगत ते निमूटपणें ऐकून घेई. कांहीं काळ लोटल्यावर दोघा गुरूंची खात्री झाली कीं प्रह्लादाच्या डोक्यांतलें खूळ गेलें असावें. ते त्याला हिरण्यकश्यपूकडे घेऊन गेले.

हिरण्यकश्यपूनें प्रह्लादाला मांडीवर घेऊन प्रेमानें विचारलें—"बाळ! तू इतके दिवस विद्याभ्यास केलास. तुला कोणती विद्या सर्वांत जास्त आवडती?"



      

प्रल्हाद म्हणाला—

"श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।
अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥

ही नवविधा भक्ति सर्वांत उत्तम विद्या आहे पितृवर !"

हिरण्यकश्यपूला दोघां गुरूंचाच राग आला. तो त्यांना म्हणाला—"माझ्या पदरचें खाऊन तुम्ही माझ्या शत्रूचें स्तवन करायला शिकवलेंत माझ्या मुलाला !

दोघे गुरु म्हणाले—"महाराज ! ही विद्या त्याला शिकून मिळालेली नाहीं. अशी विद्या शिकून मिळत पण नाहीं. जन्मतच ही विद्या अवगत होते."

तें ऐकून हिरण्यकश्यपूनें आपला राग प्रल्हादावर काढला. त्याला मांडीवरून जमिनीवर आपटीत तो विचारूं लागला—"दुष्टा ! कोठून रे शिकून आलास ही विद्या !

"इंद्रियांचें ज्ञान शून्य झाल्यावर संसार सागरांत बुडणाऱ्या हरिभक्ताच्या हृदयांत ती आपोआप उपजते."

तें ऐकून हिरण्यकश्यपूनें सैनिकांनाबोलवून प्रल्हादाला डोळ्यासमोरून घेऊन जायला सांगितलें. म्हणाला—"याचा वध करा. याच्या चुलत्याचा ज्यानें वध केला त्याची आराधना करणारा माझ्या पोटीं जन्माला आलेला खपणार नाहीं. या माझ्या शत्रूचा मित्र तो माझा शत्रू. पांच वर्षांच्या वयापासून ज्यानें बापाशीं वैर करावयाचें ठरविलें तो पुढें काय करणार नाही हें सांगणें अशक्य आहे. हा मुलगा माझा असला म्हणून काय झालें. हाताला रोग झाला तर आपण हात कापून टाकतोंच की नाहीं ! त्याला पुरून टाका, आगींत जाळा, काय वाटेल तें करा. याचा शेवट झाला पाहिजे."






पावसाळा नुकताच सुरू झाला होता.

संध्याकाळची वेळ होती. विष्णुपुराहून मंधारनला जाण्याऱ्या वाटेवर एक तरुण घोडेस्वार एकटाच जात होता. तो त्यावेळीं ज्या जागीं होता तें एक विस्तीर्ण सपाट मैदान होतें. काळोख पडेल या भीतीनें त्यानें आपला घोडा भरधांव सोडला होता. मैदान पार करून जाईपर्यंत सूर्यास्त झाला व आकाश मेघाच्छादित झाल्यामुळें इतका काळोख पडला कीं पुढें वाट दिसेनाशी झाली. वीज चमकली कीं पुढील वाट दिसे. तेवढ्यांत जातां येईल तितका तो पुढें जात होता.

आणखी कांहीं वेळानें सोसाट्याचा वारा सुरू झाला. घोडा नेईल तिकडे जायचें असें त्यानें मनाशीं ठरविलें असावें. कारण हातांतली लगाम सैल झाली होती.

कांहीं अंतर चालून गेल्यावर घोड्याचा पाय दगडाला लागल्याचा आवाज झाला. त्याचवेळीं वीज चमकली आणि त्या तरुणाला-समोर एक इमारत दिसली. त्यानें खालीं उतरून पाहिलें तेव्हां पायरीला घोड्याचा पाय लागला होता हें कळलें. त्यानें घोड्याला तेथेंच एका झाडाला बांधून ठेवलें आणि निवाऱ्याची जागा मिळेल या आशेनें तो पायऱ्या चढूं लागला. पुन्हां वीज

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



चमकली आणि त्यालासमोर एक देऊळ दिसलें. त्याला दुरून हीच पांढरी इमारत दिसली होती.

देवळाचें दार बंद होतें. त्यानें हात लावून चाचपून पाहिलें तेव्हां आंतून कडी लावली असल्याचें त्याला समजलें. यावेळीं या निर्जनस्थानीं कोण आहे बुवा ! त्याला आश्चर्यच वाटलें.

पाऊस सुरू झाला. त्यानें बाहेरून दार खडखडवून पाहिलें. पण कोणी दार उघडलें नाहीं. धक्के मारून दार फोडून आंत जावें असें एकदां त्याला वाटलें. पण तसें करणें बरोबर नाहीं असा विचार करून त्यानें हातानेंच जोरजोरानें दार वाजवायला सुरवात केली. आंतली कडी तुटली व वाऱ्याच्या तडाख्यामुळें दार एकदम उघडलें गेलें. तरुण आंत-गेला. त्याला आंत बारीक पुसट आवाज ऐकूं आला. कोणीतरी बोलत होतें. वाऱ्याच्या झोंक्यानें दिवा विझला. म्हणून कोण बोलत आहे हें कळायला कांहीं मार्ग नव्हता.

त्यानें देवाला नमस्कार केला व विचारलें—"कोण आहे आंत !" त्याचें उत्तर त्याला मिळालें नाहीं. पण बांगड्याचा आवाज मात्र झाला.

त्यानें दार बंद केलें व ऐकूं जाईल अशा स्पष्ट व करड्या आवाजांत म्हणाला—"आंत जो कोणी असेल त्याला मी सांगत आहें. मी या दाराजवळ बसून विश्रांति घेत आहें. माझ्या हातांत तलवार आहे. आंतून कोणी येऊन दवळादवळ केली तर त्याला शिक्षा द्यायला ही तलवार समर्थ आहे. आंत कोणी स्त्रीच असेल तर तिनें निश्चिंतपणें विश्रांति घ्यावी. तिच्या केसालाहि धक्का लागूं देणार नाहीं."

थोड्या वेळानें एक बायकी आवाज स्पष्ट ऐकूं आला—"कोण आपण !"





तो प्रश्न ऐकून व एका स्त्रीचा तो आवाज आहे हें ओळखून तो तरुण चकित झाला. त्यानें प्रश्नाचें उत्तर देण्याऐवजीं उलट प्रश्नच केला—"मी कोण आहे, कळल्यानें तुम्हांला काय फायदा ?"

"नाहीं, आम्ही भ्यालों होतों. म्हणून विचारलें." त्याच आवाजांत उत्तर मिळालें.

"मी एक तरुण आहें. तुम्ही कोण हें कळेपर्यंत मी आपल्याविषयीं कांहींच सांगूं इच्छित नाहीं. तुम्हांला कोणत्याहि प्रकारें त्रास किंवा कष्ट होणार नाहीं, एवढेंच मी सांगूं शकेन." तो तरुण म्हणाला.

"आपल्या त्या उत्तरानें आम्हांला धीर आला व जीव भांड्यांत पडला. इतका वेळ मन खालीवर होत होतें व मनांत धाकधूक वाटत होती. आम्ही संध्याकाळीं शैलेश्वराच्या दर्शनासाठीं देवळांत आलों होतों. आंत पाऊल टाकल्यापासून सोसाट्याचा वारा सुरू झाला व त्या पाठोपाठ पाऊस पडूं लागला. आमच्या बरोबर आलेले लोक पुजा संपल्यावर यावें असें समजून आम्हांला पोंचवून निघून गेले. वाहनें पण परत गेलीं. अशा तऱ्हेनें आम्ही येथें अडकून पडलों आहों." स्त्री म्हणाली.

"कांहीं काळजी नाहीं. रात्रभर येथेंच विश्राम करा. उजाडल्यावर तुम्हांला तुमच्या घरीं मी पोंचता करीन." तरुण म्हणाला.

"शैलेश्वर आपलें कल्याण करो !" ती स्त्री म्हणाली.

मध्यरात्रीच्या सुमारास वारा व पाऊस ओसरला. तरुण म्हणाला—"मी जवळच्या खेडे गांवांतून दिवा घेऊन येतों. तोंपर्यंत तुम्ही येथेंच निश्चिंतपणें बसून रहा."

आंतून ती स्त्री म्हणाली—"दिव्यासाठीं फार दूर जायची गरज नाहीं. पुजाऱ्याचें घर जवळच आहे. तो रानांत राहतो म्हणून



त्याच्याकडे सतत विस्तव पण खात्रीनें असणार."

तरुण देवळांतून बाहेर आला. त्यानें दार लोटून घेतलें. बाहेर दुधासारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें. चांदण्यांत त्याला जवळच देवळाच्या चौकीदाराचें घर दिसलें. त्यानें जाऊन चौकीदाराला जागें केलें. परंतु चौकीदार दार उघडून बाहेर येईना. त्याला भीति वाटत होती. अवेळीं मध्यरात्रीं वारा व पाऊस चालू असतां कोण येणार! दाराच्या फटींतून त्यानें तरुणाला पाहिलें. तरुणानें फुकटांत दिवा मागायला आलों नाहीं. बक्षिस देईन असें सांगितल्यावर चौकीदारानें दिवा लावून दिला. तरुण दिवा घेऊन देवळांत आला. देवळांत संगमरमरी दगडाचें शिवलिंग होतें. त्याच्या पलीकडे त्याला दोन कुलीन स्त्रिया उभ्या असलेल्या दिसल्या. एक वयानें तरुण होती. तिनें दिवा आंत आल्याबरोबर डोक्यावर पदर घेतला व पदरा आड तोंड करून उभी राहाली. तिच्या वस्त्रावरून व आभूषणांवरून ती कुलीन व उच्च घराण्यांतली स्त्री आहे हें सहज कळण्यासारखें होतें.

दुसऱ्या स्त्रीचें वय सुमारें पसतिसाच्या घरांत असावें. ती त्या तरुणीची दासी असावी असें तरुणाला वाटलें. पण ती फक्त दासी नाहीं हें दाखविण्याचा प्रयत्न मात्र तिनें बराच केला. तिच्या बोलण्या-वागण्यावरून तें ओळखायला विशेष कठिण नव्हतें. एक गोष्ट लक्षांत आल्याशिवाय राहाली नाहीं, त्या बंगाली स्त्रिया नव्हत्या, पश्चिमकडील प्रांतांतल्या होत्या.

सर्व बाजूला चांगला उजेड पडेल अशा तऱ्हेनें दिवा ठेवून तो तरुण दोघींच्या समोर उभा राहिला. दोघींना तो चांगला





दिसला. त्याचें वय पंचविसाबाहेर नसावें. रुंद छाती, आजानुबाहु, देहाची उंच काठी, एक सुंदर राजपुरुषाची सर्व लक्षणें होतीं. रंग गोरा, हलक्या पोपटी रंगाचीं वस्त्रें कमरेला लोंबत असलेली तलवार. उजव्या हातांत भाला व डोक्याला पांढरा शुभ्र फेटा पाहून तो एक रजपूत वीर आहे यांत शंकाच नव्हती.

त्याला व त्या स्त्रियांना परस्परांची ओळख व्हावी असें फार वाटलें. त्यानेंच प्रथम औत्सुक्य दर्शविलें. म्हणाला—"उच्च कुलीन घराण्यांतल्या दिसतां आहां. म्हणून तुमची ओळख विचारतांना मनाला थोडा संकोच वाटत आहे. कांहीं कारणामुळें मला स्वतःची ओळख सांगणें शक्य नाहीं, पण तसा प्रश्न तुमच्यासमोर नाहीं. म्हणून तुमचा परिचय कळावा असें मात्र फार वाटतें."

दासीसारखी वाटत असलेली स्त्री म्हणाली—"बायकांनीं स्वतःची ओळख कशी काय सांगायची? त्यांनीं मागें किंवा बाजूला दृष्टिआड राहण्यांतच त्यांचा गौरव आणि शोभा आहे. त्यांना हुद्दा नसतो कीं कांहीं धंदा नसतो. कोणाचें नांव घेऊन त्यांनीं ओळख सांगायची? पतीचें नांव तोंडानें उच्चारणें त्यांना शोभत नाहीं."

तरुण त्यावर कांहींच बोलला नाहीं. त्याचें मन त्या तरुणीकडे आकृष्ट होत होतें व ती आपल्या दासीच्या आड उभी राहून मधून मधून पदराबाहेर तोंड काढून त्या तरुणाकडेच पहात होती. तिच्यावर एकदां दृष्टि पडल्यापासून त्याची नजर तेथें अटकून राहिली. इतकें सौंदर्य त्यानें आयुष्यभरांत पूर्वी कधीं पाहिलें नव्हतें.

परस्परांच्या नजरा भिडल्या व दोघांच्या मनाचें समाधानपण झाल्यासारखें भासलें.



तरुणाकडून कांहीं उत्तर न आलेलें पाहून व दोघांच्या नजरा भिडलेल्या पाहून ती स्त्री तरुणीच्या कानाजवळ तोंड नेऊन हळूच म्हणाली—“साक्षात् शैलेश्वराच्या समोरच स्वयंवराचा विचार आहे वाटतें.”

डोळे वटारल्यासारखे करून पण गालां-तल्या गालांत हंसत ती तरुणी म्हणाली—“पुरे कर ग!”

प्रेमपाशांत गुरफटल्यानंतर आपल्या सखीला कष्ट सहन करावे लागतील व म्हणून वेळींच तिला बाहेर काढण्याच्या विचारानें ती तरुणाला म्हणाली—“या वादळांत सांपडून आम्ही बराच वेळ येथें अडकून राहालों. आतां पाऊस थांबला आहे व वारा पण थांबला आहे. म्हणून आम्ही हळूहळू घरीं जाऊं.”

“मलादेखील पुढें जायचें आहे व ठरल्या जागीं पोंचायचें आहे. पण आपल्या सखीनें या अपरात्रीं अरक्षितपणें जाणें मला रास्त वाटत नाहीं. म्हणून मीच तुम्हांला तुमच्या घरीं पोंचवून येईन.” तरुण म्हणाला.

“तुमची एवढी कृपा आहे आमच्यावर. पण एक विनंति आहे आमची. आपण आपल्या कामावर जावें. आम्ही कृतज्ञपणा दाखविण्याऐवजीं असें बोलल्याचा राग मानूं नये. स्त्री जात आमची. पदोपदीं फुंकून पाऊल टाकावें लागतें आम्हांला. समजा, तुम्ही आलांत आम्हांला पोंचवायला घरापर्यंत आणि आमच्या मालकांनीं, म्हणजे यांच्या वडिलांनीं विचारलेंच कीं या रात्रीच्या-वेळीं तुमच्याबरोबर येणारा तो तरुण कोण, तर आम्ही काय उत्तर द्यायचें?”

तरुण क्षणभर थांबून व विचार करून म्हणाला—“सांगा कीं मानसिंह महाराजांचा मुलगा जगतसिंह याच्याबरोबर आलांत!”

तें ऐकून दोघी चपापल्या, जणुंकांहीं देवळावर वीजच कडाडली. दोघी जरा एका बाजूला सरकून उभ्या राहाल्या. दासी पदर सावरून संकोचाच्या स्वरांत थोडी वळून व मान खालीं करून म्हणाली—“युवराज! नकळत चूक झाली आमच्याकडून क्षमा करावी.”

जगतसिंह स्मित करून म्हणाला—“तुम्ही केलेल्या अपराधाबद्दल क्षमा केली. पण तुम्ही आतां आपली ओळख सांगितली नाहींत तर मात्र अवश्य दंड करीन.”

तरुणी स्मित करून म्हणाली—“तो दंड आम्हांला मान्य आहे. कांहीं हरकत नाहीं. आज्ञा करावी!”

“तुझ्याबरोबर मी तुला घरीं पोंचती करीन, हाच तो दंड.” युवराज म्हणाला.

इतक्यांत बाहेर घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं आला. तरुण लगेच देवळा-बाहेर गेला. शंभरावर रजपूत घोडेस्वार येत होते. ते त्याचेच अनुयायी होते. तो मोहिमेवरच विष्णुपुरास गेला होता. तिकडून परत येत असतां तो आपल्या अनुयाया-पासून एकटाच दूर निघून आला होता. ते त्याच्या पाठोपाठच येत होते.



“दिल्लीश्वराचा जय असो” असा जय-जयकार सैनिकांनीं केल्यावर एक घोडेस्वार पुढें येऊन म्हणाला—“पुष्कळ शोध केला आपला. शेवटीं झाडाला बांधलेला आपला घोडा दिसला.”

“जवळच्या खेडेगांवांत जाऊन दोन पालख्या किंवा डोल्या आणायला दोघां सैनिकांना पाठव आणि दोघांना येथेंच रहायला सांग. बाकी सर्व पुढें चला.” जगतसिंह त्या घोडेस्वाराला म्हणाला. युव-राजानें दोन पालख्या आणायला सांगितल्या आहेत हें ऐकून रजपूतांना आश्चर्य वाटलें.

या अवधींत तरुणीनें आपल्या दासीला विचारलें—"विमला! माझी ओळख कां ग करून दिली नाहींस राजकुमाराशीं!"

"कां करून दिली नाहीं हें मी आतां तुझ्या बाबांसमोरच सांगेन." विमला म्हणाली.

पालखी आणायला म्हणून जे सैनिक गेले होते त्यांच्या बरोबर त्या स्त्रियांसाठीं त्यांनीं स्वतःची वाहनें पण येत असलेलीं दिसलीं. तीं पाहून जगतसिंह देवळांत येऊन म्हणाला—"तुमच्या रक्षक सैनिकांनीं आम्ही मागवलेल्या पालख्या पाहिलेल्या दिसतात. जरा बाहेर येऊन ते तुमचेच लोक आहेत ना पाहून घ्या."

विमला बाहेर येऊन म्हणाली—"होय, आमचेच लोक."

"तर मग त्यांनीं मला येथें पाहणें बरोबर नाहीं. आणखी एक आठवडा तरी मी येथें तुम्हांला दिसलों किंवा भेटलों हें कोणाला कळतां कामा नये. तुझ्या सखीनें माझें मन चोरलें आहे. पण तुमच्या दोघींच्या विषयीं मला जास्त कांहींच कळलें नाहीं."

"युवराज, मी आपल्या सखीविषयीं कांहीं सांगितलें नाहीं तर त्याचेंदेखील एक कारण आहे. एवढें कळल्यावर देखील कळून घेण्याची इच्छा मनांत असेल तर पंधरा दिवसांनीं आपण सांगाल तेथें मी आपणांला भेटून सर्व सांगायला तयार आहें."

कांहीं वेळ विचार करून तो म्हणाला—"त्या दिवशीं येथेंच भेटावें म्हणतों. तेव्हां भेटणें शक्य झालें नाहीं तर आमची आपली भेट पुन्हां कधीं होणार नाहीं." असें सांगून त्यानें त्या तरुणीकडे वळून एकदां पाहिलें व घोड्यावर बसून निघून गेला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# भाग्यहीन

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां त्या झाडाजवळ गेला. झाडावरील प्रेत काढून तें खांद्यावर टाकलें आणि मुकाट्यानें स्मशानाकडे जाऊं लागला. तेवढ्यांत प्रेतांतील वेताळ बोलूं लागला. तो म्हणाला—"राजा, मला कळत नाहीं कीं कोणत्या अपराधाचें प्रायश्चित्त म्हणून तूं एवढ्या अपरात्रीं असे कष्ट करीत आहेस. जगांत असे किती तरी लोक आहेत जे अपराधाशिवाय भयंकर शिक्षा भोगीत आहेत. त्या साकेताचेंच पहा ना, तुला कदाचित त्याची गोष्ट माहीत नसेल. सांगतों, ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट सुरू केली.

उशीनर देशांत साकेत नांवाचा एक खाटीक राहात असे. बकऱ्या पाळण्याची कला त्याला अवगत होती, म्हणून त्याच्याकडे बकरीचें मांस उत्तम मिळत असे. दूर

## वेताळाच्या गोष्टी



दूर अंतरावरून लोक येत व मांस विकत घेऊन जात. ह्यामुळें त्याला चांगली मिळकत होत असे.

एकदां एक म्हातारा त्याच्या दुकानांत आला. त्यानें मांस विकत घेतलें व त्याबद्दल त्याला एक चांदीचें नाणें दिलें. साकेतानें पूर्वी कधीं तसलें नाणें पाहिलें नसल्यानें त्याला मोठें नवल वाटलें. तें पाहून त्याला खूप आनंद झाला. त्यानें तें एका निराळ्या पिशवींत ठेवून दिलें. त्या दिवसापासून तो म्हातारा रोज साकेताकडे मांस विकत घेण्या-साठीं येई व एक चांदीचें नाणें देऊन जाई.

साकेत शेळ्यामेंढ्यांना चांगलें खायला प्यायला घालून घट्टपुष्ट करीत असे. आस-पासच्या गांवांचे पाटील शेतकरी वगैरे सर्व झुंज लावण्यासाठीं त्याच्या जवळूनच शेळ्या मेंढ्या घेऊन जात असत. पुढें पुढें तो अशा विक्रीसाठींच आसपासच्या गांवांतून चांगल्या जातीच्या मेंढ्या निवडून आणूं लागला. ह्यामुळेंहि त्याला बराच पैसा मिळत असे.

ह्या वर्षी त्याच्याजवळ बरीच चांदीची नाणीं जमली होतीं. तींच देऊन शेळ्या-मेंढ्या विकत घेण्याचा त्यानें निश्चय केला. त्यानें पिशवींत हात घालून नाणीं बाहेर काढलीं. तीं पाहून तो तर जवळजवळ बेशुद्धच झाला. कारण तीं नाणीं ठिकऱ्या होऊन गेल्या होत्या. निराशा, दुःख, क्रोध, सर्व एकत्र होऊन त्याच्या अंगाला घाम सुटला—"चांगलेंच फसविलें त्या म्हाताऱ्यानें, येऊं दे त्याला. चामडीच लोळवितों त्याची." संतापानें साकेत आपल्याशींच पुटपुटला.

"काय झालें? कोणी फसवलें" एक गिऱ्हाईक विचारीत होता, तेवढ्यांत तो म्हाताराहि तेथें आला. त्याला पाहतांच साकेत उडी मारून बाहेर आला व त्या म्हाताऱ्याची मानगुटी धरून ओरडला—"चोर, लुचा! मला फसवतोस काय?"

साकेताला दूर लोटीत म्हातारा गरजला—"काय! पुन्हां बोल, असें कांहीं बोललास तर पहा. पिळून काढीन तुला! मला ओळखलें नाहींस वाटतें अजून."

"माझें रे काय करणार? खऱ्याला कधीं मरण नसतें. धोका देऊन पुन्हां चोराच्या उलट्या आहेत." साकेत म्हणाला व म्हाताऱ्याला मारूं लागला.

"तूंच आवर आपलें तोंड आणि हात. बिंग कोणाला माहीत नाहीं तोंपर्यंतच" असें म्हणत म्हातारा लोकांच्याकडे पाहून म्हणाला—"तुम्ही आजपर्यंत जें मांस खाल्लेंत तें बकरीचें नसून नरमांस होतें. पहा जाऊन पाहिजे तर ह्याच्या घरांत प्रेत पडलें आहे की नाहीं."

"खोटें सपशेल खोटें." खाटीक ओरडला.

तो म्हातारा मांत्रिक होता. तो त्यांना म्हणाला—"पुराव्यासह सिद्ध करून दाखवितों. चला, माझ्या बरोबर ह्याच्या घरांत." असें म्हणत म्हातारा कांहीं लोकांना घेऊन साके-ताच्या घरांत गेला. साकेत पाठोपाठ येत होताच. म्हातारा सर्वांना घेऊन त्याच्या



घराच्या मागील खोलींत गेला. तेथें खरो-खरच एक प्रेत पडलेलें सर्वांनीं पाहिलें. तें पाहून साकेत सुद्धां थक्क झाला. त्याला स्वतःलाच त्याचें आश्चर्य वाटलें. ज्यांनीं तें पाहिलें त्यांनीं चिडून साकेताला खूप खूप चोप दिला. इतका कीं त्याचा डावा डोळा फुटला.

त्याला शुद्ध आली तेव्हां जवळपास कोणी नव्हतें. त्याचें घरदार सर्व लोकांनीं लुटून नेलें होतें. आतां येथें राहण्यांत अर्थ नाहीं. म्हणून तो तें गांव सोडून दूर देशीं जाऊन राहूं लागला. पिढीजात चांभार

असल्यानें त्यानें आतां वहाणाचा धंदा सुरू केला. हातांत कसब असल्यानें त्याला त्याहि धंद्यांत यश आलें.

दुर्दैव एकाद्याच्या पाठीस लागलें कीं हात धुवून मागें लागतें.

एक दिवस साकेत आपल्या दुकानांत बसून वहाण शिवत होता. तेवढ्यांत रस्त्या-वरून शिंग फुंकल्याचा आवाज आला म्हणून त्यानें वर मान करून पाहिलें. राजा आपल्या कांहीं नोकरांच्या बरोबर घोड्यावर बसून शिकारीला चालला होता. साकेतला पाहतांच राजानें आपल्या नोकरांस आज्ञा दिली—"त्या काण्याला शंभर फटके मारून देशाबाहेर हाकलून द्या." राजाला तो अपशकून वाटला. मागें परतून निघून गेला.

राजाच्या आज्ञेवरून साकेताला शंभर फटके मारून त्याला राज्याबाहेर हाकलून देण्यांत आलें—"अरे पण मी असा काय अपराध केला?" साकेतनें विचारलें.

"आमच्या राजाला काण्याचें दर्शन अप-शकुनी आहे. त्यांतून डावा डोळा आंधळा असला तर तो फारच वाईट म्हणून तुला हा देश सोडून गेलेंच पाहिजे." सैनिकांनीं सांगितलें—"नाहीं तर मृत्यू दंड मिळेल."



बिचारा साकेत तो देश सोडून आणखी दुसऱ्या देशांत गेला. तेथें दूर एका बाजूला एका कोपऱ्यांत त्यानें एक घर घेतलें व तेथें राहूं लागला.

दोन ठिकाणीं दोन तऱ्हेचे अनुभव आल्यानें तो फार सावधगिरीनें राहूं लागला. तो सहसा घराच्या बाहेर पडत नसे. कोणाकडे पाहात नसे. कोणाशीं बोलत नसे.

असे किती दिवस कोणी राहूं शकेल! त्याला घरांतल्या घरांत बसून गुदमरल्या-सारखें होऊं लागलें. आपण बाहेर जावें, लोकांशीं बोलावें, गप्पा माराव्या, हंसावें, मनमोकळें करावें, असें वारंवार वाटूं लागलें.

एक दिवस रात्रीं तो भीतभीतच डोक्याला मुंडासें बांधून घराच्या बाहेर पडला. थोडा गेला असेल नसेल तोंच पाठीमागून घोड्यां-च्या टापा ऐकूं आल्या. कोणी राजा वगैरे येतो आहे कीं काय म्हणून तो धूम पळत सुटला आणि एका घरांत शिरला. त्या घराचें दार नुसतें लोटलेलेंच होतें म्हणून तो आंत गेला व थोड्यावेळानें निघून जावें असा विचार करूं लागला. पण एवढा विचार करण्याला त्याला वेळच मिळाला





नाहीं दोघा अहदांड माणसांनीं त्याला दोन्ही कडून धरलें आणि म्हणाले–"अरे दुष्टा किती दिवस दडून राहाशील? आलास का नाहीं आपणच."

साकेतानें भीतभीतच विचारलें–"मला कशासाठीं पकडलेंत? मी काय केलें आहे? काय चूक आहे माझी?"

"वाहवा! वाहवा! बराच साव झाला आहेस. तूं आज तीन दिवसापासून आमच्या मालकाला मारण्यासाठीं तलवार घेऊन हिंडतो आहेस, तें काय आम्हांला माहीत नाहीं! आम्ही पकडायला आलों कीं पळून जात होतास. असा साळसुदासारखा तोंडाकडे काय पाहातोस." ते म्हणाले.

"कोण तुमचा मालक? तुम्ही कोण, मला कांहींच माहीत नाहीं. ह्या गांवांत मी नवा आहें." साकेत म्हणाला.

"आम्हांला फंसवतोस काय? आम्ही कांहीं एवढे मूर्ख नाहीं कीं तूं म्हणशील त्यावर विश्वास ठेवून सोडून देऊं. जर आमच्या मालकाला मारण्याचा तुझा बेत नव्हता तर अशा अपरात्रीं येथें येऊन लपण्याचें कारण काय? कमरेला तलवार आहे कीं नाहीं" असें म्हणत त्या दोघांनीं उभ्याउभ्याच त्याची झडती घेतली. दुर्दैव बिचाऱ्याचें, त्याच्या कनवटीला खरोखरच त्यावेळीं चामडें कापण्याचा चाकू होता. त्या दोघांनीं त्याला सरळ न्यायाधिशाकडे नेलें. तेथें थोडी चौकशी करतां न्यायाधिशाला समजलें कीं त्याला एकदां फटक्यांची शिक्षा मिळालेली आहे. तेव्हां हा जुनाच गुन्हेगार आहे. असें वाटून त्यानें–"पुन्हां एकदां त्याला शंभर फटके मारून देशांतून हाकलून लावा" म्हणून सांगितलें.

इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, त्या बिचाऱ्या साकेतवर एवढी दैवी कोप कां? कशासाठीं आपला कामधंदा सोडावा लागला त्याला? कशासाठीं त्याला असें रानोमाळ हिंडावें लागलें? कशासाठीं त्याला एवढ्या शिक्षा भोगाव्या लागल्या? तो तर अगदीं निरपराध होता. ह्या माझ्या शंकांचें निरसन तुला माहीत असून सुद्धां जर तूं केलें नाहींस तर तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायाशीं पडतील."

विक्रमार्क म्हणाला–"साकेताला उगीच नाहीं कष्ट भोगावे लागले. चांदीच्या तुकड्याला खापरें बनवणारा कोणीतरी चेटककरणारा असला पाहिजे हें जाणून सुद्धां त्या चेटक्याशीं त्यानें कां भांडण केलें! बरें, आपल्या घरांत नसतांना सुद्धां त्या माणसानें प्रेत असल्याचें भासवलें एवढ्यावरून तरी त्यानें त्या माणसाला समजायला पाहिजे होतें. त्यानें आपल्यापेक्षां बलवानाचा विरोध करायला नको होता. त्यांत गांव सोडून निघून गेला. तेथें परदेशांत त्याला कोणाचें सहाय्य? म्हणून त्याला लहान सहान गोष्टीचें सुद्धां भय वाटूं लागलें. आणि एकदां माणूस घसरला कीं त्याला सावरणें कठीण होतें. तो आपल्याला सावरूं शकला नाहीं म्हणून त्याला अशा शिक्षा भोगाव्या लागल्या. जर त्यानें प्रथमच थोडा विचार केला असता तर त्याच्यावर अशा शिक्षा भोगण्याची पाळी आली नसती. तो आपल्याच गांवांत राहिला असतां तर त्याला त्या गांवच्या लोकांचें थोडें तरी पाठबळ मिळालें असतें."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां त्या झाडावर लोंबकळूं लागला.














# इंद्राणी

त्वष्टप्रजापतीनें विश्वरूपाची सृष्टि केली. तेव्हां सर्व देवांनीं त्याला आपला गुरू मानलें. देवांप्रमाणें दानवांनींहि त्याला गुरू मानून त्याची पूजा केली. विश्वरूपाला यज्ञांतील एक भाग अवश्य मिळत असे. तो आपल्या भागांतील थोडासा यज्ञभाग दानवांनाहि देत असे. ही गोष्ट इंद्राला मुळींच आवडत नसे. ह्या रागावर त्यानें विश्वरूपालाच मारून टाकलें. त्वष्टप्रजापतीला ह्याचा फारच राग आला. म्हणून इंद्राला ठार करण्यासाठीं त्यानें यज्ञकुंडांतून वृत्रासुराला उत्पन्न केलें.

वृत्रासुरानें तप करून ब्रह्मदेवाला वश करून घेतलें व त्याच्याकडून अनेक अमूल्य अस्त्र मागून घेतलीं. नंतर त्यानें इंद्राशीं युद्ध करून त्याला युद्धांत हारवलें.

पराजय झाल्यानें इंद्र विष्णूकडे गेला. तेव्हां विष्णूनें त्याला सांगितलें कीं वृत्रासुराला कपटानेंच मारलें पाहिजे. सध्यां तरी तूं त्याच्याशीं वैर मांडू नकोस. तेव्हां विष्णूच्या आज्ञेवरून ऋषीमुनींच्या मध्यस्थीनें दोघांनीं वैर सोडून मैत्रीनें रहावयाचें ठरविलें.

पुढें वृत्रासुर बलहीन झाला. तीच वेळ साधून इंद्रानें वृत्रासुराला ठार केलें.

वृत्रासुराचा वध केल्यावर इंद्राला गर्व चढला कीं त्रिलोकांत त्याच्या इतका पराक्रमी कोणी नाहीं. एवढेंच काय, प्रत्यक्ष ब्रह्मदेवापेक्षांहि तो आपल्याला बलाढ्य समजूं लागला. ह्या नंतर इंद्रानें सर्व देवांची एक सभा बोलाविली व म्हणाला—"आतां ह्या पुढें मीच तुम्हां सर्वांत श्रेष्ठ म्हणून तुमचे सर्वांचे यज्ञ भाग अगोदर माझ्यापाशींच आले पाहिजेत. मी आपल्या वांटा घेतल्या नंतरच बाकीच्यांना मिळणार आणि आजपासून माझें वास्तव्य ब्रह्मलोकांत राहील."

इंद्राची ही घोषणा ऐकून सर्व देव परस्पराकडे पाहूं लागले. तेव्हां बृहस्पतीच्या संकेतावरून सर्वांनीं त्याच्या पुढें मान वांकविली. हें पाहून इंद्र खुश झाला व मोठ्या गर्वानें ब्रह्मलोकांत गेला.

ब्रह्मदेवापुढें जाऊन त्यानें गर्वोक्ति केली. म्हणाला—"तूं वृत्रासुराला निरनिराळे वर देऊन एवढें बलाढ्य करून ठेवलें होतेंस कीं तो कोणाची देखील पर्वा करीत नसे. त्याचा वध करून त्रिलोक जिंकलें आहे. तुला मी ह्या पदावरून पदच्युत करून तुझे सर्व अधिकार स्वतःकडे घेतले आहेत. उतर खालीं चालता हो येथून!"

"तूं पराक्रमी आहेस हें खरें! पण मी आपली जागा सोडून कसा जाऊं शकेन? मला तसें जातां येणार नाहीं." ब्रह्मदेवानें उत्तर दिलें.

"तूं स्वतःला समजतो आहेस तरी काय? तूं पासून मीच त्रिलोकपति झालों आहें. मी देवेंद्र आहें." असें म्हणून तो ब्रह्मलोकांतील उद्यानांत गेला.



ब्रह्मदेवाची मुलगी त्या वाटिकेंत एका झाडाखालीं उभी राहून विचार करीत उभी होती. इंद्र तिच्याजवळ गेला. ती ब्रह्मदेवाची मुलगी आहे असें समजल्यावर मोठ्या अधिकारवाणीनें तो तिला म्हणाला—"मी कोण आहे, माहीत आहे का तुला? ब्रह्मा, विष्णु महेश सुद्धां जें कार्य करूं शकले नाहींत तें करणारा, महाशक्तिशाली, सर्वाधिकारी आहें मी. सर्व सृष्टीला "त्राहि" "त्राहि" करून सोडणाऱ्या वृत्रासुराला ठार करून मी त्रिलोकाला भयमुक्त केलें आहे. मी देवेन्द्र आहें. तुझ्या बापानें



हा लोकसुद्धां मला देऊन टाकला आहे. म्हणून तूं माझ्याशीं लग्न करावेंस."

तिनें एका पानावर कांहीं तरी लिहून तें त्याला दिलें आणि म्हणाली—"मी कांहीं प्रश्न विचारतें त्यांचीं उत्तरें दे व नंतर मी लिहिलेलें वाच." "तूं प्रश्न विचारणार? विचार." इंद्र थोड्या लाडिकपणें म्हणाला.

"तूं माझ्या सारख्या स्त्रीची सृष्टि करूं शकशील का" तिनें विचारलें.

"त्यांत काय आहे; तूं माझ्याशीं लग्न केल्यावर तुला तुझ्यासारखी मुलगी होणार नाहीं का?" इंद्रानें उत्तर दिलें.

"पण ती तुझ्या एकट्याची कृति कशी होईल? बरं तूं वृत्रासुराला तरी घडवूं शकशील का?"

"त्याच्या सारख्या दुष्टाला पुन्हां उत्पन्न करण्याच्या गोष्टी कशाला?"

"बरं तर तूं त्याला पुन्हां ठार करून दाखवशील का?" तिनें विचारलें.

"चेष्टा चालविली आहेस कीं काय तूं माझी? ओळखलें नाहींस वाटतें मला?" इंद्र जरा रागानेंच म्हणाला.

"चेष्टा नाहीं, खरंच विचारतें. तो येथेंच आहे. थांब! वृत्रासुरा! इकडे ये जरा" तिची हांक ऐकतांच पर्वतासारखा धिप्पाड वृत्र पुढें येऊन उभा राहिला.

त्याला पाहतांच इंद्रानें वज्र उगारून त्याच्यावर सोडलें. परंतु वृत्रासुराला त्यानें कांहीं सुद्धां झालें नाहीं. उलट तो मिस्किलपणें हंसला. इंद्र मनांतल्या मनांत वरमला. त्याचा चेहेरा एकदम उतरला.

त्याचा उतरलेला चेहेरा पाहून ती म्हणाली—"ही तुझ्या हातून होणारी गोष्ट नाहीं. तुझ्या आयुधानें मारला जाऊन मुक्त होऊन हा येथें आला आहे." वृत्राला जावयास सांगून ती पुन्हां म्हणाली—"सांग, आतां तूं याच्या सारखी प्रतिकृति घडवूं शकशील का?"

"तूं माझा अपमान करण्याचें ठरविलें आहेस काय!" इंद्र रागानें म्हणाला.

"छे, छे, तसें मुळींच नाहीं. तूं मला लग्न करण्यासाठीं विचारलेंस ना? म्हणून विचारलें. उघड तें पान आणि वाच काय लिहिलें आहे तें." इंद्रानें पानावरील अक्षरें वाचली—"माझ्या पित्याहून बलाढ्य असणाराशीं मी लग्न करणार नाहीं."

"वाचलेंस? मी तुझी परीक्षा करून पाहिली. एका संकल्पानें माझ्या वडिलांनीं मला घडविलें आहे व वृत्रासुराला शक्तिहि पण त्यांनींच दिलेली आहे. अशा कित्येकांची सृष्टि ते करूं शकतात. तूं म्हणालास, मी तुझ्या बापाहून शक्तिशाली आहे. म्हणून मला अशी परीक्षा करावी लागली आणि तूं त्याच्याहून जास्त शक्तिशाली नाहींस हें सिद्ध झालें. आतां तुझ्याशीं लग्न करण्यास मी तयार आहें."

ती इंद्राला घेऊन आपल्या पित्याकडे म्हणजे ब्रह्मदेवाकडे गेली. दोघांनीं त्याला नमस्कार केला व नंतर इंद्राशीं लग्न करण्याची आपली इच्छा तिनें












प्रगट केली. त्या दोघांना ब्रह्मदेवानें आशीर्वाद दिला.

ब्रह्मदेवाचा निरोप घेऊन इंद्र इंद्राणी सह स्वर्गलोकीं परत आला. तेथें त्यानें सर्व देवांची महासभा भरवली व यज्ञ-भागाचें महापात्र मागून घेतलें. त्यानें आपला अधिकार सांगितल्या वेळेपासून कोणीहि त्यांतील यज्ञभाग घेतलेला नव्हता. देवांनीं तें महापात्र आणून त्याच्या पुढें ठेविलें. तेव्हां बृहस्पति म्हणाला—"आपली आज्ञा नव्हती म्हणून यज्ञांतील आपला भागहि आम्हीं घेऊं शकलों नाहीं तो देण्याची आमच्यावर कृपा करावी. त्यावांचून आम्हीं निर्बल झालों आहोंत."

"होय, प्रथम हें पात्र माझ्या अंतःपुरांत जाऊं दे." इंद्राची आज्ञा होतांच सेविकांनीं तें पात्र तिकडे पोहोंचतें केलें.

पत्नीसह इंद्र तेथें गेला व तिला म्हणाला—"पहा, माझें वैभव! तुला पाहिजे तेवढा भाग घेऊन बाकी माझ्यासाठीं ठेव."

"ह्यांत सर्व देवांचा भाग आहे. आपणच सर्व घेऊन टाकला तर देव आपापलीं कामें कसे करतील. मी जर त्या कार्यवाहकांचा सर्व भाग सेवन केला तर तीं सर्व कामें मलाच करावी लागतील." इंद्राणी म्हणाली.

"तसें कांहीं नाहीं ह्याचा सर्व अधिकार तुला दिला आहे." इंद्र म्हणाला.

इंद्राकडून यज्ञभागाचा सर्व अधिकार मिळतांच इंद्राच्या बायकोनें सर्व देवांना बोलावून त्यांना आपापला यज्ञभाग घेण्यास सांगितला. इंद्र तिला अडवूं शकला नाहीं.

अशा तऱ्हेनें इंद्रानें बंद केलेला यज्ञभाग पुन्हां सर्व देवांना मिळूं लागला.






# शंका निरसन

विंध्यपर्वतांतल्या एका गुहेंत एक मुनि तपस्या करीत बसला होता. आस-पासच्या लोकांना जेव्हां हें कळलें तेव्हां ते त्याच्या दर्शनासाठीं येऊं लागले. भावुक लोक आपलीं दुःखें त्याला सांगत. तो आपल्या प्रेमळ वाणीनें त्यांचें समाधान करीत असे आणि त्यांना कधीं कधीं कांहीं उपाय पण सुचवीत असे. त्यामुळें लोकांना बरें वाटत असे. त्यांचें मन थोडें हलकें होत असे.

भक्तांची नाना तऱ्हेचीं दुःखें ऐकून साधूच्या मनाचा गोंधळ होऊं लागला. तो म्हणे कीं मीं वाचलेल्या शास्त्रांत ज्या कांहीं गोष्टी आहेत त्याच्या अगदीं उलट व्यवहार अनुभवास येतो आहे. धर्म नष्ट होत चालला आहे. अधर्माचें प्राबल्य वाढत आहे. परमेश्वर हेंच एक थोथांड आहे. स्वर्ग नरक हें देखील मोठें थोथांड आहे. पण एकदां प्रत्यक्ष अनुभव घेऊन पाहिलें पाहिजे. त्या शिवाय माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं.

मनांत येण्याचाच अवकाश, तो तेव्हांच निघाला आपला दंड व कमंडलू घेऊन गुहेच्या बाहेर.

थोडा दूर गेला असेल नसेल तोंच त्याला एक तेजस्वी बालमूर्ति दिसली. सुमारें बारा वर्षांचा असेल तो. साधूनें त्याला विचारलें—"कोठें निघालास?" तेव्हां तो म्हणाला—"जेथें तुला जावयाचें आहे तेथेंच मला देखील जावयाचें आहे." म्हणून ते दोघे मिळून वाट चालूं लागले.












वाटेंत मुक्काम करीत मजल दर मजल करीत दोघे चालले होते. वाटेंत एका गांवाच्या वेशीजवळ त्यांना बरीच गर्दी झालेली दिसली. ते जवळ गेले तेव्हां त्यांना समजलें कीं त्यांच्या स्वागतासाठींच त्यांचे भक्तगण गोळा झालेले आहेत. त्यांनीं या दोघांचें स्वागत केलें व त्यांना घेऊन एका मोठ्या वाड्यांत आले. त्यांच्या सत्कारार्थ एक मोठी मेजवानी दिली.

सर्व कार्यक्रम आटोपल्यावर हे दोघे जाण्यास निघाले. यजमानाचा निरोप घेतला तेव्हां यजमानाला सामानांतील सोन्याची वाटी चोरीस गेलेली आढळली. सर्वांना या मुलाचाच संशय येत होता. त्या साधूनेंहि तें पाहिलें होतें. पण कोणी तसें प्रकट बोलूं शकलें नाहीं.

साधूला सारखें वाटत होतें कीं आपण या मुलाला विचारावें कीं त्यानें असें कां केलें ! ज्यानें एवढें स्वागत केलें त्याच्याचकडे चोरी करतांना त्याला कांहींच कसें वाटलें नाहीं. पण तो कांहीं बोलला नाहीं.

साधू व तो मुलगा पुढें प्रवासाला निघाले. वाटेंत खूप पाऊस पडला. दोघेहि भिजून ओले चिंब झाले. आसन्यासाठीं ते दोघे इकडे तिकडे जागा शोधूं लागले. त्यांना समोर दूर दिव्याचा प्रकाश दिसला. त्या अनुरोधानें ते तेथें गेले.

दार वाजवून त्यांनीं पाहिलें कीं आंत कोणी आहे का ? "कोण आहे आंत ? आम्ही पावसानें भिजून कुडकुडत आहोत. आम्हांला थोडासा आसरा द्या. तुम्हांला फार पुण्य लागेल." ते म्हणाले.

थोड्या वेळानें एक नोकर आला. त्यानें दार उघडलें आणि या दोघांना घेऊन आपल्या मालकासमोर उभें केलें.



"अर्ध्या रात्रीं सुद्धां भीक मागणाराला तूं दार उघडून आंत घेऊन आलास ! तुला कांहीं अक्कल आहे का नाहीं ?" त्या लोभी मालकानें आपल्या नोकराला दरडावलें. "आतां घेतलेंच आहेस त्यांना आंत तर त्या खरकट्या भांड्यांत पहा कुठाशीं कांहीं असेल तें दे दरवडून आणि पाऊस थांबतांच यांना बाहेर काढ." मालकानें नोकराला बजावलें.

त्या मुलानें खरकटी भांडीं खरवडून जें कांहीं मिळालें तें सर्व साधूला दिलें व स्वतः उपाशीच राहिला.

पाऊस बंद होतांच नोकर त्यांना सांगावयास येत होता; इतक्यांत हेच दोघे उठले व नोकराला सांगून निघाले. जातांना त्या मुलानें ती सोन्याची वाटी नोकराच्या हातांत दिली आणि म्हणाला—"अशा अपरात्रीं सुद्धां थारा देऊन व अन्न देऊन तुम्ही आमच्यावर बरेच उपकार केले आहेत. ते आम्ही कधीं विसरूं शकणार नाहीं. त्याची पूर्ण फेड तर कधींच होणार नाहीं. आपल्यासारखे थोर महात्मे कोठें कोठें आहेत, म्हणूनच हें जग चाललें आहे. फार फार उपकार झाले आमच्यावर. संकट



समयीं ही असूं दे फल न फुलाची पाकळी. आपल्या मालकास द्या." असें म्हणत त्यानें ती सोन्याची वाटी नोकराच्या हातांत दिली.

मुलाचें हें वागणेंहि साधूला आवडलें नाहीं. त्याला वाटलें या मुलाला खूप रागवावें. तरी पण त्यानें आपलें तोंड उघडलें नाहीं.

साधूचा राग पाहून मुलगा म्हणाला—"साधूबाबा, हें माझें करणें तुम्हांला विचित्र वाटतें नाहीं ! अहो, हें एक नाटक आहे. आणि आपण दोघे यांतील दोन पात्रें आहोत."

"मला वाटलें होतें, गोड गुटगुटीत चांगला मुलगा आहे. बरा आहे साथीदार. माझ्या शंकांचें निरसन व्हायला थोडी मदत होईल. पण तूं तर विचित्रच दिसतोस." साधू म्हणाला.

"तुमच्या शंका दूर करण्यासाठींच तर माझा सारा प्रयत्न चालू आहे." मुलानें शंका परिहार करण्यास सुरवात केली. "ज्यानें आपलें स्वागत केलें तो फक्त नांव लौकिकासाठींच हें सर्व करीत आहे. या पायीं तो कर्जबाजारी झाला आहे. तरीहि त्याचे डोळे अजून उघडले नाहींत. पण जेव्हां त्याची आवडती सोन्याची शकुनी वाटी चोरीस गेल्याचें कळेल तेव्हां तो सुधारेल. त्याला सुधारण्यासाठींच मी वाटी चोरली."

"असं जर आहे तर ती सोन्याची वाटी अपात्रीं कां दान केलीस? त्या चिक्कू कृपणाला तर उलट बरेंच वाटेल ती वाटी पाहून." साधूनें विचारलें.

"होय त्याला आनंदच होईल. पण आपला निरोप ऐकून त्याचें मन बदलेल. त्याला वाटेल कीं नुसतें खरकटें दिल्याचें एवढें फळ तर पोट भर दिल्याचें किती! अधिकाचें अधिक फळ म्हणून तो दान धर्म करूं लागेल. त्याचें धन सत्कारणी लागेल." मुलगा म्हणाला.

"धन्य! धन्य!! माझ्या शंका दूर झाल्या. पण हें सारें तुला कसें कळलें!" असें म्हणत साधूनें मुलाच्या तोंडाकडे पाहिलें साधूला त्याच्या तोंडावर तेज दिसलें. इतक्यांत कांहीं तरी घरघर ऐकूं आली आणि त्या आवाजांत तो मुलगा अदृश्य झाला.

साधु संतुष्ट होऊन आपल्या गुहेंत जाऊन पुन्हां तपश्चर्या करूं लागला.





# कर्तबगारीचा हिरा

एका गांवीं एक जमीनदार रहात असे.

त्याला दोन मुलगे होते. दोघे लहान सहान गोष्टींवर परस्परांशीं भांडत. म्हणून जमीनदारानें विचार केला कीं जिवंतपणींच इस्टेटीच्या वांटण्या करून द्याव्या. त्यानें दोघां मुलांना बोलावून त्यांना सर्व इस्टेटीचे सारखे वांटे करून दिले. दोघांना आनंद झाला. फक्त एक हिरा उरला होता.

तो हिरा पिढिजात होता आणि तो फक्त मोठ्या मुलालाच मिळत असे. तो विकायला किंवा दान करायला देखील कोणाला अधिकार नव्हता. प्रथात होता त्याप्रमाणें जमीनदारानें तो हिरा आपल्या मोठ्या मुलाला द्यायचें ठरविलें. पण धाकट्याला तें मान्य नव्हतें. त्यानें बापाकडे तो मागितला व पुढल्या पिढीच्या कर्त्या पुरुषाला मी देईन असें त्यानें वचन दिलें. पण मोठा मुलगा तें कसें मान्य करणार? दोघांचें भांडण मिटविण्यासाठीं बापानें अट घातली. म्हणाला—"तुम्ही दोघे जाऊन कोणत्या तरी विद्येंत प्राविण्य संपादन करून या. जो जास्त प्राविण्य मिळवून येईल त्याला मी हा हिरा देईन."

दोघे भाऊ निरनिराळ्या देशांत जाऊन विद्याध्ययन करूं लागले. मोठा मुलगा ज्योतिषशास्त्र शिकून आला. धाकटा युद्ध-विद्येंत प्राविण्य संपादन करून आला. पांच वर्षें लोटल्यावर दोघे परत आले होते.

परंतु ते परत आले तोंपर्यंत घरांत पुष्कळच बदल झालेला होता. चोरांनीं घरांत शिरून घरांतल्या सर्व मूल्यवान वस्तूं-बरोबर तो हिरा देखील पळवून नेला होता.



जमीनदारानें त्या दुःखामुळें अंथरूण धरलें होतें. दोघां मुलांत कोणी जास्त प्राविण्य मिळविलें याचा निर्णय करण्याची शक्तीदेखील त्याच्या अंगांत उरली नव्हती.

मोठा मुलगा ज्योतिषशास्त्रांत प्रवीण होता. त्यानें चोर केव्हां आले होते ती वेळ वडिलांना विचारून घेतली आणि उभ्या आडव्या रेषा काढून कांहीं तरी गणित केलें आणि म्हणाला—"चोर ईशान्य दिशेनें एका रानांतून आले. तेथें भुतें राहतात. त्या चोरांनीं भुतांना वश करून घेतलें आहे. या सर्व गोष्टींचा विचार करतां आपल्या घरून चोरांनीं चोरून नेलेला माल परत मिळण्याची आशा मला नाहीं."

परंतु ती गोष्ट कळल्यावर युद्धविद्येंत प्रवीण असलेला धाकटा मुलगा स्वस्थ बसायला तयार नव्हता. भावाच्या म्हणण्या-वर त्याचा विश्वास बसला व तो ईशान्य दिशेकडे निघाला. वाटेंत त्याला एक रान लागलें. गांवकऱ्यांनीं त्या रानांत ब्रह्मराक्षस राहातो असें सांगितलें. तर मग तेथेंच चोर असणार व चोरीचा माल पण असणार. त्याच्या मनाची खात्री झाली.

त्याला गांवकऱ्यांकडून असें देखील कळलें होतें कीं त्या रानांत जो कोणी गेला, परतला नाहीं. तरी त्यानें त्याची पर्वा केली नाहीं. त्यानें विचार केला भुतांचेंच भय आहे तर चोर कसे राहतात रानांत! जें काम चोरांना करतां येतें तें मला कां करतां येणार नाहीं! चोरांचेंच भय असेल तर माझ्याकडे ही तलवार आहेच.

रानांत शिरल्यावर त्याला प्रथम कांहींच दिसलें नाहीं. नंतर त्याला विचित्र आवाज ऐकूं येऊं लागले. पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करून तो पुढें निघाला. कांहीं वेळानें त्याला विचित्र आकृती दिसूं लागल्या. तीं भुतें होतीं. तलवारीनें त्यांना ठार करण्याचा यत्न त्यानें जेव्हां जेव्हां केला तीं अदृश्य होऊं लागलीं. तो भुतांना संबोधन करून म्हणाला—"भुतांनो! तुमची डाळ माझ्याजवळ शिज-णार नाहीं. हें सांगा, या रानांत चोर कोठें राहतात? नाहीं तर मी तुम्हांलाच एके-काला वाटेला लावीन." पण भुतें अदृश्य झालीं तीं त्याला पुन्हां दिसलीं नाहींत.

त्याला भूक लागली होती. आतां भुतें आपल्या वाटेला येणार नाहींत असा विचार करून तो एका झाडाखालीं बसून निश्चिंतपणें आपली तलवार एका बाजूला ठेवून व बरोबर आणलेली शिदोरी काढून बसला खायला. तेव्हां एक भूत त्याच्या पाठीमागून हळूच आलें व त्याची तलवार उचलून घेऊन गेलें. त्यानें ती तलवार आपल्या सरदाराला नेऊन दिली.

"आतां पाहतों याचा पराक्रम! हातांत तलवार असे पर्यंत यानें आमच्यावर अधि-कार गाजवण्याचा प्रयत्न केला." भुतांचा सरदार म्हणाला.



खाणें संपल्यावर जेव्हां धाकट्यानें तल-वार नाहींशी झाल्याचें पाहिलें तेव्हां हें काम भुतांचेंच असलें पाहिजे. या गोष्टीची त्याला शंका उरली नाहीं. त्यांना फस-विण्याच्या हेतूनें तो रानाबाहेर जायला निघाला. भुतांनीं त्याला रानाबाहेर जातांना पाहिलें. संध्याकाळ झाली. भुतें निरनिराळीं सोंगें घेऊन नाचूं लागलीं.

भुतांना कधींच या गोष्टीची कल्पना नव्हती कीं दिवसां त्यांच्या भीतीनें निघून गेलेला मनुष्य रात्रीच्या काळोखांत पुन्हां त्या बाजूला येईल. परंतु धाकटा भाऊ एक काळें कापड पांघरून त्या बाजूला आला. भुतें ती तलवार घेऊन आपल्याच धुंदींत नाचत होतीं. ती तलवार परस्परांना देत



होतीं. धाकटा भाऊ देखील त्यांच्या बरोबर नाचूं लागला. भुतांनीं त्याला ओळखलें नाहीं. नाचत असतां त्यांनीं त्याच्या हातांत नकळत त्याची तलवार दिली. तलवार हातीं येतांच तो भुतांच्या सरदाराच्या अंगावर तुटून पडला. त्याची दाढी धरून त्यानें ओढली व एक वार केला. दाढी कापली जाऊन त्याच्या हातांत आली.

भुतांचा सरदार ओरडला—"अरे माझी दाढी!" भुतें घाबरून गेलीं. आपल्या सरदाराची ती दुर्गत पाहून तीं तेथून पळून गेलीं. सरदार गयावया करून हात जोडून धाकट्या भावाला म्हणाला—"माझी दाढी दे बाबा! चोरांच्या सरदाराच्या हातीं माझ्या दाढीचा एकच एक केस आला. पण तेवढ्यावर त्यानें आम्हां सर्वांना आपला गुलाम करून घेतलें आहे. तूं तर माझी सर्व दाढीच्या दाढीच घेतली आहेस. आतां आमचा जीवच तुझ्या हातांत आहे."

"तुम्हांला गुलाम करून मला काय करायचें आहे? फक्त चोर कोठें आहेत हें मला सांग! तूं मला एकदां दाखविलेंस तर मी तुझी व तुझ्या अनुयायांची सुटका करून देईन. तूं एवढी मदत केलीस तर तुझ्यावर अधिकार गाजवणारा कोणी उरणार नाहीं." धाकट्या भावानें त्याला धीर दिला.

भुतांचा सरदार म्हणाला—"चोर चोरी करायला गेले आहेत. त्यांच्या टोळींत त्यांचा नायक धरून एकूण दहाजण आहेत." असें सांगून भुतांचा सरदार धाकट्या भावाला चोरांच्या गुहेनजीक घेऊन गेला. धाकटा एका झाडाआड उभा राहून चोर येण्याची वाट पाहूं लागला.

उजाडण्याच्या सुमारास चोर चोरी करून परत आले. गुहेचें दार त्यांनीं उघडलें. आंत जिना होता. तो जिना उतरून आंत गेले. चोरीचा माल घरांत ठेवून ते बाहेर येऊं लागले तेव्हां धाकट्या भावानें एकेक करून सर्वांचीं डोकीं उडविलीं.

दाही चोर मेल्यावर तो स्वत: भुयारांत गेला. आंत अलोट धन पडलें होतें. तेथें तो हिरा होता व त्याच्या बापाच्या घरून चोरून आणलेली प्रत्येक वस्तु होती. तो राजाकडे गेला व त्यानें चोरांनीं चोरी करून एकत्र करून ठेवलेल्या मालाची वर्दी राजाला दिली. ती गुप्त गुहा दाखवायला मी तयार आहे असें देखील त्यानें सांगितलें. गुहेंत त्याच्या बापाकडून चोरी करून नेलेला माल मी उचलून नेईन व बाकी माल आणून राजानें ज्याचा त्याच्याकडे पोंचता करावा अशी त्यानें राजाजवळ विनंति केली.

राजाचे शिपाई त्याच्याबरोबर गेले. भुयारांतला सर्व माल घेऊन त्यांनीं राजवाड्यांत पोंचता केला. राजाच्या परवानगीनें तो आपल्या घरचा चोरीचा माल व हिरा उचलून घेऊन गेला.

चोरीला गेलेला माल परत मिळालेला पाहून बापाला फार आनंद झाला. त्याची तब्बेत सुधारली व त्यानें अंथरूण सोडलें. दोघां मुलांना बोलावून तो म्हणाला—"आतां हा हिरा कोणाला द्यायचा, हा प्रश्न तर अजून सुटलाच नाहीं."

"त्यांत भांडण करण्याचें कारण काय? हा मोठ्या भावालाच मिळाला पाहिजे. पूर्वींपासून जो प्रघात आहे तो मोडण्याची गरज काय?" धाकटा म्हणाला. विद्या संपादन केल्यापासून त्याला कर्तबगारीचा हिरा लाभला होता. म्हणून त्याच्या विचारांतला कोतेपणा नाहींसा झाला होता.





# न वांकणारा वर

भीमसेन नांवाचा एक श्रीमंत गृहस्थ होता. त्याला सत्यवती नांवाची एकुलती एक मुलगी होती. वारस म्हणून कोणी मुलगा नसल्यामुळें त्यानें आपल्या मुलीचें लग्न कोणत्या तरी होतकरू तरुणाशीं करून देऊन त्याला घरजांवई करून घेण्याचें ठरविलें. खरोखरी ही गोष्ट तेवढी कठीण नव्हती. परंतु ती गोष्टच अशक्य ठरली.

त्याचें एक कारण होतें. भीमसेनची बायको रामेश्वरी एक भांडखोर कर्कशा होती. भीमसेन घराबाहेर किती गरजला व आपल्या शक्तीचा आणि धनाचा गर्व इतरां-समोर त्यानें किती दाखविला तरी घरांत मात्र बायकोसमोर तो पानाखालचें मांजर असे. ती कोणाचें कधीं ऐकत नसे. नवरा स्वतःच्या अकलेप्रमाणें कधीं कांहीं करी तर तें तिला पसंत पडत नसे. जांवयाला-देखील सासूच्या कह्यांत राहायची तयारी असेल तर त्यानें यावें. अशी होती घरांतली परिस्थिति.

भीमसेननें दोघांचौघांकडे सांगून ठेवलें होतें कीं मुलीला एखादें चांगलें स्थळ मिळालें तर पहा. मुलाकडे धनदौलत असलीच पाहिजे असें कांहीं नाहीं. मुलीच्या जोगता मुलगा असला कीं पुरे. पण जाव-यानें आमच्याकडे रहावें एवढी अट मात्र राहील. मुलानें आम्ही सांगू तसें रहावें व करावें असें देखील आम्हांला वाटतें.

एक जणानें विचार केला, लग्न ठरवून दिलें तर चांगली दक्षिणा मिळेल. म्हणून तो गांवोगांव वरशोधनार्थ हिंडू लागला. पण त्याला योग्यवर मिळाला नाहीं. तो एका गांवाहून दुसऱ्या गांवीं जात असतां एका झाडाखालीं एक तरुण बसलेला त्याला दिसला. त्याचें वय सुमारें वीस वर्षें असेल. तो गिड्डा होता. तरी त्याच्याजवळ जाऊन त्यानें त्याला विचारलें—"बाळ, कोण रे तूं? असा एकटा येथें कां बसला आहेस! तोंड उतरलेलें दिसतें आहे."

तो तरुण म्हणाला—"माझें नांव चमन-लाल आहे. या जवळच्याच गांवीं मी राहातों. माझ्या वडिलांचें नांव रोशनलाल असें आहे. माझे वडील माझ्यावर नेहमीं रागावलेले आणि संतापलेले असतात. म्हणतात. 'फुकट याचें जिणें. या गिड्ड्याला आपली मुलगीच कोणी देणार नाहीं. मग हुंडा कोठून मिळणार!' विटून गेलों आहे मी जिवाला. म्हणून घर सोडून निघालों आहें. मजुरी करून पोट भरलें तरी चालेल."

"अरे रोशनलालचा मुलगा चमनलाल तूंच का? पाहूं तर दे तुझा हात!" वर-शोधनार्थ निघालेला तो मनुष्य चमनलालचा हात आपल्या हातांत घेऊन हस्त सामुद्रिक जणुं कांहीं त्याला माहीत आहे असें दाखवीत हात पाहूं लागला. थोड्या वेळानें म्हणाला—"तुझ्या बापाला वेडबीड तर नाहीं



लागलें? एका श्रीमंताचा जांवई होणार आहेस तूं. चांगला धनयोग आहे. सर्व तुझ्यासमोर हात जोडून उभे राहतील. चल माझ्या बरोबर."

तें ऐकून चमनलालला हा कोणी तरी देवदूतच असावा असें वाटलें. दोघे निघाले. वाटेंत तो गृहस्थ चमनलालला म्हणाला—"जोपर्यंत कोणी तुझ्या उंची इतका वांकून तुझ्याशीं बोलणार नाहीं तोपर्यंत तूं कांहीं उत्तर देऊं नकोस."

त्या मुलाला आपल्या घरीं बसायला सांगून तो भीमसेनच्या घरीं गेला व त्याच्या










बायकोला म्हणाला—"वहिनी! पहा तुमच्या मुलीजोगता असा सुंदर वर पाहून आणला आहे कीं तुम्ही पाहून थक्कच व्हाल. होय, पण थोडा ठेंगणा आहे."

"ठेंगणा असला म्हणून काय झालें? बरेंच झालें. सांगितलेलें ऐकेल तरी." राजेश्वरी म्हणाली.

"अगदीं कसे! माझ्या तोंडांतलेच शब्द काढून घेतले आणखी हें पहा वहिनी, त्याच्याजवळ वांकून बोलल्याशिवाय नाहीं उत्तर देत तो. ठेंगणा आहे ना जरा, म्हणून!" तो गृहस्थ म्हणाला.

"त्यांत कांहीं हरकत नाहीं. जरा वांकून बोललें कीं झालें." राजेश्वरी म्हणाली.

मुलाला पाहिलें व राजेश्वरीला मुलगा पसंत पण पडला. लग्नमंडपांतच जांवयावर आपला अधिकार गाजवूं लागली ती. परंतु त्यानें तिची पर्वा केली नाहीं. वांकून ती त्याच्याशीं बोलली नाहीं तोंपर्यंत त्यानें उत्तर पण दिलें नाहीं. लग्न झालें व वर-वधूला देवाच्या दर्शनाला घेऊन गेले.

वाटेंत तिनें मुलगा ठरवून देणाऱ्या माणसाला बोलावून विचारलें—"काय हो भाऊजी! नेहमीं का असें वांकून बोलावें लागणार? त्रास आहे बुवा."

सर्व देवळाच्या दारांत पोंचले. दार लहान व थोडें ठेंगणेंच होतें. सर्व वांकून आंत गाभाऱ्यांत गेले. पण चमनलाल वांकल्याशिवायच आंत गेला.

"पाहिलेंत तो देवासमोर देखील आपली मान वांकवीत नाहीं. मग आपल्यासमोर वांकवील का?" मुलगा ठरवून आणणारा माणूस म्हणाला. तें ऐकून राजेश्वरीच्या तोंडाला कुलूपच पडलें.





# चतुर सत्यप्रिय

चित्रपूरच्या ग्रामदेवीच्या देवळांत सत्यप्रिय नांवाचा एक पुजारी होता. गांवांत कोणाचें भांडण झालें कीं लोक त्याच्याकडे निवाडा सांगायला धांवत. तो कधीं कोणा-कडून याबद्दल मोबदला घेत नसे.

त्याची प्रसिद्धी राजाच्या कानावर देखील गेली. राजानें त्याची परीक्षा घेण्या-साठीं मंत्र्याचा सल्ला घेतला व वेश पालटून देवळांत गेला. पूजा करून देवासमोर जें कांहीं ठेवावेंसें वाटलें तें ठेवून राजा व मंत्री पुजाऱ्याचा निरोप घेऊन परतले.

त्या गांवचे गांवकरी जवळच्या रानांतून लाकडें तोडून आणीत. एकदां एक जण लाकडें फोडून आणीत असतां त्याला एका झाडाखालीं एक ज्योतिषी दिसला. त्यानें त्याला हात दाखवून आपलें भविष्य विचारलें.

ज्योतिषी म्हणाला—"हें पहा, मी आपल्या मंत्रबळानें तुला एक दृश्य दाखवतों. नंतर मी विचारल्या प्रश्नाचें तूं ठीक ठीक उत्तर दिलेंस तर मी तुझें भविष्य सांगूं शकेन." तो मनुष्य त्या गोष्टीस कबूल झाला.

पाहतां पाहतां त्याला डोळ्यासमोर एक सुंदर राजवाडा दिसला. इतक्यांत आकाश गडगडूं लागलें व विजा चमकूं लागल्या आणि त्याच्या पाठोपाठ मुसळधार वृष्टी होऊन तो राजवाडा एकाएकीं कोसळला.

"याचा अर्थ काय?" ज्योतिष्यानें त्याला विचारलें.

"मला नाहीं माहीत, तुम्हीच सांगा!" तो मनुष्य म्हणाला.

"तर मग तेंच तुझें भविष्य समज!" असें सांगून ज्योतिष्यानें त्याला एक दगडाची



मूर्त करून टाकलें. थोड्या वेळानें त्याच वाटेनें जाणाऱ्या आणखी एका माणसानें त्या ज्योतिष्याला त्याचें भविष्य विचारलें. ज्योतिष्यानें पहिल्या माणसाला सांगितल्याप्रमाणें मंत्रबळानें एक दृश्य दाखविलें. या खेपेस त्याला एक हजार फूट उंच असा एक वृक्ष दिसला. त्या झाडावर एक मोठा ससाणा आला आणि झाडावर बसलेल्या लहान लहान पक्ष्यांना खाऊं लागला.

ज्योतिष्यानें त्या माणसाला त्याचा अर्थ विचारला. तो म्हणाला—"मला नाहीं माहीत, तुम्हीच सांगा!"

तो देखील एक दगडी पुतळा झाला.

आणखी थोड्या वेळानें तिसरा मनुष्य त्याच वाटेनें आला. त्यानें त्या ज्योतिष्याला आपला हात दाखविला. तेव्हां ज्योतिष्यानें त्याच्या पूर्वी आलेल्या दोघांच्या पुतळ्यांकडे बोट दाखवून एक दृश्य त्याला दाखविलें.

त्याला एक म्हातारा दिसला. त्याच्या पाठीवर एक मोठें ओझें होतें व तें त्याला उचलवत नव्हतें. तरी तो झाडाखालच्या काटक्या गोळा करण्यासाठीं वांकत होता व पुन्हां उभा राहून त्या काटक्या मोळीत खुपसत होता. शेवटीं तो म्हातारा एकाएकीं खालीं पडला.

त्या दृश्याचा अर्थ देखील तो मनुष्य पहिल्या दोघांप्रमाणेंच सांगूं शकला नाहीं. म्हणून तो देखील दगड झाला.

तें दृश्य एका चवथ्या लाकूड तोड्यानें दुरून पाहिलें व तो तेथून घाबरून पळूनच गेला. गांवभर बातमी पसरली की रानांत एक मांत्रिक झाडाखालीं बसलेला आहे व भविष्य सांगण्यासाठीं जो कोणी त्याच्याकडे जातो त्याला तो दगडाची मूर्त करून टाकतो. गांवकऱ्यांपैकीं कांहीं निधड्या छातीचे लोक सरळ तो ज्योतिषी बसला



होता तेथें गेले आणि त्याला त्यांनीं विचारलें—"बोल, कोण तूं? येथें तुझें काय काम?"

तो म्हणाला—"मी ज्योतिषी आहे. भविष्य विचारणाराला मी एक दृश्य दाखवितो व त्याचा अर्थ विचारतो. ठीक अर्थ सांगणाराला मी त्याचें भविष्य सांगतो. जो कोणी अर्थ सांगूं शकत नाहीं ते यासारखे दगड होऊन जातात."

तें ऐकून सर्व घाबरून गेले व मागें परतले. सत्यप्रियकडे येऊन म्हणाले—"आतां तूच कांहीं मार्ग काढ!"

"पाहातों मी, घाबरूं नका!" सत्यप्रिय त्यांना म्हणाला आणि त्यानें त्यांच्या मनाचें समाधान करून देऊन त्यांना परत घरीं पाठविलें. दुसऱ्या दिवशीं तो त्या ज्योतिष्याकडे गेला. तो त्याला म्हणाला—"ज्योतिषीबुवा! सर्व गांवकरी घाबरून गेले आहेत. या दगडांच्या मूर्तींना पुन्हां मनुष्य रूप देऊन त्या बिचाऱ्यांचें रक्षण करा." सत्यप्रियनें विनंति केली.

तें ऐकून मांत्रिक म्हणाला—"तूंच या गांवचा मुख्य नायक आहेस का? सर्व भीत असतां तूंच एकटा येऊन माझा एवढा



आदर करीत आहेस याचें कारण काय? हा खोटा विनय मला नाहीं आवडत व असल्या माणसांची डाळ येथें शिजत नाहीं."

"खोटा विनय नाहीं ज्योतिषीबुवा. मला देखील थोडें ज्योतिषशास्त्र कळतें व मंत्रतंत्र येतात. तुम्हांला पाहाल्यावर तुमच्याविषयीं माझ्या मनांत राग उत्पन्न झाला नाहीं. कारण तुमच्या मनांत मला दुष्टपणा दिसत नाहीं. दुष्टपणा असता तर तुम्ही त्यांना दगड करून टाकण्याऐवजी भस्मच करून टाकलें असतें. दुष्टपणा वाटण्यासारखें तुमच्याकडे आहे तरी काय असें? म्हणून



तुमच्या विषयीं माझ्या मनांत आदर उत्पन्न झाला आहे व म्हणूनच मी तुमच्याजवळ विनंति केली." सत्यप्रिय म्हणाला.

"ठीक! सरमग तुला आपलें भविष्य पहावयाचें आहे का?" ज्योतिष्यानें विचारलें.

"नाहीं बुवा!" सत्यप्रिय म्हणाला.

"सर्व जग ज्या साठीं तळमळतें तें भविष्य जाणण्याची तुझ्या मनांत इच्छा नाहीं! जगाचा वीट आला आहे का तुला?" ज्योतिष्यानें विचारलें.

सत्यप्रिय म्हणाला—"वैराग्य वाटण्याचें कारणच काय! देवानें या जगांत जन्माला आणून आमचें भविष्य अदृष्ट ठेवलें तें कांहीं कारण असेल म्हणूनच. मग अशा भवितव्याविषयीं औत्सुक्य दाखविणें चुकीचें आहे, असें मला वाटतें."

"ठीक! या तीन शिलामूर्तींना पुन्हां मनुष्यरूप मिळावें एवढेंच तुला पाहिजे नाहीं का? तसें असेल तर या तिघांनीं जें जें दृश्य पाहिलें त्यांचा अर्थ तूंच सांग. तुला देखील त्यांचा अर्थ सांगतां आला नाहीं तर त्यांच्या रांगेला तुलादेखील उभें रहावें लागेल." ज्योतिषी म्हणाला.

"मला कबूल! बोला, काय प्रश्न आहे तुमचा?" सत्यप्रियनें विचारलें.

तेव्हां मांत्रिकानें मंत्रबळानें तें पहिलें राजवाड्याचें दृश्य दाखविलें व त्याचा अर्थ विचारला.

सत्यप्रिय म्हणाला—"या राजवाड्यांत सर्व सुखसोयी आहेत. परंतु त्याचा पाया डळमळीत आहे. म्हणून पाऊस पडल्या-बरोबर तो राजवाडा कोसळला. अशाच तऱ्हेनें मनुष्याचें आयुष्य सत्संगाच्या बळकट पायावर आधारलेलें नसेल तर दुष्ट लोक त्याच्या जीवितांचें मातेरें केल्याशिवाय राहणार नाहींत." तें उत्तर संपल्याबरोबर



पहिली मूर्ति हलली व तो पहिला लाकूड-तोड्या जिवंत झाला.

मांत्रिकानें दुसरें दृश्य दाखवून सत्यप्रियला त्याचा अर्थ विचारला.

"झाडावर बसलेले सर्व लहान लहान पक्षी भोळ्या भावड्या लोकांसारखे आहेत व त्यांची शिकार करणारा ससाणा म्हणजे दुष्ट अत्याचारी. जगांत हेंच चालू आहे. एक मनुष्य हजारों मनुष्यांचें शोषण या जगांत करीत आहे." त्यानें तें उत्तर दिल्याबरोबर दुसरा मनुष्य जिवंत झाला.

तिसरें दृश्य पाहून सत्यप्रिय म्हणाला—"हा मनुष्यस्वभाव आहे. मनुष्यास या जगांत स्वतःचें आयुष्य भाररूप झालें असून देखील त्याचा मोह व आशा सुटत नाहीं. जो वेळींच जगाच्या मोहपाशांतून स्वतःला मुक्त करून घेतो, तोच ज्ञानी!" सत्यप्रियनें एवढें म्हटल्याबरोबर तो तिसरा मनुष्य देखील जिवंत झाला.

मांत्रिक हंसत स्मित करून म्हणाला—"सत्यप्रिय! तूं स्वतःचें भविष्य विचारलें नसलेंस तरी मी तुझें भविष्य वर्तवून ठेवतों. ऐक, उद्यां तुला राजा दरबारांत बोलावील व तुझा दरबारांत सत्कार करील. तुझ्या योग्यतेची परीक्षा करण्यासाठींच राजानें मला नेमलें होतें. मी ज्योतिषी नसून एक मांत्रिक आहें. उद्यां तुला राजानें बोलावणें पाठविलें की तूं राजाच्या दरबारांत अवश्य जा."

राजानें दुसऱ्या दिवशीं सत्यप्रिय याला दरबारांत बोलावून त्याचा सत्कार केला. तेव्हां पासून सत्यप्रियची कीर्ति राज्यभर पसरली.





# दोन शहरें

एका जहाजाच्या व्यापाऱ्याकडे बामान्ना नांवाचा एक गुलाम होता. त्यानें आपल्या मालकाची प्रामाणिकपणानें कित्येक वर्षें सेवा केली व त्यामुळें व्यापाऱ्याला त्याच्या धंद्यांत पुष्कळ फायदा झाला. अशा स्वामिभक्त गुलामाला गुलामींतून मुक्त करण्याचें ठरवून तो त्याला म्हणाला—"बामान्ना! मी तुला एक जहाज बक्षिस देतों. आज पासून तूं स्वतंत्र आहेस. पुढील आयुष्य सुखानें घालव."

बामान्नानें आपल्या मालकाचे आभार मानून व्यापार करायला सुरवात केली. त्याला पहिल्याच खेपेस यश मिळालें नाहीं. समुद्रांत वादळ आलें व त्याचें जहाज मालासकट बुडलें. खलाशी देखील पाण्यांत बुडून गेले. ईश्वराची कृपा म्हणूनच बामान्ना एकटा वांचला. तो पोहून किनाऱ्याला आला.

तें एक बेट होतें. बामान्ना पाहण्यासाठीं निघाला. त्याला एक नगर दिसलें. बाजार पेठेंत लोकांची गर्दी होती. बामान्नाला असें वाटलें कीं लोक जणुकांहीं त्यालाच भेटण्यासाठीं एकत्र झाले आहेत. तो जवळ आल्याबरोबर "महाराज की जय!" असा जयघोष लोकांनीं केला. बामान्ना चकित होऊन स्वतःशींच म्हणाला—"हे लोक मला पाहून कोणी दुसराच समजून जयजयकार करीत आहेत."

लोक त्याच्या चारी बाजूला घोळका करून उभे राहाले. एक सजवलेला हत्ती तेवढ्यांत तेथें आला. लोकांनीं बामान्नाला आदरपूर्वक हत्तीवर बसविलें आणि त्याला

सौ. शारदाबाई वाकनीस

राजवाड्यांत घेऊन गेले. राजवाड्यांत त्यानें आंघोळ केल्यावर त्याला राजवस्त्रें देण्यांत आलीं."

त्यानें लोकांना विचारलें—"मला राजा करून घेण्याचें कारण काय? मी तुम्हांला ओळखत नाहीं व तुम्ही मला ओळखत नाहीं. एकाएकीं माझें जहाज समुद्रांत बुडलें व दैवयोगानें मी तुमच्या बेटाच्या किनाऱ्याला येऊन लागलों."

तेव्हां त्या लोकांनीं आपल्या देशाचें वर्णन केलें. बावीस वर्षें त्या देशांत कोणाचेंच नियमित राज्य नव्हतें. आमच्या बेटावर कोणी तरी परदेशी आला. एक राजा असेल तर आम्हीं सुखी होऊं असें त्यानें सांगितलें. राजा निरंकुश होऊं नये असें वाटत असेल तर दर वर्षी राजा बदलावा। आणि तो राजा तुमच्यापैकीं कोणी नसून परकीय असेल तर त्याचा राज्य कारभार निष्पक्ष राहील असें त्यानें सांगितलें होतें. तेव्हांपासून आम्ही आमच्या देशांत असा कोणी अनोळखी परदेशी आला म्हणजे त्याला आपला राजा करूं लागलों. एक वर्ष झाल्यावर त्याला आम्ही गादी वरून काढून जवळच्या



रानांत पाठवून देतो व नव्या राजाचा शोध करूं लागतो.

अशा तऱ्हेनें बावीस राजांनीं त्या बेटावर राज्य केलें. बामान्ग तेवीसवा राजा होता.

बामान्गला आतां राज्यसुख काय मिळणार! त्या बेटा शेजारच्या आणखी एका बेटावर तें रान होतें. त्या बेटावर एका जहाजांत किंवा होडक्यांत बसून जावें लागे.

बामान्गनें सर्व रान नीट पाहून घेतलें. त्या रानांत जिवंत राहणें मनुष्याला अशक्य होतें. परंतु त्या रानांत लाकूड फाटा पुष्कळ मिळे व शेतकीची कामें करायला पुष्कळ सोयी होत्या. झाडें तोडून एक नवीन वसाहत स्थापन करणें देखील शक्य होतें.

बामान्गनें त्याला त्या रानांत पुढें मागें कधीं तरी जावेंच लागणार हें ओळखून त्या बेटावर त्यानें मनांत योजल्याप्रमाणें लागवड करण्यास व फळ झाडें लावण्यास सुरवात केली. एक वर्ष संपत आलें तोंपर्यंत त्या रानांत एक नवीन वस्ती निर्माण झाली. तें नगर इतकें सुंदर होतें कीं तें नगर निर्माण करण्याच्या कामीं ज्या लोकांनीं मदत केली होती त्या सर्वांनीं त्याच नगरांत राहण्याचें ठरविलें.

एक वर्ष संपलें. बामान्ग त्या नव्या नगरींत रहायला गेला. त्याच्या बरोबर जुन्या नगरांतले अनेक नागरिक निघाले. जुन्या नगरांतील लोकांना आपली जुनी वस्ती सोडवेना. म्हणून त्यांनीं मोठी सभा भरवून दोन्ही शहरांचा बामान्ग हाच कायमचा राजा राहील असा ठराव पास केला. तेव्हां पासून बामान्ग दोन्ही नगरांचा राजा झाला.





# युद्धकांड

मारुतीच्या तोंडून सारा वृत्तांत ऐकून रामाला फार आनंद झाला. तो म्हणाला—"मारुतीनें खरोखरच फार मोठी कामगिरी केली आहे. हें काम फक्त गरुत्मन्त, वायुदेव व मारुती यांच्या कडूनच होण्यासारखें आहे. बाकी कोणीहि तें करूं शकणार नाहीं आणि त्याप्रमाणें मारुतीनें तें केलें. त्यानें लंकेंत सीतेला शोधून काढलें. त्यानंतर बऱ्याच राक्षसांना ठार करून आणि साऱ्या लंकेला आग लावून तो जिवंत परत आला. मारुते! तूं सीतेचें रक्षण केलेंस. तिला माझी येण्याची वार्ता सांगून धीर दिलास. शाबास! तूं माझ्यावर फार मोठे उपकार केलेस. धन्य, धन्य वीरा!" असें म्हणून रामानें मारुतीला मिठी मारली.

नंतर तो सुग्रीवाकडे वळून म्हणाला—"सुग्रीवा, सीतेचा शोध लागला. तेथें जाऊन सीतेला मुक्त करणें आतां सोपें झालें आहे. पण एक मोठी अडचण मला वाटते. मारुती उडी मारून समुद्र पार गेला. पण तें सर्वांना कसें शक्य होईल?"

सुग्रीव म्हणाला—"समुद्र पार करणें कोणाला शक्य नाहीं आणि समुद्र पार केल्याशिवाय लंकेंत जाणें शक्य नाहीं. मग एकच उपाय आहे. तो म्हणजे समुद्रावर पूल बांधणें. तो कसा काय बांधतां येईल?"



तपश्चर्या करून व समुद्राला वळवून घेऊन, नाहीं तर त्याला अटवून कोणत्या तरी मार्गानें लंकेत गेलें पाहिजेच." राम म्हणाला.

"मारुते, लंकेची सविस्तर माहिती सांग. सैन्य किती आहे, ठिकठिकाणचा पाहारा कसा काय आहे! नगराचा आकार कसा आहे. सर्व, सर्व सांग." राम म्हणाला.

मारुती म्हणाला—"रामराया, लंकेचें जेवढें वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे. रावणाची प्रजा सुखा समाधानानें नांदत आहे. लंका त्रिकूटपर्वतावर वसलेलें एक फार मोठें शहर आहे. चोहों बाजूनें तट असून चार दिशांना चार मजबूत दरवाजे आहेत. दारावर आठही प्रहर सतत खडा पाहारा असतो. तटबंदी पासून शहर वस्तीपर्यंत मोठा आकार आहे. त्यानंतर चोहों बाजूनें खोल खंदक आहे. खंदकावरून जाण्यास लाकडी पूल आहेत. ते यंत्राच्या साहाय्यानें उचलेले जातात. चतुरंग सैन्य नेहमीं सज्ज असतें.

एवढें असले तरी मी खंदकावरील पूल मोडून टाकले आहेत. बरेच महाल जाळून उध्वस्त करून टाकले आहेत बऱ्याच पराक्रमी व शक्तिशाली राक्षसांना मारून टाकलें आहे. त्यामुळें लंकेवर स्वारी करणें अगदीं सोपें झालें आहे. मला वाटतें लंका जिंकण्यास आतां फार मोठ्या सैन्याची जरूरीहि नाहीं. आपल्याकडील निवडक वीर तें काम सहजीं करूं शकतील. आतां मुहूर्त पाहून आपण अंगद नलनीलादिकांना आज्ञा द्यावी.

"ठीक आहे. आतां शक्य तेवढ्या लवकरच स्वारी करून लंका ताब्यांत घेतली पाहिजे." नंतर सुग्रीवाकडे वळून राम म्हणाला—"आतांच कूच करून गेलें पाहिजे, सैन्यास सज्ज होण्याची आज्ञा दे. आतांचा मुहूर्त उत्तम आहे. ह्या मुहूर्तावर कार्यसिद्धीचा योग आहे. कारण माझा जन्म पुनर्वसु नक्षत्रावर झाला आहे. आणि आज आहे उत्तरा फाल्गुनी. म्हणजे तें मला अनुकूल असेंच नक्षत्र आहे. वास्तव आज सैन्यासह कूच करणें मला फायद्याचें वाटतें."

नंतर रामानें सेनापती नीलयाला सांगितलें कीं सैन्याला योग्य आदेश देऊन कोणी कोणी काय काय कामें करावयाची नीट समजावून सांग. सैन्याचें संचालन झालें उत्तम तऱ्हेनें पाहिजे.

रामाची आज्ञा शिरोधार्य मानून सुग्रीवानें सेनापती नीलला सैन्य सज्ज करून कूच करण्याची आज्ञा दिली. सर्व वानरें झाडा-वरून डोंगरावरून उड्या मारीत मारीत येऊन हजर झाली आणि नायकाच्या इशाऱ्यावर-प्रमाणें दक्षिणेकडे चालूं लागली.

फार दूरचा प्रवास असल्यानें मारुतीनें रामाला व अंगदानें लक्ष्मणाला खांद्यावर घेतलें. त्यांच्या मागें पुढें सारी वानरसेना रावण वधाची गर्जना करीत चालूं लागली.

पराक्रमी वानर श्रेष्ठ ऋषभ, नील, कुमुद वगैरे आघाडीवर राहून मार्ग व्यवस्था करीत होते.



जात असतां वाटेंत लक्ष्मण रामाला म्हणाला—"राक्षसांच्या मूळ नक्षत्रावर धूम-केतूची छाया पडली आहे. तेव्हां राक्षसांचा नाश होण्याची चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. रावणाचा वध झाला म्हणजे सीतेची सुटका होईल आणि तुम्ही दोघें आनंदानें अयोध्येला परत जाल."

नाचत बागडत, झाडाच्या फांद्या तोडीत, फळें खात, मध पीत, पर्वत, नद्या, जंगलें, पारकरीत वानर सेना महेन्द्र पर्वताच्या पाय-थ्याशीं समुद्र तटापर्यंत येऊन ठेपली. तेथें राम, लक्ष्मण व सुग्रीव पर्वतावर चढून









टेहळणी करून आले. नंतर किनाऱ्यावरून निरीक्षण केलें. त्यांना समोर अथांग पसरलेला समुद्रच समुद्र दिसत होता. त्याला पाहून सुग्रीव म्हणाला—"आतां हा समुद्र पार करण्याचा कांहीं तरी मार्ग शोधून काढला पाहिजे." नंतर सुग्रीवानें सर्व सैन्याला आज्ञा दिली कीं पुढील आज्ञा होईपर्यंत सर्वांनीं येथेंच बसावें, आणि प्रत्येकानें आपल्या तुकडीच्या आसपासच राहावें. भिण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण शत्रूपासून रक्षण करण्यासाठीं शूर शिपाई नियुक्त केले आहेत.

विश्राम करण्याची आज्ञा होतांच सर्व वानर इकडे तिकडे हिंडून ओरडा करूं लागले. त्यांच्या त्या ओरडण्यापुढें समुद्र गर्जनासुद्धां फिकी पडली. त्या सर्व वानरांची व्यवस्था पाहण्याचें काम नीलनें स्वतःकडे ठेविलें व रक्षणाचें काम मैन्द आणि द्विविद यांच्याकडे सोपविलें.

राम लक्ष्मण दोघेहि त्या अथांग सागराकडे पाहात उभे होते. सागराचा विस्तार पाहून तो तरून जाणें त्यांना दुरापास्त वाटत होतें. ते दोघे खिन्न होऊन समुद्राकडे पहात होते. अशा स्थितींत सीतेच्या वियोग दुःखानें राम विह्वल झाला. लक्ष्मणानें त्याला बराच धीर देऊन समजाविलें व सूर्यास्त होत असलेला दाखवून त्याला सायं संध्या करण्याची आठवण करून दिली.

लंकेंतून मारुती निघून गेल्यानंतर रावणाला विचार पडला कीं हा मारुती रामाला घेऊन आल्यावर काय होईल. त्यानें आपल्या श्रेष्ठ राक्षसांना बोलाविलें व म्हणाला—"लंका उंच अशा त्रिकूट पर्वतावर आहे. अथांग पसरलेला सागर सर्व बाजूनें तिचें रक्षण करीत आहे. संरक्षक दलसुद्धां सतर्क पाहारा देत आहे. एवढें असून सुद्धां



क्षुल्लक एक माकड समुद्रावरून उडीमारून येथें आलें. आपल्यांतील कांहीं वीर राक्षसांशीं युद्ध करून त्यानें त्यांना मारून टाकलें. नगराची व वनवाटिकांची नासधूस केली आणि शेवटीं सर्व लंकेला आग लावून अशोकवनांत सीतेची भेट घेऊन तें निघून गेलें. आतां राम सुग्रीवाच्या वानर सेनेसह आपल्यावर चालून येईल. रामाच्याबरोबर त्याचा भाऊहि असेल. शिवाय आणखीहि बलाढ्य वानरें आपापल्या सैन्यासह त्याच्या मदतीला येतील. राम! अचाट शक्ति आहे त्याच्या अंगांत. तो आपल्या बळानें समुद्राला अटपून टाकील आणि त्याचें सैन्य धाडधाड करीत लंकेंत शिरेल. या सर्व संकटांतून लंकेचें रक्षण करणें अगदीं जरूरी आहे. विचार करून सांगा, यावर आतां काय उपाय करावा तो."

यावर वयोवृद्ध अनुभवी राक्षस रावणाला धीर देत म्हणाले—"राक्षसाधिपते, असें निराश होण्याचें कारण नाहीं. आपल्या जवळ अतुल सैन्यबळ आहे. अनेक शूर वीर आपल्या सैन्यांत आहेत. आपण स्वतः तिन्ही लोकांत पराक्रम गाजवून आला आहांत. यक्ष, कुबेरांच्याकडून पुष्पकविमान घेऊन आला आहांत. वासुकी, तक्षक वगैरे नागराज आपल्या आधीन आहेत. अपार शक्तिवान कालकेयाला सुद्धां आपण हारविलें आहेत. वरुण, यम आपल्या आधीन आहेत. सर्व देवांच्यावर आपलें अधिपत्य आहे. मग आपण एवढें चिंतित कां! शिवाय महेश्वर यज्ञ करून वर प्राप्त करून आलेला आपला पुत्र इंद्रजित, प्रत्यक्ष देवेंद्राला बांधून लंकेला आणणारा तो. तो एकटाच वास्तविक त्या रामाचा व त्याच्या सैन्याचा पराभव करण्यास पुरे आहे. आपण ती व्यर्थ चिंता सोडावी. विसरून जा त्या माकडाला.



त्याला काय कल्पना आपल्या पराक्रमाची आणि शस्त्र व सैन्यबळाची."

एकाचें बोलणें संपतांच प्रहस्त नांवाचा दुसरा राक्षस उठला व म्हणाला—"आम्ही देव मानवांना, गंधर्व पिशाच्चांना जिथें भीत नाहीं तिथें या वानरांचें काय भय! मी त्यावेळीं बेफिकीर होतों म्हणून. नाहींतर काय त्या हनुमानाची छाती होती लंकेंत पाऊल टाकण्याची. आपण आज्ञा करा. मी सर्व वानरांना यमलोकीं पाठवितों.

दुर्मुख म्हणाला—"त्या उद्दण्ड मारुतीनें आमच्या राजाचा भारी अपमान केला आहे. त्याला क्षमा करणें शक्य नाहीं. आज्ञा करावी महाराज! एकटा सर्व वानरांचा नाश करून येतों मी."

वज्रदंष्ट्र दांत ओठ चावून गदा हवेंत फिरवून, आवेशानें पुढें येऊन म्हणाला—"हूं! त्या मारुतीला काय घेऊन बसलात. तो तर रात्रीच्या वेळीं चोरासारखा आला होता. होती का त्याची हिम्मत दिवसा राजरोस यायची? आज्ञा असेल तर हा मी निघालों. राम, लक्ष्मण, सुग्रीव सर्वांचा निकाल लावून येतों." थोडा विचार केल्या-



सारखें करून तो पुन्हां म्हणाला—"नाहीं तर आणखी एक उपाय मला सुचतो आहे. कामरूपाला मनुष्यरूप देऊन रामाकडे पाठवून देऊं या व त्याला सांगूं या कीं मी भरताचा निरोप घेऊन आलों आहें. तो भले मोठें चतुरंग सैन्य घेऊन आपल्या मदतीस येत आहे. त्याची वाट पहा. राम भरताच्या मदतीची वाट पाहूं लागला कीं अचानक त्याच्यावर हल्ला करून त्याचें सर्व सैन्य नष्ट करून टाकूं. एवढें झाल्यावर काय रामलक्ष्मण जिवंत राहातील. ते आपणच आपला देहत्याग करतील."

ह्याच्या मागून कुंभकर्णाचा मुलगा निकुम्भ उठला आणि म्हणाला—" काका विनाकारण दुःखी होऊं नका. आम्ही सर्व कशासाठीं आहोत! आपल्याकडील एक एक वीर सैनिक रामाच्या सर्व सेनेच्या बरोबरीचा आहे. कोणालाहि पाठवा आणि त्याच्या सैन्याचा धुव्वा उडवून येण्यास सांगा. हा आपला पुतण्याहि तें काम शिरावर घेण्यास तयार आहे. फक्त आज्ञा करावी."

वज्रदन्त निकुम्भाला टेकू देत म्हणाला—"बरोबर आहे निकुंभाचें म्हणणें. मी एकेका माकडाला एकेका घासांत खाऊन टाकीन. किती वेळ त्यांना संपवायला."

त्यानंतर आणखी एक राक्षस उठला. त्यानें हातांत एक मोठा धोंडा घेऊन आकाशांत उडवीत म्हटलें—"ह्या शिळा-वृष्टिच्या तडाख्यांत पाहूं बरें कोण वानर जिवंत राहातो तें. हां हां म्हणतां चिरडून टाकतो सर्व वानरसैनेला."

कामरूप राक्षस उपरणें सावरीत आल्या-सारखें दाखवून म्हणाला—"ह्या सर्व राक्षस बांधवांचा पराक्रम आपणांला माहीत आहे. तरी ते म्हणतात तसेंच पण मला वाटतें त्या रामाची थोडी गंमत तरी करून पाहूं. वज्रदंष्ट्रानें सांगितल्याप्रमाणें मी मनुष्य रूपधारण करून जातों आणि रामाला भरताचा निरोप सांगतों. म्हणजे त्याचें सैन्य बेसावध होईल. अशा वेळीं आपण सर्वांनीं मिळून त्याच्यावर हल्ला केला तर क्षणार्धात आपलें काम होईल आणि कोणा एकट्याला कष्ट होणार नाहीत."

ह्या प्रमाणें सर्वांच्या कल्पना रावणानें ऐकून घेतल्या आणि "नीट विचार करा." असें सांगून आपल्या अंतःपुरांत निघून गेला.





# परोपकारी गोपाळ

गोपाळची बायको इंदिरा बाळंतपणासाठीं माहेरीं गेली होती. तिला एक मुलगा झाला. गोपाळ गाडींत बसून सासुरवाडी निघाला. तेथें मुलाचें बारसें मोठ्या थाटानें झालें. चांगलासा दिवस पाहून तो बायकोला व मुलाला घेऊन दोन महिन्यांनीं आपल्या गांवीं परत निघाला. संध्याकाळच्या सुमारास ते एका गांवच्या पेठेंत पोंचले. ते एका धर्मशाळेंत एक खोली घेऊन उतरले.

गोपाळ धर्मशाळेच्या विहिरीवर पाणी काढून हात पाय धूत असतां कोणीतरी अनोळखी मनुष्य तेथें धांवत धांवत आला आणि भोंवळ येऊन खालीं पडला. त्याच्या खांद्यावरचें गाठोडें पण खालीं पडलें. गोपाळनें त्याला हात देऊन उभें केलें व त्याचें गाठोडें स्वतः उचलून घेऊन त्याला धर्मशाळेंत घेऊन आला. त्या माणसाचीं ढोपरें व हाताचीं कोपरें खरचटून रक्त-बंबाळ झालीं होतीं.

"कोण रे बाबा तूं! एवढें तुला कसें काय लागलें? असा घाबरल्यासारखा पळत कां होतास?" गोपाळनें विचारलें.

तो म्हणाला—"मी तांदूळ विकत घेऊन येत होतों तेव्हां शिपाई 'चोर चोर' म्हणून ओरडत माझ्या पाठीस लागले. म्हणून पळत होतों. दोनदां पडलों आणि ढोपरें फोडून घेतलीं. माझें घर फार दूर नाहीं. पण मी सरळ घरीं गेलों तर चोर घरांत शिरून माझ्या बायकोला व मुलांना विना-कारण त्रास देतील असा विचार करून मी या बाजूला पळून आलों. सकाळपासून घोटभर पाण्याशिवाय मुलांच्या तोंडांत



अन्नाच्या नांवानें एक दाणा गेला असेल तर शपथ. मी येण्याची वाट पहात असतील बायका पोरें. काय करावें समजत नाहीं."

गोपाळ म्हणाला—"घाबरण्याचें कारण नाहीं. तूं येथेंच कांहीं वेळ विश्रांति घे. तूं आपल्या घराचा पत्ता सांग मी तुझ्या घरीं हें ओझें पोंचतें करून येतो."

तो मनुष्य म्हणाला—"फार उपकार होतील तुमचे माझ्यावर. देव तुम्हांला सर्व काळ सुखी ठेवील." असें सांगून त्यानें आपल्या घराचा पत्ता सांगितला.

गोपाळनें इंदिराला जरा बाजूला बोलावून नेऊन सांगितलें कीं या बिचाऱ्याला फार लागलें आहे. थोडें तेल व हळद लाव त्याच्या जखमांना. कोणी त्याच्या शोधार्थ आला तर सांग कीं तो आपल्याच घरचा मनुष्य आहे. नंतर तो ती तांदुळाची मोट घेऊन त्यानें सांगितल्याप्रमाणें त्याच्या घरीं पोंचविण्यासाठीं निघाला.

तो निघून गेल्यावर कांहीं शिपाई त्या माणसाचा शोध काढीत तिकडे आले. इंदिरा बऱ्हांड्यांतच उभी होती. तिला त्यांनीं विचारलें—"इकडे कोणी एक तांबडी मोट उचलून घेऊन पळत आलेला पाहालात का?"

"नाहीं बुवा!" इंदिरा म्हणाली. शिपायांनीं घरांत डोकावून पाहिलें त्यांना घरांत लाल मोट दिसली नाहीं. पण उपरणें पांघरून झोपलेला एक मनुष्य दिसला. त्यांनीं विचारलें—"कोण तो?"

"तो आमच्याच घरचा मनुष्य आहे. तब्येत बरी नाहीं म्हणून पडून आहे." इंदिरा म्हणाली.

ते शिपाई निघून गेले. पण त्याचवेळीं वाटेंत दुसऱ्या शिपायांनीं गोपाळला अडवलें व ती लाल मोट ओळखून व त्यालाच चोर समजून त्यांनीं त्यालाच कैद केलें आणि ज्याची मोट चोरीला गेली होती त्याला ती मोट नेऊन दाखवून विचारलें—"ही तुमचीच मोट का?" त्या माणसानें आपली मोट ओळखली. पण मोट उचलून नेणारा मनुष्य कोण हें त्याला माहीत नव्हतें. काळोखांत त्यानें त्याला नीट पाहिलें देखील नव्हतें. म्हणून देखील हा मनुष्य तो चोर नव्हे असें देखील तो सांगूं शकला नाहीं.

"कां चोरी केलीस?" शिपायांनीं गोपाळला विचारलें.

"मी नाहीं चोरी केली!" गोपाळ म्हणाला.

"चोरीच्या मालसकट सांपडला आहेस आणि वर चोरी केली नाहीं, म्हणतोस?" शिपाई त्याला बडवीत पोलीस ठाण्यावर घेऊन गेले. वाटेंत लोकांची गर्दी जमली. त्यांपैकीं एक म्हणाला—"आज संध्याकाळीं काळोख पडल्यावर धर्मशाळेंत उतरलेला हाच तर मनुष्य दिसतो."

शिपायांनीं त्याला विचारलें—"तूं धर्मशाळेंत उतरला आहेस का?"

"नाहीं बुवा.....!" म्हणत गोपाळनें नकारार्थी मान हलविली. शिपायांनीं त्याच्या-



वर चोरीचा आळ आणला या बद्दल गोपाळला तितकेसें वाईट वाटलें नाहीं. पण सकाळ पासून त्या माणसाच्या उपाशी बायकापोरांची काय गत झाली असेल हा एकच विचार त्याच्या मनांत येत होता.

पोलीस ठाण्याच्या वाटेवरच धर्मशाळा होती. शिपायांनी धर्मशाळेच्या बऱ्हांड्यांत इंदिराला उभी पाहून तिला त्यांनी विचारलें—"ही कोण, आहे का ओळखीच तुमच्या?"

त्यावर गोपाळ म्हणाला—"चोर समजून तुम्ही धरून घेऊन चालला आहां, मग प्रत्येकाला मी कोण हें विचारण्याची गरज?"

इंदिरानें पतीचें तें उत्तर ऐकलें व त्याचा अर्थ समजून ती म्हणाली–"मला नाहीं माहीत कीं हे कोण!"

शिपाई गोपाळला घेऊन पोलीस ठाण्यावर गेले. तें सर्व पाहून खरा चोर बाहेर आला. त्याला पाहून इंदिरानें विचारलें–"तूं कां बाहेर आलास आणि कोठें निघालास?"

"तूं आणि तुझा पति लक्ष्मीनारायणासारखे मला दिसतां. मीच चोर आहें. मुलांबाळांचीं भुकेनें वाळलेलीं तोंडें पाहून मला राहवलें नाहीं व मी चोरी केली. तुझ्या पतीनें व तूं माझ्यावर जे उपकार केलेत त्याबद्दल मी असा विश्वासघात कसा करूं शकेन!" असें सांगून तो पोलीस ठाण्याकडे निघाला.

"पोलीस ठाण्यावर नांवगांव विचारतां गोपाळ म्हणाला–"तुम्हांला चोरीचा माल माझ्या हातांत सांपडला, मी चोर आहे. मला या शिक्षा द्यावयाची असेल ती. इतर गोष्टींची चवकशी कशाला?"

इतक्यांत खऱ्या चोरानें येऊन त्यानें चोरी केली असल्याचें सांगितलें.

कोतवालानें गोपाळला विचारलें–"तूं चोरी केली म्हणतोस तर मग हा कोण?"

"मालक, मी याच गांवचा राहणारा. हे परगांवचे राहणारे आहेत. धर्मशाळेंत उतरले आहेत. चोरी मीच केली." खरा चोर म्हणाला.

कोतवालाला शिपायांवर राग आला. त्याला खरी परिस्थिति ओळखायला वेळ लागला नाहीं. तो शिपायांना म्हणाला–"दोन जण स्वतः म्हणत आहेत कीं मी चोरी केली. तुमच्याकडे साक्षी पुरावा कांहीं आहे का? खरा चोर तिसराच कोणी असायचा." असें सांगून त्यानें दोघांना सोडून दिलें.



## ३१. प्राचीन माया स्तंभ

कोलंबसनें अमेरिकेचा शोध लावण्यापूर्वीच कित्येक शतकांपासून तेथें एका जातीच्या सभ्यतेचा विकास झालेला होता. त्या सभ्यतेचें नांवच माया सभ्यता. रेड इंडियन लोकच त्या सभ्यतेचे वारस होत. त्यांची भाषादेखील मूळ माया भाषेच्या सारखीच आहे.

ग्वाटेमाला, दक्षिण मेक्सिको, युकाटेन, होन्डयुरास इत्यादि देशांत प्राचीन माया नगरी उपलब्ध झाल्या आहेत. ज्या ठिकाणी ही नगरें वसली होतीं तेथें आज दाट अरण्यें आहेत.

प्राचीन उत्खननाचें कार्य करणाऱ्या संशोधकांनी माया नगरींचा शोध लावला आहे आणि त्यांच्या सभ्यतेविषयीं पुष्कळ गोष्टींवर प्रकाश पाडला आहे.

माया सभ्यता शेतकीच्या धंद्यावरच मुख्य करून अवलंबून होती. त्यांचें ज्योतिष शास्त्राचें ज्ञानपण फार उन्नत असें होतें. सभ्यतेचा विस्तारपण फार झालेला होता.

बाजूच्या चित्रांत दिलेला स्तंभ एक हजार वर्षांपूर्वीचा आहे. आज देखील तो चांगल्या स्थितींत आहे. आज जे माया स्तंभ जगांत आढळतात त्यांत हाच सर्वांत उंच असा आहे.

या स्तंभाच्या जवळपासच्या प्रदेशांत माया सभ्यतेचे अवशेष आढळतात. हा स्तंभ पोर्टो बारियोस आणि ग्वाटेमालाच्या रेल्वे मार्गापासून जवळ आहे.





# भारताचा इतिहास



देवराय द्वितीय सन् १४४६ मध्यें मरण पावला. त्याचा मोठा मुलगा मल्लिकार्जुन गादीवर बसला. त्यानें बहमनी सुलतान व ओरिसाचे हिंदू राजे दोघांनीं मिळून केलेल्या स्वारीला मोठ्या धैर्यानें तोंड दिलें. १४६५ पर्यंत त्यानें निर्विघ्न राज्य केलें. त्या अवधींत विजयनगरच्या राज्यावर संकट आलें नाहीं. चंद्रगिरीचा राजा सालव नरसिंह हा देवरायाचा समकालीन होता. त्यानें पुष्कळ ख्याति मिळविली होती. त्याचे पूर्वज विजयनगरच्या चक्रवर्तीचे मांडलिक होते.

मल्लिकार्जुन याच्यानंतरचा राजा विरुपाक्ष हा अयोग्य होता. म्हणून राज्यांत बंडाळी माजली. म्हणून बहमनीच्या सुलतानांनीं कृष्णा व तुंगभद्रा नद्यांच्या दुआबांतील प्रदेशावर स्वारी केली. ओरिसाचा राजा पुरुषोत्तम गजपति हा तिरुवण्णामलैपर्यंत चालून आला. जागोजागीं बंडें झालीं. ती परिस्थिति ओळखून विजयनगरच्या राज्याचें रक्षण करण्यासाठीं सालव नरसिंह हा. १४७६ मध्यें राजाला पदच्युत करून स्वत: गादीवर बसला. अशा तऱ्हेनें संगम वंशाचा शेवट झाला आणि विजयनगर येथें सालव वंशाची कारकीर्द सुरू झाली. सालव नरसिंह याला प्रजेचा पाठिंबा पण मिळाला. त्यानें सहा वर्षें राज्य केलें आणि बंड-खोरांचा विमोड केला. परंतु रायचूर प्रांत बहमनी सुलतानांकडे व उदयगिरीचा प्रांत उत्कलच्या राजाकडेच राहून गेला.

तुळु देशांतील राजांचा एक वंशज नरसनायक हा सालव नरसिंह याचा एक विश्वासपात्र सेनापति होता. सालव नरसिंह यानें आपल्या मागून त्यालाच राज्यकारभार दिला. नरसनायक यानें सालव नरसिंह याचा मुलगा नरसिंह द्वितीय याला गादीवर बसवून आपल्या स्वामिभक्तीचा परिचय दिला

१५०५ मध्यें नरसनायकाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा वीरनरसिंह हा स्वत: गादीवर बसला. अशा तऱ्हेनें विजयनगरचें राज्य तेव्हांपासून तुळू वंशाच्या हातीं आलें.

वीर नरसिंह याच्यानंतर त्याचा भाऊ कृष्णदेवराय गादीवर बसला. ह्याची कीर्ति अखिल भारतांत एक योग्य व पराक्रमी शासनकर्ता म्हणून पसरली व आजता-गायत इतिहासांत एक योग्य हिंदू शासक म्हणून तो प्रसिद्ध आहे. तो शूर होता व युद्धविद्येत निपुण होता. प्रथम त्यानें बंडखोरांना ताळ्यावर आणलें. नंतर त्यानें राज्याच्या उत्तरेकडील शत्रूंचा समाचार घेतला. १५११-१२ मध्यें त्यानें दक्षिणे-कडील उम्मतूरचें बंड शांत केलें. १५१२ मध्यें त्यानें विजापुर राज्याच्या सीमेवरचें रायचूर जिंकलें. नंतर मुसलमान राज्यांवर स्वारी करण्याचा विचार त्यानें केला. परंतु त्यानें आपला मंत्री व सेनापति सालव तिम्मण्णा याच्या सल्ल्यानें तो विचार सोडून दिला.



सन् १५१३ मध्यें कृष्णदेवराय यानें ओरिसाचा राजा गजपति प्रतापरुद्र याच्या राज्यावर स्वारी केली. संगम वंश राज्य करीत असतां प्रतापरुद्र याच्या पूर्वजांनीं विजयनगराच्या राज्याच्या कांहीं भागावर स्वारी करून तो प्रदेश बळकावला होता. तो प्रदेश पुन्हां आपल्या राज्यांत मिळवून घेण्याच्या हेतूनें कृष्णदेवराय यानें ही स्वारी केली होती. सन् १५१४ मध्यें कृष्ण-देवराय यानें उदयगिरीचा किल्ला सर केला. ओरिसाच्या राजाला गोवळकोंडा व बीद-रच्या सुलतानांनीं मदत केली होती. परंतु

तरी कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यानंतर एका वर्षाच्या आंत कोंडवीडूचा किल्ला व आसपासचा प्रदेश कृष्णदेवरायाच्या हातीं आला. ओरिसाचा युवराज वीरभद्र व ओरिसाचे अनेक वीर कृष्णदेवरायच्या हातीं बंदी झाले. परंतु कृष्णदेवराय यानें वीरभद्र यालाच जिंकलेल्या प्रदेशाचा अधिपति म्हणून नेमून आपल्या चाणक्यनीतीची साक्ष पटवून दिली.

ओरिसावर तिसरी स्वारी करीत असतां कृष्णदेवराय यानें बेझवाडा येथें सैन्याचा पडाव टाकला व कोंडपलीच्या किल्ल्याला वेढा दिला. या युद्धांत ओरिसाच्या राजाची राणी व मुलगा वीरभद्र दोघे कैद झाले. तेथून कृष्णदेवराय सिंहाचलापर्यंत चालून गेला. तेथें ओरिसाच्या राजाला संधि करून घेणें भाग पडलें.

कृष्णदेवराय यानें मिळविलेला शेवटचा जय म्हणजे रायचूरच्या आसपासच्या युद्धांत. रायचूर परत आपल्या राज्यांत मिळवून घेण्यासाठीं विजापूरच्या इस्माइल आदिल शाहनें प्रयत्न करून पाहिला. सन १५२० मध्यें कृष्णदेवरायनें त्याचा पराभव केला. असें सांगतात कीं खरोखरीं सर्व विजापूरच्या राज्यावरच त्या स्वारीचा परिणाम झाला आणि गुलबर्ग्याचा किल्लादेखील जमीनदोस्त झाला होता.

कृष्णदेवराय याचें साम्राज्य पश्चिमेकडे कोंकण प्रांतापासून पूर्वीकडे विशाखापट्टणम्-पर्यंत आणि दक्षिणेकडे समुद्रतीरापर्यंत पसरलें होतें. हिंदमहासागरांतलीं कांहीं बेटें व प्रदेशदेखील त्याच्या राज्यांत मोडत असे. कृष्णदेवरायच्या पुढील कारकीर्दीत राज्यांत सर्वत्र शांतता नांदत होती.





# प्रह्लाद चरित्र

[ ३ ]

हिरण्यकश्यपूच्या आज्ञेनें त्याच्या क्रूर अनुयायांनीं अमानुषपणानें प्रह्लादाला भाले भोसकून, सर्पदंश करवून, कडेलोट करून, प्यायला विष देऊन, त्याला जमिनींत पुरून व नानाप्रकारच्या यातना देऊन त्याचें मन ईश्वराविरुद्ध वळविण्याचा यत्न करून पाहिला. परंतु प्रह्लादानें खंबीरपणानें सर्व कष्ट सहन केले. इतके कष्ट देऊन देखील प्रह्लादाच्या मनावर कांहीं एक परिणाम न झालेला पाहून हिरण्यकश्यपूला मात्र दहशत बसली. लहान मुलगा होता पण त्याच्या अंगांत ईश्वरीशक्ति असली पाहिजे अशी शंका त्याला वाटूं लागली. त्याला आपण जास्त कष्ट दिला तर त्याचा परिणाम आपलाच शेवट होण्यास कारण होईल या काळजींत तो चिंतामग्न बसला असतां चंड व अपर्क त्याच्याजवळ आले. ते म्हणाले—"त्रिलोक जिंकणाऱ्या तुमच्या सारख्या वीराला काळजी कसली? शिवाय गुरु शुक्राचार्य आले कीं ते आपल्या मंत्रबळानें त्याची बुद्धि बदलून टाकतील."

"बरें तर, तुम्ही त्याला राजाचीं कर्तव्यें गार्हस्थ्यधर्म इत्यादि विषयांचें शिक्षण देत रहा!" हिरण्यकश्यपु त्यांना म्हणाला. त्या-प्रमाणें दोघे पुन्हां प्रह्लादाला शिक्षण देऊं लागले. परंतु त्याच्या मनावर त्या शिक्षणाचा काय परिणाम होणार? मुलें त्याला खेळण्यासाठीं बोलवायला आलीं कीं तो त्यांना तत्त्वबोध करूं लागे. फक्त ब्रह्मच सत्य आहे इतर जग सर्व मिथ्या आहे.









प्रह्लादाला ध्यानमग्न बसलेला पाहून इतर मुलें देखील हरीचें स्मरण करून ध्यान मग्न होऊन बसत. पण चंड व अपर्क घाबरले. त्यांनीं प्रह्लादाच्या विरुद्ध हिरण्यकश्यपूकडे तक्रार केली. तेव्हां त्यानें स्वतःच्या हातानें पुत्रवध करण्याचा निश्चय केला. त्यानें प्रह्लादाला बोलाविलें. तो हात जोडून पित्या-समोर उभा राहिला. हिरण्यकश्यपु त्याला म्हणाला–"कुळघातका! माझ्या आज्ञेविरुद्ध करण्यास तुला कोणी शिकविलें, बोल!"

प्रह्लाद नम्रपणें म्हणाला–"महाराज, तुम्ही काय, किंवा मी काय सर्वांना तो परमेश्वरच शक्ति व बळ देतो. तुम्ही ही राक्षसवृत्ति सोडून देऊन सात्विकवृत्ति स्वीकार करावी. कोम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे षड्‌रिपु हे अन्तः शत्रु आहेत. त्यांना वश केल्याशिवाय...."

"मूर्ख! टीचभर मुलगा तूं! मला अक्कल शिकवितोस? मी त्रिलोकपति नाहीं, तर तो दाखव मला कोण आहे तो!" हिरण्यकश्यपु म्हणाला.

प्रह्लाद शांतपणें म्हणाला–"तो हरि सर्वव्यापी आहे!"

तें ऐकून हिरण्यकश्यपु चवताळून म्हणाला–"तर मग तो या खांबांत कां नाहीं दिसत?" हिरण्यकश्यपु असें म्हणत तलवार घेऊन प्रह्लादावर धांवला व त्यानें खांबाला लाथ मारली.



परंतु अचानक भूकंप व्हावा तसा भयंकर आवाज झाला. पृथ्वी व आकाश दुभंगल्या-सारखें भासलें. तो आवाज ब्रह्मादिकांना ऐकूं आला व तें दृश्य त्यांना दिसलें. नाहीं ऐकूं आला तो फक्त हिरण्यकश्यपूलाच. मुलाला कसा ठार करावा या विचारांत तो रागारागानें येरझाऱ्या घालूं लागला.

इतक्यांत तो खांब दुभंगला व त्यांतून एक भयंकर रूप त्याला दिसलें. मनुष्य म्हणावें तर मनुष्य नव्हता, पशु म्हणावें तर पशु पण नव्हता. भयंकर दांत, पाजळ-वलेल्या तलवारीसारखी जीभ, लालबुंद अग्निज्वाळांसारखे डोळे, मानेवर आयाळ अंगावर केस, वाघासारखीं नखें पाहून हिरण्यकश्यपूच्या अंगाला घाम सुटला. विष्णूनें प्रह्लादाच्या हांकेसरशीं धांवून नृसिंह अवतार घेतला.

हिरण्यकश्यपु मनांत भ्याला होता, पण शौर्य व साहसाचा आव आणून म्हणाला–"हा मायावी मला ठार करण्यासाठीं हें रूप घेऊन आला आहे होय? असें म्हणत गदा











हातीं घेऊन हिरण्यकश्यपु नरसिंहावर धांवला. गरुड सांपाला धरतो तसा नरसिंहानें हिरण्यकश्यपूला सहज उचलून घेतला. परंतु सांप गरुडाच्या चोंचींतून निसटून गेला होता तसाच हिरण्यकश्यपुपण नरसिंहाच्या हातांतून निसटून बाजूला झाला. नरसिंहाचें बळ ओळखून त्यानें या खेपेस त्याच्याशीं गदा युद्ध करण्याचा विचार सोडला व ढाल तलवार घेऊन त्याला मारायला धांवला. परंतु नरसिंहाच्या तेजासमोर त्याचे डोळे दिपून गेले. त्याला नरसिंह दिसेनासा झाला. मग तो त्याला कसा मारणार. म्हणून डोळे मिटून निसटून पळून जाण्याचा त्यानें प्रयत्न केला पण डोळे मिटले असल्यानें त्याला पळतां आलें नाहीं.

नरसिंहानें हिरण्यकश्यपूला संध्याकाळच्या सुमारास दोन्ही हातांनीं उचलून आपल्या मांडीवर उताणा निजवला व आपल्या तीक्ष्ण नखांनीं त्याचें पोट फाडून त्याचा अंत केला. कांहीं राक्षस तलवार घेऊन नरसिंहाला मारण्यास धांवले. पण त्यांना देखील त्यांच्या धन्या पाठोपाठ त्यानें पाठवून दिलें आणि नरसिंह स्वतः सिंहासनावर बसला.

नृसिंह अवतार भयंकर अवतार होता. त्याच्या दर्शनासाठीं ब्रह्मादिक देव आले. हिरण्यकश्यपूचा त्रास त्रिलोकाला असह्य झाला होता. म्हणून त्यांनीं नृसिंहाची स्तुति केली. परंतु नृसिंह शांत झाला नाहीं. तेव्हां ब्रह्मदेवानें प्रह्लादाला विनंति केली. प्रह्लादानें नृसिंहाचें स्तोत्र गाऊन त्याला शांत केलें.

प्रह्लादानें आपल्या बापाची अन्त्येष्टी क्रिया केली व त्याच्यानंतर गादीवर बसला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]






[ २ ]

[राजा मानसिंह यांचा मोठा मुलगा जगतसिंह मंदारणच्या वाटेवर एकटाच घोड्यावर बसून जात असतां एका वादळांत सांपडला. काळोखांत त्याला एक देऊळ दिसलें. तो देवळांत शिरला. तें देऊळ शैलेश्वराचें होतें. तेथें एक कुलीन घराण्यांतली तरुण स्त्री व तिची दासी विमला यांच्याशी त्याची ओळख झाली. त्या तरुण स्त्रीचें रूप लावण्य पाहून त्याचें मन तिच्यावर बसलें. त्यानें आपली ओळख सांगितली, पण त्या दोघी कोण हें मात्र त्याला कळलें नाहीं. विमलानें त्याला वचन दिलें कीं बरोबर पंधरा दिवसांनीं तो पुन्हां त्याच जागीं भेटला तर ती तरुण स्त्री कोण हें सांगूं शकेल.]

जगतसिंह वंगदेशांत कशासाठीं आला होता आणि एकटाच कां फिरत होता हें कळण्यास वंगदेशाची त्या काळची स्थिति समजून घेणें आवश्यक आहे. वंगदेशांत बख्त्यार खिलजी यानें मुसलमान धर्माचा झेंडा फडकवला. त्यानंतर मुसलमानांचें राज्य वंगदेशांत कित्येक वर्षें ठाणें करून होतें. परंतु दाऊदखान यानें स्वतःच्या मूर्खपणानें अकबर बादशाहशीं वैर करून जणूं कांहीं झोंपलेल्या सिंहालाच डिवचून जागा केलें.



अकबर बादशहाचा सेनापति मुनव्वरखान यानें दाऊदखानाचा पराभव करून बंगदेशांत मोगल सत्ता स्थापन केली. दाऊदखान आपलें तोंड लपविण्यासाठीं ओरिसा प्रांतांत सकुटुंब पळून गेला. अशा तऱ्हेनें उत्कल प्रांतांत पठाण वंशाचें पाऊल पडलें. त्यांना तेथून हुसकावून लावणें मोगलांना देखील कठिण झालें. तरी शेवटीं उत्कल प्रांताला मोगलांची सत्ता मान्य करावी लागलीच.

परंतु या अवधींत बंगदेशांत बंडाळी सुरू झाली. अकबर बादशहानें कर वसूल करण्यासाठीं जी व्यवस्था केली होती त्या मुळें तेथील जमीनदार व जहागीरदार चिडून गेले होते. त्यांनीं बंडाचें निशाण उभें करण्याचें ठरविलें. उत्कलच्या पठाणांना चांगली संधी मिळाली. कतलुखान नामक एक पठाण सरदार बंडखोरांचा पुढारी झाला. त्यानें मिदनापूर हस्तगत केलें.

अकबर बादशाह जसा पराक्रमी होता, तसाच तो हुशार व चतुर पण होता. त्यानें राजपुतांनाच मुख्य मुख्य अधिकाराच्या पदावर नेमलें होतें. राजा मानसिंह त्यांत प्रमुख होता. मानसिंहालाच अकबर बादशहानें बंगदेश व बिहार प्रांताची राज्यव्यवस्था पाहण्यासाठीं आपला अधिकारी नेमलें.

मानसिंह पाटणा येथें आला. तेथें शासन व्यवस्था करून तो उत्कल प्रांताकडे वळला त्यानें सैयद खानाला आपल्या मार्गें राज्याची व्यवस्था पाहण्यासाठीं आपला प्रतिनिधि म्हणून नेमलें होतें. वर्धमान नगराच्या वाटेनें जात असतां त्यानें, सैयद खान याच्याकडे ससैन्य वर्धमान येथें येऊन भेटण्यास निरोप पाठविला. परंतु त्यानें मानसिंहाकडे परत निरोप पाठविला, सैन्याची जमवा जमव करून येण्यास बराच काळ लागेल व या अवधींत पावसाळा सुरू होईल म्हणून पावसाळा संपतांच सैन्य घेऊन येईन. मानसिंहानें निरुपाय होऊन दारुकेश्वर येथें पावसाळा संपेपर्यंत राहण्याचें ठरविलें.

सैयदखान न आलेला पाहून कतलुखानानें दूरवर मराऱ्या मारायला सुरवात केली. मंधारण प्रांतावर त्यानें हल्ला केला आणि लूटपाट सुरू केली.

ती वार्ता ऐकून मानसिंह काळजींत पडला. त्यानें शत्रूच्या शक्तीचा कयास लावून घेण्याचें ठरविलें. जगतसिंह बरोबर होताच. मानसिंहानें त्याला शंभर घोडेस्वार देऊन या कामावर पाठविलें. शत्रूच्या शक्तीची सर्व माहिती काढून जगतसिंह परत येत असतां शैलेश्वराच्या देवळांत पोंचला व अचानकपणें त्या स्त्रियांशीं त्याची भेट झाली.

जगतसिंह शैलेश्वराच्या देवळांतून आपल्या अनुयायांसह मानसिंहाच्या छावणींत पोंचला. त्यानें आपल्या वडिलांना पठाणांच्या शक्तीची कल्पना पुरी करून दिली व म्हणाला—



“ धरपुर गांवानजीक पठाणांची छावणी आहे. त्यांच्याजवळ सुमारें पन्नास हजारांचें सैन्य आहे व जवळपासच्या प्रदेशांत ते लूटपाट करीत फिरत आहेत. त्यांनीं जागोजागीं कांहीं किल्ले काबीज केले आहेत व नवीन किल्ले बांधून कायमचें ठाणें देण्याच्या प्रयत्नांत आहेत.”

मानसिंहानें पठाणांचें पारिपत्य करण्याचें ठरवून आपल्या सैन्याच्या अधिकाऱ्यांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला. मानसिंह त्यांना म्हणाला—“ गांवामागून गांवें व परगण्यामागून परगणे दिल्लीच्या बादशाहाच्या


चांदोबा



अमलाखालून निसटूं लागले आहेत. आपण हातावर हात धरून बसण्यांत अर्थ नाहीं. आपली सर्व शक्ति पणाला लावून पठाणांना थोपविलेंच पाहिजे. सैयदखान येईपर्यंत युद्धाला आरंभ करणें देखील शहाणपणाचें होणार नाहीं. तरी आपण झोपलों नाहीं हें दाखविण्यासाठीं तरी एका हुशार व कर्तबगार सेनापतीला पाठविणें आवश्यक आहे."

ती जबाबदारी जगतसिंहानें आपल्या शिरावर घेतली. त्यानें प्रतिज्ञा केली कीं दहा हजारांचें सैन्य घेऊन जाऊन मी पठाणांना सुवर्णरेखेच्या पलीकडे पिटाळून लावीन.

जगतसिंह विष्णुपुराहून जहानाबाद येथें गेला. त्या वाटेवर दक्षिणेकडे मंथारण पडत होतें. ज्या स्त्रियांशीं शैलेश्वराच्या देवालयांत त्याची भेट झाली होती त्या त्याच गांवच्या होत्या.

दामोदर नद मंथारण नगरानजीकच होता. तो नद एका जागीं वळत होता. त्या वळणावर एका त्रिकोणाकृति प्रदेशांत एक किला होता. किल्याला लागून दोन बाजूला नद वहात होता. तो किला जयधरसिंह नांवाच्या एका हिंदू सरदाराला त्याच्या शौर्याबद्दल जहागीर म्हणून मिळाला होता. प्रस्तुत गोष्टीच्या काळांत जयधर-सिंहाचा वीरेंद्रसिंह नांवाचा मुलगा किल्याचा अधिकारी होता.

वीरेंद्रसिंह तरुण वयांत असतां त्याचें त्याच्या बापाशीं कधींच पटलें नाहीं. बापानें वीरेंद्रसिंहासाठीं एक कन्या पाहिली ती देखील एका जमीनदाराचीच मुलगी होती. चांगली रूपवती होती व आपल्या आईवडिलांची एकुलती एकच मुलगी होती. परंतु वीरेंद्रसिंहानें बापाचें ऐकलें नाहीं व एका गरीब अनाथ स्त्रीशीं लग्न करून घेतलें.



म्हाताऱ्याला या गोष्टीचा मनस्वी राग आला व त्यानें आपल्या मुलाला घराबाहेर काढलें. तरुण वीरेंद्रसिंह आपल्या शौर्याच्या बळावर मोठा हुद्दा मिळविण्याच्या महत्वा-कांक्षेनें मोगलांच्या पदरीं नोकरीला लागला. त्या वेळीं त्याची बायको गरोदर होती म्हणून तिला त्यानें बरोबर नेलें नाहीं व तिच्या आईकडेच ठेवून गेला.

मुलाला घराबाहेर काढल्यापासून म्हाता-ऱ्याचें चित्त कोणत्याहि कामाकडे लागेना. मुलगा कोठें निघून गेला हें देखील त्याला माहीत नव्हतें. त्यानें मुलाचा पुष्कळ शोध केला. पण त्याला त्याचा पत्ता लागला नाहीं. म्हणून म्हाताऱ्यानें सुनेला माहेरून बोलावून घेतलें. तिला एक मुलगी झाली आणि कांहीं दिवसांनीं आजारी पडून मुलीची आई मरण पावली.

वीरेंद्रसिंह बादशाहच्या परवानगीनें रजपूत सैन्यांत भर्ती झाला. त्यानें मोठी कीर्ति मिळविली आणि अलोट संपत्ति घेऊन वृद्ध पित्याच्या मृत्युसमयीं स्वदेशीं परत आला. परत येतांना स्वतःबरोबर तो विमला नांवाची एक दासी व अभिरामस्वामी नांवाचा एक संन्यासी दोघांना घेऊन आला.



विमला घरचें काम पाही, मुख्य करून वीरेंद्रसिंहाच्या मुलीची जबाबदारी तिच्यावर टाकण्यांत आली होती. घरांतली लहान मोठीं सर्व कामें ती करी. पण दासी म्हणून तिला कोणी वागविलें नाहीं. ती वयानें मोठी होती. तरुण वयांत ती फारच सुंदर राहाली असावी यांत कोणाला शंकाच नव्हता. तिचें बोलणें राहाणी व वागणें पाहून ती कुलीन घराण्यांतलीच असावी असें वाटे.

वीरेंद्रसिंहाबरोबर जो संन्यासी आला होता तो नेहमींच किल्यांत रहात नसे. दोन तीन महिनेच मंथारणच्या किल्यांत



तो रहात असेल. बाकी काळ बाहेरच फिरत असे. वीरेंद्रसिंहाचा तो गुरु आहे असें सर्व मानत. दोघे परस्परांचा आदर करीत. वीरेंद्रसिंह अभिरामस्वामीच्या सल्ल्यानें सर्व कामें करी. विमला व अभिरामस्वामी यांच्या व्यतिरिक्त अस्मानी नांवाची आणखी एक दासी वीरेंद्रसिंहाबरोबर दिल्लीहून आली होती.

त्या दिवशीं विमला तिलोत्तमेला घेऊन शैलेश्वराच्या देवळांतून मंधारणला परत आली त्याच्या नंतर दोन तीन दिवसांनीं वीरेंद्र दरबारांत बसला असतां अभिरामस्वामी आला. वीरेंद्रसिंहानें अभिवादन केलें. दोघे आपापल्या जागीं बसल्यावर अभिरामस्वामी म्हणाला—"पठाण व मोगल यांच्या मध्यें भयंकर युद्ध सुरू होणार आहे. या युद्धांत काय करावें असें तुला वाटतें ?"

"मी आपल्या बाहुबलानें शत्रूचा पराभव करीन." वीरेंद्र म्हणाला.

"तूं शूरवीरासारखेंच बोललास. पण तुझ्याकडे फक्त एक हजाराचें सैन्य आहे. एका बाजूनें पठाण व दुसऱ्या बाजूनें मोगल आहेत. दोघां पैकीं एक जोंपर्यंत तुला मदत करायला तयार होत नाहीं तोंपर्यंत तुला यश मिळणें शक्य नाहीं. दोघांशीं वैर करण्यापेक्षां एकाशीं मैत्री करून घेण्यांत शहाणपण आहे."

"आपल्या मतें मी कोणाचा पक्ष स्वीकारावा ?" वीरेंद्रानें विचारलें.

"यतो धर्मस्ततो जयः ! ज्या बाजूला धर्म आहे त्या बाजूला तूं जावें. राजद्रोह करणें महापाप आहे. म्हणून तूं राजाचा पक्ष घ्यावा." अभिरामस्वामी म्हणाला.

"पण राजा कोण ? मोगल कीं पठाण ? दोघे राज्यासाठीं भांडत आहेत !" वीरेंद्रानें विचारलें.



"कर्तृत्ववान व धर्म परायण अकबर बादशाहच राजा आहे !" अभिरामस्वामी म्हणाला.

परंतु तें ऐकून वीरेंद्रसिंहाचा चेहेरा रागानें फणफणला. डोळे लाल झाले. तो म्हणाला—"महाराज, आपला आशीर्वाद मिळाला तर मानसिंहाच्या रक्तानें आपले चरण धोण्याचें भाग्य मला लाभेल."

"मी बादशाहचा पक्ष घेण्यास तुला सांगितलें आहे, मानसिंहाचा नाहीं. शांतपणानें थोडा विचार कर. रागाच्या भरांत कांहीं करून स्वतःचें अहित करून घेऊं नकोस. मानसिंहावर तुला सूड उगवायचा असेल तर मी त्याला नकार देणार नाहीं. परंतु अकबराच्या बाजूनें युद्ध करण्याविषयीं मी केलेल्या सूचनेबद्दल तुझें काय मत आहे ?"

त्यावर वीरेंद्रसिंहानें आपली बाजू स्पष्ट केली कीं अकबराच्या बाजूनें युद्ध करण्यासाठीं मला मानसिंहाच्या हाता खालीं युद्ध करावें लागल्यास मी त्या गोष्टीस कबूल होणार नाहीं. त्या ऐवजीं पठाणांच्या बाजूनें मी युद्ध करीन.

तें उत्तर ऐकून अभिरामस्वामीचा चेहरा गंभीर झाला. त्याच्या डोळ्यांत दोन टिपें



देखील आलीं. तें पाहून वीरेंद्रसिंहाचें मन विचलित झालें व तो आपल्या आसनावरून उठून अभिरामस्वामी बसला होता त्याच्या जवळ गेला व क्षमा करण्यास विनंति केली. तो म्हणाला—"महाराज, आपल्या आज्ञेबाहेर मी नाहीं."

अभिरामस्वामी डोळे पुसून म्हणाला—"मला तुझ्याहून तुझ्या मुलीचा जास्त अभिमान वाटतो. मी कांहीं दिवसांपूर्वी तिची जन्मकुंडली पाहिली होती. मोगलांच्या सेनापतीच्या मुळेंच तिच्यावर संकट येण्याची शक्यता आहे. मोगलांशीं मैत्री केल्यानें हें

संकट टळेल. म्हणून मी तुला त्यांची बाजू घ्यायला सुचविलें आहे. तुझ्या मुलीच्या जन्मकुंडलीची गोष्ट सांगून तुझ्या स्वाभिमानाला धक्का पोंचविण्याचा विचार माझ्या मनांत चुकून सुद्धां आला नाहीं. परंतु मुलीवर संकट येऊं नये म्हणूनच कदाचित तूं पठाणांची बाजू घ्यायचें ठरविलें असशील."

असें सांगून तो उठला आणि जातांना म्हणाला—"दारांत कतलखानाचा दूत वाट पहात उभा आहे. मी येत असता त्याला पाहिला व आंतून निरोप येईपर्यंत त्याला तेथेंच बसवून घेण्यास पाहारेकऱ्यांस सांगून मी आंत आलों. मला जें कांहीं सांगावयाचें होतें तें मी सांगितलेंच आहे. म्हणून दूताला आंत बोलवून त्याला जें उत्तर देणें तुला रास्त वाटेल तें देऊन निरोप दे!"

"महाराज! मी आपला विचार बदलला आहे. मी मानसिंहाच्या हाताखालीं देखील काम करण्यास तयार आहें. त्या दूताला आंत पाठवून देण्यास सांगावें."

थोड्या वेळानें कतलखानाचा दूत आंत आला व त्यानें कतलखानानें दिलेला लखोटा दिला. पत्रांत लिहिलेला मजकूर येणेंप्रमाणें होता—"वीरसिंह, एक हजार घोडेस्वार आणि पांच हजार मोहरा पठाणांच्या छावणींत पाठवून दे. नाहींतर माझें वीस हजारांचें सैन्य मंधारणच्या किल्ल्याला वेढा देण्यास सज्ज उभें आहे!—कतलखान."

पत्र वाचून वीरेंद्र म्हणाला—"तूं आपल्या मालकाला जाऊन सांग कीं सैन्य पाठवून देतों." दूत निघून गेला.

सभेंत झालेलें संभाषण आड उभी राहून विमला ऐकत होती. [पुढें चालू]



## नाचणारा अस्थिपंजर

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां त्या झाडाकडे गेला, प्रेत काढून खांद्यावर टाकलें आणि स्मशानाकडे निघाला. चार पावलें टाकलीं नाहींत तोंच प्रेतांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा, अद्भुत शक्ति सामर्थ्यासाठींच जर तूं इतके कष्ट करीत असशील तर ते सर्व फुकट, समज. कारण असल्या शक्तीच ऐन वेळीं धोका देतात. आतां हेंच पहाना." असें सांगून त्यानें गोष्ट सांगण्यास आरंभ केला.

कान्यकुब्ज देशांत दोघे मित्र रहात असत. एकाचें नांव कृतवर्मा व दुसऱ्याचें श्रुतवर्मा. दोघे मित्र होते खरे, पण त्या दोघांच्या स्वभावांत फार फरक होता. एक कष्टाळू तर दुसरा आळशी. एक सदाचारी तर दुसरा दुराचारी. कृतवर्मा धन जोडणारा तर श्रुतवर्मा धन उडविणारा. कृतवर्मा सतत

## वेतालाच्या गोष्टी



परिश्रम करून धन मिळवीत असे. परंतु स्वदेशीं पुरेसा पैसा न मिळाल्यामुळें तो परदेशीं जाण्यास निघाला. त्याच्या पाठोपाठ त्याचा मित्र श्रुतवर्मा पण निघाला.

परदेशांत कृतवर्मा रात्रंदिवस मेहनत करून पैसा मिळवूं लागला आणि श्रुतवर्मा दारूंत आणि जुगारींत पैसा घालवूं लागला. कृतवर्मा मित्र म्हणून जरूरी तेवढा पैसा श्रुतवर्माला देत असे. त्याला नीट वागण्यासाठीं परोपरीनें सांगत असे. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तीन वर्षे गेलीं. कृतवर्मानें खूप पैसे मिळविले आणि स्वदेशीं जाण्यास निघाला. श्रुतवर्मा त्याला म्हणाला—"मलाहि परदेशांत आतां राहण्याची इच्छा नाहीं. मलाहि तुझ्याबरोबर घरीं परत जावेंसें वाटत आहे. अशावेळीं माझ्याजवळ प्रवासाला पुरेसा पैसा अडकाहि पण नाहीं."

येतांना दोघे बरोबर आले होते. म्हणून परत जातांना कृतवर्मानें श्रुतवर्माला बरोबर घेऊन जाण्याचा विचार केला. दोघे बरोबरच घरीं जाण्यास निघाले.

कृतवर्मानें जेवढे पैसे मिळविले होते ते सर्व त्यानें आपल्या बरोबर घेतले. ते दोघे मित्र जेव्हां आपल्या गांवाच्याजवळ पोहोंचले तेव्हां श्रुतवर्मानें कृतघ्नपणानें कृतवर्माला असावधा पाहून ठार केलें. त्याचें प्रेत रस्त्याच्याकडेला झुडपांत फेकून दिलें. त्याच्या जवळची सर्व संपत्ति घेऊन आपल्या गांवीं गेला. त्यानें बरीच संपत्ति कमावलेली पाहून घरांतील लोकांना फार आनंद झाला.

श्रुतवर्माला एकटाच आलेला पाहून गांवकऱ्यांनीं कृतवर्माचीहि चौकशी केली. तेव्हां तो म्हणाला—"काय सांगूं तुम्हांला? परदेशांत गेल्याबरोबर तो अगदीं बदलून गेला. वाईट संगतींत राहूं लागला. अर्थातच कमावलेला सर्व पैसा घालवून बसला आणि शेवटीं पोट भरायची सुद्धां भ्रांत पडली."

कृतवर्माच्या पैशावर श्रुतवर्माचे कांहीं दिवस मजेंत गेले. पण दारू व जुगार ह्यांच्या तडाक्यांत ते पैसे किती दिवस पुरणार? थोड्याच दिवसांत उतरती कळा लागली व तो पुन्हां कंगाल झाला. त्याला गांवांत राहणें अशक्य झालें. म्हणून पुन्हां परदेशीं निघाला.

वेशीच्या बाहेर पडतांच त्यानें ज्या ठिकाणीं कृतवर्मास ठार केलें होतें त्या जागीं येऊन पोहोंचला. तो पुढें जाऊं लागला तेव्हां त्याला कोणी तरी बोलावीत आहे असा भास झाला. त्यानें मागें वळून पाहिलें. पण त्याला कोणी दिसलें नाहीं. खरोखरच भास झाला असें समजून तो पुढें चालू लागला. पण पुन्हां 'श्रुत' 'श्रुत' असा आवाज त्याच्या कानीं पडला. ह्या खेपेस त्याच्या लक्षांत आलें कीं आवाज रस्त्याच्या बाजूस असलेल्या झुडपांतून येत आहे. तो झुडपाजवळ गेला. त्याला तेथें एक हाडांचा सांगाडा दिसला. तो आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागला. त्याला कृतवर्माची आठवण झाली. इतक्यांत सांगाडा बोलूं लागला. म्हणाला—"अरे श्रुत, इतक्यांतच



मला विसरलास? माझ्या पैशावरच नाहीं का इतके दिवस तूं चैन केलीस? तुला माझी एकदां तरी आठवण झाली का? मी मात्र तुला भेटण्याच्या इच्छेनेंच आज पर्यंत येथें बसून राहिलों आहे. आज तुझ्या भेटीनें मला फार आनंद होत आहे. काय मला ओळखलें नाहींस? अरे मी कृतवर्मा! आपण ह्याच वाटेनें गेलों होतों आणि परत पण ह्याच वाटेनें आलों होतों."

सांगाड्यांतून निघालेले ते बोल ऐकून व कृतवर्माचें नांव ऐकून श्रुतवर्मा घाबरून गेला. तेथून पळून जाण्याच्या विचारानें तो



वळला देखील. परंतु त्या सांगाड्याच्या हातानें त्याचें धोतर घट्ट धरून ठेविलें. त्याचे पायहि जमीनीला खिळून राहिल्यासारखे त्याला वाटलें. विकट हास्य करून कोठें चाललास म्हणून सांगाड्यानें विचारलें. श्रुतवर्मा म्हणाला—"माझ्याजवळ असलेला सर्व पैसा संपून गेला. म्हणून कामधंदा करून पैसा मिळविण्याच्या हेतूनें मी घराबाहेर पडलों आहे. कां उगाच मला त्रास देतोस. जाऊं दे मला."

"हं! म्हणजे तूं पैशाच्या काळजींत आहेस. ठीक आहे. मला एका पेटींत घालून घेऊन चल. मी नाच करून तुला पैसे मिळवून देतों. असा बघतोस काय? तुझा विश्वास नाहीं बसत? हें बघ मी नाच करतों." असें म्हणात त्या सांगाड्यानें सुंदरसें नृत्य केलें. "तूं वाटेल तें गाणे म्हण, मी तालावर नाचतों. माझा नाच दाखवून तूं पैसा मिळव."

पैसे मिळविण्याचें हें उत्तम साधन आहे असें समजून त्यानें तो सांगाडा घेतला व पुढें निघाला.

अस्थिपंजराला नाचवीत तो गांवोगांव हिंडून पैसे मिळवूं लागला. त्याच्या त्या सांगाड्यची ख्याति राजाच्या कानावर गेली. राजानें त्याला बोलावलें व अस्थिपंजराचा नाच करविण्याची आज्ञा दिली. श्रुतवर्माला फार आनंद झाला. त्याला वाटलें, राजा त्या सांगाड्याच्या नाचावर खूप होऊन मला पुष्कळ पैसे देईल. म्हणून तो मोठ्या आनंदानें गाणें गाऊं लागला. पण तो सांगाडा जागचा हाललासुद्धां नाहीं. श्रुतवर्मा तऱ्हेतऱ्हेचे सूर काढून त्याला नाचवण्याचा प्रयत्न करीत होता. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं राजाला राग आला. तो म्हणाला—"हा असाच मोठ्या बिचाऱ्या गांवकऱ्यांना फसवीत असला पाहिजे. याचे हात-पाय कापून याला लंगडा-लुळा करून कोल्ह्या लांडग्यांसमोर टाका याला."

राजाची आज्ञा ती. राजाचे सैनिक त्याला पकडून घेऊन गेले आणि त्याचे हात पाय कापून त्याला रानांत सोडून आले.

इतकी गोष्ट सांगून वेताळ थांबला व म्हणाला—"राजा, मेल्यानंतर सुद्धां ज्या मित्रानें श्रुतवर्माची एवढी मदत केली तो राजासमोरच कां नाहीं नाचला? कीं राजाला पाहतांच तो सांगाडा घाबरून गेला? अशी एकाएकीं त्यांतील ती शक्ति नाहींशी होण्याचें कारण काय असावें? तूं माहिती असूनहि उत्तर दिलें नाहींस तर तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायाशीं पडतील."

विक्रमार्क म्हणाला—"सांगाडा जो नाचला तें कांहीं उपकार बुद्धीनें नव्हे. धन मिळवून देऊन मित्राला सुख द्यावें, हा मुळींच त्याचा हेतू नव्हता. केवळ सूड घेण्याच्या बुद्धीनेंच तो नाचत होता. त्याला आपल्या खुनाचा सूड उगवावयाचा होता. आणि त्या साठींच तो राजाच्यासमोर नाचला नाहीं. आपण नाचलों नाहीं म्हणजे राजाला राग येईल. तो श्रुतवर्माला खोटा व फसव्या ठरवील आणि शेवटीं त्याला मृत्यू दंड देईल. ही गोष्ट त्याला पक्की माहीत होती. आणि त्याच्या कल्पनेप्रमाणें खरो-खरच त्याचा हेतु साध्य झाला."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग झालें आणि वेताळ त्याच्या खांद्यावरून नाहींसा होऊन झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.

[ कल्पित ]





# चोरी

एका गांवांत भीमराव नांवाचा एक वाणी राहात असे. तो व्यापार करून आपला उदरनिर्वाह करीत असे. त्याला एक मुलगी होती. त्यानें तिच्यासाठीं एक योग्य स्थळ पाहालें. लग्न ठरलें. मुहूर्त ठरला. लग्नाच्या तयारीला सुरवात होणार होती. त्यापूर्वीं भीमरावानें आपल्याजवळ असलेल्या पैशा अडक्याचा हिशेब लाविला. तेव्हां त्याला समजलें कीं लग्नासाठीं पुरेसा पैसा त्याच्याजवळ नाहीं. तो काळजींत पडला. आतां आयत्या वेळीं पैसा कोठून आण-णार ! तेवढ्यांत त्याला आठवण झाली कीं त्यांच्या घरांत एक जुना हिरा आहे. तो विकण्याचें त्यानें ठरविलें.

तो हिरा घेऊन राजाकडे गेला व आपला हिरा दाखवून त्याची जी किंमत असेल ती देण्यास विनंति केली. राजानें रत्न पारख्यांना बोलावून त्याची किंमत ठरविली. तो हिरा खरा आणि उत्तम असल्यानें त्याची किंमत एक लाख आणि वर कांहीं हजार झाली.

ठरलेल्या किंमतींत राजा तो हिरा विकत घेण्यास तयार झाला. पण भीमरावांनीं तेव्हांच्या तेव्हां त्याची सर्व किंमत घेतली नाहीं. गरजेपुरेसा पैसा घेऊन बाकी हप्त्यानें घेण्याचें ठरविलें.

राजाकडून पैसे घेऊन परत येत असतां त्याला वाटलें कीं कन्यादानाबरोबर जांव-याला आपण एक गाय पण दान करावी. म्हणून एक गाय विकत घेऊन त्यानें तिचें दावें आपल्या घोड्याच्या शेपटीला बांधलें व आपण घोड्यावर बसून हळूं हळूं जाऊं लागला. गाईच्या गळ्यांतील घंटा वाजत असल्यानें तो निश्चित होता.

वाटेंत एका टेकडीवरून जात असतां घंटेचा आवाज बदलल्यासारखें त्याला वाटलें. म्हणून त्यानें मागें वळून पाहिलें तर घोड्याच्या शेपटीला बांधलेली घंटा वाजत असलेली त्याला दिसली. त्यानें चारीबाजूस नजर टाकून पाहिलें. पण त्याला गाय कांहीं दिसली नाहीं. शेवटीं स्वत:च्या भाग्याला दोष देत देत तो वाट चालूं लागला.

चंड नांवाच्या एका अट्टल चोरानें भीम-रावाची गाय चोरून नेली होती. चंडनें भीमरावाला गाय विकत घेतांना पाहिलें होतें. त्याच वेळीं त्याच्याजवळ असलेले पैसेहि त्यानें पाहिले होते. त्याच्या मनांतून तेव्हांच गाईबरोबर घोडा आणि पैसे सुद्धां चोरावयाचे होते. परंतु एकट्यानें तें जमण्यासारखें नसल्यानें त्यानें फक्त गाय चोरून नेली आणि बाकीचें काम आपल्या मुलाला सोंपविलें.

चंडचा मुलगा प्रचंड नदी काठीं एका दगडाजवळ बसला होता. भीमरावाचा घोडा जवळ येतांच तो घाईघाईनें उठला व पाय घसरून नदींत पडल्याप्रमाणें उडी मारून



जोरानें किंचाळला. भीमरावाला वाटलें कोणी वाटसरू पाण्यांत पडला आहे. म्हणून तो घोड्यावरून उतरला. आपले कपडे व सर्व सामान एका पंचांत बांधून घोड्या शेजारीं ठेविलें आणि त्या बुडणाऱ्या माण-साला काढण्यासाठीं पाण्यांत उडी मारली.

पाण्यांत त्याचा पाय एका दोरींत अडकला. त्यांतून सुटण्यासाठीं तो धडपडूं लागला. तेवढ्यांत प्रचंड पोहोत पोहोत किनाऱ्यावर आला आणि त्या दोरीचें टोक बांधून ठेवलेला घोडा त्यानें पाण्यांत ढकलून दिला. त्या दगडावरोबर भीमराव आंत

श्री. व. रा. सोनार

ओढला जाऊं लागला. पण सुदैवानें कमरेला एक चाकू होता. तो काढून तो दोरी तोडून कसा तरी किनाऱ्याला लागला. एवढ्या वेळांत प्रचंडनें घोडा व सर्व सामान लांबविलें. तें पाहून भीमराम बेशुद्ध होऊन पडला.

कपडे गेले, पैसे गेले, घोडा गेला सर्व कांहीं गेलें. आतां घरीं कसें जावें अंगभर वस्त्रहि नसल्यानें इतके दूर चालून घरीं जाणें त्याला शक्य नव्हतें. बिचारा अंधार पडेपर्यंत तेथेंच बसून राहिला.

काळोख पडूं लागला. लाकूडतोडे जंगलांतून लाकडें घेऊन परतूं लागले होते. त्यांनीं भीमरावाला पाहिलें, त्याची सर्व माहिती काढून घेतली व त्याला कपडे देऊन आपल्या घरीं घेऊन गेले.

रात्रभर भीमराव त्यांच्या घरीं राहिला व सकाळीं उठून राजाकडे गेला. आपली रडकथा सांगून त्यानें राजाजवळ थोडेसे पैसे मागितले.

"पैसे मिळतील हो. परंतु चोराचा शोध तरी लागायला पाहिजे ना? तोंपर्यंत रहा येथें दोन चार दिवस." राजाच्या मंत्र्यानें भीमरावाला सांगितलें व त्याची राहाण्याची व्यवस्था केली.



राजानें दुसरे दिवशीं राज्यांत दवंडी पिटली कीं राजा कपिला गाईचें दान करणार आहे. योग्य किंमत दिली जाईल.

चंडच्या बायकोला आपल्या नवऱ्याचा व मुलाचा चोरीचा धंदा आवडत नव्हता. म्हणून ते तिला चोरी करून आणलेली प्रत्येक वस्तु विकत घेतल्याचें सांगत असत. चंडनें त्या गाईची किंमत पन्नास रुपये सांगितली होती. राजाकडे खात्रीनें जास्त किंमत मिळेल. म्हणून ती राजाकडे गेली.

तेथें पुष्कळ गाई आल्या होत्या. त्यांत भीमरावानें आपली गाय ओळखली व मंत्र्याला सांगितलें. मंत्र्यानें त्या बाईला विचारलें कीं ती गाय तिच्याकडे केव्हांपासून न आहे? किती वेतें झालीं? वगैरे वगैरे.

"आम्ही ही कालच विकत घेतली. काल गुरांच्या बाजरांत पन्नास रुपयाला माझ्या धन्यानें विकत घेतली. घाईघाईनें आणून अंगणांत बांधली. मी विचारलेंच म्हणून किंमत तेवढी सांगितली आणि गडबडीनें कोठें तरी निघून गेले."

"ठीक आहे. तूं घरीं जा आणि तुझे यजमान आले म्हणजे त्यांना ह्या शिपायांच्या



बरोबर पाठवून दे. त्याच्या जवळच पैसे देतो." असें सांगून मंत्र्यानें चार शिपायांना तिच्याबरोबर पाठवून दिलें.

चंड गाईला बांधून बाहेर गेला तो प्रचंडाची मदत करण्यासाठीं. पण प्रचंड जेथें नदीकांठीं बसला होता तेथें तो चंडला भेटला नाहीं. त्यानें त्याला जवळपास बरेंच शोधलें. परंतु तो कोठें भेटला नाहीं. शेवटीं येईल तो स्वतःच असा विचार करून चंड घरीं परतला. त्याच वेळीं त्याची बायको शिपायांच्याबरोबर आली होती. शिपायांनीं चंडला पकडून राजाकडे नेलें.

प्रचंड वास्तविक चंडला भेटायचा. पण त्याला घोड्यानें धोका दिला. घोडा मुकें जनावर असलें तरी प्रामाणिक. आपल्या मालकाचें सामान घेऊन दुसराच कोणी स्वार होऊन बसलेला पाहून तो प्रचंडला पाठीवर घेऊन निघाला तो सरळ भीमरावाच्या घरीं येऊन थांबला. घोड्याला थापा टाकीत आलेला पाहून आणि त्या स्वाराजवळ भीमरावाची थैली, सामान आणि कपडे पाहून घरवाल्यांना स्वाराचा संशय आला. त्यांनीं त्याला पकडून राजाकडे नेलें.

इकडून चंडला व तिकडून प्रचंडाला शिपाई घेऊन आले. दोघेहि मुद्देमालासह पकडले गेले असल्यानें न्याय निवाड्याची गरज नव्हतीच.

अशा तऱ्हेनें मंत्र्याच्या चातुर्यामुळें आणि घोड्याच्या प्रामाणिकपणामुळें अट्टल चोर पितापुत्र एकाच वेळीं पकडले गेले.

अर्थातच भीमरावाचें सर्व सामान व पैसे त्याला परत मिळाले. तो मंत्र्याचे आभार मानून आनंदानें घरीं गेला. चोरांना मात्र चांगली शिक्षा झाली.





# सावत्र आई

एका गांवांत एक शेतकरी राहात असे.

परमेश्वराच्या कृपेनें त्याला एक मुलगा झाला. परंतु त्याची आई त्याला जन्म देऊन मरण पावली. शेतकऱ्याला फार दुःख झालें, मुलाचें संगोपन करण्यास त्याच्या घरांत कोणी नव्हतें. म्हणून त्यानें दुसरें लग्न केलें. सावत्र आई, सत्यभामा स्वभावानें फार चांगली बाई होती. तिनें आपल्या सावत्र मुलाचें संगोपन मोठ्या प्रेमानें केलें. त्यामुळें तो मुलगा सुद्धां आईशीं प्रेमानें वागे. तरी पण शेजारी पाजारी होतेच कीं चहाडी करावयाला. ते नेहमीं त्या मुलासमोर म्हणत—"कोणी कितीहि जरी प्रेम दाखविलें तरी आईची सर येणार नाहीं सुरवातीला 'श्री' विचार करी किती चांगली आहे माझी आई. मग हे लोक असें कां म्हणतात. पण पुढें असले बोल वारंवार ऐकून त्याच्या मनांतहि किल्मिष येऊं लागलें. भामाला आपलें स्वतःचें अपत्य नव्हतें. तिची सर्व माया श्रीच्या ठिकाणींच होती. तरी तो जेव्हां तिच्या बोलण्याचा गैर अर्थ करी तेव्हां तिला फार वाईट वाटे.

कांहीं वर्षें लोटलीं. पुढें शेतकरी आजारी पडला व मरून गेला. आतां तर शेजाऱ्यांना चांगलेंच फावलें. ते म्हणत—" जन्मापासूनच सावत्र आईचा छळ. बाप होता कांहीं तरी कोडकौतुक करीत, आतां हाल आहेत मुलाचे."

रोज रोज शेजाऱ्यांची असलीं बोलणीं ऐकलीं आणि आई एकाद्या चुकीबद्दल रागे भरली म्हणजे श्रीला वाटे, लोक म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. पण जेव्हां ती प्रेमानें



कुरवाळी, पाठीवर हात फिरवी, कौतुक करी तेव्हां वाटे सर्व जण उगाच आपल्या आईला नांवें ठेवीत आहेत.

"वाटतें आहे तुला तसें. जसजसा मोठा होशील तसतसें कळेल. आम्ही आपलें सांगायचें तें सांगितलें आहे, बाबारे, संभाळून रहा." शेजाऱ्यांची नेहमीं अशाच तऱ्हेची बोलणीं ऐकूं येत. ह्यामुळें त्यालाहि वाटूं लागलें कीं खरोखरीच आपली आई दुष्ट आहे. आपल्याला छळते आहे.

शेजाऱ्यांची बोलणीं ऐकून श्री विचित्र वागूं लागलेला पाहून भामाला फार वाईट वाटे. ती बिचारी त्याच्या कल्याणासाठीं परमेश्वराची रोज प्रार्थना करी.

रोज संध्याकाळीं सांजवात लावल्यावर भामा देवापुढें हात जोडून उभी राही आणि तोंडानें कांहीं तरी गुणगुणे. एके दिवशीं ती काय म्हणते आहे तें ऐकण्या-साठीं श्री तेथें तिच्याजवळच बसून राहिला. नित्याप्रमाणें भामानें सांजवात लावली आणि हात जोडून डोळे मिटून देवासमोर उभी राहिली. नंतर म्हणाली "परमेश्वरा, माझ्या श्रीला मुंगीप्रमाणें कर, बाईसारखें कर, त्याला नियमित भूक लागू दे, दोरी व मडक्याचे गुण त्याच्यांत येऊं देत." नंतर तिनें डोकें टेकून देवाला नमस्कार केला.

भामाची प्रार्थना ऐकून श्रीला राग आला. आई माझ्याविषयीं असें काय म्हणत आहे? ह्यांत कांहींतरी तिचा वाईट हेतूच असणार. हो, मुंगीप्रमाणें म्हणजे चुटकी सरशी चुरडण्या सारखें. बायकाप्रमाणें म्हणजे अबला, पराव-लंबी, भुकेनें पीडित म्हणजे भिकारी. दोरी-प्रमाणें म्हणजे गुरांना बांधण्यापलीकडे तिचा काय उपयोग आहे? आणि मडकें म्हणजे जरा धक्का लागला कीं फुटणारें. म्हणजे माझ्या सावत्र आईचें माझ्यावर ही असलीच कृपा मागण्याएवढें प्रेम आहे. असा विचार मनांत येतांच तो उठला आणि मुकाट्यानें घराच्या बाहेर निघून गेला.

तो कोठें चालला होता त्याचें त्यालाच भान नव्हतें. भूक लागली म्हणजे कोणाच्या दाराशीं भीक मागायची आणि झोंप आली कीं कोठें तरी पारावर झाडाखालीं दगडावर झोपायचें. एकदां सूर्यास्ताच्या वेळीं तो एका जंगलांत जाऊन पोहोंचला. तेथें एका झाडाखालीं एक हत्ती मरून पडलेला दिसला. त्याला बऱ्याच मुंग्या लागलेल्या दिसल्या. त्या मुंग्यांची ती गंमत पाहात तो तेथेंच झाडाजवळ एका दगडावर बसला. थोड्या वेळानें झोंप आली म्हणून तेथेंच तो आडवा झाला.

त्यानें सकाळीं उठून पाहिलें तों त्याला हत्तीची सोंड थोडी सरकल्यासारखी दिसली. त्यानें लक्षपूर्वक पाहिलें, मुंग्या आपली सर्व शक्ति एकवटून चिकाटीनें सतत कष्ट करून त्याला ओढून नेण्याचा प्रयत्न करीत होत्या. त्याला मुंग्यांचें कौतुक वाटलें.

दिवसभर चालत राहून संध्याकाळीं श्री एका झोपडीजवळ आला. तो बाहेरच्या ओट्यावर बसला. त्या घरांत दुखणेकरी





बाप आपल्या दोन लहान मुलांची समजूत घालीत असलेला त्यानें पाहिला.

थोड्या वेळानें मुलांची आई आली. तिनें मुलांना कुरवाळलें व म्हणाली—“ किती लवकर यावें म्हटलें तरी कामेंच संपत नाहींत. एक एक वाढतच जातें मजुरी घेऊन पीठ मीठ घेऊन येईपर्यंत ही वेळ आली.” असें म्हणत ती स्वयंपाकाला लागली.

मुलें गोंधळ करीत होती तरी त्यांना गोडगोड बोलून “ झाली हं भाकरी. बघ कशी फुगली ” असें म्हणत काम करीत होती. नंतर तिनें मुलांना जेऊं घातलें. नवऱ्याला वाढलें. त्यांना अंथरून पांघरूण करून दिलें व आपण जेवायला बसली. “ अग हो, बाहेर एक कोणी मुलगा बसला आहे. त्याची चौकशी केलीस का ?”

“ करतें हं !” म्हणून दिवा घेऊन ती बाहेर आली. म्हणाली—“ कोण रे तूं ? कोठून आलास ? कांहीं खालेंस का नाहीं ? चटणी भाकरी देते ती खा. घोटभर पाणी पी आणि मग नीज.”

“ तुम्हीं जेवा आई. मला नको.” तो म्हणाला.

“ उपाशी झोपलास तर झोप येणार नाहीं. लाजूं नकोस. दोन घास खा आणि नीज.” बाई म्हणाली.

श्रीनें मुकाट्यानें भाकरी खाली व पाणी प्यायला. पोट भरल्यावर त्याला बरें वाटलें. दुसऱ्या दिवशीं ती बाई म्हणाली—“ मी जेथें काम करते तेथें लग्न आहे. चार दिवस गोडधोड मिळेल. रहा तोंपर्यंत येथेंच. मग जा कोठें जायचें तेथें.” त्या बाईचा प्रेमळ-स्वभाव व औदार्य पाहून त्याला आपल्या आईची आठवण झाली.

चार दिवस खूप खाल्यानें श्रीला अपचन झालें. तो त्या बाईला म्हणाला—





“ आज मला जेवायचें नाहीं. आज प्रकृति बरी नाहीं. पोट जड झालें आहे.”

“ कां रे ! प्रकृतीला संभाळ बरं, तुम्हां मुलांना चांगली कडकडून भूक लागली पाहिजे. चांगली भूक लागणें चांगल्या प्रकृतीचें लक्षण आहे.” ती बाई म्हणाली.

श्रीला आपल्या आईची आठवण झाली. तीहि रोज हात जोडून देवाजवळ प्रार्थना-करीत असे कीं श्रीला नेहमीं चांगली भूक लागूं दे ! म्हणजे प्रकृति नेहमीं उत्तम असूं दे हाच अर्थ.

ह्या बाईच्या प्रत्येक व्यवहारांत त्याला त्याच्या आईचें साम्य भासत होतें. त्यानें तिला तें सर्व सांगितलें. म्हणाला—“ बाई, तुम्ही हें जें मला सांगितलेंत त्यासाठीं माझी आई रोज देवाजवळ प्रार्थना करीत असे. मला वाटलें ती माझ्याशीं दुष्टावा करते आहे. म्हणून मी तिला सांगितल्या शिवाय घर सोडून आलों.”

“ वेडा आहेस झालं. इतकी मायेची तुझी आई. तिला सोडून तूं पळून आलास ? जा आत्तांच्या आत्तां घरीं जाऊन तिची क्षमा माग. तुझ्या काळजीनें ती रात्रीचे दिवस करीत असली पाहिजे. बाबा, तुला इतकीं वर्षें आईजवळ राहून तिचें हृदय कसें समजलें नाहीं ? तूं निघून गेल्यामुळें तिच्या हृदयांत किती वेदना होत असतील. जा, तूं अगोदर घरीं जा.”

श्री उठला आणि तडक घरीं आला. तो घरीं पोहोंचला त्या वेळीं मध्यरात्र होती. कोणी चोर घराची भिंत फोडून आंत शिरत होता. तोहि त्याच भोंकांतून आंत गेला व त्यानें चोराला पकडलें, आणि ओरडला—“ आई ! मी श्रीकांत आलों आई ! अगोदर दिवा लाव. बघ मी चोराला पकडलें आहे.”

भीमानें दिवा लावला व एक दोरीचा तुकडा त्याला दिला. त्यानें चोराचे हात बांधले व शेजाऱ्यांच्या मदतीनें पोलिसांच्या स्वाधीन केलें.

भीमानें गद्गद होऊन आपल्या मुलाला विचारलें—" असें सांगितल्याशिवाय कुठें गेला होतास ?"

श्रीकांतनें सर्व हकीगत सविस्तर सांगितली आणि म्हणाला—" आई, तूं देवाजवळ माझ्याविषयीं प्रार्थना करतेस कीं मुंगी होऊं दे, बाई होऊं दे, दोरी होऊं दे, मडकें होऊं दे, त्यांतील मुंग्यांच्या शक्तीचें, बाईच्या मनाचें आणि दोरीचें महत्व मला कळलें. त्यांच्यांत असलेलें सामर्थ्य माझ्या लक्षांत आलें. असे असून अजून मडक्याचें वैशिष्ट्य मात्र मला कळलें नाहीं."

" बाळा, मातीचें भांडें ओबड धोबड असलें तरी ते तऱ्हेतऱ्हेच्या कामाला उपयोगी पडतें. सोन्या चांदीच्या, तांब्या-पितळेच्या भांड्यांपेक्षां त्याचा उपयोग जास्त होतो. त्यांत ठेविलेली वस्तु नासत नाहीं, आंबत नाहीं, कळकत नाहीं. त्याची किंमत कमी असल्यानें गोरगरिबांना तें सहज विकत घेतां येतें. त्या लोकांचा सर्व संसारच त्या भांड्यावर चालतो. दिसायला ती वस्तु क्षुल्लक वाटली तरी ती फार चांगली आणि उपयोगी आहे."

श्रीच्या मनावर आईच्या ह्या सांगण्याचा चांगला परिणाम झाला. आई बद्दलचा त्याचा आदरच वाढला. आपली आई फार चांगली आहे ह्याची त्याला खात्री वाटली. त्यानें आईचे पाय धरून क्षमा मागितली व अविचार न करण्याचा निश्चय केला.





# भय कशाशीं खातात ?

एका गांवीं एक घरंदाज गृहस्थ रहात असत. त्यांना एक मुलगा होता. त्याचें नांव गुणवंत होतें. अगदीं लहानपणापासूनच तो खोडकर होता. म्हणून त्याला लोक गुणवंत या नांवाऐवजीं गुंडवंत म्हणूं लागले त्याच नांवानें सर्व त्याला ओळखूं लागले.

सुरवातीला तो कुत्र्या-मांजरांबरोबर खेळत असे व पुढें गाई-गुरें व घोडे यांच्या-बरोबर खेळूं लागला. त्याला कशाची भीति म्हणून नव्हती. म्हणून त्याला वळण लावणें त्याच्या आईवडिलांना कठिण वाटूं लागलें. बापानें त्याला एका गुरूकडे नेऊन ठेवायचें ठरविलें व गुरूला जाऊन म्हणाला—" याचें लक्ष विद्याभ्यासाकडे लागेल व कामधंदा शिकून हा मार्गाला लागेल असें कांहीं तरी करा. मागाल ती गुरुदक्षिणा मी देईन."

गुरूनें शिष्याचें लक्ष विद्याभ्यासाकडे लागावें म्हणून पुष्कळ यत्न करून पाहिला. पण त्याला त्यांत यश आलें नाहीं. चिडून जाऊन गुरू शिष्याला म्हणाला—" तुला भय ही वस्तु माहीतच नाहीं असें दिसतें !"

" भय कशाशीं खातात, गुरुवर्य ?" शिष्यानें विचारलें. गुरूनें त्याचें कांहींच उत्तर दिलें नाहीं व रात्रीं काळोखांत घोंगडीखालीं तोंड झांकून ओरडत शिष्य झोपला होता तेथें आला. गुंडवंत जागा झाला व ओरडणाऱ्या त्या काळ्या वस्तूकडे पाहून म्हणाला—" कोण तूं ?"

" भूत आहें, भूत ! तुला खायला आलों आहें !" गुरु म्हणाला.

" सर्व भूत म्हणतात तें कसें असतें हें आज दिसलें, मला. पण काय ? तुला तोंड



देखील नाहीं. मग तूं मला कसा काय खाणार?'' गुंडवंतानें विचारलें.

गुरु चकितच झाला व पुढें कांहीं बोलला नाहीं. पण गुंडवंत म्हणाला—"थांब, मी आपल्या गुरुवर्यांना जागा करतों. ते तुला खायला घालतील आणि मग आपण दोघे खूप खेळूं." असें सांगून गुंडवंत जवळ येऊं लागला. भुताचें सोंग करून आलेले गुरुवर्य धावूं लागले व काळोखांत एका जागीं ठेच लागून पडले. गुंडवंतानें जवळ जाऊन गुरूला ओळखलें व म्हणाला—"तुम्हींच का? तर मग हा गमतीचा खेळ आहे. उद्यांपासून रोज असा कांहीं तरी नवा खेळ खेळूं या गुरुवर!''

दुसऱ्या दिवशीं गुरूनें गुंडवंताला त्याच्या घरीं पोंचता केलें व त्याच्या बापाला जाऊन म्हणाला—"तुमच्या चिरंजीवांना भीति भय म्हणून कोणाचें नाहीं. याला विद्याभ्यास कसा काय येणार?''

बापानें मुलाला वाटखर्चापुरेसे पैसे दिले आणि म्हणाला—"बाळ! आतां तूं स्वतःच कोठें तरी जाऊन कामधंदा शिकून पोटा-पुरते पैसे मिळव.''

गुंडवंत कामधंदा शिकण्यासाठीं परगांवीं निघाला. वाटेंत एक रान होतें. रानांत शिकारी जात होते. एक वाघ गवताआड लपून बसलेला त्यांनीं पाहिला. पण पुढें जाऊन त्याला धरण्याची किंवा त्याला गोळी मारण्याची कोणाची छाती होईना. ते परस्परांशीं बोलत होते. प्रत्येक जण म्हणत होता—"आपण नाहीं बुवा, पुढें जात. आपल्याला भय वाटतें." गुंडवंत तें ऐकून पुढें गेला व विचारूं लागला—"भय कोठें आहे? मला तरी दाखवा!''

एका शिकाऱ्यानें त्याला सूखांत काढून एका गुहेकडे बोट दाखविलें व म्हणाला—



"त्या गुहेंत आहे!'' गुंडवंत गुहेंत शिरला. त्याला तेथें वाघाचीं पिलें दिसलीं. तो मनाशीं म्हणाला—"केवढी मोठीं मांजरें! हेंच का भय?'' तो पिलांना घेऊन गुहेबाहेर आला.

त्याचें तें साहस पाहून सर्व शिकाऱ्यांनीं तोंडांत बोटेंच घातलीं. पुढें त्यानें हें विचार-ल्यावर कीं "हेंच का भय?'' शिकारी थक्कच झाले. म्हणाले—"होय बाबा! ह्यांनाच आम्ही भय म्हणतों. पण यांचा बाप जरी समोर येऊन उभा राहिला तरी तुला मात्र त्याचें भय वाटणार नाहीं! चल राजाकडे! तो तुला या साहसाबद्दल खात्रीनें कांहीं बक्षिस देईल.''

राजानें वाघाचीं पिलें ठेवून घेतलीं व गुंडवंताला बक्षिस देऊन त्याचा सत्कार केला. सत्कार समयीं राजानें एक मेजवानी दिली तेव्हां हजर असलेल्या सरदार मानकऱ्यांना गुंडवंत म्हणाला—"मी भय कसें असतें व कशाशीं खातात हें पहात फिरत आहें. पण अजून तें मला आढळलें नाहीं.

राजाच्या एका पहलवानानें त्याला बरोबर बोलाविलें आणि म्हणाला—"चल, दाख-वितों, तें कसें असतें तें!'' तो पहेलवान गुंडवंताला आणखी एका पहेलवानाच्या घरीं घेऊन गेला. तो पहेलवान दिग्विजय मिळवून



नुकताच परत स्वदेशीं आला होता. दोघे त्याच्या घरीं पोंचले. तेव्हां तो पहेलवान आपल्या मुलीबरोबर बागेंत बोलत बसला होता. त्याच्याकडे बोट दाखवून दरबारी पहेलवान गुंडवंताला म्हणाला—"त्या पहेल-वानाच्या छातींत दोन तीन बुक्के मार! तो दाखवील तुला भय कसें असतें तें.''

गुंडवंत सरळ पुढें गेला आणि त्या दिग्विजयी पहेलवानाला म्हणाला—"जरा उभे तर रहा!'' आणि तो उभा राहल्याबरोबर गुंडवंतानें तीन बुक्के जोरानें त्याच्या छातींत मारले. तो पहेलवान बेशुद्ध होऊन जमिनीवर

पडला. शुद्धीवर आल्यावर त्यानें गुंडवंताची मानगुटी धरली व तो पिळवटणार; इतक्यांत त्याची मुलगी त्याला म्हणाली—“बाबा! त्यानें तुम्हांला बेशुद्ध केलें होते. आतां त्याच्यावर राग कां दाखवितां?”

“त्यानें कुस्तींत मला जिंकलें असतें तर मी तें कबूल केलें असतें. त्यानें नियमाविरुद्ध माझ्या छातींत बुक्के मारून मला बेशुद्ध केलें होतें.” पहेलवान म्हणाला.

“मी तुला जिंकण्याच्या हेतूनें नव्हतों आलों. भय काय असतें हें पाहाण्यासाठीं आलों होतों.” गुंडवंत म्हणाला.

“ठीक! तर मग मार आतां! छाती असेल तर!” असें पहेलवान म्हणाला आणि छाती पुढें करून उभा राहिला.

गुंडवंतानें दोन तीन बुक्के मारले त्याच्या छातींत. तो थोडादेखील भ्याला नव्हता.

पहलवानाची मुलगी मध्यें उभी राहून आपल्या बापाला म्हणाली—“बाबा! तुमचें बळ याच्या अंगांत नसेल पण निर्भयपणा अर्धा देखील तुमच्या अंगांत असेल कीं नाहीं, शंका आहे. याला विचारा तर जरा कीं हा तुमचा जांवई व्हायला तयार आहे का?”

पहेलवान हंसत म्हणाला—“असें होय!” नंतर तो गुंडवंताला म्हणाला—“माझी मुलगी दाखवील तुला भय कसें असतें तें. तिच्याशीं लग्न करायला तयार आहेस का तूं?” तो लग्नाला कबूल झाला व दोघांचें लग्न झालें. नंतर त्यानें बायकोला विचारलें—“तू मला भय कसें असतें दाखवणार होतीस ना?”

ती म्हणाली—“होय!” आणि एका डबक्यांतला एक बेडूक आणून गुंडवंतावर टाकला. गुंडवंत ओरडला—“अरे बाप रे!” त्याची बायको म्हणाली—“हेंच तें भय!”





# यक्षिणी राजकन्या

फार पूर्वी गांधार राज्यांत धनवंत नांवाचा राजा राज्य करीत होता. एकदां तो शिकारीला गेला असतां त्याला एका फुलझाडाजवळ एक सुंदर तरुणी उभी असलेली दिसली. तिच्या रूपावर तो इतका भाळला कीं त्यानें हातांतलें धनुष्यबाण टाकलें आणि आपल्या बरोबरच्या साथीदारांना परत जायला सांगून तो ती उभी होती तेथें गेला. त्यानें तिला विचारलें कीं तूं कोण व अशी एकटी उभी कां?

ती म्हणाली—“मी अप्सरा आहें. आकाशमार्गें जातांना ही वनश्री पाहून खालीं उतरलें. किती सुंदर आहे ही आणि फुलांचा वास पण कसा दरवळला आहे चहूंकडे!”

“तुला हा देश आवडला आहे तर! मग तूं येथेंच कां नाहीं रहात? तूं माझ्या अन्तःपुरांत आलीस तर माझें आयुष्य सुखी होईल.” राजा म्हणाला.

अप्सरेनें मान हलवून तें कबूल केलें. पण ती म्हणाली—“तुझ्या डोळ्यावर झांपड पडलें आहे तसें तुझ्या बुद्धीवर पण पडलें आहे. नाहीं तर माझें रूप पाहूनच तूं ओळखायला पाहिजे होतेंस कीं मी मर्त्यलोकांतील स्त्री नसून गंधर्व लोकांतील एक अप्सरा आहें. तर मग तूं खरोखरचाच आंधळा होऊन रहा!” असा शाप देऊन ती आकाश मार्गें उडून गेली.

आंधळ्या धनवंताला त्याच्या लोकांनीं परत घरीं नेलें. त्याचें अंधत्व जाऊन त्याला छान दिसूं लागावें म्हणून पुष्कळ औषधपाणी केलें. पण गुण पडला नाहीं. शापामुळें अंधत्व आलें होतें तें शापमुक्ति झाली



तरच जाणार! कोणी तरी त्या गंधर्व स्त्रीकडे जाऊन शापमुक्ति मिळवून आणल्यास तें शक्य होतें.

धनवंताला निरंजन नांवाचा एकुलता एक मुलगा होता. तो म्हणाला—"मी गंधर्व लोकांत जाऊन त्या अप्सरेला हुडकून काढीन व शापमुक्ति मिळवून बाबांचें अंधत्व दूर करीन." असें सांगून तो घरून निघाला.

गंधर्वलोक ईशान्येला आहे हें त्यानें ऐकलें होतें. म्हणून तो त्या दिशेनें निघाला व बरेच दिवस चालत राहिला. कित्येक दिवसांनीं तो अशा एका जागीं पोंचला कीं पुढें जायला वाटच नव्हती. तेथें मनुष्य-वस्ती नव्हती. खायला प्यायला देखील कांहीं मिळालें नाहीं. तो उपाशीच एका झाडाखालीं झोंपला. त्याची झोप मोडली तेव्हां त्याला कोणीतरी काळी कुरूप स्त्री फळें खायला घेऊन आलेली दिसली.

"मी यक्षिणी आहें. मी या झाडावर राहातें. कोणी या दिशेला फिरकत देखील नाहीं. तूं या झाडाखालीं येऊन झोंपलास. तू माझा अतिथि आहेस. तुझा सत्कार करण्यासाठीं मी आलें आहें. तूं इकडे कसा काय आलास?" यक्षिणीनें विचारलें.

निरंजननें तिला, तो ज्या हेतूनें आला होता तें सर्व सांगितलें व म्हणाला—"भुकेनें कासावीस होऊन झाडाखालीं पडलों होतों. मला फळें खायला देऊन माझ्यावर उपकार केले आहेस ते मी जन्मोजन्मीं विसरणार नाहीं. तूं मला गंधर्वलोकाची वाट दाखव."

"येथून गंधर्वलोकांत जायला फक्त आकाशमार्गच आहे आणि तेथें जाणें तुला अशक्य आहे!" यक्षिणी म्हणाली.

"अशक्य असो वा शक्य! मी परत फिरणार नाहीं. तूं नाहीं का मला मदत करणार?" निरंजन म्हणाला.



"मी तुला गंधर्वलोकाच्या दारापर्यंत घेऊन जायला तयार आहें. आंत नाहीं जातां यायचें मला." ती म्हणाली.

"तूं इतके उपकार केलेस तरी पुरे! मी स्वतःला तुझा आजन्म ऋणी मानून या उपकाराची फेड करण्यासाठीं आपलें सर्वस्व खर्ची घालीन." निरंजन म्हणाला.

"फक्त एकच इच्छा आहे! ती पुरी केलीस कीं या उपकाराची फेड होईल." यक्षिणी म्हणाली.

"मी तुझी ती इच्छा यथाशक्ति पुरी करण्याचा यत्न करीन." निरंजन म्हणाला.

"तुला करतां येणार नाहीं असें मी मागेनच कसें?" असें सांगून तिनें निरंजनला डोळे मिटून घ्यायला सांगितलें. त्यानें डोळे मिटल्याबरोबर तो गंधर्वलोकाच्या द्वारा-समोर जाऊन पोंचला. यक्षिणी एका ढगावर बसून राहाली. ती त्याला म्हणाली—"तूं येईपर्यंत मी येथें तुझी वाट पाहतें. मी तुला स्वदेशीं पोंचता करीन."

निरंजननें गंधर्वलोकांत प्रवेश केल्या-बरोबर गंधर्वजातीच्या स्त्रिया घोळका करून त्याच्या चारी बाजूला उभ्या राहाल्या. "किती सुंदर आहे हा तरुण! कोणी बरें



बोलाविलें असेल? कोण असेल ती भाग्यवान स्त्री?" प्रत्येकीच्या मनांत हेंच विचार येत होते. त्या विचारूं लागल्या—"कोण पाहिजे? काय पाहिजे तुला?"

"मला एका गंधर्वलोकांतील अप्सरेला भेटावयाचें आहे. तिचें नांव माहीत नाहीं मला. ती भूलोकीं आली होती व माझ्या वडिलांना शाप देऊन निघून आली. त्या शापानें माझ्या वडिलांना अंधत्व आलें." तो म्हणाला.

तें ऐकून त्या चकित होऊन परस्परांकडे पाहूं लागल्या. पण कांहीं तरी आठवल्या-



सारखें त्यांच्या चेहऱ्यावरून भासलें. गंधर्व-राजाची जेष्ठ कन्या पुष्पोत्तमेकडे त्या त्याला घेऊन गेल्या.

"तूं त्या राजाचा मुलगा आहेस होय! मीच दिला होता त्याला तो शाप! त्यानें स्वतःच्या अंतःपुराची शोभा वाढवण्यासाठीं मला बोलावून माझा अपमान केला. म्हणून मी शाप दिला." पुष्पोत्तमा म्हणाली.

"माझ्या वडिलांनीं अपमान करण्याच्या हेतूनें तें म्हटलें नव्हतें. खरोखरी तुझा आदर करण्यासाठींच ते तसें म्हणाले होते. कृपा करून तूं आपला शाप परत घे व त्यांना शापमुक्त कर." निरंजननें हात जोडून विनंति केली.

पुष्पोत्तमा त्याला एक फूल देत म्हणाली—"शाप परत घेतां येत नाहीं. पण हें फूल कोणी त्याच्या डोळ्यावर फिरविलें तर पुन्हां दृष्टि येईल. परंतु ज्यानें वचन देऊन तें मोडलें नसेल अशा माणसानेंच हें काम केलें पाहिजे. नाहीं तर आलेले डोळे पुन्हां जातील."

निरंजन तें फूल घेऊन पुष्पोत्तमेचे आभार मानून गंधर्वलोकाबाहेर आला. यक्षिणी वाट पहात उभी होतीच. तिनें त्याला क्षणार्धांत स्वदेशीं पोंचतां केलें व म्हणाली—"राजकुमार, माझ्याकडून शक्य होती ती सेवा मी केली. आतां तूं वचन दिलें होतेंस त्याप्रमाणें माझी एकच एक इच्छा पुरी कर. माझ्याशीं तूं विवाह कर."

निरंजन म्हणाला—"मी लवकर परत येईन. तोंपर्यंत तूं येथेंच वाट पहा!" असें सांगून त्यानें राजधानींत प्रवेश केला व यक्षिणी वाट पहात उभी राहाली.

निरंजननें गंधर्वलोकांतून आणलेलें फूल आपल्या वडिलांच्या डोळ्यावर फिरविलें. त्याबरोबर धनवंताला दृष्टि आली. यक्षिणीला दिलेल्या वचनाची गोष्ट सांगून निरंजन म्हणाला—"मी तिच्याशीं लग्न करणार."

"बाळ, तें शक्य नाहीं. वचन दिलें म्हणून काय झालें. असलीं वचनें पाळण्याची गरज काय?" राजानें सल्ला दिला.

"पण, मी दिलेलें वचन मोडलें तर तुम्हांला पुन्हां अंधत्व येईल!" निरंजन म्हणाला.

"तुझें एका यक्षिणीशी लग्न करून देण्या ऐवजीं मी आंधळा राहालों म्हणून काय बिघडलें!" राजा म्हणाला.

निरंजननें त्यावर कांहींच उत्तर दिलें नाहीं. पण गुप्तपणें तो यक्षिणी उभी होती तेथें आला आणि म्हणाला—"मी तुझ्याशीं लग्न करण्यासाठीं आलों आहे. पण एक विनंति आहे. तूं अदृश्यरूपें राजवाड्यांत प्रवेश कर! तुला पाहून सर्व भिऊन जातील."

"पाणिग्रहण झाल्यावर तूं सांगशील तशी रहायला मी तयार आहें." यक्षिणी म्हणाली. निरंजननें तिच्याशीं विधिवत लग्न केलें. पाणिग्रहण केल्याबरोबर यक्षिणीच्या जागीं एक सुंदर राजकन्या पाहून त्याला आश्चर्य वाटलें. ती म्हणाली—"मी वत्स-देशाची राजकन्या आहें. माझें नांव सुगंधा. एकदां एक म्हातारा योगी आमच्या घरीं आला. माझ्या वडिलांनीं त्याच्या सेवेसाठीं मला नेमलें. त्यानें माझ्याशीं लग्न करण्याची इच्छा दर्शविली. मला आवडलें नाहीं. त्यावर त्या योग्यानें मला एक यक्षिणी करून टाकलें. पण माझ्या वडिलांच्या विनंतीला मान देऊन मला शापमुक्त होण्यास उपाय सांगितला. माझें हें भयंकर रूप पाहूनहेखील कोणी माझें पाणिग्रहण करील तर मला पूर्वरूप मिळेल. तो सुदिन आज उजाडला."





# शाहीरचें चातुर्य

एका गांवीं बाळकृष्ण भट नांवाचा एक शाहीर रहात असे. तो फार चतुर व हुशार होता. गांवांत कोठें मंगलकार्य असलें कीं तो त्या घरीं जाई व त्या घरच्या थोरा मोठ्यांचें कीर्ति-स्तवन करून ते करतील त्या दानावर उदरनिर्वाह करी.

गांवांतले सर्व लोक त्याला बक्षिस व इनाम देत. देत नव्हता काय तो गांवचा पाटील. पाटलाच्या घरीं मंगलकार्य असलें कीं तो बिनचूक त्यांच्या घरीं जाई व पाटलाच्या घराण्याचें स्तवन करून पोवाडे म्हणे. प्रत्येक वेळीं पाटील म्हणे–"काय हो तुमचा खडा आवाज आणि काय पण तुमच्या गाण्याचा रागरंग! तुम्हांला भलें मोठें इनाम मिळालें पाहिजे. पुढल्या मंगल-कार्याला आलें पाहिजे बरं का!" अनेक मंगलकार्यें झालीं, पण बाळकृष्ण भटाला कोरेंच परतावें लागलें.

पुढें एकदां पाटलाच्या मुलीचें लग्न ठरलें. बाळकृष्ण भटाला कळलें. काय वाटेल तें झालें तरी या खेपेस भलें मोठें इनाम मिळाल्याशिवाय घरीं परतायचेंच नाहीं. या खेपेस पाटलाकडून एक चांगली दुभती गाय मागून घ्यायचें बाळकृष्ण भटानें मनाशीं ठरविलें.

तो ठरल्या दिवशीं पाटलाच्या घरीं लग्नाच्या मांडवासमोर जाऊन उभा राहिला. त्यानें पाटलाची फार स्तुति करून कांहीं गीतें म्हटलीं व वरवधूला आशीर्वाद देऊन कांहीं पदें म्हटली. नंतर हात जोडून उभा राहून पाटलाला म्हणाला–"यजमान! या खेपेस मोठें इनाम मिळालें पाहिजे!"

श्री. ल. दा. महाजन

पाटील व्याह्यांच्यासमोर "नाहीं" कसें म्हणणार? म्हणाला–"माग, तुला जें हवें तें!"

"मी गरीब आहें. माझें फार मोठें कुटुंब आहे. मुलें बाळें पण पुष्कळ आहेत. एक दुभती गाय मिळाली तर आपलें नांव काढून मुलें दूध पितील." शाहीर म्हणाला.

पाटलानें एका नोकराला बोलावून कांहीं तरी त्याच्या कानांत सांगितलें.

नोकर गोठ्यांत गेला, एक म्हातारी गाय आणून समोर उभी केली. ती पाहून शाहीर काय म्हणतो, सर्व उत्सुकतेनें पाहूं लागले.

ती गाय पाहून शाहीर बोलायला मागें पुढें करूं लागला. त्या गाईला घेऊन जाणें फुकट होतें. कारण ती निरुपयोगी होती न घ्यावें तर पाटलाचा अपमान केल्यासारखें होणार. म्हणून खूप विचार करून त्यानें एक युक्ति केली.

तो गाईजवळ गेला आणि तिच्या काना-जवळ जाऊन कांहीं तरी पुटपुटला. नंतर स्वतःचा कान गाईच्या तोंडाजवळ नेऊन डोकें हलवून असें भासवूं लागला कीं गाय कांहीं तरीं त्याला सांगत आहे व तो ऐकत आहे. तें पाहून सर्व चकित झाले. कांहीं



लोक हंसूं लागले. कांहीं खाणाखुणा करून कांहीं तरी बोलूं लागले. कीं शाहीर हे काय करीत आहे.

पाटिलानें थट्टेनें हंसत त्याला विचारलें—"काय रे गाईशीं कसल्या कान गोष्टी चालल्या आहेत ?"

शाहीर म्हणाला—"कांहीं नाहीं यज-मान! मी गाईला विचारीत होतों, तिला पाडा होईल कीं पाडी ?"

"काय म्हणाली ती ?" पाटलानें थट्टेच्या सुरांत विचारलें.

"ती म्हणाली—"मी सत्ययुगांत महिषा-सुराकडे होतें. महिषासुराचा वध जगन्माता दुर्गेनें केला. सत्ययुग संपलें. त्रेतायुग आला. रावण जन्मला. रामानें त्याचा वध केला. हें सर्व मी स्वतःच्या डोळ्या देखत घडत असलेलें पाहिलें. द्वापरयुगांत त्या बाल-कृष्णानें गोकुळांतल्या इतर सर्व गाईंबरोबर मला देखील वृंदावनांत चरायला नेलें होतें. आतां कलियुग चालू आहे व संपतहि आला आहे. माझें मन विटलें आहे या संसार सुखाला! आणि तूं विचारतोस तुला पाडा होणार कीं पाडी. लाज नाहीं वाटत तुला ? मला बासरूं झालें तर लोक हंसणार नाहींत का ?" तें उत्तर ऐकून सर्व उपस्थित लोक खदखदां हंसूं लागले. पाटलाची मान खालीं झाली.

पाटील नोकरावर खवळून मोठ्यानें ओरडले—"तुला चांगली दुभती गाय आणायला सांगितलें आणि ही कसली गाय आणलीस तूं ? जा, एक चांगली गाय घेऊन ये !"

चांगली गाय मिळाल्यावर शाहीर आनंदानें घरीं परतला.





# परोपकारी गोपाळ

गोपाळच्या मुलाला सातवां महिना लागला.

एकदां लक्ष्मीनें आपल्या मुलाला न्हाऊं घालून ओट्यावर ठेवलें व त्याचे कपडे धुऊन वाळत घालावे म्हणून घरांत गेली. नेमका त्याच वेळीं मुलाला एक सांप चावला. मुलगा ओरडला तेव्हां लक्ष्मी धांवत आली. मुलगा निश्चेष्ट पडला होता.

विंचू, सांप वगैरे त्या प्रदेशांत फार होते. अर्थातच विंचवा सांपाचें विष उतर-विणारे पण जवळ पास पुष्कळ लोक होते. एक मांत्रिक गांवाबाहेर एका आश्रमांत रहात असे. त्याच्या आश्रमाचें नांव नागाश्रम असें होतें. गोपाळ लक्ष्मीला व मुलाला एका गाडींत घेऊन त्या आश्रमाकडे निघाला.

वाटेंत एक बाई एका मुलाला घेऊन चालत असलेली त्यांना दिसली. तिच्या मुलाला पण सांप चावला होता व तीदेखील नागाश्रमाकडे चालली होती. गोपाळला तें सर्व कळलें. त्यानें तिला गाडींत घेतलें व पुढें निघाला.

नागाश्रमांत लोकांची पुष्कळ गर्दी होती. कोणी विंचू चावला म्हणून व कोणी सर्पदंश झाला म्हणून व कोणी भूतबाधा आहे म्हणून आला व प्रत्येकाबरोबर एक दोघे मदतीला म्हणून आले होते. आश्रमांतला नोकर एका मागून एक एकेकाला आंत पाठवीत होता. उशीर होऊं नये म्हणून गोपाळ नोकराला म्हणाला—"माझ्या मुलाला जरा वरचा नंबर मिळेल का ?" नोकर गोपाळला ओळखत होता. लक्ष्मी मुलाला गाडींतच ठेवून गोपाळ नोकराशीं जें बोलत होता तें ऐकायला गेली. त्या अपरिचित बाईनें विचार केला गोपाळला

वरचा नंबर मिळाला म्हणजे त्याचा मुलगा लवकर जिवंत होईल व आपली पाळी येई-पर्यंत बराच वेळ जाईल व आपला मुलगा मरून जाईल. म्हणून स्वार्थबुद्धीनें तिनें मुलांची अदलाबदल केली. स्वतःच्या मुलाला लक्ष्मीच्या मुलाच्या जागीं त्याच्या दुपट्यांत गुंडाळून ठेवलें व लक्ष्मीच्या मुलाला उचलून स्वत:जवळ घेऊन बसली.

तिच्या मनासारखेंच सर्व घडलें. आंतून लोक बाहेर आल्याबरोबर नोकरानें गोपाळला मुलाला घेऊन यायला सांगितलें. लक्ष्मी धांवत धांवत गाडीजवळ गेली व नीट पाहिल्याशिवाय दुपट्यांत गुंडाळून ठेवलेल्या त्या बाईच्या मुलाला आपला मुलगा समजून उचलून घेऊन आली.

मांत्रिकानें मुलाला काय झालें आहे म्हणून विचारलें. गोपाळ म्हणाला–"सकाळीं आंघोळ झाल्यावर मुलाला सर्पदंश झाला. मांत्रिकानें मुलाचें जन्म-नक्षत्र, नांव, मुलाच्या बापाचें नांव वगैरे विचारून घेऊन मंत्र म्हटला व म्हणाला–"जा आतां तुम्ही!"

दोघं बाहेर आल्याबरोबर ती बाई ओरडत आली व म्हणाली–"अहो बाई घाईघाईत तुम्ही माझ्या मुलाला उचलून



नेलात. चूक झाली पहा. पाहूं तर मंत्रानें गुण पडला कीं नाहीं? माझा मुलगा जिवंत झाला का?"

तें ऐकून लक्ष्मी घाबरून गेली. गोपाळनें विचार केला आणि म्हणाला–"होतें असें घाईघाईत, होय मांत्रिकानें मंत्र म्हटला होता. तुझ्या मुलाला आतां कसलीच भीति नाहीं. असें सांगून त्यानें तिचा मुलगा तिच्या हातांत दिला.

त्या बाईच्या कपड्यांत आपल्या मुलाला व आपल्या कपड्यांत तिच्या मुलाला पाहून लक्ष्मीला संशय आला तिनें तसें तिला विचारलें देखील–"काय ग? तुझा मुलगा आमच्या कपड्यांत कसा काय आला व आमचा मुलगा तुझ्याजवळ कसा गेला?"

तिचें उत्तर देण्याऐवजीं ती बाई म्हणाली–"लवकर आपल्या मुलाला आंत घेऊन जाऊन मंत्र करवून घ्या!" जणुंकांहीं तिला त्यांच्या मुलाची जास्त काळजी होती.

"आण तें दुपटें....!" असें म्हणत लक्ष्मीनें त्या बाईच्या मुलाच्या अंगावरचें दुपटें काढून घेतलें व आपल्या मुलाला उचलून घेतलें. पण तिचा मुलगा डोळे उघडून तिच्याकडे टक लावून पाहूं व



हात पाय हलवूं लागला होता. हें पाहून तिला आश्चर्य वाटलें.

पण त्या बाईचा मुलगा मात्र तसाच निश्चेष्ट पडला होता. ती बाई घाबरून गेली व तिनें मुलाला गोपाळच्या पायावर ठेवलें आणि म्हणाली—"या अर्भकाला वांचवा! कान धरतें चूक झाली माझी! मीच स्वार्थ बुद्धीनें मुलांची अदलाबदल केली होती. मंत्रानें माझा मुलगा जिवंत झाला नाहीं. तुमचा मुलगा मंत्रानें जिवंत झाला. मी आपल्या पापकर्मामुळेंच आपल्या मुलाचा जीव घेतला. आतां तुम्ही वांचविलात तर तो वांचेल."

गोपाळ तिला म्हणाला—"घाबरूं नका बाई!" आणि नोकराला बोलावून विचारलें—"हें असें कसें काय झालें?"

नोकर म्हणाला—"ज्या मुलाचें नांव घेऊन मांत्रिक मंत्र मंत्र्योच्चार करीत असतो तोच मुलगा जिवंत होतो. मग तो मुलगा मांत्रिकासमोर असो किंवा नसो." त्या बाईला ती गोष्ट माहीत नव्हती म्हणून तिनें मुलांची अदलाबदल केली.

गोपाळच्या सांगण्यावरून नोकरानें त्या बाईला तिच्या मुलाबरोबर आंत मांत्रिकाकडे नेलें. त्यानें मंत्र म्हटल्याबरोबर मुलगा जिवंत झाला. तिनें बाहेर येऊन गोपाळचे आभार मानले. म्हणाली—"मी चूक केली ती पोटांत घालून तुम्ही माझ्या मुलाला जीवदान दिलें. तुम्ही नसतां तर मला आंत प्रवेश देखील मिळाला असता कीं नाहीं शंकाच!"

गोपाळ घरीं निघाला तेव्हां त्या बाईला देखील त्यानें गाडींत बसवून तिच्या गांवापर्यंत पोंचतें केलें. नंतर तो लक्ष्मी व मुलासह स्वतःच्या घरीं आला.





# युध्द कांड

रावणाच्या सभेंत राक्षसांनीं आपल्या शौर्याच्या व साहसाच्या फुशारक्या मारल्या कीं प्रभो, आज्ञा करावी, आम्ही जाऊन रामलक्ष्मणांना जिवंत धरून आणून आपल्यासमोर हजर करतों. तें ऐकून विभीषण रावणाच्या सभेंत उभा राहिला व हात जोडून रावणाला म्हणाला—"बुद्धिमान लोकांचें असें मत आहे कीं साम, दाम तथा भेद या तीन उपायांचा प्रयोग करून त्यांत यश मिळालें नाहीं तरच चवथा उपाय दंड याचा प्रयोग करावा. असावध, निर्बल, लोभी व दुर्दैवी लोकांविरुद्ध दंड प्रयोग केल्यास त्यांत यश मिळतें. राम सावधान आहे, बलवान आहे. मारुतीनें लंकेंत जो धुमाकूळ केला तो पाहून दैव देखील त्यांच्या बाजूला आहे असें वाटतें. रामानें राक्षसांचा वध केला म्हणून सुडाच्या भावनेनें तूं सीतेला पळवून घेऊन आलास असें एक वेळ धरून चालू या. पण रामानें स्वच्छेनें खरदूषणादिकांचा वध केला नव्हता. त्यांनीं स्वारी केली तेव्हां रामानें आत्मरक्षणासाठीं युद्ध करून त्यांचा वध केला. या परिस्थितींच सीतेला पळवून आणण्यांत आपलीच चूक होती. तिला रामाकडे आदरपूर्वक पोंचती करावी."

तें ऐकून रावण कांहीं उत्तर दिल्याशिवाय सभेंतून उठून निघून गेला. तेव्हां विभीषण स्वतः दुसऱ्या दिवशीं रावणाला



भेटण्यासाठीं त्याच्या वाड्यांत गेला. त्यावेळीं रावणाचा कोणी मंत्री त्याच्याजवळ नव्हता. विभीषण त्याला म्हणाला—“ दादा ! सीता आली आहे तेव्हांपासून एक न एक अपशकून होत आहेत. लंकेंत राहणाऱ्या प्रत्येक स्त्री-पुरुषाला ही गोष्ट माहीत आहे. मंत्र्यांना देखील माहीत आहे. परंतु तोंड उघडून तुझ्यासमोर बोलण्याची कोणाची छाती होत नाहीं. म्हणून सर्व गोष्टींचा नीट विचार करून तूं काय तें कर.”

तें ऐकून रावण म्हणाला—“ मला कोणाची भीति नाहीं. रामाच्या हातीं सीता लागणें शक्य नाहीं. देवेंद्र जरी रामाच्या बाजूनें युद्धाला उभा राहिला तरी मी त्याचें पारिपत्य करीन.” असें सांगून त्यानें विभीषणाला परत जायला सांगितलें.

नंतर रावणानें आपल्या मंत्र्यांना बोलावून त्यांचा सल्ला घेण्याचा विचार केला. रावणाची आज्ञा होतांच, सर्व हजर झाले. रावण प्रहस्तला म्हणाला—“ आपल्या राक्षस सैन्यास ताकीद कर कीं पूर्वीपेक्षां जास्त चौकसपणानें लंकेच्या रक्षणासाठीं त्यांनीं डोळ्यांत तेल घालून काम करावें.”

प्रहस्त बाहेर जाऊन सर्व सैन्य सज्ज तयार असलेलें पाहून पुन्हां सभेंत आला व म्हणाला—“ सर्व सैन्य सज्ज उभें आहे.”

रावण आपल्या मंत्र्यांना म्हणाला—“ तुमच्या सल्ल्याप्रमाणें मी जीं जीं कामें आजवर केलीं तीं सर्व यशस्वी झालीं आहेत. आपल्या सर्वांसमोर आतां जो प्रश्न उभा राहिला आहे माझे त्या विषयींचे विचार व्यक्त केलेच आहेत. फक्त कुंभकर्णाचा सल्ला घेऊं शकलों नव्हतों. कारण तो सहा महिन्यापासून झोंपला होता. आतां तो देखील हजर आहे. जनकराजाची कन्या सीता हिला मी दंडकारण्यांतून हरण करून आणली आहे. मी अनेक प्रकारें तिची समजूत घालून पाहिली. पण तिचें मन माझ्याकडे वळत नाहीं. तिच्यासारखी रूपवती स्त्री त्रिलोकांत नाहीं. राम येऊन तिचा उद्धार करील अशा आशेनें तिनें माझ्याकडून एक वर्षाचा अवधी मागून घेतला होता. मी कबूल केलें. वानरांचें सैन्य घेऊन लंका पार करून येणें रामाला शक्य नाहीं. पण समजा, तो आलाच तर पुढें काय करावयाचें ? कारण एक वानर पार करून आला होता व राक्षसांना त्याची दहशत बसलेली आहे. म्हणून विचारतों. नीट विचार करून सल्ला द्या. राम समुद्रापलीकडे सैन्य घेऊन उभा आहे. सीतेला परत करणें शक्य नाहीं. राम-लक्ष्मणांचा वध करण्यास उपाय सांगा.”

रावणाचें म्हणणें शांतपणें ऐकून घेऊन कुंभकर्ण म्हणाला—“ हा सल्ला तूं सीतेला घेऊन येण्यापूर्वी विचारायला पाहिजे होतास. कोणतेंहि काम करण्यापूर्वी विचार करावयाचा असतो. पाठीमागून पश्चात्ताप केलानें देखील कांहीं फायदा होत नाहीं. तूं अविचारानें सीतेचें अपहरण केलेंस. रामानें आतांपर्यंत तुझा वध केला नाहीं हें आपलें भाग्य समज. या परिस्थितींतहि तुझ्या सर्व शत्रूंचा ध्वंस करून तुझें कार्य पूर्ण करण्यास समर्थ मी एकटाच आहें व तें कार्य मी करीन. तूं बेफिकीर रहा.”



कुंभकर्णाचें तें कटु वचन रावणाला आवडलें नाहीं. त्याला राग आला. तें पाहून महापार्श्व नांवाचा एक नायक राक्षस म्हणाला—“ महाप्रभो ! मधाच्या शोधार्थ भयंकर अरण्यांत प्रवेश करून मध मिळाल्यानंतर जो कोणी तो चाखण्याचा प्रयत्न करीत नाहीं त्याला लोक महामूर्खांत काढतात.



आपण बलीच नव्हेतर महाबली आहांत. सीतेचा उपभोग करावा. तिनें स्वतः होऊन मान्य केलें नाहीं तर बलात्कार करावा. त्या नंतर जें कांहीं होईल त्याला तोंड द्यायला आपण समर्थ आहां. देवेंद्राला देखील जिंकणारे पराक्रमी इंद्रजित वगैरे राक्षसवीर आपल्या बाजूनें असतां आपणांला कोणाचें भय असण्याचें काय कारण? सामदामाच्या गोष्टी मूर्ख करतात. आपण दंडाचाच प्रयोग करावा."

रावणाला तें बोलणें आवडलें. तो महा-पार्श्वाला म्हणाला—"मला एक शाप आहे. एकदां पुंजिकस्थल, ब्रह्मदेवाकडे जात असतां मी तिच्यावर बलात्कार केला. ब्रह्मदेवाला ती गोष्ट कळली. तेव्हां त्यानें मला शाप दिला कीं मी पुढें कोणा स्त्रीवर बलात्कार करण्याचा विचार मनांत आणला तर माझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन जातील. म्हणून मी आजवर सीतेच्या अंगावर हात टाकायला धजलों नाहीं. रामाला कदाचित कल्पना देखील नसेल माझ्या शक्तीची. विद्युत गतीनें मला त्रिलोकांत उडतां येतें. तो लंकेवर विजय मिळवून माझा वध करण्याचा विचार करीत आहे. माझ्या वाटेला गेल्याचा परिणाम काय होईल हें त्याला कळलें नसावें."

बिभीषण इतका वेळ कांहींच बोलला नाहीं. अगदीं राहवलें नाहीं म्हणून म्हणाला—"सीतेला तूं घेऊन आलास म्हणजे पांच फडांच्या नागाला स्वतः होऊन घरांत आणून ठेवल्यासारखें आहे. इंद्रजितच काय, कुंभकर्ण काय आणि तूं काय, रामावर जय मिळविणें अशक्य. सीतेला पोंचती करणेंच आपल्या सर्वांचा हिताचें आहे."

तें ऐकून इंद्रजित म्हणाला "काका! पुलस्त्य वंशांत जन्माला येऊन तुम्ही असें



बोलतां? तुम्ही भित्रे व कापुरुष आहां! स्वतः बरोबर दुसऱ्यांना भित्रे करण्याचा तुमचा हा प्रयत्न आतां सोडा. राम व लक्ष्मण या दोघांचा वध करण्यास आमच्या पैकीं एक राक्षस पुरे आहे. मी इंद्राचा पराभव केला हें जगजाहीर आहे. मी येत आहें याची वार्ता लागतांच सर्व देव आपल्या बायकापोरांसह दडी मारून बसतात हें तुम्हांला माहीत नसेल कदाचित! इंद्राच्या ऐरावताचे दांत उपटून काढले आहेत मी! या दोघां राजकुमारांना जिंकणें मला शक्य नाहीं म्हणतां?"

"बाळ! तूं अजून लहान आहेस, तुला सर्व गोष्टी कळत नाहींत. आपल्या बापाच्या दुष्कृत्यांचें समर्थन करून तूं त्याचें अहित करीत आहेस. आपण सीतेला आदरपूर्वक नजराण्यासह रामाकडे पोंचती केली तरच आपलें सर्वांचें हित आहे. नाहींत तर जें होईल तें देवच जाणें!"

तें ऐकून रावणाची तळपायाची आग मस्तकाला गेली. म्हणाला—"कुळघातक्या! तूं माझा सख्खा भाऊ आहेस म्हणून माफ केलें, नाहींतर तुला उभा चिरून फेंकून दिला असता कोल्ह्या कुत्र्यांसमोर!"



रावणानें असें उत्तर दिल्यावर बिभीषण चार राक्षस अनुचरांसह आकाशांत उडाला आणि म्हणाला—"तूं मोठा भाऊ आहेस म्हणून चार हिताच्या गोष्टी सांगून पाहाल्या. तूं माझी व्यर्थ निंदा केलीस. ती मला असह्य झाल्यानें मला एक क्षणभर देखील तुझ्या दरबारांत राहण्याची इच्छा नाहीं. जातांना मी एवढेंच सांगून जात आहें, गोडगोड बोलून स्वतःचा स्वार्थ साधणारे तुला पुष्कळ लोक भेटतील, परंतु हिताची सत्य गोष्ट सांगणारा बंधु व सखा तुला क्वचितच लाभेल. रामाच्या हातीं तुला मरण आलेलें



मला पाहवणार नाहीं. मी जें बोललों त्या बद्दल तूं मला माफ कर. पण तुझें, राक्षस जातीचें व लंकेचें हित होईल असें कांहीं तरी कर. बरें मी येतों. देव तुला सुखी ठेवो!" असें सांगून विभीषण रामलक्ष्मण व वानरसेना जेथें होती तेथें येऊन पोंचला.

आकाशमार्गें सशस्त्र विभीषणाला व त्याच्या अनुयायांना येत असलेले वानरसेनेनें पाहिलें. सुग्रीवानें त्यांना पाहिलें व थोडा विचार करून हनुमानाचा सल्ला घेतला. "हे राक्षस, आपल्यावर हल्ला करण्यासाठींच येत असले पाहिजेत! पहा तर!"

वानर सेना झाडें उपटून व दगड हातीं घेऊन तयार झाल्यावर वानर प्रमुख म्हणाले—"या दुष्टांना ठार करून खालीं पाडलें पाहिजे. इतक्यांत विभीषण समुद्राच्या उत्तरेकडील काठावर उतरला व सुग्रीवादि वानरांस संबोधन करून म्हणाला—"दुष्ट रावणाचा मी भाऊ आहें. माझें नांव विभीषण! रावण जटायूचा वध करून सीतेला दंडकारण्यांतून पळवून घेऊन आला व त्यानें तिला राक्षसिणींच्या पहाऱ्यांत ठेवलें आहे. मी त्याला पुष्कळ समजावून पाहिलें कीं सीतेला परत पोंचता कर. पण तो माझें ऐकत नाहीं. म्हणून त्यानें अपशब्द बोलून माझी निंदा केली. मी पुत्रपरिवार समेत रामाच्या आश्रयाला आलों आहें. रामाला या गोष्टीची सूचना द्यावी."

तें ऐकून सुग्रीव लक्ष्मणासह रामाकडे गेला. "रावणाचा भाऊ कोणी विभीषण आहे, म्हणे. तो चार राक्षसांना बरोबर घेऊन तुझ्याकडे शरण मागायला आला आहे. पण आपण सावध राहलें पाहिजे. मायावी राक्षसांचा काय विश्वास? तो आपल्या सैन्यांत शिरून गुप्तचराचें काम करण्यासाठीं आला आहे. मला तरी शंका वाटत नाहीं.

संधी साधून व तुला असावध पाहून तुझा वध करण्यास देखील मागेंपुढें पाहणार नाहीं. रावणानें स्वतःच याला पाठविला नसेल कशा वरून ? याला व याच्या अनुयायांना तावड-तोब यमसदनास पाठवून मोकळें व्हावें असें आमचें मत आहे." वानर वीर सुग्रीव म्हणाला.

सुग्रीवाचें तें बोलणें ऐकून राम हनुमान आदि वानरांकडे वळून म्हणाला—"सुग्रीवानें बराच विचार करून जें कांहीं सांगितलें तें तुम्ही सर्वांनीं ऐकलेंच आहे. तुमचा सल्ला देखील ऐकून मग काय करावयाचें तें मी ठरविणार आहें."

जांबुवान म्हणाला—"प्रथम या गोष्टीची माहिती काढली पाहिजे कीं बिभीषण आहे कसा ? त्यानंतर त्याला कसा वागवावा याचा विचार करतां येईल."

शरभ म्हणाला—"एक गुप्तचर पाठवून त्याच्या खरेपणाची खातरी करून घ्यावी !"

आणखी एक वानर नायक म्हणाला—"पण बिभीषण येथें अकस्मात आला यांतच मला फार मोठी भीति वाटत आहे."

मारुतीनें सर्वांचें मत खोडून काढलें. तो म्हणाला—"बिभीषण चांगला आहे कीं वाईट हें तुम्हांला कसें कळणार ? जो इतका जवळ आला आहे त्याच्याकडे गुप्तचर पाठवून तरी काय उपयोग होणार ? यावेळीं बिभीषण आला आहे यांत मला कांहीं तरी विशेष हेतू दिसतो. रावण दुष्ट आहे हें त्याला माहीतच आहे. रामानें वालीचा वध करून राज्य सुग्रीवाला दिलें हें देखील त्याला माहीत असलें पाहिजे. राज्यलोभास्तव तो रामाकडे आला असावा. पुढें तुम्ही विचार करा !" हनुमान रामाला म्हणाला.



# नेहरू चरित्र

अडीचशें वर्षांपूर्वी मोंगल वंशाच्या अमदानीला उतरती कळा लागली होती. काश्मीर मध्यें राजकौल नांवाचे गृहस्थ रहात असत. काश्मीरभर संस्कृत व फारसी भाषांचे विद्वान म्हणून त्यांची ख्याति होती.

औरंगजेब बादशाहच्या मृत्यूनंतर फरूख सियर दिल्लीच्या गादीवर बसला. तो काश्मीरला गेला असतां राजकौलच्या पांडित्याची कीर्ति त्याच्या कानावर गेली. कदाचित त्याच्या कडून मिळालेल्या प्रोत्साहनामुळेंच सन् १७१६ मध्यें राज-कौल आपली मातृभूमि काश्मीर सोडून दिल्ली येथें राहूं लागले.

दिल्ली येथें त्यांना एक जहागीर मिळाली व एका कालव्याच्या काठीं (हिन्दी व उर्दूंत कालव्याला 'नहर' म्हणतात) घर बांधून ते राहूं लागले. या 'नहर' शब्दा-वरून त्यांच्या नांवाबरोबर 'नेहरू' जोडलें गेलें. आडनांव कौल असून कौल-नेहरू नांव झालें. शेवटीं फक्त 'नेहरू' आड-नांवच राहून गेलें.



ते दिवस फार कष्टाचे गेले नेहरू कुटुंबाला. त्यांची जहागीर संपली. दिल्लीच्या बादशाहच्या दरबारांत खालावत चाललेल्या आर्थिक स्थितींत लक्ष्मीनारायण नेहरू यांनीं 'सरकार कंपनी' (ईस्ट इंडिया कंपनी) यांच्या तर्फे वकिलीचें काम केलें. तेच पंडित जवाहरलाल नेहरू यांचे पणजोबा. जवाहरलाल नेहरूंचे आजोबा गंगाधर नेहरू १८५७ च्या बंडाच्या आधीं कांहीं दिवस दिल्लीचे कोतवाल होते. १८६१ मध्यें वयाच्या ३४ व्या वर्षींच ते वारले.



# भारताचा इतिहास



कृष्णदेवरायनें पोर्चुगीजांना कांहीं सवलती दिल्या व त्यांच्याकडून स्वतःच्या राज्याचा फायदापण करून घेतला. पोर्तुगीजांनीं मुसलमानांच्या हातून गोवा जिंकल्यावर पोर्तुगीज गव्हर्नरानें सन् १५१० मध्यें भटकळ जवळ एक किल्ला बांधण्याची परवानगी मिळविली.

एका पोर्चुगीज प्रवाशानें कृष्णदेवराय याची फार प्रशंसा केली आहे. कृष्णदेवरायहून दुसरा मोठा राजा नाहीं. त्यानें जेवढा पराक्रम दाखविला आणि राज्याचें वैभव वाढविलें तेवढें इतर कोणत्याहि राजाच्या नशिबीं नव्हतें. कृष्णदेवरायाच्या कारकीर्दींत विजयनगर साम्राज्याची भरभराट कळसाला पोंचली होती. व्यापाराबरोबर कला व साहित्य यांचीपण उन्नति झाली. तो स्वतः वैष्णव मताचा होता. पण हिंदूधर्मांतील सर्व मतांचा त्यानें समादार केला. पराभूत शत्रू राजांना तो औदार्यानें वागवी व जिंकलेल्या प्रदेशांत राहणाऱ्या प्रजेशीं स्वतःच्या प्रजेसारखा व्यवहार करी. तो स्वतः एक कवि होता. साहित्याची त्याला आवड होती व त्याच्या दरबारीं थोर कवि होते. देवस्थानांना त्यानें जमिनी दान करून ब्राह्मणांना वर्षासनें बांधून दिलीं.

इतकें सर्व असून विजयनगर साम्राज्य संकटांतून मुक्त नव्हतें. उत्तरेकडील सीमेवर शत्रूची कुदृष्टि सतत त्याच्यावर असे. दोघां राजप्रतिनिधींनीं बंडें देखील केलीं. दक्षिणेकडील मदुरेच्या शासकानें कृष्णदेवराय जिवंत असतांनाच (१५२८-१५२९) च्या दर्म्यान बंडाचें निशाण उभारलें. परंतु कृष्णदेवराय त्याच्या पारिपत्त्याला पोंचण्यापूर्वींच त्याला दंड मिळाला.

१५२९-३० मध्य कृष्णदेवराय वारल्यावर त्याचा सावत्र भाऊ अच्युतराय गादीवर आला. मदुरेचा शासक व त्याच्या आश्रयाला असलेला त्रावणकोरचा राजा दोघांचें त्यानें पारिपत्य केलें. अच्युतरायनें बंड शांत केलें खरें, परंतु राज्यव्यवस्थेकडे दुर्लक्ष केलें. त्याच्या दोघां मेहुण्यांचा वरचष्मा नेहमीं राज्यांत असे. त्यांनीं सर्व राज्यव्यवस्था आपल्या हातीं घेतली.



मांडलिक राजांना ही गोष्ट आवडली नाहीं. रामराजू, तिरुमलराजू, वेंकटराय इत्यादिकांच्या नेतृत्वाखालीं राजप्रतिनिधि स्वतंत्र होऊं लागले. तेव्हांपासून विजयनगर साम्राज्यांतली शांतता नष्ट झाली.

१५४१ ( किंवा ४२ ) मध्यें अच्युतराय वारला. त्याच्यानंतर त्याचा मुलगा वेंकटराजू उर्फ वेंकटराय गादीवर बसला. त्यानें फक्त ६ महिनेच राज्य केलें. त्याच्यानंतर अच्युतरायचा धाकटा भाऊ सदाशिवराय गादीवर बसला. तो आपला मंत्री रामराय याच्या हातांतलें एक बाहुलें होऊन राहाला. रामराय एक योग्य शासक होता. त्यानें कृष्णदेवरायाच्या कारकीर्दींनंतर साम्राज्यांत जो विस्कळितपणा आ होता तो दूर करून शांतता व सुव्यवस्था स्थापन करण्याचा यत्न केला. रामराय राजनीतिकुशल होता. त्यानें चाणक्यनीतीनें दक्कनच्या सुलतानांपैकीं कधीं एकाचा पक्ष घेऊन तर कधीं दुसऱ्याची बाजू घेऊन त्यांचें आपसांतलें वैर वाढविलें. परंतु त्याची ही नीति फक्त कांहीं काळच उपयोगी पडली. विजापूरच्या राज्यावर स्वारी करतांना रामरायानें १५४३ मध्यें अहंमदनगर व गोवळकुंड्याच्या सुलतानांशीं सख्य केलें.

विजापूरचा नवाब असदखान हुशार होता. त्यानें गोवळकुंड्याच्या सुलतानाशीं एक निराळी संधी केली व विजयनगरशीं आणखी एक संधी करून घेतली. अशा तऱ्हेनें त्यानें गोवळकुंडा व विजयनगर यांची आपसांतील गट्टी तोडण्यांत यश मिळविलें.

दक्कनच्या सुलतानांच्या डोळ्यांत विजयनगरचें राज्य बरेंच दिवसापासून सलत होतें. बरारच्या सुलतानाला सोडून दक्कनच्या इतर सुलतानांनीं एकत्र होऊन २३ जानेवारी १५६५ या रोजीं राक्षसतंगडी या ठिकाणीं विजयनगरच्या सैन्याशीं युद्ध करून विजयनगरचा पराभव केला. गोवळकुंड्याच्या नवाब हुसेन निजामशाह यानें रामराय याचा वध स्वतःच्या हातानें केला.

या युद्धांत इतकें धन मुसलमान सैन्याला मिळालें कीं प्रत्येक सामान्य सैनिक देखील श्रीमंत झाला. तिसऱ्या दिवशीं शत्रूनें राजधानींत शिरून नगर उध्वस्त केलें. इतक्या मोठ्या वैभवशाली नगराचा ध्वंस ही इतिहासांत ली एक अपूर्व घटना आहे.

हें युद्ध तालीकोटचें युद्ध म्हणून इतिहासांत प्रसिद्ध आहे. या युद्धानंतर हिंदूंच्या साम्राज्याला उतरतीकळा लागली. व तुर्की सत्ता वाढत गेली. १७ व्या शतकापर्यंत हें राज्य कसेंबसें जिवंत राहिलें. दक्कनच्या नवाबांच्या आपसांतील भाऊबंदकीमुळें रामरायचा धाकटा भाऊ तिरुमलराय याला थोडा फायदा झाला. १६१४ मध्यें वेंकटराय द्वितीय याच्या मृत्यूनंतर विजयनगर साम्राज्याचा ह्रास होत गेला. १६१२ मध्यें वेंकटराय याच्या परवानगीनें राजा ओडयर यानें मैसूर येथें आपलें राज्य स्थापन केलें.





# प्रह्लाद चरित्र

[ ४ ]

प्रह्लाद मोठा झाल्यावर त्याचें लग्न झालें. त्याच्या बायकोचें नांव देवी असें होतें. त्याला आयुष्मंत, शिबि, विरोचन, कुंभ व निकुंभ अशीं चार मुलें झालीं. पुराणांत शिबि एक प्रसिद्ध पुरुष होऊन गेला. परंतु तो शिबि प्रह्लादाचा मुलगा नव्हता. तो उशीनर याचा मुलगा होता. त्याच्या आईचें नांव देवी नसून माधवी होतें.

नृसिंहानें हिरण्यकश्यपूला ठार केल्यानंतरच्या प्रह्लादाच्या चरित्रांतल्या अनेक गोष्टी पुराणांत आहेत.

प्रह्लाद राज्य करीत असतां स्वर्गावर स्वारी करून तें जिंकण्याची इच्छा त्याच्या मनांत उदभवली. त्यानें देवांशीं युद्ध केलें. पण त्या युद्धांत त्याचाच पराभव झाला. एकदां त्याच्या मनांतील हरिभक्ति लुप्त झाली व तो स्वतः विष्णूशीं युद्धाला सिद्ध झाला. प्रह्लादानें एकदां एका मुनींचा अपमान केला आणि त्यांनीं त्याला शाप दिला. म्हणून विष्णूशीं त्याचें युद्ध झालें व त्या युद्धांत त्याचा पराभव झाला. नंतर त्याला ज्ञान प्राप्ति झाली व तो पुन्हां विष्णुभक्त झाला.

च्यवन ऋषि एकदां नदींत स्नान करीत असतां पाताळ लोकांत गेले. तेव्हां प्रह्लादानें त्यांचा सत्कार केला आणि त्यांच्याकडून तीर्थयात्रेचा महिमा ऐकून घेतला. त्यानंतर तो स्वतः च्यवन मुनींबरोबर तीर्थयात्रेला निघाला. एका तीर्थस्थानीं त्याला नरनारायण तपश्चर्या करीत असलेले दिसले. त्यांना पाहून प्रह्लाद म्हणाला—“हे कोणी ढोंगी



साधू दिसतात. हे मुनि आहेत तर यांना शस्त्रास्त्रांची काय गरज ?"

तें ऐकून नरनारायणांला राग आला व त्यांनीं प्रह्लादाशीं युद्ध करून त्याचा पराभव केला. दुःखी प्रह्लादानें विष्णूचें स्मरण केल्यावर विष्णू दर्शन देऊन म्हणाला—"हे नरनारायण माझाच अंश होत."

एकदां प्रह्लादाचा मुलगा विरोचन व अंगीरस याचा मुलगा सुधन्वा दोघांच्या मनांत एकाच मुलीशीं लग्न करण्याची इच्छा उत्पन्न झाली. परस्परांच्या गुणावगुणांचें वर्णन करून दोघे परस्परांशीं खूप भांडले. दोघे निवाडा मागण्यासाठीं प्रह्लादाकडे गेले. त्यानें त्यांना कश्यप मुनींकडे जाण्याचा सल्ला दिला.

पण सुधन्वा म्हणाला—"तूं राजा आहेस आम्ही तुझ्याकडे न्याय मागण्यासाठीं आलों. जो न्याय असेल तो दे. राजाच आपल्या कर्तव्याला जागला नाहीं तर इतर कोणीच कर्तव्य पालन करणार नाहीं."

त्यावर प्रह्लादानें विरोचन स्वतःचा मुलगा असूनहि सुधन्वाच अधिक गुणवान आहे असा न्याय दिला.

विरोचनच्या मुलाचें नांव बलि. स्वर्गावरच्या स्वारींत प्रह्लादाचा पराभव झाल्यावर तो तपश्चर्या करण्यासाठीं निघून गेला. त्यानें आपल्या मागें त्याचा नातू बली यासच गादीवर बसविलें. एकदां बलीनें आपल्या आजोबांना विचारलें—"एका काळीं राक्षस महा पराक्रमी होते. पण त्यांचा तो पराक्रम कां लुप्त झाला ?"

"त्याला कारण विष्णू !" प्रह्लाद म्हणाला.

"विष्णू इतका पराक्रमी आहे का ? त्याला जिंकण्याची शक्ति आपल्यापैकीं कोणांत नाहीं का ?" बलीनें प्रश्न केला.



"तूं हा प्रश्न केलास, हें देखील त्याला कळलें आहे व तो तुला त्याबद्दल शिक्षा दिल्याशिवाय राहणार नाहीं." प्रह्लाद रागानें म्हणाला व तेंच घडलें.

बली एक मोठा धर्मभीरु चक्रवर्ती होता. तो जें वचन देई तें कधीं मोडत नसे. त्याच्या राणीचें नांव अशना. त्याला रत्नमाला नांवाची एक मुलगी होती व बाण, धृतराष्ट्र, निकुंभ व बिभीषण नांवाचीं चार मुलें होतीं.

देवांनीं बलीला शांतिपूर्वक राज्य करूं दिलें नाहीं. म्हणून त्यानें इंद्रलोकावर स्वारी केली. इंद्र घाबरला. त्यानें बृहस्पतीचा सल्ला घेतला. बृहस्पती म्हणाला—"बलीला जिंकणें तुला शक्य नाहीं. तूं या कामीं विष्णूची मदत माग."

बलीनें त्रिलोक जिंकले. देव ब्रह्मदेवाकडे धांवले. ब्रह्मदेव त्यांना घेऊन वैकुंठलोकीं विष्णूकडे गेला. विष्णूनें बलीचें पारिपत्य करण्याचें वचन देऊन देवांना निरोप दिला. त्यानें वामन रूप घेऊन कश्यप व अदितीच्या पोटीं जन्म घेतला. उपनयन संस्काराच्या वेळीं भिक्षावळीसाठीं फिरत फिरत तो बलीकडे आला.



बलीनें त्याला विचारलें—"बोल काय देऊं भिक्षा ?" वामन म्हणाला—"तीन पावलें भूमि !" बलीनें तें कबूल केलें. परंतु शुक्राचार्याला त्यांत डाव आहे हें कळलें. त्यानें बलीला सावध केलें. म्हणाला—"तीन पावलें भूमि देण्याचें वचन मागें घे !" परंतु बलीनें तें साफ नाकारलें.

बली झारी घेऊन वामनाच्या हातावर उदक सोडणार होता. नेमके त्यावेळीं गुरु शुक्राचार्य किड्याचें रूप घेऊन झारीच्या तोटींत जाऊन बसले. झारींतून पाणी बाहेर येत नाहीं हें पाहून वामनानें एक काडी, तोटी साफ करण्यासाठीं आंत घातली. त्यामुळें शुक्राचार्यांचा एक डोळा फुटला. शुक्राचार्य बाजूला सरकल्यावर पाणी बाहेर आलें व बलीनें संकल्प सोडला. वामनानें तीन पावलें भूमि देण्याचा संकल्प सोडल्या-बरोबर वामनानें विश्वरूप धारण केलें. एक पाऊल ठेवून सर्व भूमि व्यापली व दुसरें पाऊल ठेवून दिगदिगंत व्यापलें. "तिसरें पाऊल कोठें ठेवूं ?" असा प्रश्न वामनानें करतांच बलीनें आपलें डोकें पुढें केलें व म्हणाला—"येथें !"

प्रल्हादानें पुढें होऊन विष्णूजवळ प्रार्थना केली कीं हा दिलेलें वचन पाळणारा न्यायी राजा आहे. याला असा दंड देणें बरोबर नाहीं. म्हणून वामनानें बलीचा वध केला नाहीं. त्याला पाताळ लोकांत पाठविलें. तेथलें राज्य त्याला दिलें. त्यानें अशी आज्ञा काढली कीं जो राक्षस बलीच्या आज्ञेचें पालन करणार नाहीं त्याला दंड मिळेल. नंतर विष्णू स्वतः बलीचा द्वार-पालक झाला.






[ ३ ]

[बंगाल प्रांतांतील पठाणांचें परिपत्य करण्यासाठीं अकबर बादशाहानें मानसिंहाला मोठें सैन्य देऊन पाठविलें. वर्धमान नगरानजीक त्यानें तळ दिला. त्याचा मुलगा जगतसिंह शत्रूच्या शक्तीची माहिती काढून आणण्यासाठीं मंधारणच्या आसपासच्या प्रदेशांत येऊन पोंचला. तेथें शैलेश्वराच्या देवळांत मंधारणचा किल्लेदार वीरेंद्रसिंह याची मुलगी तिलोत्तमा व तिची दासी विमला दोघी भेटल्या. त्या दोघींचा परिचय त्याला झाला नाहीं. पण तो कोण हें मात्र त्यांना कळलें होतें. तो व तिलोत्तमा यांचें परस्परांवर प्रेम जडलें.

पठाण व मोंगल यांचें युद्ध झाल्यास वीरेंद्राच्या मनांतून पठाणांची बाजू घ्यावी असें होतें. कारण मानसिंहावर त्याचा राग होता. परंतु अभिरामस्वामीनें मोंगलांशीं स्नेह ठेवण्यांत हित आहे असा उपदेश केला. परंतु वीरेंद्रसिंहाला तो सल्ला तितकासा आवडला नाहीं.]

किल्ल्याच्या कोटाला लागूनच दामोदर नद वहात होता. त्या बाजूच्या खिडकींत बसून तिलोत्तमा नदीची गंमत पहात होती. सूर्यास्ताची वेळ होती. नदी-पलीकडे एक तीन मजली हवेली व मोठमोठे वृक्ष दिसत होते.

किल्ल्याच्या आंत वाड्यासमोर पटांगणांत मोर पोपट कोकिळा आदि पक्षी निश्चिंतपणें

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



खेळत बोलत उडत होते. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें कडक ऊन पडलें होतें. परंतु नदीवरुन गार वारा येत होता. म्हणून ऊष्मा जाणवत नव्हता.

तिलोत्तमा अन्यमनस्कपणें खिडकीसमोर उभी राहून कोठें पहात होती हें तिचें तिलाच ठाऊक होतें कीं नाहीं नकळे. संध्याकाळ झाल्यावर दासी दिवा ठेवून गेली. तिलोत्तमा आपलें मन आवरण्यासाठींच जणुंकाहीं एक पुस्तक घेऊन दिव्याच्या उजेडांत वाचायला बसली. तिनें बाणभट्टाची कादंबरी वाचायला घेतली होती. अभिरामस्वामीजवळ ती संस्कृत शिकली होती. थोड्या वेळानें कादंबरी बाजूला ठेवून तिनें स्वप्नवासवदत्ता नाटक वाचायला सुरवात केली. नंतर तें पुस्तक ठेवून दिलें व गीत-गोविंद वाचायला घेतलें. शेवटीं तें देखील ठेवून दिलें व अंथरुणावर पडून विचारांत मग्न झाली.

तिच्या मनांत कोणते विचार चालू होते हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. जगतसिंह तिच्या दृष्टीसमोर उभा होता.

विमला अभिरामस्वामीकडे गेली व तिनें तिलोत्तमेचें जगतसिंहावर प्रेम असल्याचें त्याला सांगितलें. चवदा दिवस होऊन गेले होते. पंधराव्या दिवशीं शैलेश्वराच्या देवा-लयांत पुन्हां भेटण्याचें ठरलें होतें.

"मग तूं काय करण्याचें ठरविलें आहेस?" अभिरामस्वामीनें तिला विचारलें.

"तुमचा सल्ला याविषयीं मिळेल या अपेक्षेनें मी आलें होतें." विमला म्हणाली.

"माझ्या मतें हें सर्व विसरून जाणेंच हिताचें होईल." अभिरामस्वामी म्हणाला.

विमलाच्या डोळ्यांत दोन टिपें आलीं. ती म्हणाली—"तिलोत्तमेच्या हृदयाचा कांहीं विचार नको का करायला?"



"विमला! पहिल्याच भेटींत ओळख-देख नसतां एवढें प्रेम जडलें का?" अभिरामस्वामीनें विचारलें.

क्षणभर विचार करून ती म्हणाली—"आतां तुमच्याजवळ लपविण्याची काय गरज? गेले चवदा दिवस त्या मुलीचें चित्त कोणत्याहि कामांत नसतें. खाण्या-पिण्याची फिकीर नाहीं व अंथरुणावर या कुशीवरुन त्या कुशीवर असें रात्रभर चालू असतें. क्षणभर देखील तिचा डोळा लागला असेल तर शपथ. इतका बदल झाला आहे कीं तिला ओळखणें देखील कठिण वाटतें."

अभिरामस्वामी स्मित करून म्हणाला—"तुम्हां बायकांचें हेंच तर चुकतें. कोणाला मन दिलें कीं जगांत दुसरें कांहीं सुचत नाहीं. तिलोत्तमा अजून पोरवय आहे. दुसरीकडे लक्ष गेलें कीं विसरुन जाईल हें सर्व!"

विमलाला तें पटलें नाहीं. गेल्या पंधरा-दिवसांत झालेला फरक तिनें स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिला होता. अभिरामस्वामी पुढें म्हणाला—"तिलोत्तमेचें मन राखायचें हें खरें आहे. पण वीरेंद्रसिंहाचें मत काय आहे हें देखील पाहिलें पाहिजे.



"त्यांच्या भीतीनेंच मी त्यांच्याजवळ हा प्रश्न काढला नाहीं. मानसिंह व त्यांचें पटत नसलें तरी त्याच्याशीं मैत्रीनें वागण्याचें ठरविलें आहे ना त्यांनीं? मग मानसिंहाच्या मुलाला जांवई करून घेण्यास काय हरकत आहे?" तिलोत्तमेनें विचारलें.

"मानसिंह या संबंधास कबूल होईल, कशावरून?" अभिरामस्वामीनें विचारलें.

"कां नाहीं कबूल होणार? स्वतः युवराज तयार आहेत." विमला म्हणाली.

"पण जगतसिंह वीरेन्द्रसिंहाच्या मुलीशी लग्नाला तयार होईल हें तुला

कशावरून वाटलें ?" अभिरामस्वामीनें विचारलें.

"कुळ, गोत्र, गौरव सर्व दृष्टींनीं दोन्ही वंश एका दर्जाचे आहेत. जयधरसिंहांचे वंशज यदुवंशांतलेच नाहींत का ?" विमलानें विचारलें.

"यदुवंशकुलोद्भवा तिलोत्तमा मोगलांच्या नातेवाइकांच्या घरीं सून म्हणून जाणार वाटतें ?" अभिरामस्वामीनें स्पष्टच विचारलें.

विमलानें पण तितक्याच स्पष्ट शब्दांत विचारलें—"कां होणार नाहीं ? यदुवंशाहून खालच्या दर्जाचा वंश आहे का कोठें ?"

तें ऐकून अभिरामस्वामीचा चेहरा लाल झाला. म्हणाला—"तूं अजून आपल्या फुटक्या अदृष्टाची गोष्ट विसरली नाहींस वाटतें ! दूर हो, माझ्या दृष्टीसमोर उभी राहूं नकोस !"

*  *  *

जगतसिंह आपल्या वडिलांचा निरोप घेऊन ससैन्य निघाला. त्याचा पराक्रम पाहून पठाणांचे धेत दासळूं लागले.

जगतसिंहानें प्रतिज्ञा केली होती कीं फक्त पांच हजाराच्या सैन्यानिशी जाऊन पन्नास हजारांचा पुढारी कतलुखान याला सुवर्णरेखेच्या पलीकडे पिटाळून लावीन. ती प्रतिज्ञा पुरी होण्याची वेळ अजून आली नसली तरी दोन आठवड्यांत त्यानें जें शौर्य आणि साहस दाखविलें त्याचें वर्णन ऐकून मानसिंह म्हणाला—"माझा मुलगा रजपूत जातीची कीर्ति कायम ठेवील यांत शंका उरली नाहीं."

पन्नास हजार पठाणांना तोंड देऊन त्यांना सुवर्णरेखेच्या पलीकडे पिटाळून लावणें पांच हजार रजपुतांना शक्य नाहीं हें जगत-सिंहाला कळत होतें. समोरासमोर युद्ध करून स्वतःच्या मृत्यूला बोलावणें पाठ-विण्याचा मूर्खपणा करावयास तो सिद्ध नव्हता. म्हणून त्यानें गनिमी काव्यानें युद्ध करण्याचें ठरविलें. शत्रूला असावध पाहून छापे मारायचे व शत्रूची धुळदाण उडवायची या पद्धतीनें त्यानें युद्ध चालू ठेवलें. त्याचें सैन्य किती आहे हें त्यानें शत्रूला कळूं दिलें नाहीं. त्याचें सैन्य कोठून केव्हां व कसा हल्ला करील हें शत्रूला कळत नव्हतें. त्यानें आपल्या सैन्याच्या लहान लहान तुकड्या करून त्या जागोजागीं दाट झाडींत, गुहेंत, खड्डयांत जेथें जेथें दबा धरून बसणें शक्य होतें तेथें त्यांना नेमलें. त्याचे हेर








शत्रूच्या गोटांत शिरून शत्रूच्या हाल-चालींच्या बातम्या पोंचत्या करीत. शत्रूला असावध पाहून एका बाजूनें एक तुकडी छापा मारी व शत्रू सज्ज होऊन उभा राहण्या-पूर्वींच दुसऱ्या बाजूनें दुसरी तुकडी हल्ला करी. अशा तऱ्हेनें शत्रूचा धीर खचून जाई व तो पळून जाई.

जगतसिंहाच्या या युद्धाला पठाण तयार नव्हते. असंख्य सैन्य असूनहि त्यांची धुळदाण उडाली सहस्रावधी सैनिक ठार झाले. पठाण सेनापतीनें जगतसिंहाला समोरासमोरच्या युद्धाला खेचण्यासाठीं शिकस्तीचा प्रयत्न केले. पण ते सर्व फोल ठरले. इतके सैन्य कत्तल झालें, इतके सैनिक जखमी झाले, शत्रूनें रसद लुटून नेली सकाळ संध्याकाळ याच बातम्या कत्तलखानाच्या कानावर येत होत्या. पठाण जेरीस आले. किल्ल्याबाहेर पाऊल टाकणें देखील त्यांना धोक्याचें वाटूं लागलें. रसद येण्याचा मार्ग बंद झाल्यामुळें उपासमार होण्याची वेळ येऊन ठेवली.

पठाणांना ताळ्यावर आणण्याच्या कामीं मुलानें दाखविलेला पराक्रम पाहून मान-सिंहानें त्याचें अभिनंदन करून एक पत्र लिहिलें व आणखी दहा हजारांचें सैन्य कुमक म्हणून पाठवीत आहें असें देखील कळविलें.

जगतसिंहानें उत्तर पाठविलें कीं जास्त सैन्य आल्यास बरेंच होईल. परंतु बरोबर आणलेल्या पांच हजार सैन्याच्या मदतीनें मी आपली कामगिरी पुरी करूं शकेन असें मला वाटत आहे.

अभिरामस्वामींशीं बोलणें ज्या दिवशीं झालें त्याच्या दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं विमला आपल्या खोलींत वेणी फणी करीत बसली होती. तीस वर्षांच्या बाईला एवढा नट्टापट्टा कशाला असा प्रश्न साहजिकच मनांत उद्भवतो. परंतु ज्यांच्या मनांत तारुण्य आहे त्यांना वयोमर्यादेची पर्वा करण्याची काय गरज? कांहीं लोक वीस वर्षें वय असतांनाच म्हाताऱ्यासारखा पोक्तपणा दाखवतात. विमला वयानें मोठी असली तरी मनानें तरुणच होती. गुणगुणत होती आणि वेणीफणींत गुंग होती. वेणीफणी आटोपल्यावर तिनें जगतसिंहानें दिलेला मोत्यांचा हार घातला आणि तिलोत्तमेच्या खोलींत गेली.

तिलोत्तमेनें चकित होऊन विचारलें—"कोठली तयारी? काय आहे तरी काय? कळूं देशील कीं नाहीं?"

"दूर जायचें आहे!" विमला म्हणाली.

"थट्टा सोडून सांग ना कोठें निघालीस तें!" तिलोत्तमेनें लडिवाळपणें विचारलें.

विमला तिचा हात धरून तिला खिडकी-जवळ घेऊन गेली व तिच्या कानांत म्हणाली—"शैलेश्वराच्या देवळांत! तेथें एका रजपूत तरुणाला भेटायचें आहे."

तें ऐकून तिलोत्तमेच्या चेहरा लज्जावनत झाला. स्मित करून व मान खालीं करून ती उभी राहाली. तिचीं बोटें पदरांत गुरफटलेलीं दिसलीं.



"मी अभिरामस्वामींना सर्व सांगितलें. जगतसिंहाशीं तुझा विवाह अशक्य असें त्यांचें मत आहे. तुझ्या वडिलांना ही गोष्ट मुळींच खपणार नाहीं, म्हणे. तूं असावधपणें त्यांच्याजवळ याविषयीं कांहीं बोललीस तर सर्व फिसकटेल, एवढें लक्षांत ठेव!" विमलानें तिला सावध केलें.

तिलोत्तमा पुसट आवाजांत विचारूं लागली—"पण कां? त्यांना कां खपणार नाहीं?"

"म्हणे कां? आतां काय सांगूं? हें पहा, मी वचन दिल्याप्रमाणें देवळांत

      

जगतसिंहाला भेटणार आहें, व तूं कोण हें पण सांगणार आहें. पण एवढ्यानें भागेलसें वाटत नाहीं. मला जें कांहीं सांगावयाचें आहे तें मी सांगेनच. पुढें त्याची मर्जी. तुझ्यावर त्याचें खरें प्रेम असेल तर....”

विमलाच्या तोंडावर मधेंच हात ठेवीत तिलोत्तमा म्हणाली—“पुरें झालें ग ! मला बाई लाज वाटते हें सर्व बोलायला. तुला जायचें असेल तर जा. माझी ना नाहीं. परंतु माझ्याविषयीं बोलण्याची गरजच काय मी म्हणतें.”

“अस्सं !! मग या पोरवयांत प्रेमसागरांत बुड्या मारण्याची काय गरज होती ग ?” विमलानें खवचटपणें विचारलें.

“जा ग ! मला नाहीं बोलायचें तुझ्याशीं !” तिलोत्तमा म्हणाली.

“बरें तर मी नाहीं जात !” विमला स्मित करून म्हणाली व तिलोत्तमेच्या तोंडावर काय फरक पडतो हें पाहूं लागली.

तिलोत्तमा अगदीं पराभव झाल्यासारखी म्हणाली—“बरें बाई जा !”

विमला स्मित करून म्हणाली—“तर मग जाऊं म्हणतेस. पण पहा, मी येईपर्यंत झोपतां कामा नये !”

तिलोत्तमा जोरानें हंसली, जणुंकांहीं म्हणत होती झोंप येईल तर ना झोंपणार. विमलानें मातृस्नेहानें तिला पोटाशीं ओढून धरलें. नकळत दोन टिपें तिच्या डोळ्यांत आलीं.

विमला तिलोत्तमेच्या खोलींतून बाहेर पाऊल टाकणार तेवढ्यांत अस्मानीनें येऊन निरोप सांगितला—“महाराजांनीं बोलाविलें आहे.” [पुढील गोष्ट पुढील अंकीं]



## अभिशप्त मत्स्यकन्या

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर टाकलें व नेहमीप्रमाणें मौनपणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत असलेला वेताळ बोलूं लागला—“राजा ! तुला इतके कष्ट सहन करीत असलेला पाहून वाटतें कीं कोणीतरी तुला शापच दिला असावा. परंतु तूं सामान्य अभिशप्त माणसासारखा दिसत नाहीस. मत्स्यराजाची कन्या मुक्तामयीप्रमाणें तूं स्वतः होऊन अभिशप्त झालेला दिसत आहेस. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी तुला मत्स्यराजाच्या कन्येची गोष्ट सांगणार आहें ऐक.” असें सांगून वेताळानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

मत्स्यलोकाच्या राजकन्येचें नांव मुक्तामयी होतें. ती अप्रतिम रूपवती होती. तिच्या रूपावर भाळून जाऊन फणीमुख










नामक एका नागजातीच्या तरुणानें तिच्याशीं लग्न करण्याचें ठरविलें. परंतु तो स्वतः मात्र कुरूपच होता. म्हणून मुक्तामयी त्याला भेटावला देखील तयार झाली नाहीं.

"आमची मुलगी तुझ्याशीं लग्नास तयार नाहीं. म्हणून तूं तिची आशा सोडून दे." मुक्तामयीच्या आईवडिलांनीं फणीमुखला कळविलें.

परंतु फणीमुखच्या मनाचें समाधान त्या उत्तरानें कसें होणार? त्यानें मुक्तामयीचा विचार मनांतून काढून टाकण्याऐवजीं तिच्याशींच लग्न करण्याचा हट्टच मनांत धरला. त्यानें मुक्तामयीचें अपहरण करण्याचें आपल्या मनांत ठरविलें. परंतु त्या प्रयत्नांत त्याला यश मिळालें नाहीं. याशिवाय सर्व जलचर सृष्टींतल्या रहि-वाश्यांना त्याचा तो दुष्ट हेतु कळला. त्या दिवसापासून फणीमुखाला मत्स्यलोकांत निश्चिंतपणें राहाणें दुरापास्त झालें. तो चंपा सरोवरांतून भूमीवर आला व सरोवराजवळ एक बिवर खणून त्या बिळांत राहूं लागला.

फणीमुख मत्स्यलोक सोडून निघून गेल्यावर मुक्तामयी निर्धास्तपणें हिंडूं फिरूं लागली. कारण तिला धास्ती वाटे कीं केव्हां व कोठून फणीमुख येतो, कोण जाणे! परंतु तेव्हांपासून ती मोकळेपणानें हिंडूं फिरूं लागली.

एकदां ती चंपा सरोवराच्या मार्गानें भूलोकांत आली व चंपा वनांत निघून गेली. त्यापूर्वीं तिनें कधीं भूलोक पाहिलाच नव्हता. म्हणून चंपा वनांतील दृश्य तिला फार मनोरम्य वाटलें.

मुक्तामयी हीं दृश्यें पहात निश्चिंतपणें हिंडत असतां फणीमुख अचानक बिळांतून बाहेर आला व तिच्यासमोर येऊन उभा राहून तिला म्हणाला—"माझ्याच शोधार्थ आली



आहेस वाटतें? ये, माझ्याशीं लग्न कर आणि सुखानें येथेंच राहा."

फणीमुखाला पाहतांच मुक्तामयी मोठ्यानें किंचाळली व ती चंपा सरोवरांत उडी मारणार, पण इतक्यांत फणीमुखानें तिला सरोवराकडे जाऊं दिलें नाहीं. मुक्तामयी घाबरून गेली होती. तिचें सर्व अंग थरथर कांपत होतें व ती सारखी पळत होती.

तिची ती किंकाळी ऐकून त्या देशाचा युवराज जगंधर तिकडे धांवत आला. त्यानें धांवत असलेल्या रूपवती मुक्तामयीला व तिचा पाठलाग करीत असलेल्या फणीमुखाला पाहिलें. तो आला होता शिकारीसाठीं. परंतु जनावरांच्या शिकारी ऐवजीं त्याला हें दृश्य पहावयास मिळालें.

मुक्तामयी धांवत धांवत तो उभा होता तेथें आली व म्हणाली—"हा दुष्ट माझा पाठलाग करीत आला आहे. याला ठार करून माझें रक्षण कर."

जगंधर शूर व साहसी होता. त्यानें फणीमुखाच्या डोक्यावर वार केला. दोघांचें द्वंद्व चालू असतां इकडे मुक्तामयीनें सरो-वरांत उडी मारली व पाण्यावर डोकें काढून द्वंद्व पाहूं लागली.




जगंधरचा वार मर्मी बसला होता. प्राणत्याग करण्यापूर्वीं फणीमुख म्हणाला—"मी इतक्या विनवण्या केल्या तरी तूं माझ्याशीं लग्न करण्यास तयार झाली नाहींस. उलट माझ्या आत्माभिमानास डिवचण्यासाठीं स्वतः होऊन मी तोंड लपवून बसलों होतों तेथवर आलीस. याहि पुढें तूं या युवराजाकरवीं मला ठार करविलेंस. या युवराजासाठीं म्हणून जर यदाकदाचित तूं या भूमीवर पाऊल टाकलेंस तर तूं एक दगड होऊन जाशील." असा शाप देऊन फणीमुखानें प्राण सोडला.









तें ऐकून मुक्तामयीनें सरोवरांत बुडी मारली व सरळ मत्स्यदेशांत निघून गेली.

जगंधरला हें सर्व कळलें नाहीं. कारण फणीमुखाला ठार केलें त्यावेळीं त्याचे अनुयायी त्याचा शोध काढीत आले. त्याची तलवार रक्तानें माखलेली पाहून त्यांना वाटलें कीं युवराजाला लागलें असावें.

"मला नाहीं लागलें कोठें. पण तो नागदेव कोठें निसटून गेला हें जाऊन पाहिलें पाहिजे. तो जिवंत असेल असें नाहीं वाटत मला." तो म्हणाला.

तोंपर्यंत फणीमुख मेला होता. नंतर जगंधर ज्या तरुणीचें त्यानें रक्षण केलें होतें ती कोठें आहे हें पाहूं लागला. परंतु ती त्याला कोठें दिसली नाहीं. त्यानें सरोवराजवळ जाऊन पाहिलें तेव्हां त्याला मुक्तामयी फक्त एकदांच वीज चमकावी तशी दिसली व नंतर अदृश्य झाली.

युवराजाच्या अनुयायांना तो कोणाच्या शोधार्थ फिरत आहे हें कळलें नाहीं. त्यांपैकीं एकानें देखील मुक्तामयीला पाहिलें नव्हतें. जगंधरला तिच्याविषयीं कोणाजवळ कांहीं बोलावेसें पण वाटलें



नाहीं. हताश होऊन तो त्यांच्या बरोबर घरीं परतला.

जगंधर घरीं आला खरा, परंतु त्याचें चित्त चंपा सरोवराच्या काठींच होतें. मुक्तामयीचें रूप सतत त्याच्या हृदयांत वसत होतें. ते दोन तीन दिवस तीन युगांसारखे वाटले त्याला. तिच्या विरह दुःखानें त्याला आपल्या जीविताचाच वीट आला.

एकदां तो कोणालाहि कांहीं कळविल्याशिवाय चंपावनांत गेला आणि चंपा सरोवराच्या काठींच या आशेनें हिंडत राहिला कीं कदाचित मुक्तामयीशीं भेट होईल. तेव्हां त्याला सरोवराच्या काठीं एक मणि दिसला. तो मणि फणीमुखाच्या डोक्यांतला होता. तो उचलून घेतल्याबरोबर त्याच्या मनांतून पाण्याचें भय नाहींसें झालें. त्यानें चंपा सरोवरांत उडी टाकली. जणुं कांहीं पाणी स्वतःच त्याला वाट दाखवीत होतें. तो निर्विघ्नपणें मत्स्यलोकांत जाऊन पोंचला.

तिकडे जगंधराच्या मनासारखीच मुक्तामयीच्या मनाची स्थिति झाली होती. जगंधरनें तिचें रक्षण केलें त्या वेळेपासून तिचें मन त्याच्यावर बसलें होतें. फणीमुखानें शाप दिला नसता तर कदाचित ती पाण्या-





बाहेर येऊन जगंधरला भेटली देखील असती व त्याच्याशीं लग्न करून घेऊन त्याच्याबरोबर राहूं लागली असती. परंतु तें शक्य नव्हतें व जगंधरला मत्स्यलोकांत प्रवेश मिळणें अशक्य होतें. म्हणून मनांतल्या मनांत ती झुरत राहिली.

कोणी मानवजातीचा तरुण मत्स्यलोकांत आला असल्याचें वर्तमान कळतांच ती धांवत धांवत त्याला भेटण्यासाठीं आली. जगंधरला पाहून तिला वाटलें कीं देवानेंच तिचें गाऱ्हाणें ऐकून तिचें जगंधरशीं मीलन घडवून आणलें. ती आपल्या महालांत त्याला बोलावून घेऊन गेली.

नंतर मुक्तामयीनें आपल्या आईवडिलांना आपल्या मनांतली इच्छा कळविली. त्यांनीं मुक्तामयीच्या इच्छेप्रमाणें जगंधराशीं तिचें लग्न करून दिलें व भूलोकांत आपल्या मुलीला पाठवण्याची तयारी करूं लागले. परंतु आश्चर्य म्हणजे स्वतः मुक्तामयीच त्या गोष्टीस तयार झाली नाहीं.

तें ऐकून जगंधर तिला म्हणाला—"मला भूलोकांत तुझ्याहून जास्त प्रिय असें काय आहे? मी भूलोक सोडून येथेंच तुझ्या संगतींत रहावयास तयार आहें."

जगंधर पांच वर्षें मत्स्यलोकांत सुखानें राहाला. त्यांना एक मुलगा व एक मुलगी झाली. पांच वर्षें आनंदांत केव्हां निघून गेलीं, कळलें देखील नाहीं. एकदां स्वदेशीं जाऊन आईवडिलांना भेटून यावें असें साहजिकच जगंधरला वाटलें व मुक्तामयीच्या अनुमतीनें तो त्या मण्याच्या सहाय्यानें स्वदेशीं आला.

परंतु तिकडे स्वदेशीं जगंधर निघून गेल्यापासून त्याचे आईवडील काळजींत पडले. तो कोठें गेला हें कोणालाच कांहीं माहीत नव्हतें. पुष्कळ शोध केला पण त्यांचा थांगपत्ता लागला नाहीं. पुत्रविरहानें बापानें अंथरूण धरलें. अनेक वैद्य आले व त्यांनीं नानाप्रकारचें औषध पाणी करून पाहिलें. पण गुण पडला नाहीं. म्हाताऱ्याचा अंतकाल जवळ येऊन ठेपला. गादीला कोणी वारस नाहीं.

सुदैवानें त्या परिस्थितींत जगंधर परत आलेला पाहून सर्वांस परमानंद झाला. मुलाला पाहून बापाला पुनर्जन्मच मिळाला. मुलाकडून घडलेला सर्व वृत्तांत ऐकून म्हातारा म्हणाला—"आतां जें झालें तें झालें. सर्व विसरून जा. तूं भूलोकांत राहून राज्य करणार तेव्हां मानवजातींतच लग्न करून घेऊन राज्य करावें. पुढें प्रजेचा भार तुझ्या शिरावरच येऊन पडणार. माझ्या मनःशांती-करितां तरी तूं हें करावें."

परंतु जगंधर बापाला म्हणाला—"या आयुष्यांत मी एक पत्नीव्रत घेऊनच राहणार. मुक्तामयीच माझी पत्नी! मी इतर कोणत्याहि स्त्रीशीं विवाहास तयार नाहीं."

"तर मग तिलाच घेऊन ये आणि राज्यभार सांभाळ." वृद्ध राजा म्हणाला.

जगंधरनें विचार केला कीं मुक्तामयी त्याची मनःस्थिति ओळखून भूलोकांत येऊन राहायला तयार होईल. तो मत्स्यलोकांत



गेला व सर्व वृत्त सांगून भूलोकांत चलायला त्यानें मुक्तामयीजवळ विनंति केली. मुक्तामयी सर्व ऐकून म्हणाली—"तर मग वडिलांच्या इच्छेप्रमाणें एका मानव स्त्रीशीं विवाह करून राज्य करण्यास काय हरकत आहे?"

"ती गोष्ट अशक्य! तुझ्याशिवाय आतां माझें प्रेम कोणावर बसणार? दुसरें लग्न करण्याचा विचारच माझ्या मनांत येत नाहीं. पण भूलोकांत यायला तुला काय हरकत आहे?" जगंधरनें तिला विचारलें. मुक्ता-मयीच्या आईवडिलांनीं देखील जगंधरचेंच अनुमोदन केलें.

"बरें तर चला!" असें म्हणत मुक्तामयी आपल्या प्रियकराबरोबर भूलोकीं जायला निघाली. चंपा सरोवराच्या काठावर पाय ठेवतांच फणीमुखानें दिलेल्या शापामुळें ती प्रस्तर-मूर्ति होऊन गेली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला— "राजा! मला हें कळत नाहीं कीं माहीत असून मुक्तामयी शापाला कां बळी पडली? शापाची गोष्ट तिनें जगंधरला सांगितली असती तर त्यानें तेथवर स्थिति आणून दिली नसती? याचें उत्तर माहीत असून दिलें नाहींस तर तुला परिणाम माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर लोळूं लागतील."

"दोन कारणें आहेत याला. जगंधरचें प्रेम तिला सर्वोपरि वाटत होतें. कारण तो दुसऱ्या लग्नास तयार झाला नाहीं. तिनें आपल्या शापाची गोष्ट सांगितली असती तर जगंधर आपलें राज्य सोडून मत्स्य-लोकांतच कायमचा राहूं लागला असता. बायकोच्या प्रेमासाठीं पतीनें कर्तव्यच्युत व्हावें ही गोष्ट कोणत्या पतिव्रतेला आवडेल? म्हणून या संकटांतून तोड म्हणून शापाला बळी जाणें हाच एक उपाय तिला दिसला. दुसरें कारण असें कीं तिला पतिप्रेम मिळालें होतें व दोन मुलें पण झालीं होतीं. त्या नंतर हजार वर्षें जरी ती पतीबरोबर राहाली असती तर निराळें सुख काय लाभलें असतें?"

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतावरोबर अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# पापमुक्ति

सत्ययुगांत पृथ्वीवर सर्वत्र अरण्यें होतीं. त्यांत ऋषी व मुनी रहात. दस्यु राक्षस पण रहात. एक विदस्यु नांवाचा एक दस्यु रानांत रहात असे. येणाऱ्या जाणाऱ्यांना लुटून स्वतःचा उदरनिर्वाह करणें हा एकच धंदा तो करीत असे. ऋषी मुनींकडे काय असणार? म्हणून त्यांना त्याचा कधीं त्रास झाला नाहीं.

सुमनाक नांवाचे एक मुनि होते. त्यांनीं इंद्राचें स्तवन करून अनेक ऋचा लिहिल्या. इंद्राचें स्तोत्र फक्त सुमनाकच आपल्या ऋचांत करीत असे. म्हणून इंद्राची त्याच्या-वर फार कृपा असे. इंद्र वर्षांतून एकदां सुमनाक मुनींच्या दर्शनास येत असे.

इंद्रानें एकदां सुमनाक मुनींना वर द्यायचें ठरवून म्हटलें—"मुनिवर! काय वाटेल तो वर मागून घ्यावा!" पण सुमनाकनें स्वतःसाठीं कांहीं एक न मागतां हा वर मागितला कीं देवा, तूं माझ्या हितासाठींच वर मागायला सांगत आहेस तर एक वर दे. सर्व जग सुखी व्हावें.

सुमनाकनें मागितलेल्या वरामुळें त्याच्या-विषयीं इंद्राच्या मनांत आदरभाव जास्तच वाढला. आतां तो दरवर्षी दोनदां सुमना-काच्या भेटीला येऊं लागला व सुमनाक नवीन ऋचा रचून त्याचें स्तवन करूं लागला.

सुमनाक एका जागीं आश्रम बांधून रहात नसे. तो इंद्राचें स्तवन करीत ऋचा म्हणत गांवोगांवीं हिंडत असे.

एकदां इंद्र सुमनाकला भेटायला आला तेव्हां त्याचा आदर करण्याच्या हेतूनें

सौ. शामला सरदेसाई

बरोबर एक किरीट व रत्नहार घेऊन आला. इंद्राच्या आग्रहानें सुमनाकनें तो किरीट व रत्नहार घातले. परंतु त्यामुळें त्याच्यावर एक प्राणांतिक संकट ओढवलें.

एकदां सुमनाक विदस्यु ज्या रानांत रहात असे त्या रानांत आला. त्याच्याजवळ किरीट व रत्नहार पाहून विदस्यूला त्यांचा मोह आवरला नाहीं व त्यानें सुमनाककडून ते हिसकावून घेण्याचा यत्न केला. इंद्रानें दिलेलें पारितोषिक तें, सुमनाक गप्प कसा बसणार? त्यानें प्रतिकार केला. म्हणून विदस्यूनें त्याला ठार करून बळजबरीनें दोन्ही वस्तू त्याच्याकडून घेतल्या. परंतु मरतेवेळीं सुमनाक विदस्यूला म्हणाला–"माझा वध केल्याचें पाप तुला लागलें आहे. पण तूं खरें बोललास तर तुझें हें पाप धुवून निघेल व तुला पापमुक्ति लाभेल."

शाप देण्याऐवजीं ऋषीनें पापमुक्तीचा तो आशीर्वाद दिलेला ऐकून विदस्यूला आश्चर्य वाटलें. त्यानें विचार केला, हा मुनि कोणीतरी विक्षिप्तच दिसतो आहे. एक तर ऋषी किरीट किंवा रत्नहार घालीत नाहींत. हा दोन्ही घालतो. त्यांसाठीं मी याचा वध केला तर त्याबद्दल राग करण्या ऐवजीं त्यानें मलाच सत्य-वचन पालन करण्याचा उपदेश केला व त्यामुळें पापमुक्ति लाभेल असें देखील सांगून गेला."

सुमनाककडून मिळविलेला किरीट व रत्नहार घालून विदस्यु रानांत हिंडूं लागला.

पुढें कांहीं दिवसांनीं सुमनाकचा आवाज ऐकूं न आल्यामुळें इंद्र त्याच्या शोधार्थ निघाला. त्याला विदस्यु भेटला. त्याच्याजवळ तो किरीट व रत्नहार इंद्राला दिसले. त्यानें विदस्यूला विचारलें–"तुला हा किरीट व रत्नहार कोठून मिळाले?"

विदस्यु म्हणाला–"तूं मला म्याल्या-शिवाय असा प्रश्न विचारीत आहेस यावरून तूं इहलोकांतला दिसत नाहींस."

इंद्रानें स्वतःचा परिचय दिला व म्हणाला–"मी आपला भक्त सुमनाक मुनि यांच्या शोधार्थ हिंडत आहें. त्यांना मी हे किरीट व रत्नहार दिले होते."

"माझें नांव विदस्यु आहे. मी तुझ्या त्या भक्ताला ठार करून त्याच्याकडून हे बळजबरीनें घेतले आहेत." विदस्यु म्हणाला.

इंद्राला राग येण्याऐवजीं आश्चर्य वाटलें. इंद्र विदस्यूला म्हणाला–"मी कोण हें व





मुनि माझे भक्त होते हें माहीत असून देखील तूं साहस करून खरें बोललास या बद्दल मला आश्चर्य वाटत आहे."

"त्याचें कारण सुमनाक मुनीच! प्राण सोडतांना त्यांनीं मला उपदेश दिला होता कीं नेहमीं खरें बोलत जा. खरें बोलण्याची मला संवय नाहीं उलट खोटें बोलण्याचा धंदाच मी करीत आलों. मी कित्येक खून केले दरवडेखोरी केली. परंतु तुझ्या भक्तानें मला उपदेश केला तेव्हांपासून मी सत्यवचन पालन करीत आहें. आतां खोटें बोलण्यांत भितरेपणा आहे असें मला वाटतें."

तें ऐकून इंद्र रडूं लागला. तें पाहून विदस्यूनें चकित होऊन विचारलें—"इंद्रा! तुला रडायला काय झालें?"

"माझा भक्त व मित्र सुमनाक याचा वध तूं केला नसून तो माझ्याच हातून घडला. तूं एक निमित्त मात्र झालास. मी किरीट व रत्नहार देऊन ते घालण्याचा आग्रह केला नसता तर मुनींचा वध करण्याची दुर्बुद्धि तुला झाली नसती. तुझें सत्यवचन ऐकून मला आनंद झाला. काय वाटेल तो वर माग!" इंद्र म्हणाला.

"त्या मुनीनें खरें बोलण्यास सांगितलें म्हणून मी खरें बोलत आलों. पापमुक्ति मिळावी अशी इच्छा माझ्या मनांत केव्हांहि उद्भवली नाहीं. आतां तूं वर देणारच असशील तर माझ्या वंशांत एक ब्रह्मज्ञानी जन्मास यावा असा वर दे!" विदस्यूनें वर मागितला.

इंद्र "तथास्तु!" म्हणाला.

विदस्यूच्या वंशांत कठ नांवाचा एक ब्रह्मज्ञानी जन्मास आला व त्यानें आपल्या वंशाचें नांव उजागर केलें.





# मित्राबरोबर पैज

एका गांवीं गुणाकर व धनाकर नांवाचे दोन मित्र रहात असत. गुणाकर स्वभावानें अगदीं भोळा होता तर धनाकर वस्ताद. गुणाकरला वडिलोपार्जित जमीन-जमुला, राहातें घर व कांहीं संपत्ति मिळाली होती. त्यावर त्याचा संसार सुखानें चाले.

धनाकर व्यवहारकुशल होता. गोड बोलून स्वतःचें काम करून घेणें त्याला छान साधत असे. कोणाकडून पैसे काढून घ्यायचे तर ते देखील देणाऱ्याच्या मनाला दुखवल्या-शिवाय कसे घ्यावे हें त्याला चांगलें माहीत होते.

धनाकर आपल्या मित्रमंडळींसह गुणा-करच्या घरीं येऊन बसे. गप्पागप्पांत ते पैज लावीत व कोणी जिंकला कीं हारणारा पैज लावलेली वस्तु देई. कधीं कोडीं सोडवणें. कधीं व्यवहारांतले प्रश्न करणें अशाच गोष्टींसाठीं ते पैज लावीत.

गुणाकर स्वभावानें जितका भोळा होता तितकीच त्याची बायको व्यवहारांत हुशार होती. तिनें पुष्कळदां नवऱ्याला सांगून पाहिलें कीं या मित्राच्या नादीं लागूं नका. केव्हां गोत्यांत सांपडवील सांगतां येत नाहीं. पण गुणाकरचा दरवाजा धनाकर व त्याच्या मित्रमंडळीस नेहमीं उघडाच असे.

एकदां धनाकरनें गुणाकरला फस-विण्याचा घाट घातला. चार मित्र हजर असतां तो गुणाकरला म्हणाला—"मित्रा! आपण लहान मुलांसारख्या रोज पैजा मारतो. पण आज आपण समजूतदार मोठ्या माणसासारखी एक पैज लावूं या. मी तुला एक प्रश्न करतों. तूं त्याचें बरोबर

श्री. शा. वा. बोराळे



उत्तर दिलेंस तर मी आपलें घरदार व सर्व संपत्ति तुझ्या नांवीं लिहून देतों. तूं उत्तर दिलें नाहींस तर तुला आपलें सर्वस्व लिहून द्यावें लागेल."

पण मित्र म्हणाले—"हें बघ धनाकर! प्रत्येक वेळीं तूंच प्रश्न करणारा कोण रे? गुणाकर देखील एक प्रश्न करील तुला!"

धनाकर म्हणाला—"कबूल! मी प्रश्न केल्यानंतर त्यानें उत्तर द्यावें. कोण जिंकला हें ठरेल व त्यानंतर त्यानें पाहिजे तो प्रश्न करावा. मी त्याला कबूल आहें. मी हारलों तर आपलें घरदार त्याच्या नांवीं लिहून द्यायला तयार आहें."

ती गोष्ट त्याला सरळ व सोपी वाटली व तो ती पैज लावायला तयार झाला.

धनाकरनें ठरल्याप्रमाणें प्रथम प्रश्न केला—"भाताच्या शेतीला नांगर खोल चालवला पाहिजे कीं वरवर!"

गुणाकरला व्यवहारज्ञान मुळींच नव्हतें. त्यानें अंदाजानें उत्तर दिलें—"नांगर खोल चालवला पाहिजे."

"चूक! उसाच्या लागवडीसाठीं खोल खणावें लागतें. भाताच्या शेतीला खोल नांगरण्याची गरज नसते!" धनाकर म्हणाला.

त्याचे मित्र देखील म्हणाले कीं गुणाकरचें उत्तर चूक आहे. ते म्हणाले—"तूं आपलें घरदार धनाकरला वचन दिल्याप्रमाणें दिलें पाहिजेस. पण तुला सुद्धां प्रश्न करण्याचा अधिकार आहे. तूं प्रश्न विचार!"

गुणाकरनें विचारलें—"खायचीं पानें झाडाला लागतात कीं वेलाला?"

धनाकरनें बरोबर उत्तर माहीत असून चेष्टेनें उत्तर दिलें—"झाडाला!"





"चूक! झाडाला नाहीं वेलाला लागतात!" गुणाकर ओरडला.

"धनाकर हारला!" सर्व मित्र म्हणाले. नंतर ते धनाकरला म्हणाले—"पहिली पैज तूं जिंकलास म्हणून गुणाकराचें घरदार व संपत्ति तुला मिळेल. पण गुणाकर दुसरी पैज जिंकला म्हणून तुझें घरदार व संपत्ति त्याची झाली. दोघे आपापल्या घरादारांची अदलाबदल करा."

गुणाकरनें ती गोष्ट घरांत जाऊन बायकोला सांगितली. ती म्हणाली—"ही काय पैज झाली? तुम्ही त्यांना जाऊन सांगा, मला हें सर्व कबूल नाहीं. हा अन्याय आहे."

गुणाकरनें बाहेर येऊन बायको संपत्तीची अदलाबदल करण्यास कबूल नसल्याचें सांगितलें.

धनाकर व त्याचे मित्र म्हणाले—"हें पहा गुणाकर! तूं वचन दिल्याप्रमाणें निमूटपणें आपलें घरदार धनाकरच्या स्वाधीन केलें नाहींस तर धनाकरला न्यायालयांत जाऊनच निवाडा घ्यावा लागेल."

शेवटीं भांडण विकोपास गेलें व धनाकरनें न्यायाधिशाकडे फिर्याद दाखल केली. दोघे न्यायालयांत हजर झाले. साक्षीपुरावा ऐकून न्यायाधिशानें धनाकरला विचारलें—"तूं आपली फिर्याद परत घेतोस कीं तुला निवाडा ऐकावयाचा आहे!"

"मला निवाडा ऐकावयाचा आहे." धनाकर ऐटींत म्हणाला. न्यायाधिशानें गुणाकरची पण जबानी घेतली. त्यानें खरें खरें तें सर्व सांगितलें व तें सर्व बरोबर असल्याचें धनाकर व त्याच्या साक्षीदारांनीं कबूल केलें.

तेव्हां न्यायाधीश म्हणाला—"तूं आपली पैज पहिल्या खेपेस हारलास म्हणून तुला आपलें सर्व घरदार धनाकरच्या नांवीं लिहून

दिले पाहिजेस." असें सांगून न्यायाधिशानें त्याच्यासमोर कोर्टाचा कागद ठेवला. गुणाकरनें निरुपाय होऊन सर्व घरदार धनाकरच्या नांवीं लिहून दिलें. न्यायाधीश तो कागद धनाकरच्या हातीं देत म्हणाला—"पहा बरोबर आहे ना?" त्यानें होकार दिल्यावर न्यायाधीश म्हणाला—"तूं दुसरी पैज हारलास म्हणून आतां तूं आपला सर्व मालमत्ता गुणाकरच्या नांवीं लिहून दे!"

"मी तो कागद लिहून ठेवला आहे. कोर्टानें पहावा!" धनाकरनें असें सांगून खिशां-तून एक कागद काढून कोर्टासमोर ठेवला.

न्यायाधीश तो वाचून म्हणाला—"हें पहा, तूं यांत फक्त आपलें घरदार व संपत्ति लिहून दिली आहेस?"

"होय! माझ्याकडे जें कांहीं होतें तें सर्व मी लिहून दिलें आहे!" धनाकर म्हणाला.

न्यायाधीश म्हणाला—"गुणाकराशीं लाव-लेल्या दुसऱ्या पैजेच्या वेळीं तूं गुणाकराच्या संपत्तीचा देखील मालक झाला होतास. तुझ्या संपत्तीबरोबर गुणाकराच्या संपत्तीची मालकी पण तुला मिळालेली होती. तेव्हां आपल्या कागदावर तूं स्वतःच्या जुन्या संपत्तीबरोबर गुणाकराकडून तुला मिळालेल्या सर्व संपत्तीचा देखील उल्लेख केला पाहिजेस. मी तुला विचारलें होतें कीं तूं फिर्याद परत घेणार कीं निवाडा पाहिजे! तूं निवाडा मागितलास. आतां तुला यांतून सुटका नाहीं. तुला आपलें सर्वस्व गुणाकराच्या नांवीं लिहून दिलेंच पाहिजे."

धनाकरला चांगलीच अद्दल घडली. तो स्वतःची सर्व संपत्ति घालवून बसला व त्यानें स्वतःचें जगहंसें करून घेतलें. त्यामुळें त्याला पर गांवीं जाऊन रहावें लागलें.





# दोन मुली

सौराष्ट्र देशांत एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. त्याचें भाग्य उफराटें होतें. तो आपलें सर्वस्व घालवून बसला. म्हातार-पणीं दारिद्र्यांत दिवस कंठायचें त्याच्या नशिबीं लिहिलें होतें. एक म्हातारपण व त्यांत गरिबी. त्याला एकुलती एक नात होती. बारा वर्षें वय असेल तिचें. स्वतःचा व तिचा उदरनिर्वाह कसा चालावा हीच काळजी म्हाताऱ्याला होती. नातीचें नांव सौदामिनी होतें. तो नातीला बरोबर घेऊन एका झोंपडींत जाऊन राहूं लागला. दोघांचीं पोटें कशीतरी भरत होतीं.

हळू हळू म्हाताऱ्याला वाटूं लागलें कीं त्याच्या एकट्याच्या मिळकतीवर दोघांचीं पोटें भरणें अशक्य आहे. म्हणून म्हाताऱ्यानें एका श्रीमंताच्या घरीं सौदामिनीला कामाला लावून दिलें. त्या श्रीमंत गृहस्थाचें नांव विश्वंभर असें होतें. तो म्हणाला—"तुम्ही काळजी करूं नका मुलीची. मी तिला स्वतःच्या मुलीहून जास्त पाहीन व ती मोठी झाल्यावर चांगलें घरदार पाहून तिचें लग्न देखील करून देईन."

सौदामिनी काम करण्यांत हुशार होती. तिला कामाची संवय होती व अंगांत आळस मुळींच नव्हता. म्हणून सर्व कामें छान करी. कधीं कोणाला तक्रार करायला तिनें जागा ठेवली नाहीं. म्हातारा मधून मधून नातीला भेटून येई. चार वर्षांनीं म्हाताऱ्यानें इहलोकाला रामराम ठोकला. आतां सौदामिनीला विश्वंभरच्या कुंटुंबाखेरीज आपलें असें कोणी राहालें नाहीं.

सौ. नलिनी सावकार



विश्वंभर स्वभावानें फार चांगला होता. पण त्याची बायको स्वभावानें फार खाष्ट बाई होती. तिला एक मुलगी होती. तिचें नांव चंद्रावळी असें होतें. ती दिसायला बेताचीच होती. उत्तमोत्तम पातळें नेसून दागिने घातले तरी सौदामिनीच्या रूपासमोर तिचें रूप फिकें पडे. हें पाहून विश्वंभरच्या बायकोला हेवा वाटे. सौदामिनी चंद्रावळीच्या बरोबरीनें खात पीत राहाली तर कांहीं दिवसांनीं चंद्रावळीहून ती जास्त सुंदर दिसेल असा विचार करून तिनें सौदामिनीला गुरें चरायला घेऊन जायला सांगितलें.

सौदामिनी शिळा भात खाऊन गुरांना घेऊन रानांत जाई. शेणगोठा, गाईम्हशी धुणें, भांडीं घासणें कपडे धुणें वगैरे कामें तिला करावी लागत. उन्हातान्हांत हिंडून सर्व तऱ्हेचीं कामें करीत राहल्यानें ती थोडी काळंवडली व अशक्तपण झाली. फाटकी मळकी लुगडीं गुंडाळून वेणीफणी केल्या-शिवाय तिला काम करावें लागे. म्हणून त्या वयांत तिचें सौंदर्य वाढण्या ऐवजीं कमी होऊं लागलें.

विश्वंभरच्या पत्नीच्या मनाचें तेव्हां कोठें समाधान झालें. परंतु विश्वंभरला मात्र बायकोनें सौदामिनीला अशा तऱ्हेनें वाग-वलेलें मुळींच आवडत नसे. पण तो कधीं एका शब्दानें बायकोला बोलला नाहीं.

सौदामिनी कष्ट सहन करण्याची संवय झाली होती. एकदां ती गुरें रानांत घेऊन गेली. गुरें एका बाजूला चरत होतीं. ती बरोबर आणलेली भाकरी काढून खायला बसली. तिनें आपल्या गाई मोजून पाहाल्या. त्या गाईंत तिला यमुना नांवाची गाय दिसली नाहीं. सौदामिनीनें भाकरी तशीच उचलून ठेवून दिली. तिला खाणें पिणें सुचेना. "यमुना....यमुना...."



अशी ओरडत संध्याकाळपर्यंत सर्व रान पालथें घातलें. पण यमुना गाय दिसली नाहीं. शेवटीं निराश होऊन संध्याकाळीं इतर गाईंना घेऊन ती घरीं परतली. तिनें मालकिणीला यमुना दिसत नसल्याचें जाऊन सांगितलें. तें ऐकून विश्वंभरच्या बायकोनें तिला त्या रात्रीच्या वेळीं घराबाहेर काढलें व म्हणाली—"मिळत कशी नाहीं ? जा, काढ हुडकून. ती मिळाली तरच घरीं परत ये !"

काळोख्या रात्रीं सौदामिनी पुन्हां रानांत गेली. ती रात्रीच्या वेळीं काळोखांत "यमुना....यमुना...." अशी ओरडत रानांत हिंडत होती. तिच्या हांकेला जणुं कांहीं उत्तर म्हणून कोठून तरी 'हम्मा' असा आवाज ऐकूं आला. सौदामिनीच्या जिवांत जीव आला. आवाजाच्या अनुरोधानें ती जाऊं लागली. तिला त्या बाजूला एक झोंपडी दिसली. झोंपडीच्या चारी बाजूला दाट झाडी होती व झोंपडीसमोर यमुनेला कोणीतरी बांधून ठेवलें होतें. सौदामिनी गाईजवळ गेली व तिच्या अंगावर हात फिरवून तिला गोंजारलें. इतक्यांत झोंपडीं-तून तिला कोणीतरी विचारलें—"गाईकरितां आली आहेस होय ? आंत ये तर !"



सौदामिनी आंत गेली. तिला तेथें तिघे खुजे दिसले. दिसायला तिघे कुरूपच होते. सौदामिनी चकित होऊन त्यांच्याकडे पहात असतां एकानें विचारलें—"अशी काय पाहतेस आमच्याकडे ? भ्यालीस वाटतें आम्हांला पाहून ?"

"नाहीं बुवा ! मी आपल्या गाईला घेऊन जायला आलें आहें." सौदामिनी निर्भीकपणें म्हणाली.

"ती रानांत हिंडत होती. आम्ही तिला घेऊन आलों म्हणून ती वांचली, नाहींतर केव्हांच वाघानें तिला खाऊन टाकलें असतें.



तूं घेऊन जा आपल्या गाईला. पण हें पहा, आम्हांला जो कोणी भेटायला व पाहायला येतो तो परत जातेवेळीं आला होता तसा जात नाहीं. आम्ही त्याचें रूप बदलून टाकतों." असें सांगून एका खुजानें सौदामिनीला हात धरून आपल्या शेजारीं बसविलें. तिच्या डोक्यावर हात फिरविल्याबरोबर तिचे सर्व केस गळून पडले.

तो खुजा तिला पाहून हंसत म्हणाला– "पहा आतां तूं किती सुंदर दिसतेस ती!"

दुसरा खुजा म्हणाला–"तिला असें विद्रूप केल्यानें तुला काय मिळालें?"

"तूं रागावली आहेस का आमच्यावर? खरें खरें सांग!" एक खुजा म्हणाला.

"नाहीं बुवा! तुम्ही माझ्या गाईचें रक्षण केलेंत मग मी कां रागावेन?" सौदामिनी म्हणाली.

"तर मग आम्हांला कांहींतरी खायला दे!" पहिला खुजा म्हणाला.

तेव्हां सौदामिनीला आपल्या भाकरीची आठवण झाली. तिच्या खांद्यावरच होत्या भाकऱ्या बांधलेल्या. तिनें शिधोरी सोडली व भाकरी देत म्हणाली–"ही इतकी चांगली नाहीं."

"कांहीं हरकत नाहीं! चला आपण खाऊन तर पाहूं!" असें सांगून त्यानें भाकरीचे चार वांटे केले. तिघांनीं तीन वांटे घेतले व सौदामिनीला एक वांटा दिला.

भाकरी खात एक खुजा म्हणाला– "फार छान आहे बुवा!"

"आज तूं आम्हांला आमच्या आवडीचें पक्वान्न खायला दिलेंस. असें म्हणत दुसऱ्या खुजानें सौदामिनीच्या डोक्यावर हात फिरवला. त्या बरोबर सौदामिनीच्या डोक्याला सर्व केस आले. तिचें रूप एकदम पालटून गेलें व ती अप्सरेसारखी सुंदर दिसूं लागली. तिसऱ्यानें तिच्या गळ्यावर बोट फिरवून तिला म्हटलें–"गाणें म्हण बघू कांहींतरी!"

सौदामिनीला पण गावेंसें वाटलें व ती गाऊं लागली तेव्हां तिचा गळा कोकिळेसारखा गोड झालेला पाहून तिलाच फार आश्चर्य वाटलें. रानांतलीं जनावरें तो गोड आवाज ऐकून गाणें ऐकायला तेथें जमा झालीं.

अशा तऱ्हेनें अप्सरेसारखी सुंदर झालेली सौदामिनी गाईला घेऊन उजाडण्याच्या सुमारास घरीं परत आली. तिला पाहून मालकिणीनें तिच्यावर आग पाखडली. तिचा आवाज गोड झालेला ऐकून तर ती मनांतल्या मनांत जळफळूं लागली.

नवऱ्याला म्हणाली–"ऐकलेंत का ती काय म्हणाली तें! रानांतल्या तीन खुजांनीं तिला हें रूप व गोड अवाज दिला, म्हणें. आपण चंद्रावलीला घेऊन जाऊं त्यांच्याकडे!"

त्याप्रमाणें मालकिणीनें पुष्कळशीं पक्वान्नें तयार केलीं व नवऱ्याबरोबर रात्रीं मुलीला घेऊन रानांत गेली. सौदामिनीनें ते खुजे कोठें राहतांत त्या जागेच्या खाणाखुणा नीट





समजावून सांगितल्या होत्या. त्यांच्या अनुरोधानें तिघं त्या झोंपडीजवळ येऊन पोंचलीं. नवराबायको दूर उभी राहालीं व मुलीला झोंपडीजवळ पाठवून दिलें.

चंद्रावलीनें झोंपडींत डोकावून पाहिलें. खुजे आंत बसले होते. त्यांनीं तिला आंत बोलावल्यावर ती आंत गेली. एका खुजानें तिला विचारलें—"काल आलेल्या मुलीनें सांगितलें वाटतें ? म्हणून आलीस ना ?"

"होय ! मी तुमच्यासाठीं उत्तम पक्वान्नें घेऊन आलें आहे. मला तिच्याहून जास्त सुंदर करा !" चंद्रावली म्हणाली.

"नवें रूप हवें असेल तर प्रथम हें आहे हें देखील नष्ट करावें लागेल. ये, जवळ येऊन बस माझ्या." दुसरा खुजा म्हणाला. त्यानें तिच्या डोक्याखांद्यावर हात फिरवल्याबरोबर तिचे सर्व केस गळून पडले व ती काळवंडली.

चंद्रावली तें पाहून घाबरून गेली आणि रडूं लागली. खुजांना शिवीगाळ करून ती आपल्या आईवडिलांकडे धांवत आली. खुजांनीं तिनें आणलेलीं पक्वान्नांची टोपली फेंकून दिली. ती सरळ विश्वंभर व त्याची बायको बसलीं होतीं तेथें येऊन पडली.

आईबाप मुलीचें तें विकृत रूप पाहून फार दुःखी झालीं. "खोटें सांगून आम्हांला फसविलें वाटतें सौदामिनीनें ?" विश्वंभरची बायको म्हणाली. घरीं आल्याबरोबर तिनें रागाच्या भरांत सौदामिनीला घराबाहेर काढलें.

रात्रीची वेळ होती. कोठें जावें कळेना बिचारीला. गोठ्यांत एका कोपऱ्यांत लपून बसली. आईवडील झोंपल्यावर चंद्रावली रात्रीं हळूच घराबाहेर पडली. तें भयंकर रूप कोणाला दाखविण्यापेक्षां आत्महत्या करून मोकळें होण्याचा तिनें निश्चय केला होता.

सौदामिनीनें तिला पाहालें व जवळ येऊन विचारलें—"कोठें निघालीस ?"

"हें रूप घेऊन जिवंत राहण्यापेक्षां कोठें तरी जीव देऊन मोकळें व्हावेंसें वाटत आहे." चंद्रावली म्हणाली.

"तुझें हें रूप पाहून तुलाच काय मला देखील फार वाईट वाटत आहे. मरायचेंच आहे तर दोघी एकदम जीव देऊं. पण त्या आधीं त्या खुजांना भेटून येऊं." सौदामिनी म्हणाली.

दोघी खुजांच्या झोंपडीजवळ गेल्या. सौदामिनी त्यांना म्हणाली—"माझ्यासारखीच हिला पण सुंदर रूपवती करून द्या ! नाहींतर आम्हा दोघींचा जीव घ्या !"

"तुझ्या प्रमाणें हिनें आमच्या बोलण्यावर विश्वास केला नाहीं. ती पळून गेली. आम्ही हावरे उपाशी पोटासाठीं हें सर्व करतों असें तिला वाटलें असेल. पण आतां तुझ्या सांगण्यावरून तिला आम्ही तुझ्या सारखेंच सुंदर रूप व गोड आवाज देतों." त्याप्रमाणें त्यांनीं चंद्रावलीच्या अंगाखांद्यावर एकदां हात फिरवल्याबरोबर तिला अप्सरेसारखें सुंदर रूप आलें. दुसऱ्या खुजानें तिच्या गळ्याला स्पर्श केल्याबरोबर तिचा आवाज कोकिळेसारखा झाला. तो त्यांना म्हणाला—"आतां दोघी गाणें म्हणा."

दोघींनीं गाणें म्हणून त्या खुजांना संतुष्ट केलें व उजाडल्यावर घरीं आल्या. सौदामिनीनें दाखविलेलें औदार्य पाहून मालकिणीचा राग नाहींसा झाला व तिनें स्वतः नवऱ्याला सांगून सौदामिनीचें थाटामाटानें लग्न करून दिलें. पुढें कांहीं दिवसांनीं चंद्रावलीचें देखील लग्न झालें.





# भाग्य बलवत्तर

मगध चक्रवर्तींपैकीं एकाचें नांव वीरसेन असें होतें. त्यानें आपल्या शौर्यानें आपलें साम्राज्य वाढविलें. म्हणून त्याच्या दरबारीं मोठमोठे कवि येऊन राहूं लागले. राजाच्या शौर्याचें व पराक्रमाचें वर्णन करून त्यांनीं मोठीं कीर्ति संपादन केली व पारितोषिकें मिळविलीं.

एकदां पांचाल देशांतून विष्णुशर्मा नांवाचा एक विद्वान कवि मगध देशांत आला. एका अधिकाऱ्यानें त्याला आपल्या घरीं पाहुणा म्हणून ठेवून घेतलें. दुसऱ्या दिवशीं तो अधिकारी विष्णुशर्माला दरबारांत घेऊन गेला. राजानें नव्या कवीचा सत्कार करून त्याला सन्मानपूर्व बसायला सांगितलें.

नित्याप्रमाणें दरबारांतल्या कवींनीं राजाची स्तुति करून कविता म्हणून दाखविली. विष्णुशर्मानें देखील त्याचें यशगान करून कविता रचावी या हेतूनें राजानें कविता म्हणून दाखविणारांस मोठमोठीं पारितोषिकें देऊन त्यांचा सत्कार केला. विष्णुशर्मा हें सर्व पहात होता. परंतु त्याला हें सर्व आवडलें नाहीं. त्यानें दरबारांत उभा राहून ही कविता म्हटली—

"येन यत्रैव भोक्तव्यं,
सुखं वा दुःखमेववा
स तत्र बध्वा रज्जैव,
बलाद्दैवेन नीयते।"

(तात्पर्य: ज्याला जेथें सुख किंवा दुःख अनुभवायचें असतें तेथें त्याला भाग्य जणुंकांहीं दोरीनें बांधून ओढून नेतें.)

या श्लोकांत राजाची प्रशंसा नव्हती. थोडें व्यंग्यच होतें. म्हणून सर्वांना वाटलें कीं आतां राजा रागावणार. पण राजा मंत्र्याला बोलावून त्याला म्हणाला—"या पंडिताला देखील त्याच्या दर्जाप्रमाणें पारितोषिक देऊन त्याचा 'सत्कार' करावा."

मंत्र्यानें राजाज्ञेप्रमाणें एका कागदावर जें लिहावयाचें होतें तें लिहून राजासमोर सही करून मोहर लावण्यासाठीं कागद पुढें केला. राजानें सही करून मोहर लावली व चिट्ठी बंद करून विष्णुशर्माला दिली.

मंत्री म्हणाला—" ही चिठ्ठी खजीनदारांना दाखवा. आपल्याला इनाम मिळेल."

दरबार संपल्यावर ज्या अधिकाऱ्याकडे विष्णुशर्मा उतरला होता तो अधिकारी त्याला म्हणाला—"आपल्याला जें पारितोषिक मिळालें आहे तें खजिन्यांत जाऊन मी घेऊन येतों. मला खजिन्यांत ओळख द्यायची सुद्धां गरज नाहीं. तुम्ही घरीं चला. मी पारितोषिक घेऊन येतों पाठोपाठ."

त्या पारितोषिकांत आपला वांटा उचलण्याच्या हेतूनेंच त्यानें हा सर्व घाट घातला होता. राज्यांतल्या सर्व अधिकाऱ्यांना ही गोष्ट माहीत होती. प्रत्येक जण मधल्यामधें पैसे उकळण्याचा धंदा करी. म्हणून नवीन कोणी गांवांत आला कीं अधिकारी त्याला आपल्या घरीं आग्रह करून ठेवून घेत.



तो अधिकारी विष्णुशर्माला मिळालेली चिठ्ठी घेऊन खजिन्यांत गेला. खजिनदाराला भेटून ती चिठ्ठी त्याला दिली. त्या चिठ्ठींत लिहिलेला मजकूर येणें प्रमाणें होता—

"ही चिठ्ठी घेऊन येणाऱ्याला कैद करावें व उद्यां सूर्योदयापूर्वी त्याचा शिरच्छेद करावा. ही गोष्ट ह्या कानाची त्या कानाला कळतां कामा नये."

चिठ्ठींतील मजकुराप्रमाणें त्या अधिकाऱ्याला कैद करण्यांत आलें.

सौ. शांता नेमाडे

दुसऱ्यादिवशीं पहाटे राजा स्वत: कैद्याला भेटण्यासाठीं आला. काळोखामुळें विष्णुशर्माच्या जागीं तो अधिकारी बसलेला न कळून राजानें विचारलें—" काल दरबारांत तूं श्लोक म्हटला होतास त्याच्या विषयीं आतां तुझें काय म्हणणें आहे ?" परंतु तो विष्णुशर्मा नसून राज्याचा एक प्रमुख अधिकारी आहे हें कळल्यावर राजानें चकित होऊन विचारलें—" हें काय ? तूं येथें कसा ?" अधिकाऱ्यानें खरें खरें तें सांगून आपला अपराध स्वीकार केला व माफी मागितली.

" तुझ्या मूर्खपणामुळेंच हें सर्व झालें. तूं जा घरीं आणि त्या विष्णुशर्माला घेऊन ये. म्हणावें, राजा स्वत:च्या हातानें पारितोषिक देणार आहे." राजा म्हणाला.

त्या अधिकाऱ्यानें राजाच्या आज्ञेप्रमाणें विष्णुशर्माला पाठवून दिलें.

राजाला राग आला आहे ही गोष्ट विष्णुशर्माला मुळींच माहीत नव्हती. तो संध्याकाळपर्यंत राजाच्या बरोबरच होता. रात्रीं राजा त्याला बरोबर घेऊन रानांत गेला. निर्जनस्थानीं त्याचा वध करण्याचा राजाचा हेतु होता. परंतु राजाच्या घोड्याच्या वाटेवर एक विषारी सांप आडवा आला. घोडा घाबरून मागच्या पायांवर उभा राहिला. राजा घोड्यावरून खालीं पडला व त्याच्या पाठीचा कणाच मोडला. नोकर राजाला घरीं घेऊन गेले. विष्णुशर्मानें म्हटलेला श्लोक राजावरच लागू पडला. खुशामत करण्याऐवजीं खरें बोलणाऱ्या विष्णुशर्मावर राजानें खूष होऊन त्याला मोठें पारितोषिक दिलें. त्या दिवसापासून खोटी खुशामत करणाऱ्या कवींना पारितोषिक देण्याचा प्रघात राजानें बंद केला.





# परोपकारी गोपाळ

एकदां रामराव आपल्या सुब्बाराव नांवाच्या नातेवाइकाकडे जेवायला गेले. दोघे जेवायला बसले. सुब्बारावानें पहिलाच घास तोंडांत घेतला असेल, घास कसातरी गिळला आणि बायकोवर ओरडला—" हें ग काय ! तांदूळ निवडले नाहींत वाटतें !

रामरावांनीं पण भातांत खडे असल्याचें ओळखलें. पण नुसतें एवढेंच विचारलें— " वहिनी !. तांदुळांत इतके खडे कसे काय आले बुवा ?"

" काय सांगूं भाऊजी ! दुकानांतून तांदूळ मागवितें. खडे दिसत देखील नाहींत. तांदुळाच्या रंगाचेच नेमके मेले कोठून आले आहेत कोणास ठाऊक ? एका तांदुळांतच खडे आहेत असें नाहीं. डाळींत, कडधान्यांत, प्रत्येकांत खडे आहेत. नेमके त्या रंगाचे खडे कसे मिळतात नकळे."

सुब्बाराव तापलेले होते. म्हणाले— " हल्लींच्या बायका झाल्या आहेत आळशी ! धान्य निवडणें त्यांच्याकडून होत नाहीं व दुकानदाराला शिव्या देत सुटतात."

पण रामरावांनीं हे खडे धान्यांत येतात कोठून याचा शोध काढण्याचें मनाशीं ठरविलें. ते दुकानदाराकडे गेले व त्याला विचारलें—" काय हो ? तुमच्याकडून जें धान्य न्यावें त्यांत खडेच खडे मिळतात. कारण काय ?"

वाणी म्हणाला—" काका ! आम्हीं बाजारपेठेंत आडत्याकडून धान्य घेऊन येतों आणि गिऱ्हाइकांना विकतों. आमचा आडती दानालाल नांवाचा सावकार आहे.

खड्यांचा व्यापार ] [ श्री. मा. गो. मोरे



त्यांच्याकडे जाऊन चवकशी करा. कदाचित काहीं कळेल!"

रामराव दानालाल शेठ कडे गेले व चवकशी केली. म्हणाले—"काय हो शेठजी! तुम्ही ज्यांना ज्यांना धान्याचा पुरवठा करतां त्या दुकानदाराकडचे गिऱ्हाईक धान्यांत खडे आहेत म्हणून तक्रार करीत आहेत."

दानालाल शेठ म्हणाला—"नाना! आमच्या आडतींत का धान्य पिकतें? आम्ही शेतकऱ्याकडून घेतों व तें दुकान-दाराला विकतों. आतां खडे कोठून येतात हें शेतकऱ्यांनाच ठावें."

रामरावांनीं जवळपासच्या खेडे गांवांत जाऊन शेतकऱ्यांकडे चवकशी केली. शेतकरी म्हणाले—"काका, अहो धान्य खडकांत का पिकतें खडे यायला? शेतें हात भर खोल नांगरून पाण्यासारखा अंगाचा घाम निथळून काम करावें तेव्हां धान्य पिकतें. धान्यांत माती आढळेल कदाचित. पण खडे कां यावेत?"

एका म्हाताऱ्या शेतकऱ्यानें रामरावांना बाजूला बोलावून नेलें आणि म्हणाला—"हें पहा, यांतलें गुपित मी तुम्हांला सांगतों. दानालालची लबाडी जोंपर्यंत तुमच्या लक्षांत येत नाहीं तोंपर्यंत तुम्हांला कळणार नाहीं हें सारें. ह्या दानालालनें निरनिराळ्या रंगाच्या खड्यांचीं कोठारें भरून ठेवलीं आहेत. दोन तीन टक्के खडे मिसळून तो धान्याचा व्यापार करतो. खडे विकून पैसा मिळविणें हा त्याचा धंदा आहे. त्याला धाक दपटशा दाखवून मार्गावर आणणें शक्य नाहीं. रात्रीं तो खडे मिसळतो त्या वेळीं छापा मारून पकडतां आलें तर चोर सांपडेल."

रामराव रात्रीं दानालालाच्या कोठाराकडे गेले, आणि खरोखरच दिवे लावून आंत धान्यांत खडे मिसळण्याचें काम चालू असल्याचें त्यांना आढळून आलें. त्यांनीं खिडकींतून डोकावून पाहिलें तेव्हां जें दृश्य त्यांना दिसलें तें पाहून तर ते थक्कच झाले. खडे वजन करून प्रमाणशीर मिसळण्याचा धंदा चालू होता. रामरावांना राहवलें नाहीं. ते ओरडून म्हणाले—"शेठजी! हा काय धंदा चालवला आहे, गिऱ्हाइकांचा जीव घ्यायचा?"



दानालाल थोडादेखील भ्याला नाहीं. 'चोराच्या उलट्या बोंबा' या न्यायानें ओरडला—"चोर आला आहे चोरी करायला, धरा त्याला!"

रामराव म्हणाले—"चोरीच करायला आलों असतों तर तुम्हांला बोलावून विचारलें असतें होय? दार उघडा, तुमच्याशीं मला बोलावयाचें आहे."

दानालालनें क्षणभर विचार केला. दार उघडलें नाहीं तर ओरडा करून हा सर्व गांव जागें करील असा विचार करून त्यानें दार उघडलें व म्हणाला—"अहो! तुम्ही का? मला वाटलें कीं कोणी दुसरा असेल."

नंतर थोडा वेळ थांबून म्हणाला—"रामराव! तुम्ही या भानगडींत कशाला पडतां? अहो व्यापाऱ्यांचें रहस्य तुम्हांला काय माहीत? खऱ्याचा व्यापार केला तर उपाशी मरावें लागेल. खोटेंखरें व कमी-जास्त केल्याशिवाय कोठें व्यापार चालतो का? आणि दानधर्म करायला तरी पैसे कोठून आणावयाचे, तुम्हींच सांगा! चोखीच्या व्यापारांत फायद्याचें नांव काढूं नका!"

"तरमग असें करा! धान्यांत खडे मिसळल्यानें जितकी किफायत होत असेल तितके पैसे माझ्याकडून घ्या आणि तुम्ही हा धंदा सोडा." रामरावांनीं सूचना केली.

दानालाल सेठनें विचारलें—"पण तुम्हांला काय फायदा ?"

"मला जो फायदा मिळावयाचा असेल तो देव देईल मला. तुम्हांला किती लाभ मिळावा असें वाटतें ? मी ती रक्कम उद्यां तुमच्या घरीं पोंचती करतों." रामराव म्हणाले.

दानालालला ही सर्व थट्टा व चेष्टा वाटली. तो रामरावांना म्हणाला—"हें पहा, पांचशें पोतीं आहेत धान्याचीं. पन्नास पोत्याला एक पोतें खडे या हिशोबानें दहा पोतीं होतात. तोच माझा फायदा."

दुसऱ्या दिवशीं रामरावांनीं घरीं जाऊन स्वतःकडे किती पैसे आहेत, मोजून पाहिले. थोडे पैसे कमी पडले ते कोणाकडून तरी कर्ज मागून घेऊन सर्व पैसे दानालालला दिले. म्हणाले—"हा तुमचा फायदा ! आतां लोकांना चांगला माल मिळाला पाहिजे बरें का ?" असें सांगून रामाराव निघून गेले.

ही कोणीतरी विक्षिप्त व्यक्ति दिसते आहे. असा विचार करून दानालालनें सर्व पैसे ठेवून घेतले.

कांहीं दिवसांनीं रामराव पुन्हां आपल्या मित्राच्या गांवीं आले. त्यांनीं सुब्बारावांना विचारलें "काय रे बुवा ! आतां तांदूळ बरे मिळतात ना ? खडे बिडे नसतात ना ?"

"बरें कसलें ? आमच्या नशिबांतले खडे सुटतात का ?" सुब्बाराव म्हणाला.

रामराव सरळ दानालालाच्या घरीं गेले. त्याच्याकडे नवीन सून आली होती. मुलाचें नुकतेंच लग्न झालें होतें. जेवणावळ चालू होती. त्यानें रामरावला आलेले पाहून नमस्कार केला व जेवायला चलायला सांगितलें. "जेवण होईल सावकाश ! मी एक गोष्ट विचारायला आलों होतों." असें सांगून दानालालला एका बाजूला बोलावून घेऊन गेले व म्हणाले—"अजून गांवकरी म्हणतात कीं धान्यांतले खडे कमी झाले नाहींत ! याचें काय कारण ?" "अहो रामराव ! आतां मी तुम्हांला काय सांगूं ? मी तुम्हांला वचन दिलें तेव्हांपासून ती चूक कधीं केली नाहीं. मी खडे मिसळणें सोडलें तरी हे लहान लहान व्यापारी सोडतील तेव्हां ना प्रश्न सुटणार !"

"तरमग तुम्ही दुकानदारांना माल विकायचा सोडून द्या व तो सर्व मला विकत जा !" रामराव म्हणाले. दानालालला रामरावांच्या हट्टीपणाबद्दल आश्चर्य वाटलें.





म्हणाला—" तें नंतर पाहून घेऊं, पहिल्यानें जेवून तर घ्याल!"

तोंपर्यंत पुष्कळ लोकांचीं जेवणें झालीं होतीं. रामराव जेवायला बसले. तोंडांत घास घातल्याबरोबर ओरडले—" मेलों ...."

तीच स्थिति होती त्यांच्या बरोबर बसणाऱ्यांचीं. सर्व म्हणत होते, " हें जेवण, काय जेवण आहे?" सर्व पानावरून उठले. दानालालला वाईट वाटलें.

पहिल्या पंक्तींतल्या लोकांना चांगल्या तांदुळाचा भात वाढला होता. पण दुसऱ्या पंक्तीच्या लोकांना वाढलेल्या भाताचे तांदूळ चांगले नव्हते. चांगले तांदूळ संपलेले पाहून सैंपाक्यानें सरळ कोठारांत जाऊन समोर जें पोतें दिसलें त्यांतले तांदूळ काढून भात टाकला होता. पाहुण्यांनीं ओरडा केल्यावर सैंपाकी म्हणाला—" चला दाखवितों मी कोणत्या पोत्यांतले तांदूळ घेतले होते ते." सर्व त्याच्या पाठोपाठ कोठारांत गेले. तेथें तांदुळाशेजारीं निरनिराळ्या रंगांच्या खड्यांचीं पोतीं होतीं. तीं पाहून सर्व नातेवाईक पाहुणेमंडळी दानालालच्याकडे सशंकित मुद्रेनें पाहूं लागली.

रामराव म्हणाले—" दानालाल! मला एका गोष्टीचें बरें वाटलें, तुम्ही लोकांना जे तांदूळ विकतां तेच तुमच्या घरीं वापरतां. परंतु दानालालला त्यांत व्यंग्य दिसलें. तो रामरावांना घरांत बोलावून घेऊन गेला व त्यांनीं दिलेले सर्व पैसे परत करून म्हणाला—" आतां कानाला खडा लावला. पुन्हां ही तक्रार तुमच्या कानावर येणार नाहीं. झाला तेवढा पाणउतारा पुरे!"

तेव्हां पासून दानालालनें व्यापारांत चोखपणा राखला.





# युद्ध कांड

मारुतीनें हें सुचविल्यावर कीं बिभीषण राज्यलोभानें आला असावा राम म्हणाला—" बिभीषण दुष्ट असो वा सुष्ट. तो शरण मागतो आहे. क्षत्रिय कुळांत जन्माला येऊन शरणागताला नकार कसा देऊं?"

सुग्रीवाला तें पटलें नाहीं. तो म्हणाला—" कबूल! हा क्षत्रियधर्म झाला. पण यांत फायदा काय? याला आपल्या गोटांत शिरूं देतां कामा नये. सख्ख्या भावाविरुद्ध उलटणाऱ्याचा काय विश्वास?"

" राजधर्माचीच गोष्ट मी सांगत आहे. राज्य बळकावण्यासाठीं शत्रूच्या कमकुवतपणाचा फायदा घेतल्याशिवाय कोणी राहील का? म्हणून राजानें तो किती का समर्थ असे ना भावाचा देखील विश्वास करून औदार्य दाखविणें रास्त होत नाहीं. रावणानें म्हणूनच याच्यावर विश्वास केला नाहीं. समजा रावणाविरुद्ध उलटून आपल्या मदतीनें तो त्याचें राज्य बळकावण्याच्या हेतूनें आला आहे. तर मग हा आपल्याला सोडून जाणें शक्यच नाहीं." राम म्हणाला.

तरी सुग्रीवाच्या मतांत बदल झाला नाहीं. तो म्हणाला—"पण लक्षांत ठेव हा तुझा विश्वास संपादन करून ऐन वेळीं तुझा घात करील. रावणाचाच भाऊ, त्याचा काय विश्वास?"



"सुग्रीवा! तो दुष्ट हेतूनें आला आहे असें एक वेळ मानलें तरी तो माझ्याविरुद्ध काय करणार? स्वत: रावण शरण मागायला आला तर मी नाहीं त्याला परत करणार! शरणागताच्या रक्षणासाठीं प्राण वेंचावे लागले तरी मी त्याला तयार आहें. म्हणून तूं त्याला आदरपूर्वक बोलावून घेऊन ये." रामानें आज्ञाच केली.

सुग्रीवानें जास्त वाद घातला नाहीं. तो विभीषणाला बोलवून घेऊन रामाकडे आला.

विभीषणानें रामाचे पाय धरले व म्हणाला—"रामा! मी रावणाचा धाकटा भाऊ आहें. त्यानें माझा अपमान केला म्हणून मी त्याला सोडून तुझ्या दारीं शरण मागायला आलों आहें. मी आपले मित्र बांधव सर्वांना लंकेंत सोडून तुझ्या आश्रयाला आलों आहें. आतां तूं ठेवशील तसा राहीन. माझें सुखदु:ख, राज्य व वैभव सर्व तुझ्या कृपेवर अवलंबून आहे."

रामानें विभीषणाला अश्वासन दिलें व म्हणाला—"लंकेची स्थिति कशी काय आहे हें सांग! रावण व त्याच्या राक्षस सैन्याच्या बळाबळाची मला कल्पना करून दे."

विभीषण म्हणाला—"रावणाला ब्रह्म-देवाचा वर प्राप्त आहे. राक्षस, गंधर्व किंवा कोणत्याहि प्राण्याच्या हातून त्याला मृत्यु येणें शक्य नाहीं. रावणाहून धाकटा व माझ्याहून मोठा आमचा मधला भाऊ कुंभकर्ण महाबलवान आहे. युद्धांत इंद्राची देखील तो बरोबरी करूं शकेल. रावणाचा सेनापति प्रहस्त यानें कुबेराचा सेनापति मणिभद्र याला जिंकलें आहे. मारुतीनें इंद्रजिताच्या शक्तीची कल्पना करून दिलीच असेल. त्यानें स्वत: इंद्राला जिंकून इंद्रजित ही पदवी मिळविली आहे. त्याच्याजवळ एक अमोघ कवच आहे. अदृश्य शत्रूचा वध



करण्याची शक्तिदेखील त्याला प्राप्त आहे. महोदर, महापार्श्व, अकंपन वगैरे रावणाचे सेनापति दिक्‌पालकांशीं देखील बरोबरीनें युद्ध करूं शकतील असे पराक्रमी आहेत. रक्तमांसाहारी राक्षस लंकेंत कोट्यवधि आहेत. त्यांच्या मदतीनेंच रावणानें दिक्पालकांना जिंकलें."

तें सर्व ऐकून राम त्याला म्हणाला—"विभीषणा! या सर्व राक्षसांचा संहार करून मी लंकेचें राज्य तुला देईन. तूं माझ्यावर पूर्ण विश्वास ठेव. रावण स्वर्ग, मृत्यु किंवा पाताळ लोकांत कोठेंहि जाऊन लपला तरी तो माझ्या हातांतून सुटणें शक्य नाहीं. मी आपल्या तिघां भावांची शपथ घेऊन सांगतों, रावणाचा वध केल्याशिवाय मी अयोध्येला परत जाणार नाहीं."

"या युद्धांत तुझ्या बाजूनें युद्ध करण्यास मलादेखील परवानगी दे. मी यथाशक्ति तुला मदत करीन." विभीषण म्हणाला.

रामानें संतुष्ट होऊन लक्ष्मणाला समुद्राचें पाणी आणावयास सांगितलें. नंतर रामानें विभीषणाला लंकेचा राजा म्हणून घोषित करून विधिवत त्याचा राज्याभिषेक केला.



लक्ष्मणानें वानरांसमक्ष विभीषणाचा लंकेचा राजा म्हणून राज्याभिषेक केला. सर्व वानरांनीं रामाचा जयजयकार केला.

नंतर सुग्रीव व हनुमान दोघांनीं विभीषणाची एकांतांत भेट घेऊन त्याला विचारलें—"एवढी मोठी वानरसेना आहे. पण या सर्वांना समुद्रपार लंकेला कसें घेऊन जावयाचें हें नाहीं कळलें आम्हांला. उपाय तूंच सुचविला पाहिजेस."

"रामानें समुद्राजवळ शरण मागावी. या समुद्रावर रामाचा पूर्वज सगर राजा यानें उपकार केले आहेत. म्हणून तो रामाचें



काम आनंदानें करावयास तयार होईल." विभीषण म्हणाला.

सुग्रीव रामाकडे गेला व बिभीषणानें सांगतलेलें निवेदन करून समुद्राची आराधना करण्यास विनंति केली. रामानें त्याप्रमाणें समुद्रकाठीं दर्भ अंथरून त्यावर झोंपण्याचें ठरविलें.

शार्दूल नांवाचा एक राक्षस वेष पालटून वानरसेनेंत रावणाच्या वतीनें हेरगिरी करण्यासाठीं आला. त्यानें सर्व परिस्थिति गुप्तपणें पाहून घेतली व रावणाला येऊन सांगितलें कीं वानरसेना समुद्रावर वादळाच्या लाटा येतात तशी येत आहे. सशस्त्र राम-लक्ष्मण सीतेच्या शोधार्थ समुद्र किनाऱ्यावर येऊन उतरले आहेत. सैन्य कोठून हि पाहालें तरी तें सुमारें दहा योजन पसरलेलें दिसलें. मी हें सर्व घाईघाईत वर वर पाहून आलों आहे. बारीकीनें सर्व पहावयाचें असेल तर आणखी कोणाला तरी पाठविणें बरोबर होईल.

रावण तें सर्व ऐकून शुक नांवाच्या राक्षसाला म्हणाला—"तूं सुग्रीवाकडे जा व मी जो निरोप सांगत आहें तो त्याच्याकडे पोंचता कर." नंतर रावणानें त्याला गुप्तपणें जें कांहीं सांगावयाचें होतें ते त्याच्या कानांत सांगून त्याला निरोप दिला.

शुक राक्षसानें पक्ष्याचें रूप घेतलें आणि समुद्रपार वानर सेना होती तेथें आकाशांत येऊन पोंचला. तो आकाशांतच उडत घिरट्या घालूं लागला व त्यानें रावणाचा निरोप सुग्रीवाला सांगितला. म्हणाला—

"वानरराज सुग्रीवा! रावणानें मला तुझ्याकडे त्याचा निरोप कळविण्यासाठीं पाठविलें आहे. तूं कुलीन वंशांत जन्माला आला आहेस. महा पराक्रमी आहेसा निष्कारण तूं माझ्याशीं वैर कां करीत आहेस? वाली माझा मित्र व सखा होता. तूं त्याचा भाऊ. मी तुला भावासारखा मानीत आलों. मी रामाच्या बायकोला घेऊन आलों तर त्यांत तुझें काय बिघडलें? तूं बुद्धिमान आहेस. तुला जास्त सांगण्याची गरज नाहीं. खूप विचार कर आणि किष्किंधेला परत जा. लंकेंत देवांना देखील प्रवेश नाहीं, मग नरावानरांना कोठून मिळणार?"

तें ऐकून वानरांनीं आकाशांत उडी मारून शुक राक्षसाला जमिनीवर खेंचलें. शुक मोठ्यानें ओरडला—"रामा! तुझे वानर माझा वध करीत आहेत. मी दूत आहें. दूत अवध्य असतो. माझ्या मालकानें जो निरोप पोंचविण्यास सांगितला होता तो मी पोंचता केला. माझा काय अपराध?"

रामानें वानरांना सांगून त्याला सोडविलें. म्हणाला—"सोडा बिचाऱ्याला!"

शुक राक्षसाचें पंख क्षत विक्षत झाले होते. तरी तसाच तो आकाशांत उडूं लागला व त्यानें विचारलें—"सुग्रीवा! मग रावणाला काय उत्तर देऊं?"

"रावणाला जाऊन सांग! राक्षसांच्या राजा! मी तुला आपला मित्र मानीत नाहीं. तूं माझ्यावर केव्हां व कोणता उपकार केला





आहेस आपला बंधु मानायला? तूं माझा मित्र राम याचा शत्रु आहेस. माझा मोठा भाऊ वाली जिवंत असेपर्यंत माझ्याशीं वैर करीत होता. तूं त्याचा मित्र, म्हणजे माझा शत्रू. म्हणून मी तुझा वध करण्यास रामाला मदत करणार आहे. मी तुला सकुटुंब यमसदनीं पाठवून लंका उध्वस्त करीन. आतां तुझें रक्षण देव लोकांतले देव देखील करूं शकणार नाहींत. म्हाताऱ्या जटायूशीं हें युद्ध नसून दशरथ पुत्र महा पराक्रमी रामाशीं हें युद्ध आहे हें तूं विसरूं नकोस." सुग्रीव शुक राक्षसाला म्हणाला.

अंगद सुग्रीवाला म्हणाला—"हा दूत दिसत नाहीं. हेर दिसतो आहे. यानें आपल्याशीं बोलण्याचें मिश करून आपल्या सर्व सैन्याची टेहळणी वरच्या वर केली आहे. याला पकडा. लंकेला जाऊं देऊं नका."

सुग्रीवाच्या आज्ञेनें वानरांनीं पुन्हां शुक राक्षसाला धरून जमिनीवर ओढलें. शुक पुन्हां ओरडला—"रामा! मी दूत आहें व दूत अवध्य असतो. हे वानर माझे पंख तोडीत आहेत. डोळे काढून टाकण्याच्या विचारांत आहेत." रामानें पुन्हां वानरांना समजावून सांगितलें व त्याला सोडविलें. नंतर रामानें पुन्हां समुद्राला नमस्कार केला व डोक्याखालीं हात ठेवून समुद्रासमोर पडून राहिला.

रामानें अशा तऱ्हेनें तीन रात्रीं काढल्या. परंतु समुद्राची कृपा झाली नाहीं. तेव्हां रामाला राग आला. म्हणाला—"जगांत जे चांगले लोक असतात त्यांना भितरे मानण्यांत येतें. समुद्र मला कापुरुष समजत असेल कदाचित! बरें तर त्याचा समाचार घेतला पाहिजे. असा विचार करून रामानें लक्ष्मणाला धनुष्य बाण आणायला सांगितलें. मी समुद्र शोषवून वानरसैन्य समुद्रपार



लंकेला घेऊन जाईन. पाहतों या समुद्राची किती शक्ति आहे ती!"

रामानें एक अग्निबाण सोडला. तो लागतांच समुद्रांत वादळी वारा सुटला. लाटा उसळूं लागल्या व समुद्राच्या तळांतले शंख, शिंपावगैरे पाण्यावर तरंगूं लागले. समुद्राला जणुं कांहीं उकळीच फुटली.

लक्ष्मण रामाला म्हणाला—"रामा पुरे कर आतां!" पण राम मागें पाऊल घ्यायला तयार झाला नाहीं. राम म्हणाला—"समुद्रा! तुला पाताळ लोकांत पाठवून देतों एक थेंब देखील पाणी राहणार नाहीं. फक्त वाळूवाळू राहील, लक्षांत ठेव."

असें सांगून रामानें ब्रह्मास्त्र उचललें. धनुष्यावर चढवून त्यानें तें कानापर्यंत ओढलें. परंतु बाण सोडण्यापूर्वीच सर्वत्र हाहाकार उडून गेला. जणूं कांहीं भूकंप झाला व आकाशच कोसळतें कीं काय वाटूं लागलें. पर्वत थरथर कांपूं लागले. नद्या व सरोवरें एकच एक भासूं लागलीं. सूर्य, चंद्र व तारे डळमळले. सोसाट्याचा वारा सुटला व वृक्ष लता उपटून पडूं लागल्या. समुद्राचें पाणी आटूं लागलें व कित्येक योजनें मागें सरकलें. तें पाहून



रामाचा क्रोध थोडा शांत झाला. त्यानें ब्रह्मास्त्र मागें घेतलें.

समुद्र हात जोडून सप्तनदींसह धांवत रामासमोर येऊन हात जोडून उभा राहिला. त्याचा रंग वैडूर्य रत्न सारखा होता. त्यानें रक्तवर्ण वस्त्रें परिधान केलीं होतीं. पुष्पमाळा, रत्नहार व आभूषणें घालून तो आला होता. मोत्यांच्या माळेंत कौस्तुभमणी झळकत होता.

समुद्रानें रामाजवळ येऊन रामाला आपलें नांव सांगून नमस्कार केला व म्हणाला—"रामा! गांभीर्य हा माझा स्वभावधर्म








आहे. तो मी कसा सोडूं? परंतु वानर सैन्य समुद्र पार करूं लागलें कीं त्यांच्या जिवाला धोका होऊं नये याची जबाबदारी मी घेतों."

"पण मी हें जें ब्रह्मास्त्र चढविलें आहे त्याचा काय उपयोग करूं?" रामानें विचारलें.

या बाजुला उत्तरेकडे द्रुमकुल्य नांवाचा प्रदेश आहे. तेथें भयंकर चोर व डाकू राहतात. त्यांचा प्रजेला फार त्रास होतो. ते माझें पाणी वापरतात व हें पापकर्म करतात. त्यांचें पारिपत्य करण्यास हा बाण सोडावास." समुद्र रामाला म्हणाला.

तो बाण जेथें जाऊन पडला तेथील प्रदेश मरूकान्तार म्हणून पुढें प्रसिद्ध झाला. तो बाण पृथ्वीला भेदून पाताळ लोकांत गेला व तेथून पाणी बाहेर आलें. त्या जागेचें नांव व्रणकूप पडलें. तेथें नित्य पाणी मिळूं लागलें. द्रुमकुल्य प्रदेशांतल्या सर्व चोरांचा संहार झाला.

तेव्हां समुद्र रामाला म्हणाला—"तुझ्या सैन्यांत नल नांवाचा एक वानर आहे. तो विश्वकर्माचा मुलगा आहे. शिल्पकलेंत तो आपल्या बापाहून कमी नाहीं. त्याला सांग पूल बांधायला. पूल बुडूं नये हें माझ्याकडे लागलें."

असें सांगून समुद्र अंतर्धान झाला. नल रामाला म्हणाला—"समुद्र जें कांहीं म्हणाला तें बरोबर आहे. मी पूल बांधण्याचें काम स्वतःवर घेतों. स्वतःच आपल्या कलेचें वर्णन करण्यापेक्षां दुसऱ्यानें येऊन केलें तर बरें या विचारानें मी गप्प होतों. आपली आज्ञा असेल तर पूल बांधण्याचें काम आम्ही सुरू करायला सुरवात करतों."



# नेहरू चरित्र

[२]



सन १८८७ च्या नोव्हेंबर महिन्याच्या १४ तारखेस (मार्गशीर्ष कृष्ण सप्तमीला) मोतीलाल नेहरू यांस एक पुत्ररत्न झालें. तेच जवाहरलाल होत. एका श्रीमंत घराण्यांत एकुलता एक मुलगा. लग्नानंतर अकरा वर्षे मूल झालें नव्हतें. पहलेंच मूल झालें, तो मुलगा. म्हणून जवाहरलाल जींचें बालपण लाडांत गेलें. परंतु त्यामुळें बालपणीं आवश्यक अशी समवयस्क मुलांची संगत त्यांना लाभली नाहीं. शाळेंत गेले असते तर साथी सोबती व मित्र मिळाले असते. पण त्यांना शाळेंत घातलेंच नाहीं. घरींच शिक्षक-शिक्षकणींची शिकवण ठेवून शिक्षणाची व्यवस्था करण्यांत आली.

जवाहरलालजींना शिक्षण देण्यासाठीं एक इंग्रज शिक्षकीण होती. मोतीलालजींच्या मित्रमंडळींत पुष्कळ इंग्रज लोक होते. ते नेहमीं मोतीलालजींना भेटायला येत. जवाहरलालजी त्या सर्वांना आदरपूर्वक भेटत. पण जवाहरलालजींना मात्र त्यांना भेटणें फार आवडत नसे. कारण ज्यांनीं भारताला परतंत्र केलें व जे भारतीयांना हीन लेखत त्यांच्या विषयीं आदर जवाहरलालजींच्या मनांत कसा उपजणार? हें सर्व वडील-धाऱ्यांच्या तोंडून जवाहरलालजींनीं ऐकलें होतें व त्याचा परिणाम त्यांच्या मनावर झाला होता, हें सांगण्याची गरज नाहीं. जवाहर-लालजींच्या नातेवाइकांत एकजण इंग्रज व एंग्लो इंडियन यांच्याशीं या ना त्या कारणा-वरून भांडत. आगगाडींत प्रवास करतांनाच मुख्यकरून असलीं भांडणें होत. इंग्रजांसाठीं त्या काळांत निराळे डबे राखून ठेवलेले











# भारताचा इतिहास



## ओरिसा :

चोडगंग अनंतवर्मा याच्या कारकीर्दीत (१०७६-११४८ पर्यंत) एका शक्तिशाली राज्यांत ओरिसा राज्याची गणना होऊं लागली. शिलालेखांवरून असें कळतें कीं हें राज्य गंगेच्या मुखापासून गोदावरीच्या मुखापर्यंत पसरलेलें होतें. चोडगंग यानें धर्म, संस्कृत व आन्ध्रभाषा यांच्या उन्नतीस सहाय्य केलें. त्याच्या कारकीर्दीत निर्मिलेलें जगन्नाथपुरीचें देवालयच या गोष्टीची साक्ष पटवून देण्यास पुरें आहे.

त्याच्यानंतर जे जे राजकर्ते ओरिसाच्या गादीवर आले त्यांनीं मुसलमानांच्या वारंवार होणाऱ्या स्वाऱ्या थोपवून ओरिसा राज्याचें रक्षण केलें. त्या सर्वांत प्रसिद्ध राजा नरसिंह प्रथम (१२३८-१२६४) हा होय. त्यानें बंगालच्या मुसलमान शासकांवर विजय मिळविला. जगन्नाथाच्या देवळाचें बांधकाम पुरें केलें आणि कोनार्कच्या सूर्य देवालयाच्या बांधकामास सुरवात केली. त्याच्यानंतर गंग वंशाचा ह्रास होत गेला व सूर्यवंशी राजांची सत्ता कायम झाली.

या नवीन राजवंशाची स्थापना कपिलेंद्र यानें केली. गंग वंशाच्या उत्तर काळांत क्षीण होत चाललेली कीर्ति व प्रतिष्ठा दोन्हींची प्राप्ति त्याला झाली. त्यानें राज्यांतली बंडाळी शांत केली. बलिष्ठ बीदरच्या सुलतानांना व विजयनगरच्या राजांना जिंकलें. त्यानें आपल्या राज्याची सीमा गंगेपासून दक्षिणेंत कावेरीपर्यंत भिडविली. गोपीनाथपुरम्‌च्या शिलालेखावरून तर त्यानें उदयगिरि व कांचीपुरम् देखील काबीज केलें होतें.

त्याच्यानंतर पुरुषोत्तम (१४७०-१४९७) याच्या कारकीर्दींत भाऊबंदकीमुळें गोदावरीच्या दक्षिणेचा प्रदेश त्याच्या हातांतून निघून गेला. कृष्णेच्या दक्षिणेकडील भाग साळव नरसिंह याच्या व कृष्णा आणि गोदावरी नद्यांच्या मधला प्रदेश बहमनी सुलतानांच्या अमलाखालीं आला. तरी शेवटीं शेवटीं कृष्णेच्या दक्षिणेकडील हल्लींच्या गुंटूरचा कांहीं भाग पुन्हां ओरिसाच्या छत्रछायेखालीं आला.

पुरुषोत्तमच्या मुलाचें नांव प्रतापरुद्र (१४९९-१५४०). हा चैतन्य प्रभूंचा समकालीन व त्यांचा शिष्य पण होता. राज्याचा कांहीं भाग त्याच्या शत्रू राज्यांनीं हस्तगत करून घेतला. विजयनगरचा कृष्णदेवराय यानें गोदावरीच्या दक्षिणेकडील सर्व प्रदेश जिंकून आपल्या साम्राज्याला जोडला. १५२२ मध्यें गोवळकोंड्याच्या कुली कुतुब शाह यानें देखील ओरिसाचें राज्य जर्जर करून सोडण्यास मदत केली.

ओरिसा राज्याची शक्ति क्षीण होण्याचें एक मोठें कारण तेथील राजवंशानें स्वीकारलेला वैष्णवधर्म व वैष्णव धर्माचा झालेला प्रसार असें सांगण्यांत येतें.



सन् १५४१-४२ मध्यें कपिलेंद्रानें स्थापिलेल्या वंशाच्या जागीं भोज वंशाची सत्ता कायम झाली. या वंशाचा मूळ पुरुष गोविंद हा होय. त्याच्या मुलानें व दोघां नातवांनीं मिळून एकंदर १८ वर्षें राज्य केलें. मुकुंद हरिचंदन हा १५५९ मध्यें या वंशाच्या राजाला पदच्युत करून स्वत: गादीवर बसला. १५६८ पर्यंत त्यानें राज्य केलें. त्याला मुसलमानांच्या स्वाऱ्यांना तोंड द्यावें लागलें. बंगालच्या अफगाण शासनकर्त्यांचा विमोड करण्यासाठीं अकबर बादशाहनें याच्याशीं मैत्री करण्याचा विचार केला होता.

       



**मेवाड :**

रजपूत राजकर्त्यांना हिंदुस्थानभर जी कीर्ति मिळाली त्याच्या मुळाशीं मेवाडचें राज्य होतें. तेथें अनेक पराक्रमी, शासनकर्ते व कवि यांनीं जन्म घेतला. मेवाडच्या सुप्रसिद्ध राजवंशाचें नांव गुहिल राजपूत वंश असें होतें. सातव्या शतकापासून या राज्याची कीर्ति देशभर पसरलेली होती.

दिल्लीच्या हिंदू साम्राज्याचा शेवट झाल्यावर रजपूत राज्यकर्त्यांचे डोळे उघडले. अल्लाउद्दीन खिलजीनें चितोडचा जो अपमान केला होता त्याला त्याबद्दल खमखमीत शिक्षा देऊन राणाकुंभनें पुन्हां मेवाडची कीर्ति उज्वल करून दाखविली. त्यानें माळवा व गुजराथ येथील मुसलमान शासनकर्त्यांशीं युद्धें केलीं. जेवढा मुलख मेवाडच्या राज्यांत होता त्याचें त्यानें रक्षण केलें. मेवाडच्या रक्षणासाठीं बांधलेल्या ८४ किल्ल्यांपैकीं ३२ किल्ले राणा कुंभ यानेंच बांधले होते. त्यानें बांधलेल्या किल्ल्यांत कुंभलनेरच्या किल्ला व जयस्तंभ मुख्य होत. कुंभ स्वतः कवि व पंडित होता. सन् १४६९ मध्यें त्याच्या मुलानेंच त्याचा वध केला.

राणा संग्रामसिंह उर्फ राणा सांगा हा राणा कुंभ याचा नातू. सन् १५०९ च्या सुमारास हा गादीवर बसला. तो शूर व पराक्रमी होता. त्याला एकच डोळा होता. पाय देखील एकच होता. शरिरावर ८० जखमांचे वण होते. त्यानें माळवा, दिल्ली व गुजराथवर स्वाऱ्या करून विजय मिळविला. मेवाडच्या उन्नतीसाठीं त्यानें जें शौर्य गाजविलें त्याबद्दल इतर रजपूत राजे त्याच्याशीं हेवा करूं लागले. त्याचाच परिणाम खानव येथील युद्धांत झाला. त्याविषयीं वर्णन पुढें येईल.



# नेहरू चरित्र

[ ३ ]



बालक जवाहरलाल यांचें वय दहा वर्षांचें असेल, ते एका नवीन घरांत रहायला गेले. तें घर पहिल्या घरापेक्षां पुष्कळच मोठें होतें. त्या घरांत मोठी बाग होती. एक तलावदेखील होता. नवीन घराच्या आवारांत जवाहरलालजींना नवनवीत वस्तू पहायला मिळाल्या. त्या आवारांत नवीन घराचें बांधकाम झालें. गवंडी व मजूर काम करीत. तें पाहण्यांत जवाहरलालजी स्वतःला विसरून जात.

मोतीलालजींनीं आपल्या नवीन घराचें नांव 'आनंदभवन' असें ठेवलें.

जवाहरलालजी आनंदभवनाच्या आवारांतल्या तलावांत पोहायला शिकले. त्यांना पोहण्याची फार हौस होती. उन्हाळ्यांत तर ते तासन् तास पाण्यांत डुंबत असत. पोहायला म्हणून ठरलेली अशी वेळ पण नव्हती. वाटेल तेव्हां तलावांत उडी मारली व वाटेल तितका वेळ डुंबत राहाले.

या तलावाच्या काठींच मोतीलालजी व त्यांचे मित्र संध्याकाळीं जमत असत. विजेची दिवाबत्ती व पंख्यांची व्यवस्था होती. त्या काळीं विजेचे दिवे अलाहाबाद शहरांत नवे होते. म्हणून ते पाहून लोक चकित होत.

संध्याकाळीं सर्व वडी मंडळी तलावांत पोहोत व जवाहरलाल गंमत पहात बसत. खूप गंमती व ओरडा आरडा होई. डॉ. तेजबहादुर सप्रू यांनीं नुकतीच ज्यूनिअर म्हणून वकिली सुरू केली होती. त्यांना बिलकुल पोहतां येत नसे. शिकायला देखील










मिळून एक विज्ञानशाळाच निर्मिली. त्या प्रयोग शाळेंत रसायनशास्त्र व पदार्थ विज्ञान या दोन्हींचे प्रयोग करण्यांत जवाहरलालजी तासनतास मग्न होऊन जात.

ब्रुक्स यांच्या व्यक्तित्वाचा ठसा जवाहरलालजींच्या मनावर आणखी एका गोष्टीमुळें उमटला. दर आठवड्यांत एकदां आपल्या खोलींत ते थियॉसफीवर सभा करीत. तेथें थियॉसफीचा अर्थ व त्याची व्याख्या यांवर चर्चा होई. पुनर्जन्म कर्म सिद्धांत वगैरे विषयांवर व्याख्यानें होत. जवाहरलालजींना तें सर्व समजत होतें असें नाहीं, परंतु एवढें मात्र कळत होतें कीं या जगाच्या मूळ आधारभूत तत्वांवर ही चर्चा होत आहे. त्याच वेळीं धर्म व इह परलोक यांविषयीं त्यांच्या मनांत विचार येऊं लागले. उपनिषद भगवद्गीता वगैरे ग्रंथांत वर्णिलेल्या हिंदू धर्माविषयीं आदर त्यांच्या मनांत उत्पन्न होऊं लागला व ते मनाचे मनोरे देखील बांधू लागले.

त्याच सुमारास ॲनी बेझंट यांचें अलाहाबाद येथें थियॉसफीवर एक व्याख्यान झालें. व्याख्यानाचा जवाहरलालजींच्या मनावर इतका परिणाम झाला कीं त्यांनीं वयाच्या तेराव्या वर्षीच थिऑसोफिकल सोसायटींत सामील होण्याचें ठरविलें. त्यांनीं वडिलांजवळ परवानगी मागितली. मोतीलालजींनीं स्मित करून परवानगी दिली, पण तिकडे दुर्लक्षच केलें. ॲनी बेझंट यांनीं स्वतः जवाहरलालजींना उपदेश केला होता. परंतु थिऑसोफीवर बसलेला त्यांचा विश्वास फार दिवस टिकला नाहीं. ब्रुक्स साहेब निघून गेल्यावर थिऑसफीची आवड हळूहळू कमी होत गेली.






[ ४ ]

[जगतसिंहाला पाहिल्यापासून दुर्गेशनंदिनी तिलोत्तमेनें त्याला मनानें वरलें होतें. विमलानें जगतसिंहाला तिलोत्तमेचा परिचय दिला नव्हता. परंतु तिनें त्याला वचन दिलें होतें कीं बरोबर पंधरा दिवसांनीं भेटून ती सर्व खुलासा करील. त्याप्रमाणें ती जगतसिंहाला भेटण्यासाठीं तयार होऊन तिलोत्तमेजवळ बोलत असतां, वीरेंद्रसिंहाकडून तिला निरोप आला.]

"तूं हा वेष बदलून जा," असें तिलोत्तमेनें बजावून सांगितलें तरी "कांहीं हरकत नाहीं ग," असें उत्तर देऊन विमला तिच्या खोलींतून वीरेंद्रसिंहाला भेटण्यासाठीं निघून गेली.

वीरेंद्रसिंह पलंगावर पडून होता. एक दासी त्याचे पाय चेपीत होती. दुसरी दासी पंख्यानें वारा करीत होती. विमलानें पलंगाजवळ येऊन विचारलें—"कशासाठीं बोलाविलें?"

वीरेंद्रसिंहानें डोकें वर करून पाहिलें व तिचा तो नट्टा फट्टा पाहून विचारलें—"कोठें तरी निघालेली दिसते आहेस!"

"होय...." विमला म्हणाली.

"तिलोत्तमेची तब्येत कशी काय आहे?"

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



"बरी आहे !"

"अस्मानी जाऊन तिलोत्तमेला बोलावून घेऊन येईल तोंपर्यंत तूं वारा घाल." वीरेंद्रसिंह म्हणाला. अस्मानीनें पंखा खालीं ठेवला व निघून गेली.

विमलानें खुणेनें अस्मानीला बाहेर उभें रहायला सांगितलें. वीरेंद्रसिंह दुसऱ्या दासीला म्हणाला—"तूं जाऊन विडे लावून घेऊन ये." ती गेल्यावर त्यानें विचारलें—"विमला, इतकी तयारी कसली ?"

"मला आज या सर्वांची जरूरी वाटली आहे."

"असें कोणतें काम आहे, मला कळलें पाहिजे!"

"तर मग ऐका, मी आपल्या प्रियकराकडे जात आहें!"

"यमराजाकडे ?"

"कां ? तो मनुष्य असूं शकत नाहीं, असें वाटलें का ?"

"तसा मनुष्य आजपर्यंत जन्माला आलेला नाहीं !"

"फक्त एक सोडून...." असें म्हणत विमला चटकन उठून निघून गेली. ती बाहेर जाऊन अस्मानीला म्हणाली—"तुला एक गुपित सांगतें. आज मी फार दूर जात आहें. रात्रीची वेळ, एकटी कशी जाऊं ? आणखी कोणावर माझा विश्वास नाहीं. होय, पूर्वी तुला चांगला ओळखणारा व आतां पण ओळखूं शकेल असा कोणी आहे का ?"

"कोणाविषयीं म्हणते आहेस ?"

"सबब, युवराज जगतसिंहानें तुला पाहिलेंच !"

"इतकें माझें भाग्य कोठें आहे ?"

"असें कां म्हणतेस ?"

"युवराज खात्रीनें मला ओळखतील."



"तर मग तूं नको येऊंस ! पण मी एकटी कशी जाऊं ?" विमला म्हणाली. अस्मानी पदर तोंडावर धरून हंसूं लागली.

"एवढें हसायला ग काय झालें तुला ?" विमलानें विचारलें.

"दिग्गज आहे कीं ! त्याला बरोबर घेऊन गेलीस तर ?"

"बरोबर ! त्या 'रसिकराजा'लाच बरोबर घेऊन जातें."

"वा ग वा ! मी तर थट्टेंत म्हटलें होतें !"

"थट्टा नाहीं ! त्या मूर्खांना काय कळतें ? त्याला बरोबर नेल्यास कांहीं हरकत नाहीं. पण तो भट येत नाहीं म्हणाला तर ?"

अस्मानी दिग्गजाच्या घरीं गेली तेव्हां त्याच्या घराचा दरवाजा आंतून बंद होता. "भटजी ! अहो भटजी !" अस्मानीनें हांक मारली. पण आंतून उत्तर आलें नाहीं. दाराच्या फटींतून तिनें आंत पाहिलें तेव्हां 'रसिकराज' जेवायला बसलेले दिसले.

पाहातें, हा ब्राह्मण माझ्याशीं बोलल्यावर नंतर कसा जेवत नाहीं तो, असा विचार करून अस्मानीनें जोरानें हांक मारली व उत्तर येईपर्यंत हांक मारीत राहिली.



दिग्गज एवढेंच गुणगुणला—“ ऊं...ऊं ! ”

“ कळलें मला, आंत कोणीतरी बाई दिसते आहे. तुम्ही जेवतांना बोलत नाहीं का भटजी ! मी ओरडा करून सर्व गांव येथें एकत्र करतें ! ” अस्मानी म्हणाली.

तें ऐकून दिग्गजनें एकदां चहूंकडे पाहिलें. कोणी नाहीं अशी खात्री करून घेतली आणि पुन्हां जेवूं लागला.

“ कळलें मला, एकदां बोललांत आणि पुन्हां जेवूं लागलांत ! ” अस्मानी म्हणाली.

दिग्गज घाबरून म्हणाला—“ केव्हां ग ? मी कोठें बोललों.”

अस्मानी खदखदून हंसत म्हणाली—“ आणि हें जें बोललात तें ! ”

“ मग आतां कसा जेवूं ? ” दिग्गज म्हणाला. दाराच्या फटींतून भट काय करतो आहे हें पहात अस्मानी म्हणाली—“ अहो उठलात कशाला ? बसा. जेवून घ्या ! ”

“ जेवतांना बोलल्यावर पुन्हां जेवण कसें ? ” दिग्गज म्हणाला.

“ जेवा हो कांहीं हरकत नाहीं.” अस्मानी म्हणाली.

“ जेवतांना तोंडांतून शब्द निघाल्यावर आतां पुन्हां कसा बसूं जेवायला ? ”

“ बरें तर जातें. एक गोष्ट सांगायला आलें होतें. पण मध्यें माशीच शिंकली.”

“ नाहीं, नाहीं....! अस्मानी ! अशी रागावलीस तर कसें ? हा बघ बसलों ! ” असें म्हणत दिग्गज पुन्हां पानावर बसला तेवढ्यांत अस्मानी म्हणाली—“ पुरें करा, आतां उठून दार उघडा जरा.”

“ आणखी दोनच घास आहेत बघ ! ”

“ दार उघडतां कीं करूं ओरडा ? ”

दिग्गज उठला. हात धुऊन त्यानें दार उघडलें. अस्मानी आंत आल्यावर म्हणाला—“ क्षमा कर महादेवी ! तुझी कृपा असूं दे ! ”

“ काय पण कविता करतां ? म्हणून तर तुम्हांला रसिकराजाची पदवी बहाल केली आहे ! ”

“ इकडे कशी काय वाट चुकलीस ? ”

“ अगो बाई ! उपाशी उठलात कीं काय ? जेवून घ्या. मग बोलूं.”

“ मी जेवून तर उठलों ! ”

“ उपाशी राहलांत तर त्याचें पाप माझ्या डोक्यावर येईल, त्याची काय वाट ? ”

इतक्यांत तेथें विमला येऊन पोंचली. तिनें आग्रह करून दिग्गजला पुन्हां जेवायला बसायला सांगितलें. तो पुन्हां जेवायला बसला व पोटभर जेवून घेतलें..

“ रसिकराज ! आज तुमच्या मदतीची जरूर आहे ! ” विमला म्हणाली.

“ ऐकूं तर देशील ! ” दिग्गज म्हणाला.

“ तुमची आम्हां दोघींवर किती कृपा आहे, नाहीं का ? आम्ही कशासाठीं आलों आहों आहे का माहीत ? ” विमलानें विचारलें.

“ आम्ही तुमच्याबरोबर निघून जाण्यासाठीं आलों आहों.” अस्मानी म्हणाली.

तो ब्राह्मण चकितच झाला आणि विचारूं लागला—“ केव्हां ? ”



“ आतां, लगेच ! आम्ही तयार होऊन आलों आहों, पाहिलें नाहींत का ? ” विमलानें विचारलें.

तिघें निघालीं.

“ आपण परत केव्हां येणार ? ” दिग्गजनें संशयितपणें विचारलें.

“ एकदां घराबाहेर पाऊल टाकल्यावर कोणी परत येण्याचें नांव काढतो का ? हें देखील सांगायला हवें ? ”

दिग्गज आपल्या मूर्खपणावर लाजल्यासारखा दिसला. कांहीं अंतर चालून गेल्यावर अस्मानी म्हणाली—“ तुम्ही पुढें व्हा, मी

येतेंच पाठोपाठ !" असें सांगून ती थोड्या-वेळानें परत फिरली ती थेट घरीं निघून गेली.

थोड्या वेळानें दिग्गजनें विमलाला विचारलें—"असानी पाठोपाठ येते म्हणाली, वाट चुकली कीं काय ?"

"काम होतें म्हणून घरीं गेली होती. परत येऊं शकली नसेल." विमला म्हणाली. तिचा चालण्याचा वेग कमी झाला नव्हता.

दोघं मंथारणची हद्द ओलांडून पलीकडे पोचलीं होतीं. काळोख वाढूं लागला होता. चहूंकडे शांततेचें वातावरण होतें. विमलानें दिग्गजला विचारलें—"तुम्हांला भुतांची भीति वाटते का? या वाटेवर भुतें फार असतात, म्हणें."

दिग्गज घाबरला व घाईघाईनें दोन पावलें पुढें टाकून विमलाच्या अगदीं जवळ आला व तिचा पदर धरून चालूं लागला.

"त्या दिवशीं आम्ही दोघी शैलेश्वराच्या देवळांतून परत येत असतां येथल्याच एका झाडावर एक भयंकर आकृति दिसली आम्हांला." विमला म्हणाली. तें ऐकून दिग्गजच्या अंगाला घाम सुटला व त्याची वाचाच बंद झाली. भुतांची गोष्ट पुढें चालू



ठेवली तर स्वारी घेरी येऊनच पडायची असा विचार करून विषय बदलायच्या हेतूनें विमला म्हणाली—"रसिकराज! तुम्हांला गाणें चांगलें म्हणतां येतें असें मी ऐकलें आहे. म्हणा कीं एक गाणें."

दिग्गजनें गाणें म्हणायला सुरवात केली. विमला गाणें ऐकायच्या नादांत पुढें चालली होती. एकाएकीं तिच्या पदराला एकदम ओढ बसली. तिनें मागें वळून पाहिलें व विचारलें—"काय आहे हो ?"

दिग्गज भीतभीत अडखळत म्हणाला—"तें पहा! तें पहा!" त्यानें तडफडत










असलेला एक घोडा दाखविला. त्या घोड्यावर खोगीर होतें.

पण विमलाचें लक्ष तिकडे मुळींच नव्हतें. ठिकाणावर केव्हां पोंचतें अशा घाईनें ती चालत होती. एक मैल चालून गेल्यावर त्यांना एका सैनिकाचें पागोटें दिसलें.

इतक्यांत चंद्रोदय झाला. विमलाला विचारांत पडलेली पाहून दिग्गजनें तिला विचारलें—"बोलत कां नाहींस? गप्प कां?"

"वाटेंत तूं तो घोडा पाहिलास ना? त्यावरून तुला कांहीं कळलें?"

"नाहीं बुवा!"

"मरत असलेला घोडा, सैनिकाचें पागोटें, घोड्यांच्या पायाच्या खुणा. यावरून कांहीं कळलें? पण तुला विचारून काय उपयोग?" विमला म्हणाली.

त्यांना शैलेश्वराच्या देवळाचें शिखर दिसलें. आतां दिग्गज बरोबर नाहीं आला तरी चालेल असा विचार करून तिनें पुन्हां भुतांच्या गोष्टी सुरू केल्या. ऐकून दिग्गज असा घाबरला की उलट पावलीं मंथारणच्या बाजूनें पळाला.

विमला देवळाच्या दारांत आली. आंतून दार बंद होतें. तिनें दार खडखडवून पाहिलें. आंतून कोणी तरी विचारलें—"कोण आहे? काय काम आहे. इतकी घाई कशाला?"

"एक दमलेली बाई!" विमला सर्व धैर्य एकवटून म्हणाली.

दार उघडलें. देवळांत दिवा तेवत होता. दार उघडणाऱ्या तरुणाला विमलानें लगेच ओळखलें. तो जगतसिंह होता.

[ पुढें चालू ]





# खऱ्याला मरण नाहीं

एका पल्हव वंशी राजाला एका मागून एक पांच मुलें झालीं, पण एक देखील मुलगी झाली नाहीं. राजाला वाटलें कीं कन्यादानाचें पुण्य त्याच्या नशिबीं नाहीं. त्याला त्याच्या स्नेह्यांनीं व मंत्र्यांनीं सल्ला दिला कीं आणखी एक लग्न करावें, कदाचित कन्यारत्न लाभेल. त्याप्रमाणें राजानें आपल्या एका मांडलिक राजाच्या मुलीशीं लग्न करून घेतलें. तिचें नांव उर्मिला होतें. उर्मिला रूपवती होती. परंतु स्वभावानें फार दुष्ट होती. सवतीमत्सरामुळें तिनें मोठी राणी चंद्रमती हिचा छळ सुरू केला. राजाचें मन वळवून घेऊन तिनें तिच्या मुलांचा पण नाना प्रकारें छळ सुरू केला. अगदीं नाइलाजानें चंद्रमती आपल्या मुलांसह राजवाडा सोडून बाहेर पडली व राजपुरोहिताच्या मदतीनें एका खेडेगांवांत राहूं लागली. त्यावेळीं ती गरोदर होती.

त्या गांवांतले लोक मोल मजुरी करून आपला उदर निर्वाह करीत. चंद्रमतीनें व तिच्या मुलांनीं पण तसेंच राहण्याचें ठरविलें. चंद्रमतीनें देवाला आळवलें व प्रार्थना केली कीं देवा! तुझ्या कृपेनें या खेपेस मुलगी झाली तर राजाची कृपा पुन्हां माझ्यावर होईल. देवानें तिची प्रार्थना ऐकली. तिला मुलगीच झाली परंतु तिची आशा पुरी झाली नाहीं.

राजपुरोहितानें चंद्रमतीला पूर्वींच कळविलें होतें कीं मुलीला संभाळ. उर्मिलानें मारेकरी नेमून मुलगी झाली तर तिचा गळा दाबून टाकण्याची व्यवस्था केली आहे. म्हणून चंद्रमतीनें तिला मुलगी झाली तरी मुलगा

श्री. रमेश वासुदेव महाजन



झाला असेंच जगजाहीर केलें व मुलीला मुलाचे कपडे घालूनच लहानाची मोठी केली.

चंद्रमतीला मुलगा झाल्याची वार्ता कळली. उर्मिलाला तिचें मन थोडें शांत झालें. पण पूर्ण शांत झालें नाहीं. चंद्रमती व तिच्या मुलांचा अंत झाल्याशिवाय तिच्या मुलाला राज्य मिळणार नाहीं म्हणून तिनें त्यासाठीं यत्न सुरू केले.

उर्मिलाला एकच मुलगा झाला. त्यानंतर तिला मूलच झालें नाहीं. कन्यारत्न व्हावें म्हणून राजानें दुसरें लग्न केलें होतें. राजाला निराशा वाटली. उर्मिलाच्या मुलाचें नांव जयंत होतें. जयंत लहानाचा मोठा झाला. पंधरा वर्षें वय असेल, तो आपल्या कांहीं नोकराचाकरांसह शिकारीला रानांत गेला. शिकारीच्या शोधार्थ बराच वेळ हिंडत राहिला. पण शिकार मिळाली नाहीं. त्याला भूक लागली. म्हणून मागचा पुढचा विचार न करतां त्यानें कोणत्या तरी झाडाचें एक फळ खाल्लें. तें विषारी फळ होतें. तें खाल्ल्याबरोबर तो बेशुद्ध होऊन पडला. नोकर त्याला घेऊन शेजारच्या गांवीं औषधोपचारासाठीं गेले. योगायोग असा कीं ते ज्या घरीं गेले त्या घरांत चंद्रमती आपल्या मुलांसह रहात होती. चंद्रमतीच्या मोठ्या मुलाला औषधोपचाराची थोडी माहिती होती. त्यानें कोणत्यातरी झाडाचा पाला काढून त्याचा रस जयंताला पाजला. त्यामुळें त्याला ओकारी झाली व पोटांतलें सर्व विष बाहेर पडलें. कांहीं वेळानें त्याला हुषारी वाटली व तो उठून बसला. नंतर त्यानें स्वतःची ओळख सांगून आपल्या उपकारकर्त्या कुटुंबाचे आभार मानले.

चंद्रमतीला आपलें सर्व पूर्व वैभव आठवलें व तिचे डोळे ओले झाले. जयंतनें तिला तिच्या दुःखाचें कारण विचारलें तेव्हां



आपली खरी ओळख न सांगतां ती म्हणाली कीं सोळा वर्षांपूर्वीं तिला तिच्या पतीनें तिच्या मुलांसह त्या गांवीं आणून सोडलें. तेव्हां-पासून तिनें एकटीनें हाल अपेष्टा सहन करून मुलांना लहानाचें मोठें केलें. मुलांबरोबर मुलगी पण मुलांचे कपडेच घालून मोठी झाली. मोठी झाल्यावर तिनें मुलीसारखा परकर-पदर घातला. तें सर्व ऐकून जयंतला दया आली. तो म्हणाला कीं मी बाबांना सांगून तुझ्या सर्व मुलांना चांगली नोकरी देववितो. तुम्ही राजधानींत येऊन रहा.

चंद्रमति म्हणाली—"तुझें औदार्य पाहूनच आमच्या मनाचें समाधान झालें. आम्ही आहों तेथेंच सुखी आहों. राजधानींत येण्याची आमची इच्छा नाहीं."

जयंतनें घरीं गेल्यावर सर्व वृत्त आपल्या आईला सांगितलें. त्यानें चंद्रमती व तिच्या मुलांचें वर्णन करून त्यांच्या गोड स्वभावाची स्तुती केली व म्हणाला—"आज त्यांनीं मला वांचविलें म्हणून मी घरीं परत येऊं शकलों."

सर्व वर्णन ऐकून घेतल्यावर उर्मिलाच्या मनांतला संशय दुणावला. चंद्रमतीला मुलगी





झाली आहे तर! राजाला ही गोष्ट कळली तर तो तिला परत घेऊन येईल. चंद्रमती आवडती होईल व तिचा मुलगाच गादीला वारस होईल. तेव्हां तिचा व तिच्या मुलांचा कांटाच दूर केलेला बरा. असा विचार करून ती जयंतला म्हणाली—"बाळ! मला वाटतें, तुझ्या बापाच्या पदरीं एक राजद्रोही नोकर होता. त्याचींच तीं मुलें असावीत. तो राज-द्रोही राजाच्या भीतीनें पळून गेला. तें कांहीं असो, ज्यांनीं तुला पुनर्जन्म दिला त्यांचा योग्य तो आदर तूं करावास. मी तुझ्याबरोबर एका नोकराला पाठवितें. तो त्या सर्वांसाठीं भेट घेऊन तुझ्याबरोबर येईल. गांवभर या गोष्टीची चर्चा करणें देखील बरोबर नाहीं. म्हणून तूं ही गोष्ट आणखी कोणाजवळ, स्वतः महाराजांजवळ देखील बोलूं नकोस. नाहीं तर त्या गरीबकुटुंबावर गंडांतर यायचें."

दुसऱ्या दिवशीं उर्मिलानें नोकराला बोलावून त्याला पक्वान्नें व वस्त्रें देऊन राजकुमाराबरोबर जायला सांगितलें आणि त्याला असें बजावून सांगितलें कीं राज-कुमारानें त्यांच्याबरोबर बसून यांतला एक देखील पदार्थ खातां कामा नये. दान दिलेली वस्तू दान देणारानें उपभोगायची नसते असें तूं राजकुमाराला सांग.

जयंत नोकराबरोबर चंद्रमती रहात होती तेथें गेला. त्यावेळीं चंद्रमती व तिचीं सर्व मुलें घरींच होतीं. जयंत म्हणाला—"आईनें मुद्दाम ही भेट स्वतः पोंचवून येण्यासाठीं मला पाठविलें आहे."

"आमच्या करितां महाराणीनें इतका कष्ट कां करावा?" चंद्रमती म्हणाली.

नोकर चंद्रमती व तिच्या मुलांना म्हणाला. "राणी सरकारांनीं सर्वांना समक्ष सर्व पदार्थ खायला घालावे असें मला बजावून सांगितलें आहे."



"राणी सरकारांची आज्ञा आम्हांला मान्य आहे. पण नुकतीच जेवणें झालीं आहेत. मी वाढीन मुलांना पाठीमागून. तूं काळजी करूं नकोस." चंद्रमती म्हणाली आणि तिनें तीं पक्वान्नें आंत नेलीं. तिनें प्रत्येक पक्वान्नांतील एक दोन पदार्थ कावळ्यांना खायला घातले. मुलांना जेवायला वाढण्यापूर्वीं ती रोज प्रथम कावळ्यांना खायला घालीत असे. पण त्या दिवशीं पक्वान्नें खाल्ल्याबरोबर कावळे ओरडूं लागले व तडफडून मरूं लागले.

कावळ्यांचें ओरडणें ऐकून जयंत आंत गेला व कावळे तडफडत असलेले पाहून विचारूं लागला—"काय झालें? काय झालें?"

"हें सर्व कळल्यास तुझ्या मनाला वाईट वाटेल. अजून तूं लहान आहेस, अबोध आहेस. हे पदार्थ खाण्यालायक नाहींत." चंद्रमती म्हणाली.

पण जयंत चंद्रमतीला वाटला तितका अबोध नव्हता. काय वाटेल तें करून या कुटुंबाचा शेवट करण्याच्या हेतूनेंच त्याच्या आईनें पक्वान्नांत विष कालवून पाठविलें होतें हें त्याला कळलें. ही गोष्ट नोकराला



माहीत असल्याशिवाय त्यानें खाण्याचा आग्रह केला नसता. त्यानें नोकराला दटावून विचारलें—"पक्वान्नांत विष घातलें आहे, हें तुला माहीत होतें तर?"

नोकर म्हणाला—"मला कांहीं माहीत नाहीं."

"बरें तर मी जाऊन खाऊन पाहातों." असें जयंत म्हणाला.

"राणी साहेबांनीं तुम्ही खाऊं नये असें सांगायला सांगितलें होतें." नोकर म्हणाला.

जयंतनें लोकांच्या तोंडीं ऐकलें होतें कीं राजानें आपल्या पट्टराणीला दुसरें लग्न

झाल्यावर नीट वागवलें नव्हतें. म्हणून ती आपल्या मुलांना घेऊन पळून गेली होती. कदाचित हीच तर ती राणी नव्हे. नाहीं तर फक्त राजद्रोह्याच्या कुटुंबाचा शेवट करण्यासाठीं आईनें इतकी गर्दी केली नसती. असा विचार करून तो नोकराला म्हणाला—“ मी नाहीं घरीं येत. मी यांच्या-बरोबर हीं पक्वान्नें खाणार आहें. मीच आधीं खाऊन पाहातों.” असें सांगून तो आंत गेला. थोड्या वेळानें तो ओरडला—“ आई ! मेलों !”

नोकर पळत राजधानींत गेला व राणीला म्हणाला—“ युवराजांनीं ऐकलें नाहीं व हट्ट करून पक्वान्न खाल्लें व त्यांचें प्राणोत्क्रमण झालें.”

उर्मिला कांगावा करून छाती बडवून रडूं लागली—“ मोठ्या राणीनें माझ्या मुलाला विष घातलें.” राजा धाकट्या राणीसह त्या नोकराला बरोबर घेऊन चंद्रमतीच्या घरीं गेला. उर्मिला चंद्रमतीला पाहतांच ओरडली—“ राक्षसिणी ! तूं माझ्या मुलाला विष दिलेंस. आतां तुझें समाधान झालें असेल !”

जयंत बाहेर येऊन म्हणाला—“ पहिल्यानें हें सांग, ह्या सर्वांचा कांटा दूर करण्या-साठीं तूं पक्वान्नांत विष घालून पाठविलें नव्हतेंस ?”

राजाला सर्व वृत्तांत कळला. त्याच्या पट्टराणीला व राजकुमारांना इतके कष्ट भोगावे लागले त्याला तोच कारण होता. त्याला पश्चात्ताप वाटला, एक मुलगी झाली. पण तिला पितृप्रेमाचें सुख लाभलें नाहीं. तो चंद्रमती व तिच्या मुलांना राजधानींत घेऊन आला. योग्यवर पाहून त्यानें आपल्या लाडक्या मुलीचें कन्यादान केलें.







# बेडकांचा राजा

ईश्वरानें सृष्टी निर्मिली त्यावेळीं त्यानें एक मोठा तलाव निर्मिला. त्या तलावांत लक्षावधि बेडूक रहात. ते नेहमीं ‘ डरांव ’ ‘ डरांव ’ असे ओरडत. ते आपसांत भांडत. कोणाचें ऐकत नसत. त्यांच्यांत शिस्त म्हणून नव्हती.

हें सर्व पाहून एका वृद्ध बेडकानें सर्व बेडकांची एक सभा बोलावली व म्हणाला—“ ईश्वराच्या सृष्टींत अनेक प्राणी आहेत. पण आपल्या बेडकांच्या जाती इतका निरर्थक निरुपयोगी प्राणी एक देखील नसेल. आपल्यांत शिस्त नाहीं. कोणी कोणाचें ऐकत नाहीं. आपल्या बेडूक जातींत नियम नांवाची वस्तूच नाहीं. या सर्वांचें कारण आपला कोणी राजा नाहीं. राजा असला कीं तो आपल्या प्रजेला वळण लावतो. मी आपले विचार मांडले. तुमच्या पैकीं कोणाला कांहीं सुचवायचें असेल तर सुचवावें.”

वृद्ध बेडकानें सांगितलें तें सर्व समजूत-दार बेडकांना पटत होतें. परंतु कोणी पूर्वी कधीं बोलून दाखविलें नव्हतें. म्हणून सर्वांनीं त्याच्या म्हणण्याला होकार दिला. सर्वांनीं त्यालाच आपला प्रतिनिधि नेमलें. तो वरुणदेवाकडे गेला व हात जोडून त्यानें विनंति केली—“ वरुणदेवा ! आम्हां बेडूक जातीला एक राजा हवा आहे. तो तूं पाठव.”

“ तथास्तु !” असें सांगून वरुणदेवानें त्याला निरोप दिला.

म्हाताऱ्या बेडकानें बेडकांना ती बातमी दिली. ती ऐकून सर्व राजाची वाट पहात

सौ. सरलाबाई नेमाडे



आकाशाकडे डोळे लावून बसले. तेव्हां-पासून बेडकांची तोंडें वर झालीं तीं तशींच राहालीं.

वरुणदेवानें दगडाचा एक बेडूक निर्मिला आणि तो त्या तलावांत टाकला. तो दगड तलावांतल्या चिखलांत तळाला जाऊन रुतून बसला. तो पडला त्यावेळीं तलावांत इतक्या मोठ्या लाटा आल्या व हलकल्लोळ उडून गेला कीं बेडकांना वाटलें कीं प्रलयकाळच येऊन ठेपला आहे. ते घाबरून इकडे तिकडे ओरडत पळूं लागले. परंतु थोड्या वेळानें सर्व शांत झालें.

'बेडकांचा राजा आला' ही बातमी तलावांत सर्वत्र पसरली. सर्व लहान थोर बेडूक राजाच्या दर्शनास निघाले. कांहीं हिंमत बहादूर बेडकांनीं दुरून आपल्या राजाला पाहिलें व म्हणाले—"पाहिलेंत आपला राजा किती मोठा आहे!"

त्या दिवसापासून बेडकांच्या जीवनांत पुष्कळ फरक पडूं लागला. त्यांचा ओरडा कमी झाला व ते कोणाशीं बोलायचें झालें तर हळूं बोलूं लागले. राजा केव्हां कोणाला बोलवील कोण जाणें, म्हणून सर्वांचे कान तिकडे लागलेले असत. राजाच्या जवळ जाण्याची स्वतः होऊन कोणी कधींच हिम्मत केली नाहीं. त्यांनें सर्व जीवनच पालटलें.

परंतु हा फरक फार दिवस टिकला नाहीं. कारण लहान लहान बेडकांनीं भीतभीतच राजाकडे निरखून पाहिलें. तो थोडी सुद्धां हालचाल करीत नाहीं, त्याची पापणीदेखील लवत नाहीं. हें देखील त्यांच्या लक्षांत आलें. थोडी हिंमत करून कांहीं बेडकें पुढें गेलीं आणि जवळून त्यांनीं राजाला पाहिलें. तो सारखा एकाच बाजूला टक लावून पहात होता. त्यानें एकदां देखील तोंड उघडलें नाहीं. शिवाय त्यांना या गोष्टीचें आश्चर्य वाटलें कीं राजाच्या अंगा तोंडावर शेवाळ सांचलें होतें.

तरण्या बेडकांनीं मोठ्या बेडकांसमोर आपल्या राजाची थट्टा उडवायला सुरवात केली. म्हातारे बेडूक म्हणत—"बाळांनो! आपल्या राजाची अशी थट्टा करूं नये." पण तरणे बेडूक कसलें ऐकतात? शेवटीं लहान थोर सर्व बेडूक राजाला पाहून स्वतःची खात्री करून घेण्यास गेले. लहान बेडकांनीं सांगितलें तें खरें निघालें. पुन्हां बेडकांच्या जगांत अराजकता माजली.

तो बुद्धिमान वृद्ध बेडूक पुन्हां वरुण-देवाकडे गेला व म्हणाला—"अरे देवा! तूं हा दगडाचा राजा कशाला दिलास आम्हांला?"

वरुणदेवानें सर्व शांतपणें ऐकून घेतलें व म्हणाला—"म्हणजे मी तुमचा राजा म्हणून ज्याला पाठविलें तो दगडच ठरला तर? ठीक! आतां चालता बोलता एक राजा येईल. पण संभाळून रहा, बरें का?"

वरुणदेवानें या खेपेस मगरीला पाठविलें. मगरच ती, हळूच पाण्यांत शिरली. पाणी थोडेंसें हललें पण ती केव्हां आली हें बेडकांना कळलें देखील नाहीं. हा राजा एका जागीं बसत नसे. दिवसभर तलावांत हिंडे फिरे. समोर कोणी बेडूक किंवा प्राणी दिसला तर तो त्याला खाऊन टाकी.

आतां बेडकांना हवा होता तसा राजा मिळाला. जुन्या संवयीप्रमाणें ते ओरडत पण राजा जवळपास कोठें आहे हें कळतांच गुपचुप राहूं लागले. चुकून पाठीमागून राजा येईल या भीतीनें ते मागें पाहूं लागले. अशातऱ्हेनें त्यांच्या जीवनांत मगरीच्या भीतीमुळें थोडीशी शिस्त आली.





# लोभाला बळी पडले

दंडकारण्यांत एका डोंगरी मुलखांत रानटी भिल्लांची एक जात रहात असे. त्या जातींतले दोन भाऊ होते. त्यांचें वय असेल पन्नास पंचावन्न. त्या जातीचे ते दोघे प्रमुख होते. जातींतले लोक या दोघांचा सल्ला घेऊन आपलीं कामें करीत.

दोघे कधीं कधीं दूर उंच डोंगर चढून जात. पण कोठें व कशासाठीं हें कधीं कोणाला कळलें नाहीं व कधीं त्यांनीं कोणाला सांगितलें पण नाहीं. दोघां भावांजवळ एक लहान अनाथ मुलगा होता. त्याचें नांव तुंगनाथ. दोघे भाऊ त्याच्या कडूनच आपलीं लहान मोठीं कामें करून घेत. पण त्याला देखील दोघे डोंगरांत कोठें व कशासाठीं जातात हें ठाऊक नव्हतें. दोघां भावांपैकीं धाकटा भाऊ एकाएकीं तापानें आजारी पडला व त्यांतच त्याला मरण आलें. तेव्हांपासून मोठ्या भावाच्या स्वभावांत फार फरक पडला. त्याच्याकडे पाहून वाटे कीं त्याच्या अंगांत शक्तीच उरली नाहीं. त्याचा आवाजदेखील बारीक झाला होता. त्याची अशी स्थिति पूर्वीं कधींच झाली नव्हती. तुंगनाथच्या स्वभावांत देखील फरक पडला. तो दिवसांतून तीनदां खात असे. आतां एक वेळचें जेवणदेखील त्याला जातनासें झालें होतें. कारण त्याला त्याच्या मानलेल्या काकांच्या तोंडावर दुःख कळा दिसे.

एकदां त्याच्या काकानें त्याला विचारलें—"कायरे तुंग? तुला मी एक गुप्त गोष्ट सांगणार आहे. पण ती या कानाची त्या कानाला कळतां कामा नये!"

श्री. का. बा. पुसाळकर



"मी कोणाजवळ बोलणार नाहीं!" तुंग म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं दोघे उजाडतांच घराला कुलूप लावून नंदीपर्वताकडे निघाले. जातांना दोघांनीं शेजाऱ्याला सांगून ठेवलें कीं गाईकडे लक्ष ठेवा. तिची धार काढा व तिला गवतचारा घाला.

नंदी पर्वताच्या पायथ्याच्या रानांत दोघे शिरले. झाडींतून वाट काढीत डोंगर चढत ते कित्येक मैल चालत गेले. संध्याकाळच्या सुमारास दोघे एका गुहेजवळ येऊन पोंचले. गुहेच्या तोंडावर डोंगरावरून वेली लोंबत होत्या. म्हणून दुरून तेथें गुहा असेल असेंदेखील वाटत नव्हतें. दोघांनीं गुहेच्या दारांत बसून भाकरी खाल्ली व पाणी पिऊन तेथेंच झोंपले. ती रात्र त्यांनीं तेथेंच काढली.

दुसऱ्या दिवशीं उजाडल्यावर म्हाताऱ्यानें तुंगनाथाला त्याच्या पाठोपाठ येण्यास सांगितलें व तो स्वतः गुहेंत शिरला. आंत जात असतां त्यांना एका जागीं एका चिंचोळ्या वाटेनें जावें लागलें. म्हणून दोघे रांगतच आंत गेले म्हटलें तरी चालेल. परंतु आंत गेल्यावर गुहा मोठी दिसली. म्हाताऱ्यानें एक मेणबत्ती काढली आणि ती पेटवून तिच्या उजेडांत ते पुढें जाऊं लागले. तुंगनाथ आपल्या काकांच्या पाठोपाठ चालत होता.

गुहेंत खोल आंत गेल्यावर म्हाताऱ्यानें मेणबत्ती एका उंच दगडावर ठेवली व म्हणाला—"अरे तुंग! मी जादू करतों बरें का? पूर्वी माझा धाकटा भाऊ मला मदत करीत असे. आतां तूं कर!"

तुंगला औत्सुक्य वाटत होतें. पण त्याचें हृदय धडधड करूं लागलें. त्याला भीति वाटली. तरी त्यानें होकारार्थी मान हलविली.










म्हाताऱ्यानें पिशवींतून एक लोखंडी ताट. वाळलेला दूधभोपळा, हिरव्या रंगाचें तेल असलेली एक बाटली, एक विचित्र वाटणारें मूळ वगैरे वस्तू काढल्या. सांपासारखें लांब मूळ पाहून तुंगला भीति वाटली. तें मूळ कोणत्या झाडाचें आहे हें त्याला कळलें नाहीं.

म्हाताऱ्यानें त्या वाळक्या दुधभोपळ्यांतून कसलें तरी भस्म काढलें आणि त्या लांब मुळाच्या कित्येक गोलगोल काचऱ्या काढून घेतल्या. नंतर मेणबत्तीच्या ज्योतीला एक काचरी लावून ती पेटविली आणि ताटलींत टाकलेल्या भस्मावर टाकली. त्या बरोबर ताटलींतून हिरवट निळ्या ज्वाळा येऊं लागल्या.

"एक" म्हातारा म्हणाला.

ताटलींतली ज्वाळा थोडी कमी होऊं लागल्यावर म्हाताऱ्यानें 'दोन' म्हणून आणखी एक काचरी ताटलींत टाकली. पुन्हां जाळ मोठा झाला. अशा तऱ्हेनें त्यानें एकीमागून एक चार पांच काचऱ्या ताटलींत टाकल्या. "हें काम येईल करतां तुला?" म्हाताऱ्यानें तुंगनाथाला विचारलें.

"हो, करीन कीं!" तुंगनाथ म्हणाला.



म्हाताऱ्यानें मुळाच्या आणखी कांहीं काचऱ्या काढल्या. "एक एकच टाकायची बरें का? एक जळून गेली कीं दुसरी टाकायची! काचरी जळत असतां तूं जोरानें एक ते दहापर्यंत मोजत रहा. या अवधींत मी कांहीं केलें किंवा तूं कांहीं पाहिलेंस तरी तिकडे लक्ष देऊं नकोस. तूं आपलें काम करीत रहा."

तुंगनाथानें होकारार्थी मान हलविली. म्हातारा म्हणाला—"मी पांघरूण घेऊन पडून राहातों नंतर तूं सुरू कर. त्यानें काठी एका बाजूला ठेवून दिली. बाटलींतलें तें हिरवें तेल थोडें प्याला. डोक्यावरून पांघरूण घेऊन मंत्र पुटपुटूं लागला."

थोड्यावेळानें तुंगनाथानें डोकें वर करून पाहिलें तर तेथें त्याचा काका नव्हता. त्याचे कपडे व पांघरूण जमिनीवर पडलेले होते. त्याच्या खालून एक हिरवा सांप बाहेर आला. तुंग जोरानें ओरडला व उडून दूर पळून गेला.

"तुंग इकडे ये." त्याला त्याच्या काकाचा आवाज ऐकूं आला.

तुंग भीतभीत पुन्हां आपल्या जागीं आला. म्हातारा त्याला खूप रागावला. मी



तुला काय सांगितलें होतें? मी सांगितलें होतें कीं मी कांहीं केलें किंवा तूं कांहीं पाहिलेंस तरी तूं तिकडे लक्ष देऊं नकोस व तूं हें काय केलेंस?"

"पण काका! तुम्ही मला हें सर्व पहिल्यानें कां नाहीं सांगितलेंत? असें होईल म्हणून!" तुंगनाथ म्हणाला.

या खेपेस त्यानें काकानें म्हटल्याप्रमाणेंच सर्व केलें. तो एका हातानें काचऱ्या ताटलींत टाकीत होता व तोंडानें एक ते दहा अंक मोजीत होता. एका डोळ्यानें त्याचा काका काय करतो हें पण पहात होता.











म्हातारा मंत्र म्हणत असतां सांप झाला. तो एका दगडच्या फटींत शिरला. तोंडांत एक सोन्याचें नाणें धरून बाहेर आला. एका जागीं तें नाणें ठेवून पुन्हां फटींत शिरला व दुसरें नाणें घेऊन आला. अशा-प्रकारें दहा वेळां तो सांप नाणीं घेऊन आला. काचऱ्यांच्या ज्वाळेचा उजेड कमी होत गेला व पुन्हां काळेख झाला. त्याबरोबर तो सांपाचें रूप सोडून पुन्हां म्हातारा झाला.

परत येत असतां वाटेंत तुंगनाथनें म्हाताऱ्याला विचारलें—"काका, तुम्हांला पैसे मिळतात ते असेच का?"

"होय, होय...." म्हातारा म्हणाला.

तुंगनाथनें विचारलें—"पण कसे हो काका?" त्यानें अनेक प्रश्न करण्याचा यत्न केला. पण म्हातारा त्याला म्हणाला—"हें पहा, तुला काय त्याचें. तुझा ज्या गोष्टीशीं संबंध नाहीं त्याविषयीं तूं विचार-तोसच कशाला? आणि हें पहा, ही गोष्ट तिसऱ्याला कळली तर आपण जिवंत राहणें अशक्य! मंत्रबळानें पैसे मिळतात हें कळलें तर राजा जिवंत सोडणार नाहीं. म्हणून सावधपणानें वाग!"

दोन वर्षे तुंगनाथ काकांना मंत्रबळानें सोन्याचीं नाणीं मिळवून देण्याच्या कामीं मदत करीत राहिला. त्यानंतर त्याचें लग्न झालें. त्याच्या बायकोचें नांव सत्तू होतें. ती हट्टी होती. एकदां डोक्यांत हट्ट शिरला कीं ती कोणाचें ऐकत नसे. लवकरच तिला सोन्याच्या नाण्यांची गोष्ट माहीत झाली. तुंगनाथाच्या पाठीस लागून तिनें तें गुपित विचारून घेतलें.

"हें गुपित कोणाला कळलें तर तुझा माझा व काकांचा जीव जाईल विसरूं नकोस." त्यानें बायकोला अशा तऱ्हेनें बजावून सांगितलें.



"मी कशाला सांगायला जातें कोणाला? तर मग हा म्हातारा असें बरेंच सोनें एकत्र करूं शकेल म्हणावयाचा!" सत्तू म्हणाली.

"होय!" तुंगनाथ म्हणाला.

"तुम्हांला माहीतच आहे, मला देखील पैशाची किती गरज आहे ती. मी नवीन कपडे व घरांतलें निरनिराळें सामान अजून कोठें घेतलें आहे? या म्हाताऱ्याला हें सर्व सोनें कशाला?" सत्तूनें नवऱ्याला विचारलें.

तिच्या मनांत एक विचार आला. तुंगनाथ म्हाताऱ्याऐवजीं सांप होऊन सोन्याचीं नाणीं घेऊन आला तर सर्व काम भागेल. नवऱ्या-जवळ तशी ती बोलली देखील. तेव्हां तुंगनाथ म्हणाला—"तेल पिणें तेवढें कठीण नाहीं. पांघरुणाखालीं तो कांहीं तरी मंत्र म्हणतो. तो मंत्र आल्याशिवाय काय उपयोग?"

पण सत्तू तेवढ्यावर नवऱ्याला सोडायला तयार नव्हती. तो म्हातारा घरांत नसतांना तिनें त्याची पिशवी काढली. पतिपत्नी दोघें तें तेल प्याली मुळाच्या काचऱ्या पेटवून भस्मावर टाकल्या. पण कांहीं उपयोग झाला नाहीं.



"या खेपेस गुहेंत म्हातारा मंत्र म्हणेल तो नीट ऐकून घे आणि पाठ करून घे!" सत्तू म्हणाली.

एक दोनदां लक्ष देऊन ऐकल्यावर तुंगनाथाला तो मंत्र पाठ झाला.

म्हातारा घरांत नसतां नवरा बायकोनें तो मंत्र म्हटला. या खेपेस मंत्राचा परिणाम झाला. तुंगनाथ सांप झाला. पण त्याच वेळीं म्हातारा घरांत आला. तुंगनाथ सांप झाला होता. तो पुन्हां काकांच्यासमोर मनुष्य झाला.

सत्तू म्हणाली—"हें पहा म्हाताऱ्या!"









"तुझें मंत्राचें गुपित आम्हांला कळलें आहे. आतां तुझ्या गमजा नाहीं चालायच्या आमच्या जवळ. तूं थोडें थोडें सोनें आणीत होतास. तें नाहीं चालणार. आणि तूं आणशील त्यांतलें अर्ध्याहून अधिक आम्हांला दिलें पाहिजे. तूं म्हातारा आहेस. तुला काय गरज पैशाची ! आम्ही तरणी माणसें आम्हांलाच त्याची जास्त गरज आहे."

दुसऱ्या दिवशीं तिघें गुहेंत गेलीं. म्हाताऱ्यानें मुळाच्या दहा काचऱ्या काढल्या. सतूनें आणखी काढायला सांगितल्या. म्हातारा म्हणाला—"तो मंत्र दहा काचऱ्या जळेपर्यंतच उपयोगी पडतो. माझें ऐक!"

"हें बघ, आम्हां दोघांना सांप करून तूं आंत पाठव. सांपाचें रूप देणारा मंत्र मला माहीत आहे." सतू म्हणाली. म्हाताऱ्यानें तें कबूल केलें.

म्हातारा कांचऱ्या पेटवून टाटतली टाळ्याकोच लागल्याबरोबर नवरा बायको सांपाचें रूप घेऊन सोन्याचीं नाणीं आणूं लागलीं. नाण्यांची एक रास पडली. पण सांपांना मनुष्य रूप मिळालें नाहीं.

म्हातारा दोघांना म्हणाला—"सांप होण्याचा मंत्र तुम्ही शिकून घेतलात. पण पुन्हां मनुष्य रूप घेण्यास जरूर असलेला मंत्र तुम्हांला माहीत नाहीं. तुम्ही घाई केलीत. तुम्ही तो मंत्र शिकून घ्यायला हवा होता. आतां मला सोनें मिळविणें शक्य नाहीं हें खरें आहे. पण तुम्ही आणून दिलेंत तें सोनें मला आयुष्यभर पुरेल. आतां तुम्ही सर्प योनींत राहूनच पुढील आयुष्य घालवा." असें सांगून म्हातारा सोनें उचलून घेऊन निघून गेला.

नवरा बायकोला पुढील आयुष्य सर्पयोनींतच घालवावें लागलें.





# सहोदर भ्राता

कावेरी नदीच्या काठीं एका गांवीं गोविंदस्वामी नांवाचा एक धर्मपरायण ब्राह्मण रहात असे. त्याला दोन मुलगे होते. एकाचें नांव अशोकदत्त होतें व दुसऱ्याचें विजयदत्त.

एकदां त्या प्रदेशांत दुष्काळ पडला. गोविंदस्वामीच्या घरांत त्याच्या कुटुंबाला पुरेल एवढें अन्नधान्य सांठवलेलें होतें. दुष्काळामुळें गांवकरी गांव सोडून जाऊं लागले. कित्येक उपाशी मरण पावले. हें सर्व डोळ्यासमोर घडत असतां स्वतःच्या घरीं बसून निश्चिंतपणें दोन्ही वेळचीं जेवणें गोविंदस्वामीला जड वाटूं लागलीं. म्हणून त्याच्याकडे जें कांहीं होतें तें त्यानें शेजारपाजाऱ्यांना वांटून टाकलें व सकुटुंब काशीला जाऊन राहूं लागला.

काशी नगराबाहेर एक चंडिकेचें देवालय होतें. तेथें पोंचल्यावर गोविंदस्वामीनें देवीची पूजा केली आणि एका झाडाखालीं गवत अंथरून त्यावरच सर्व झोंपले.

गोविंदस्वामी सारखेच अनेक लोक त्याच झाडाखालीं झोंपले होते. ते थंडीचे दिवस होते. गोविंदस्वामीचा धाकटा मुलगा रात्रीं उठला आणि बापाला जागा करून म्हणाला—"बाबा, मला फार थंडी वाजत आहे. शेकोटी तयार करून बसूं या का ?"

"वाळू काटक्या एकत्र करून आपण शेकोटी करायची म्हटली तरी या मध्यरात्रीच्यावेळीं विस्तव कोठें मिळणार ?" बाप म्हणाला.

"तो पहा, दूर जाळ दिसतो आहे." मुलगा म्हणाला.












बाप मुलाला समजावून सांगूं लागला—"तो जाळ! नको रे बाबा, ती तर चिता आहे! तेथें भुतें असतात!"

"भुतें काय करतात आपल्याला? मला घेऊन चला तिकडे!" विजयदत्तानें हट्ट केला.

शेवटीं नाइलाजानें गोविंदस्वामी मुलाला चितेजवळ घेऊन गेला. त्याला थंडी कमी झाल्यासारखें वाटूं लागलें. त्याला चितेंत कांहीं गोल वस्तु जळत असलेली दिसली. त्यानें बापाला विचारलें—"तें गोल चेंडूसारखें काय दिसतें आहे बाबा?"

"ती डोक्याची कवटी आहे!" बाप म्हणाला. मुलानें एक लाकूड हलवलें. त्याबरोबर ती फुटली. स्फोट झाल्यासारखा आवाज झाला व आंतून निघालेला द्रवपदार्थ विजयदत्तच्या तोंडावर उडाला आणि आश्चर्य म्हणजे त्याला एक राक्षस उग्र रूप मिळालें. त्याचे केस कांट्यासारखे अंगभर उभे झाले. त्याच्या हातांत तलवार होती. तोंडांत मोठे मोठे भयंकर दांत होते. गोविंदस्वामीला मारायला त्यानें तलवार उगारली तेव्हां आकाशवाणी झाली—"कपालस्फोटा! त्याला काय मारतोस? तो तर तुझा बाप आहे! तूं इकडे ये." त्या आवाजा पाठोपाठ तो राक्षस अदृश्य झाला.

गोविन्दस्वामी दुःखी कष्टी मनानें त्या झाडाखालीं आला. सकाळीं घडलेला सर्व वृत्तांत त्यानें बायकोला सांगितला. सर्वांना फार वाईट वाटलें. यात्रेकरूंत समुद्रदत्त नांवाचा एक व्यापारी होता. त्याला गोविंदस्वामीच्या कुटुंबाची दया आली व तो त्यांना घेऊन काशीच्या आपल्या एका नातेवाइकाच्याघरीं गेला. तेथें त्यानें गोविंदस्वामीच्या कुटुंबाची राहाण्या व जेवणाची व्यवस्था करून दिली.



२

त्यानंतर कित्येक वर्षें लोटलीं. गोविंदस्वामीचा मोठा मुलगा अशोकदत्त वेदशास्त्र पारंगत झाला. विद्येबरोबर त्याला शरीर संपत्ति तरुणाला साजेल अशीच मिळाली होती.

दुसऱ्या दिवाळीला काशीचा राजा प्रताप याच्याकडे मल्लयुद्ध करून कीर्ति व पारितोषिक मिळविण्याच्या हेतूनें दूरदूरच्या देशांतले मल्ल येत असत. त्यावर्षी देखील मल्ल जमा होऊं लागले. कुस्त्यांचे सामने सुरू झाले व दक्षिणेकडील एका पहिलवानानें इतर सर्व पहिलवानांना जिंकलें. तें ऐकून समुद्रगुप्त राजाकडे गेला व म्हणाला—"आपल्याच गांवांत एक तरुण मल्ल आहे व तो या दक्षिणेकडील पहिलवानाला कुस्तीचें आव्हान करायला तयार आहे. राजानें त्याला बोलाविलें व कुस्तीचा सामना ठरला. अशोकदत्तानें एका मिनिटांत त्या पाहिलवानाची पाठ जमिनीला लाविली व अजिंक्य पद मिळविलें. राजानें त्याचा सत्कार केला व त्याला आपला मुख्य अंगरक्षक म्हणून नेमलें.

एकदां राजा रात्रीच्या वेळीं कोठेंतरी जाऊन परत येत असतां स्मशानांतून



"पाणी!" "पाणी द्या!" असा आवाज कित्येकदां त्याच्या कानीं पडला. राजानें आपल्या नोकरांना सांगितलें कीं जाऊन त्या बिचाऱ्याला पाणी द्या. पण स्मशानांत रात्रीच्या वेळीं पाऊल टाकण्याची कोणाला हिंमत होईना. परंतु अशोकदत्त जायला तयार झाला. तो पाणी घेऊन स्मशानांत गेला. काम असल्यामुळें राजा त्याची वाट पहात थांबला नाहीं व राजवाड्यांत निघून गेला.

काळोखी रात्र होती. प्रेतें जळत होतीं. अशोकदत्त ओरडून विचारीत होता, "कोण












पाणी मागत होतें !" त्याला एक बायकी आवाज ऐकूं आला "मीं !" ज्या बाजूनें तो आवाज ऐकूं आला अशोक त्या दिशेला गेला. त्याला समोर एक पुरुष सुळावर लटकत असलेला दिसला. जवळ एक सुंदर स्त्री तडफडत पडलेली दिसली. त्यानें तिला विचारलें—"कोण तूं ?"

"मी त्यांची बायको आहें. त्यांना मरण आलें तर त्यांच्याबरोबर मी देखील चितेंत उडी घेईन. त्यांचा जीव अजून गेला नाहीं. त्यांना तहान लागली आहे. मी पाणी घेऊन आलें आहें. पण त्यांच्या तोंडापर्यंत इतका उंच माझा हात पोंचत नाहीं." ती स्त्री म्हणाली.

माझ्या पाठीवर चढ आणि पाज त्याला पाणी." असें सांगून अशोक वांकून उभा राहिला. ती स्त्री त्याच्या पाठीवर चढून उभी राहाली. परंतु अंगावर आणि जमिनीवर रक्ताचे थेंब टपटप पडूं लागल्यावर अशोकदत्तला आश्चर्य वाटलें व तो वर पाहूं लागला. तेव्हां त्याला हें पाहून जास्तच आश्चर्य वाटलें कीं ती स्त्री त्या माणसाचें मांस कापून खात आहे.

अशोकदत्तला आतां संशय उरला नाहीं. ती एक जखीण असणार. तिला धरून आपटून ठार करण्यासाठीं त्यानें तिचे दोन्ही पाय धरले. पण ती आकाशांत उडून गेली व अंतर्धान पावली. अशोकदत्तच्या हातांत तिच्या पायांतली एक पैंजण मात्र राहून गेली.

अशोकदत्त चकित होऊन पैंजण घेऊन घरीं गेला. दुसऱ्यादिवशीं सकाळीं राजाकडे जाऊन त्यानें तें पैंजण राजाला दाखविलें व त्यानें रात्रीं जें कांहीं पाहिलें तें निवेदन केलें.

अशोकदत्ताचें शौर्य व साहस पाहून राजाची मर्जी बसली होतीच. परंतु आतां



तें पैंजण पाहून व आपल्या अंगरक्षकाचा पराक्रम पाहून राजा फारच खूष झाला.

राजानें तें पैंजण महाराणीला दाखविलें व अशोकदत्तानें तें आणल्याचें सांगितलें. अशा पराक्रमी तरुणाशीं राजकन्येचें लग्न करून द्यावें असें मला वाटत आहे असें देखील राजा म्हणाला—"आपल्या अंगलेखेला याच्याहून सुंदर व शूर पति आणखी कोठून मिळणार?"

तें ऐकून राणी स्मित करून म्हणाली—"मी आजपर्यंत महाराजांजवळ ही गोष्ट सांगितली नव्हती. अंगलेखेनें पण अशोकदत्तलाच मनानें वरलें आहे. मला तिच्या मैत्रिणीकडून ही गोष्ट कळली आहे. तेव्हांपासून ही गोष्ट महाराजांच्या कानावर घालावी म्हणून मी संधी पहात होतें. आज तो योग आला."

राजानें अशोकदत्त व राजकन्या अंगलेखा यांचा लग्न समारंभ एका समुहूर्तावर पुरा केला.

३

एकदां राणीनें राजाला अशोकदत्तानें आणलेलें पैंजण दाखवून म्हटलें—"हें पैंजण या जगांतलें दिसत नाहीं. आपल्या सोनारांनीं शिकस्त करून पाहिली. पण त्यांना तसें घडविणें शक्य झालें नाहीं. त्यांत असलेले हिरे व माणिक्यें या जगांत मिळत नाहींत. तेव्हां जेथून हें पैंजण मिळालें तेथेंच त्याच्या जोडीचें दुसरें असणार तें आणून द्यायला जांवयाला सांगावें."

राजा विचारांत पडला. पण अशोकदत्त म्हणाला—"त्याच्या जोडीचें पैंजण आणून देण्याची जबाबदारी मी घेतों."

जांवई त्या प्रयत्नांत स्वतःचा जीव धोक्यांत घालील या भीतीनें राजा म्हणाला—



"काय जरूर आहे त्या पैंजणाची? नाहीं मिळालें तर नाहीं. त्यांत असें मोठें बिघडलें काय?" पण अशोकदत्तनें त्यांचें ऐकलें नाहीं.

तें पैंजण त्याला कृष्णचतुर्दशीच्या दिवशीं स्मशानांत रात्रीं मिळालें होतें. अशोकदत्त त्याच दिवशीं रात्रीं स्मशानांत ती स्त्री भेटेल असा विचार करून निघाला. नरमांसाची चटक लागलेल्या जखिणीला धरण्यासाठीं नरमांसाचाच मोह तिला दाखविला पाहिजे या विचारानें तो झाडाला लोंबकळत असलेलें एक प्रेत काढून घेऊन "नरमांस!" "नरमांस!" असा ओरडत स्मशानभर हिंडला.

एक स्त्री येऊन त्याला म्हणाली—"चल माझ्याबरोबर!" तो तिच्याबरोबर गेला. एका झाडाखालीं एक अप्सरा उभी होती. तिनें त्याला विचारलें—"नरमांस केवढ्याला देशील?"

अशोकदत्तनें पैंजण दाखवून विचारलें—"या पैंजणाच्या जोडीचें दुसरें मिळालें तर देईन नरमांस!"

"माझ्याजवळ त्याच्या जोडीचें पैंजण आहे. तूं दाखविलेंस तें पण माझेंच. मी वेष पालटून आलें आहे. म्हणून तूं मला



ओळखलें नाहींस! मला नरमांसाची गरज नाहीं. मी सांगेन तें केलेंस तर तुला हें पैंजण पण मिळेल." ती अप्सरा स्मित करून म्हणाली.

"बोल, काय करायचें असेल तें मी करायला तयार आहें." अशोकदत्त म्हणाला.

"हिमालय पर्वतांत त्रिघंट नांवाचें एक नगर आहे. तेथें महावीर नांवाचा राक्षस रहात असे. मी त्याची बायको, आमचा तूर्तचा राजा कपालस्फोट याच्याशीं युद्ध करीत असतां तो मरण पावला. नंतर कपालस्फोटानें तें नगर माझ्या स्वाधीन केलें.











मला एक मुलगी आहे. तिला योग्य वर मिळावा म्हणून मी शोध काढीत आहे. तुला तुझ्या राजाबरोबर मी पाहालें व आपल्या मुलीला तूंच योग्य वर आहेस असें समजून मी ती स्मशानांतली फाशीची व नरमांस खाण्याची माया रचली. तूं पुन्हां दुसऱ्या पैंजणाच्या शोधार्थ खात्रीनें येशील असें वाटून मी तें एक पैंजण तुझ्याकडे राहूं दिले. त्याप्रमाणें तूं आलास. आतां माझ्या मुलीशीं तूं लग्न करून घे."

वचन दिलें होतें म्हणून अशोकदत्त त्या स्त्री बरोबर गेला. ती त्याला आकाश-मार्गी त्रिघंट नगरींत घेऊन गेली. तेथें राक्षसकन्या विद्युत्प्रभा हिच्याशीं त्याचें लग्न झालें. त्या अप्सरेनें वचन दिल्याप्रमाणें दुसरें पैंजण दिलें व त्याबरोबर एक सोन्याचें कमळवण दिलें. नंतर तिनें आपल्या जांवयाला काशी नगरी बाहेरच्या स्मशानांत पोंचतें केलें व म्हणाली—"मी नेहमीं कृष्ण चतुर्दशीला येथें येत राहीन. त्या दिवशीं मला भेटावयाचें झाल्यास भेट."

अशोकदत्त तिचा निरोप घेऊन आपल्या घरीं गेला. त्याचे आईवडील घाबरले होते कीं धाकटा मुलगा नाहींसा झाला व मोठा देखील नाहींसा झाला. त्यांना जाऊन भेटला व धीर दिला. जांवई परत आलेला ऐकून राजा धांवत आला व त्याला राजवाड्यांत बोलावून घेऊन गेला. त्यानें हिमालयांतून आणलेलें जोडीचें पैंजण व त्याबरोबर मिळालेलें सुवर्ण कमळ राजाला दिलें. त्याच्या तोंडून घडलेला सर्व वृत्तांत ऐकून राजाला व राणीला आश्चर्य वाटलें.

राजानें दोन देवळें बांधलीं होतीं. दोन्हीं देवालयांवर चांदीचा कळस होता. एका कळसावर तें सवर्ण कमळ बसविल्यावर त्या कळसाचें सौंदर्य द्विगुणित झालें. तें पाहून राजाला वाटलें कीं दुसऱ्या देवळाच्या कळसावर देखील तसेंच कमळ लावतां आलें तर किती बरें होईल! त्याप्रमाणें व्यवस्था करण्यास राजानें सांगितलें. राज्यांतले उत्तमोत्तम सोनार तें कमळ घडविण्यासाठीं बोलावण्यांत आलें. परंतु सर्वांनीं हात टेकले व म्हणाले—"हें कमळ घडविणें आम्हांला शक्य नाहीं."

तेव्हां अशोकदत्त दुसरें कमळ आणण्यास तयार झाला. पण राजाला तें नको होतें. तो म्हणाला—"माझ्या मतें त्या कळसावर कमळ बसविण्याची गरज नाहीं."







पण अशोकदत्त हट्टाला पेटला. पुन्हां कृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं रात्रीं काळोख पडल्यावर राजकुमारी झोपली असतां तो कोणाला सांगितल्याशिवाय राजवाड्याबाहेर पडला व सरळ स्मशानांत गेला. तेथें वडाच्या झाडाखालीं त्याची राक्षस जातीची सासू बसली होती. जावयाला पाहून ती उठून उभी राहाली. ती त्याला आकाश मार्गें हिमालय पर्वतांतील आपल्या राजधानींत घेऊन गेली. तो कोणत्या कामासाठीं स्मशानांत आला होता हें देखील तिनें त्याला विचारलें नव्हतें. राक्षसकुमारीला आनंद झाला कीं तिचा पति तिला भेटण्यासाठीं आला. अशोकदत्त आपल्या राक्षसपत्नीबरोबर कांहीं दिवस आपल्या सासुरवाडीस राहाला. एक दिवशीं तो आपल्या राक्षस सासूला म्हणाला—"मला आणखी एका सुवर्णकमळाची गरज आहे."

"माझ्याजवळ एकच होतें. आणखी दुसरें कोठून आणूं बाळ? आमचा राजा कपालस्फोट यानें तें कमळ दिलें होतें. त्याच्या सरोवरांत हीं कमळें आहेत. पण त्या कमळांना हात लावण्याची कोणाची छाती नाहीं." सासू म्हणाली.

"कोठें आहे तो तलाव दाखव मला! मी स्वतः जाऊन घेऊन येतों कमळ तोडून. पाहातों मला कोण अडवितो तें." अशोकदत्त म्हणाला.

"तें तुला शक्य नाहीं. त्या तलावाचें रक्षण रात्रंदिवस राक्षस करीत असतात." त्याची सासू म्हणाली.

परंतु अशोकदत्तनें तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें व म्हणाला—"काय वाटेल तें झालें तरी चालेल, मी तो तलाव पाहणार व एक कमळ आणणार." शेवटीं त्याच्या सासूनें भीतभीतच दुरून त्याला तो तलाव दाखविला. तो तलाव एका उंच पर्वतावर होता. त्यांत सहस्रावधि कमळें होतीं. सर्व सोन्याचीं. त्यानें एक कमळ तोडण्यासाठीं हात घातल्याबरोबर भयंकर राक्षसांनीं त्याला अडविलें.

अशोकदत्तनें आपल्या तलवारीनें त्यांपैकीं अनेकांना जमिनीवर लोळविलें. कांहीं घाबरून पळून कपालस्फोट राजाकडे धांवत गेले. तें ऐकून कपालस्फोट स्वतः आला. अशोकदत्तला दुरूनच पाहून चकित होऊन तो ओरडला—"अरे हा तर माझा मोठा भाऊ अशोकदत्त! हा येथें कसा काय आला?" त्यानें हातांतली तलवार व इतर शस्त्रें दूर फेंकून दिलीं व धांवत येऊन अशोकदत्तच्या पायाला मिठी मारली.

"कोण तूं? हें सर्व काय आहे?" अशोकदत्तनें चकित होऊन त्याला विचारलें.

"मी तुझा धाकटा भाऊ विजयदत्त. तूं मला या रूपांत न ओळखणें साहजिक आहे. पण मी तुला ओळखलें. तूं तरी किती मोठा झाला आहेस? तुझें शौर्य व साहस पाहून मला कौतुक वाटलें. आपला भाऊ इतका पराक्रमी आहे हें पाहून माझ्या मनाचें समाधान झालें.



"तुला आठवत असेल दुर्दैवानें मला हें राक्षस रूप मिळालें. मी स्मशानांत जळत असलेल्या एका प्रेताच्या कवटीला ठेंचल्या-बरोबर ती फुटली व तिच्यांतून निघालेल्या द्रव पदार्थाच्या स्पर्शानें कपालस्फोट राक्षस झालों. मला आपलें पूर्ववृत्त आजपावेतों आठवलें नाहीं. परंतु तुला पाहिल्याबरोबर सर्व आठवलें व पुन्हां पूर्वरूप लाभलें आहे, बघ." त्याप्रमाणें खरोखरच त्याला मनुष्य रूप मिळालें. दोघे भाऊ प्रेमानें कडकडून भेटले.

नंतर दोघे अशोकदत्तच्या राक्षस पत्नीच्या माहेरी गेले. अशोकदत्तनें आपल्या राक्षस




सासूचा निरोप घेतला व म्हणाला–" आतां आम्ही दोघे भाऊ आपल्या घरीं जातों. कित्येक वर्षांनीं मला माझा धाकटा भाऊ भेटला. या खेपेस मी तुमच्या मुलीला पण बरोबर नेत आहें."

राक्षस सासूनें तिघांना काशीच्या स्मशानांत आणून पोंचतें केलें. तेथून तिघे गोविंदस्वामीकडे आलीं व आपल्या आई-वडिलांना भेटलीं. कित्येक दिवसांनंतर अशोकदत्त परत आलेला पाहून व बरोबर आपल्या धाकट्या भावाला व पत्नीला घेऊन आलेला पाहून मातापितरांना जो आनंद झाला तो काय वर्णावा ?

विजयदत्तच्या तोंडीं त्यांनीं व शेजार पाजारच्या लोकांनीं त्याच्या राक्षस जगांतल्या अनुभवाच्या गोष्टी ऐकल्या. सर्वच गोष्टी अद्भुत व विलक्षण होत्या.

प्रताप महाराजांना जांवई परत आल्याचें वर्तमान कळलें. ते महाराणीसह भेटायला धांवले. दोघांनीं अशोकदत्तच्या पराक्रमाची व विजयदत्तच्या राक्षस जीवनांतली गोष्ट ऐकली आणि तोंडांत बोटें घातलीं. राजा आपल्या जांवयाला राजवाड्यांत घेऊन गेला. पति परत आल्याचें कळल्यावर राजकुमारीला पण हायसें वाटलें व आनंद झाला.

राजाला एकच काय सोन्याचीं असंख्य कमळें मिळालीं. राजानें इतर देवळांच्या कळसांवर देखील एक एक सोन्याचें कमळ बसविलें. उरलेलीं कमळें त्यानें देवाला वाहिलीं.

विजयदत्त राजाच्या पदरीं नोकरीला लागला.

अशोकदत्तचें पुढील आयुष्य त्याचा दोघी पत्नींच्या सहवासांत सुखानें गेलें.





# मल्लिका जादुगारीण

एका गांवी एक गरीब कुटुंब रहात होतें. त्यांना मुलबाळ नव्हतें. त्यांच्या शेजारीं एका मोठ्या वाड्यांत मल्लिका जादुगारीण रहात होती.

एकदां त्या गरिबाच्या बायकोनें जादुगारिणीच्या बागेंतून आंबे तोडून आणायला नवऱ्याला सांगितलें. तो आंबे तोडूं लागला तेव्हां जादुगारिणीनें त्याला धरलें व म्हणाली–"तुला जें मूल होईल तें तूं मला दिलेंस तरच तुला माफ करीन."

त्या गरिबानें तें कबूल केलें. मुलगी झाली ती त्यानें वचन दिल्याप्रमाणें जादुगारिणीला आणून दिली. मुलीचें नांव गौरी होतें.

मल्लिकानें गौरीला एका बुरुजावर ठेवलें. त्या बुरुजाला पायऱ्या नव्हत्या. गौरी मोठी झाली.
















ऐनवेळीं जादुगारीण तेथें आली व तिनें राजकुमाराला आंधळा केलें. बुरुजावर जाऊन गौरीचे केस कापून टाकले व तिला रानांत सोडलें.

आंधळा राजकुमार धक्के खात हिंडत फिरत रानांत पोंचला. त्याला कोठून तरी कोणी हृदयाला पीळ पाडणारें गाणें म्हणत असल्याचा आवाज ऐकूं आला. तो त्या बाजूला धांवला. गौरीच होती तें गाणें म्हणणारी. आपल्या प्रियकराचें दुःख पाहून तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. अश्रूंचें पाणी राजकुमाराच्या डोळ्यांना स्पर्श करतांच त्याला छान दिसूं लागलें.

गौरी व राजकुमार यांना विवाह झाला व दोघं सुखानें राहूं लागलीं. तिच्या गरीब आई वडिलांना तें पाहून जो आनंद झाला तो काय वर्णावा?





## जांवयाचें भूत

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. झाडावरून प्रेत काढून घेऊन त्यानें खांद्यावर टाकलें आणि स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांतील वेताळ त्याला म्हणाला–"राजा, या रात्रीच्या वेळीं तूं इतके कष्ट सोशीत आहेस. पण तुला याची कल्पनादेखील नसेल कीं यश तुझ्या पदरीं पाडण्याऐवजीं तुझ्याहून कमी दर्जाच्या माणसाच्या पदरीं पडण्याची शक्यता आहे. ही गोष्ट पटावी म्हणून मी तुला कुमारवर्मांची गोष्ट सांगणार आहे. लक्ष देऊन ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

कुमारवर्मा अवंती नगराचा राहणारा होता. एक कुलीन घराण्यांत तो जन्मला होता. परंतु त्याच्या आईवडिलांनीं श्रीमंतीची ऐट दाखविण्यांत व दान धर्म करण्यांत जवळ होतें नव्हतें तें सर्व खर्च करून टाकलें.

---

वेताळाच्या गोष्टी



मुलाचें लग्न श्रीमंत घराण्यांत करून दिल्यास पुन्हां आपला बडेजाव कायम राहील या हेतूनें आईवडिलांनीं कुमारवर्माचें लग्न एका कोट्याधीशाच्या मुलीशीं करून देण्याचें ठरविलें. मुलगी रंगा रूपानें चांगली नव्हती. म्हणून तिच्या बापानें पाण्यासारखा पैसा खर्च करून हा संबंध जुळवून आणला होता.

परंतु कुमारवर्माला पैशाचा लोभ नव्हता. स्वतःच्या पायावर उभा राहून आयुष्य घालविण्याची त्याची तयारी होती. म्हणून त्यानें या संबंधाला नकार दिला. बापलेकांचें या गोष्टीवर भांडण झालें व बापानें मुलाला घराबाहेर काढलें. कुमारवर्मा जग मोठें आहे, लाथ मारीन तेथें पाणी काढीन असा मनाशीं निश्चय करून घराबाहेर पडला.

कुमारवर्मा कांहीं दिवस उज्जयिनी येथें राहून नंतर उमरावतीला जाण्यासाठीं निघाला. त्याच दिवशीं धनगुप्त नांवाचा उज्जयिनीच्या एका व्यापाऱ्याचा मुलगा देखील उमरावतीला जाण्यासाठीं निघाला. नगराबाहेर दोघांची गांठ पडली. दोघे घोड्यावर बसून जात होते. धनगुप्त आपल्या बापाप्रमाणेंच व्यापारधंद्यांत पडला. त्याला आपल्या गांवाबाहेरचें जग माहीत नव्हतें व व्यापाराशिवाय इतर कोणता धंदापण येत नव्हता. नवीन अनोळखी माणसाशीं ओळख करून घेण्यासाठीं कसें बोलावें, कसें वागावें हें त्याला कळत नव्हतें. परंतु कुमारवर्माचा स्वभाव मात्र अगदीं निराळा होता. तो बोलण्यांत चतुर होता. म्हणून त्यानें धनगुप्तशीं लवकर चांगली ओळख करून घेतली. परस्परांच्या गप्पा चालू असतां कुमारवर्माला धनगुप्त उमरावतीला कां जात आहे हें कळायला वेळ लागला नाहीं.

धनगुप्त याचा विचार लग्नाच्या बाबतींत कुमारवर्मासारखा नव्हता. बापानें त्याचें लग्न उमरावतीच्या कोट्याधिशाच्या मुलीशीं ठरविलें होतें. वरवधू पक्षांनीं पत्रोपत्रींच तो संबंध जुळवून आणला होता. असें ठरलें कीं नवऱ्यामुलीबरोबर इतके लक्ष रुपये तिच्या सासरीं पाठवून देण्यांत यावेत. नवरामुलगा व नवरीमुलगी दोघांनीं परस्परांस भेटावें. नंतर मुहूर्त ठरवून लग्नसमारंभ करावा. म्हणून धनगुप्त आपल्या भावी सासुरवाडच्या गांवीं निघाला होता.

तें ऐकून कुमारवर्मानें चकित होऊन विचारलें—"हें बरोबर आहे कीं मुलीकडून लक्षावधि रुपये येणार आहेत. पण समज, ती कुरूप निघाली तर तूं तिच्याशीं लग्नाला तयार होशील का? तिच्या बरोबरच तर तुला सारें आयुष्य घालवावें लागणार?"

"मुलगी ठीक आहे. एखादें वैगुण्य असलेंच तर त्यांत काय? सर्वच गुण एकत्र कोठें मिळतात का? काम भागवून घ्यावेंच लागतें." धनगुप्त म्हणाला.

कुमारवर्मा बरोबर आल्याचा धनुगुप्ताला फायदाच झाला. कारण नव्या जागेंत विचार-पूस करून सोय करून घेण्यांत तो पटाईत होता. पण धनगुप्ताला तें सर्व कांहीं कळत नव्हतें. त्यामुळें प्रवास सुखाचा झाला.





दोघे कांहीं दिवस प्रवास केल्यावर उमरावती येथें पोंचले. धनगुप्तानें जन्मांत कधीं दुसरें शहर पाहिलें नव्हतें. कुमारनें देखील पाहिलें नव्हतें. परंतु तो गांव परकें म्हणून घाबरला मात्र नाहीं.

"अरे बाबा! आतां तर काळोख पडूं लागला आहे. या रात्रीच्या वेळीं तुझें सासुरवाड कोठून सांपडणार? आजची रात्र कोठें तरी धर्मशाळेंत काढूं. उजाडल्यावर जा हुडकायला." कुमारवर्मानें त्याला सल्ला दिला. धनगुप्त नगरांतला गजबजाट पाहूनच थोडा घाबरला होता. म्हणून त्याला कुमारवर्माचा सल्ला पसंत पडला. तो कुमार-वर्मा बरोबर धर्मशाळेंत गेला. पण ती धर्मशाळा नसून वाडा असावा असें भासलें.

ती एक खानावळ होती. कुमारवर्मानें खानावळीच्या मालकाला सांगून दोघांसाठीं दोन निरनिराळ्या खोल्या ठरवून घेतल्या व उत्तम जेवणाची व्यवस्था करण्यास सांगितलें.

खानावळीच्या मालकानें पाहिलें कीं कोणी तरी बडे प्रस्थ दिसत आहे म्हणून पंचपक्वान्नांचें भोजन तयार करविलें. धनगुप्त जेवायला बसला. मागचा पुढचा कांहीं एक विचार न करतां त्यानें पक्वान्नांवर खूप हात मारला. रात्रीं पोट दुखूं लागलें. झोंप लागली नाहीं. पोट इतकें दुखूं लागलें कीं त्यानें खानावळवाल्याला जागें करून वैद्याला बोलाविलें. वैद्यानें नाडी पाहिली व पोट तपासलें व म्हणाला—"हा जुना आजार दिसतो आहे. जास्त जेवायला नको होतें. त्याचा कोणी नातेवाईक असेल तर त्याला लवकर बोलवून घ्यावें. खानावळवाल्यानें कुमारवर्माला जागें केलें व धनगुप्तच्या खोलींत बोलावून घेऊन आला. सर्व वृत्त ऐकून त्याला फार वाईट वाटलें.

"उजाण्यापूर्वी माझी प्रकृति सुधारली नाहीं तर माधवगुप्त याच्याकडे जाऊन मी येथें असल्याची बातमी दे. कारण मी आज उद्यां येईन असें त्यांना कळविलें होतें. ते काळजी करतील. तेच मला माझ्या गांवीं पोंचवितील." धनगुप्त म्हणाला.

दुर्दैवानें उजाडण्यापूर्वीच धनगुप्ताचें प्राणोत्क्रमण झालें. दुपारीं दहनविधि वगैरे करण्याचें ठरवून उजाडतांच कुमारवर्मा माधवगुप्तच्या शोधार्थ निघाला.

माधवगुप्तला व त्याच्या घरच्या लोकांना वाटलें कीं धनगुप्तच आला आहे. त्यांनी त्याच्या सत्काराची धांवपळ व गर्दी इतकी केली कीं धनगुप्तच्या मृत्यूची वार्ता देण्यास सवडच मिळाली नाहीं.

"काल रात्रीं तुमची वाट पाहिली आम्ही!" माधवगुप्त म्हणाला.

कुमारवर्मानें त्यांचा तो उत्साह व आनंद पाहिला व ती शोकवार्ता त्यांना न देण्याचें मनाशीं ठरविलें. एक अपूर्व अनुभव त्याला सहजी मिळत होता त्याचा उपयोग करून घेण्याचा मोह आवरेना. म्हणून स्वतःच धनगुप्त असल्याचें दर्शवून तो बोलूं लागला. म्हणाला—"हो, रात्र फार झाली पोंचायला.





म्हणून एका धर्मशाळेंत उतरलों होतों."

नवऱ्यामुलाचें रूप पाहून माधवगुप्ताच्या कुटुंबांतील सर्व लोकांना आनंद झाला. पण त्यांच्यापैकीं एका तरुणाचा चेहरा पाहून त्याला आश्चर्य वाटलें. त्याच्या तोंडावर राग झळकत होता.

त्या तरुणाचें नांव वज्रपाल असें होतें. तो माधवगुप्त याचा दूरचा नातेवाईक होता. घरची गरीबी होती. उमरावतीच्या राजाच्या पदरीं तो एक सामान्य सैनिक म्हणून नोकरी करीत होता. तो गरीब नसता तर माधवगुप्तानें त्याच्याशींच आपल्या मुलीचें लग्न करून दिलें असतें. परंतु आपली लाडकी मुलगी कल्याणी श्रीमंताच्या घरीं पडावी या विचारानें त्यानें दूरचा संबंध जोडण्याचें मनाशीं ठरविलें होतें.

वज्रपाल कुमारवर्माला एका बाजूला बोलावून घेऊन गेला व म्हणाला—" तुझ्या जवळ तलवार दिसते आहे मला. पण कधीं उपयोग केला आहेस का त्या तलवारीचा ?"

" तुला तें पाहायचेंच असेल तर पहा. पण केव्हां व कोठें ?" कुमारवर्मानें विचारलें.

" या बागेंत जेवणानंतर !" वज्रपाल म्हणाला.

" परंतु माझ्यावर तुला एवढा राग येण्याचें कारण काय मला नाहीं कळलें." कुमारवर्मानें विचारलें.

" तुला माझ्याविषयीं माहिती असती तर कल्याणीशीं विवाह करण्यासाठीं इतक्या दुरून तूं कदाचित आलादेखील नसतास." वज्रपाल म्हणाला.

त्याच वेळीं माधवगुप्त आला व म्हणाला— " थोड्या वेळानें जेवायला बसूं. तोंपर्यंत मी कल्याणीला पाठवून देतों. तिच्याशीं बोलत बसा थोडा वेळ. मी भटजींकडे निरोप पाठविला आहे. दुपारपर्यंत ते येतील."

त्यानंतर कांहीं वेळानें कल्याणी आली. कुमारवर्मा व ती दोघंच तेथें होतीं. आपल्या भावी पतीसमोर बोलायला व वागायला एक तऱ्हेचा जो संकोच व लाज वाटणें साहजिक असतें तें कल्याणींत दिसलें नाहीं.

" तुझ्या रूपाचें वर्णन मी ऐकलें होतें. पण त्याहून...." कुमारवर्मा म्हणाला.

" माझ्या रूपाची गोष्ट तुम्हांला कशाला हवी ? माझ्या बापाकडून काय काय घ्यायचें याची लांब यादी आली आहे पूर्वीच." कल्याणी म्हणाली.

" तर मग लग्न झालें तर आपला संसार सुखाचा कसा होणार ?" कुमारवर्मानें विचारलें.

" मी अगदीं तेंच म्हणतें. परस्परांवर प्रेम असल्याशिवाय लग्नाच्या गोष्टी फुकट !" कल्याणी म्हणाली.

जेवणें आटोपल्यावर कुमारवर्मा बागेंत वज्रपालाशीं द्वंद्वयुद्धाला तयार होऊन निघाला. अर्थात ती गोष्ट माधवगुप्ताला काय माहीत असणार ? तो त्याला म्हणाला— " हे पहा, भटजी आलेले आहेत. साखरपुडा वगैरे करून घेतलेला बरा !"





“ठीक ! मी येतो जरा बागेंत हिंडून.” असें बोलत तो निघून गेला. बागेंत त्यानें प्रवेश केला. पण त्याला वज्रपाल दिसला नाहीं. म्हणून तो परतला. फाटकाला कुलूप लागलेलें पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

तितक्यांत पाठी मागून वज्रपालचा आवाज त्याला ऐकूं आला—“तुला फाटक उघडें असेल असें वाटलें होय, पळपुट्या !”

“तूं इतका मूर्ख असशील असें नव्हतें वाटलें मला ! मी स्वतः बागेंत आलों व तुझ्या भीतीनें परत फिरलों असें वाटलें होय तुला ? म्हणून तूं कुलूप लावून ठेवलें होतेंस नाहीं कां ? तर मग ये तुझी खोड मोडलीच पाहिजे !” असें सांगून त्यानें तलवार उपसली.

वज्रपालनें पण आपली तलवार उपसली. दोघांचें द्वंद्व सुरू झालें. “तलवार धरण्याचें देखील कळत नसतां तूं कोणत्या जोरावर द्वंद्वयुद्धाला आव्हान केलेंस हें नाहीं कळलें मला.” असें सांगून एक वार करून कुमारवर्मनें वज्रपालच्या हातांतली तलवार खालीं पाडली व ती उचलून घेतली.

“माझी तलवार मला परत कर !” वज्रपाल म्हणाला.

“तुला तलवार परत करण्याचा अर्थ तुझ्याशीं युद्ध चालू ठेवणें. तुला स्वतःचा जीव वांचावा असें वाटत असेल तर निमूटपणें चालू लाग व आपल्याहून जास्त भित्र्या लोकांना द्वंद्वयुद्धाला आव्हान कर !” कुमारवर्मा म्हणाला.

तितक्यांत पाठीमागून कल्याणीचा आवाज त्याला ऐकूं आला—“काय झालें ? काय झालें ?” तिनें सर्व पाहालें होतें. तिला वाटत होतें कीं तिच्या प्रियकराच्या हातीं कुमारवर्माचा वध होईल. कुमारवर्मनें वज्रपालाची तलवार तिच्या हातांत देत



म्हटलें—"ही तलवार संभाळून ठेव. कारण ही तलवार इतरांना यमलोकीं पाठविण्या-ऐवजीं आपल्या मालकालाच पाठवायची!" असें सांगून तो निघून गेला. तो माधव-गुप्ताला म्हणाला—"मी ज्या कामासाठीं आलों होतों तें झालें. आतां मी येतों."

माधवगुप्त चकित होऊन विचारूं लागला—"परंतु अजून साखरपुडा वगैरे तर कांहींच झाला नाहीं. भटजी वाट पहात बसले आहे."

"होय! परंतु त्याहून जास्त आणखी एक जरूरी काम आहे. आणखी क्षणभरानें माझा दहन संस्कार आहे. म्हणून मला गेलें पाहिजे!" कुमारवर्मा म्हणाला.

"हें काय खुळ्यासारखें अशुभ बोलतां!" माधवगुप्तनें विचारलें.

"वेडपटासारखें नाहीं. खरें! रात्रीं पंचपक्वान्नांवर हात मारल्यावर पोटांत दुखूं लागलें व रात्रींच हें जग सोडून मी निघून गेलों. आणखी थोड्या वेळानें माझा दहन संस्कार आहे. माझ्या शिवाय तो कसा काय होणार?" कुमारवर्मा म्हणाला.

असें सांगून कुमारवर्मा निघून गेला. सर्व चकित होऊन त्याच्याकडे पहात उभे राहिले.

नंतर कांहीं वेळानें माधवगुप्तानें नोकरांना पाठवून चवकशी केली तेव्हां त्याला कळलें कीं रात्रीं एका खानावळींत जास्त खाल्ल्या-मुळें धनगुप्त नांवाच्या एका तरुणाचा मृत्यू झाला व त्याचा दहसंस्कार दुपारीं करण्यांत आला.

माधवगुप्त व त्याच्या कुटुंबांतील लोकांना वाटलें कीं आला होता तो धनगुप्त स्वतः नसून त्याचें भूत होतें, व त्यांनीं मनाचें समाधान करून घेतलें.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, मला हें कळत नाहीं कीं पैशाच्या मोहानें येणाऱ्या धनगुप्तावर कल्याणीचें प्रेम न होणें साहजिक होतें. पण कुमारवर्मा-सारख्या शूरवीराशीं ती लग्नाला तयार झाली असती. मग कुमारवर्मानें खरी गोष्ट न सांगून धनगुप्ताच्या भुताचें सोंग कशाला केलें? याचें कारण माहीत असून तूं उत्तर दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"कुमारवर्मानें खरी गोष्ट सांगितली नाहीं तर त्याचें एक नाहीं, अनेक कारणें आहेत. पहिली गोष्ट ही कीं तो गरीब होता. तिला वाटलें असतें कीं तो देखील धनलोभानें त्या लग्नास तयार झाला असावा. तिचें प्रेमदेखील एका गरीब तरुणावरच होतें हें खरें आहे. पण तें स्वेच्छेनें होतें. दुसरें कारण, त्याला कल्याणीशीं लग्न करण्यासाठीं एका मूर्ख कापुरुषाशीं द्वंद्व युद्ध करावें लागलें. तो त्याला त्याचा अपमानच वाटला. त्यानें भुताचें सोंग केलें त्यालादेखील एक कारण होतें. तें तिसरें कारण. त्यानें वज्रपालाचा द्वंद्वयुद्धांत पराभव केलेला पाहून वज्रपाला ऐवजीं ती त्याच्याशीं लग्नाला तयार झाली असती. परंतु दुसऱ्यावर प्रेम करणाऱ्या मुलीशीं लग्नाला कोणता पुरुष तयार होईल! भूत होतें म्हणूनच पराभव झाला असें समजून ती वज्रपालाशीं लग्न करून सुखी होईल असा विचार करून त्यानें तें भुताचें सोंग केलें."

अशातऱ्हेनें मौन भंग झाल्यामुळें वेताळ अदृश्य झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला. [कल्पित]





# परोपकारी गोपाळ

लग्नाचा सोहोळा किती आनंदाचा असतो.

परंतु मुलींचें लग्न जुळवतांना गरिबावर जें संकट येतें तें त्याचें त्यालाच ठाऊक.

एकदां परोपकारी गोपाळ बाजारपेठेच्या गांवीं निघाला. वाटेंत एक ओढा पार करून जावें लागलें. पाण्यांत पाऊल टाकतांच पायाला कांहीं लागलें. म्हणून त्यानें वांकून पाण्यांतून ती वस्तु काढली. ती एक पिशवी निघाली व त्यांत मोहोरा होत्या. गाडींतून जात असतां पडल्या असतील कोणाच्या तरी. गांवांत जाऊन चवकशी करूं व नाहीं तर पोलीस ठाण्यावर देऊन टाकूं असा विचार करून गोपाळनें ती पिशवी उचलून घेतली.

पण बाजारपेठेंत मोहरांची पिशवी हरवल्याचें कोणी त्याला सांगितलें नाहीं तो एका घरांत पाणी प्यायला म्हणून गेला. तेव्हां त्याला बाईचा आवाज ऐकूं आला— "तुम्ही विष कशाला खातां ? मला द्या. मी मेल्यावर काय वाटेल तें करा." गोपाळ तें ऐकून आंत धांवत गेला.

चवकशी करतां त्याला कळलें कीं त्या गरिबाला तीन मुली होत्या. हुंडा कमीत कमी १०० मोहरा तरी द्याव्या लागणार. नाहीं दिल्या तर मुलींचे हात पिवळे कसे होणार ? पण हुंडा कोठून द्यायचा ? म्हणून मुलींचा बाप तो प्रश्न सोडविण्यासाठीं विष खाणार होता.

"एवढेंच ना ? तर मग ही घ्या मोहरांची पिशवी. आपल्या मुलींचें लग्न करून टाका !" गोपाळ म्हणाला व त्यानें मोहरांची पिशवी दिली.

तो गरीब चकित होऊन विचारूं लागला—"कोण तुम्ही ? परोपकारी गोपाळासारखे दुसऱ्याच्या मदतीला धांवत आलांत म्हणून विचारलें."

"मीच तो गोपाळ !" असें सांगून व त्यांचा निरोप घेऊन गोपाळ आपल्या गांवीं निघाला.

कालव्याच्या काठीं तो पोंचला तेव्हां त्याला जवळच कोणी तरी कण्हत असल्याचा भास झाला. कालव्याच्या काठीं त्या आवाजाच्या अनुरोधानें तो गेला तेव्हां त्याला एक मनुष्य बेशुद्ध पडलेला दिसला. त्याच्या डोक्याला जखमा दिसल्या. रक्त वाहात होतें. गोपाळ त्याला उचलून घेऊन कालव्याच्या काठीं गेला. त्याच्या डोक्यावर पाणी शिंपडलें व त्याला त्यानें थोडें पाणी पाजलें. पाणी प्याल्यावर त्याला हुशारी वाटली. तो म्हणाला—"मी बाजारांत जात होतों, दोघां तिघां दुष्टांनीं मारहाण केली." गोपाळला तो असेंदेखील म्हणाला कीं त्याचें घर पांच सहा कोसावर आहे. म्हणून गोपाळ त्याला आपल्या घरीं घेऊन गेला. वैद्याला बोलावून त्याच्या औषध पाण्याची व्यवस्था करून दिली.



तो मनुष्य गोपाळजवळ खोटें बोलला होता. त्यादिवशीं एक सावकार बाजार पेठेंतून परत येत होता. त्यानें बाजार पेठेंतल्या व्यापाऱ्यांकडून जी रक्कम येणें होती ती वसूल करून घेतली होती व तो आपल्या एका नोकरासह परत येत असतां, तिघां चोरांनीं त्यांना लुबाडण्यासाठीं मारहाण केली. नोकरानें एका चोराला खूप चोप दिला. तो एका जागीं बेशुद्ध होऊन पडला. त्याचे साथी पळून गेले होते.

ती मारामारी झाली त्या गडबडींत एक पिशवी कालव्यांत पडली व तीच गोपाळला



सांपडली. त्यावेळीं तो चोर बेशुद्ध पडलेला होता. गोपाळ परत येत असतां त्याच्या कण्हण्याचा आवाज ऐकून तो त्याच्या मदतीला धांवला.

घरीं गेल्यावर एक पिशवी गहाळ झाल्याचें सावकाराच्या लक्षांत आलें व त्यानें पुन्हां बाजारपेठेंत जाऊन एक पिशवी नाहींशी झाल्याची वर्दी ठाण्यावर दिली.

दोन तीन दिवसांत एका गरिबाच्या घरीं तिघां मुलींची लग्नें होत असल्याची बातमी पण कोतवालाला कळली. कोतवालानें त्याला विचारलें—"काय रे! तूं उपाशीं मरत होतास परवांपर्यंत. आतां तिघां मुलींचीं लग्नें करायला इतके पैसे कोठून आले रे? तेव्हां त्यानें परोपकारी गोपाळकडून त्याला ती पिशवी मिळाल्याचें व एका सावकाराची मुद्रा पिशवीच्या तोंडावर असल्यानें सांगितलें.

पोलिसांनीं ती थैली मागवून घेतली व तिच्या तोंडावर त्या सावकाराची मुद्रा पाहून खात्री करून घेतली. कोतवालानें परोपकारी गोपाळाचें नांव पूर्वी ऐकलें होतें. पण तो चोरी करून उपकार करीत असेल असें त्याला कधीं वाटलें नव्हतें. परंतु ती पिशवी पाहून मात्र त्याचा संशय वाढला.

गोपाळला त्या चोरांशीं सावकारांच्या नोकरांनीं केलेली मारामारी व त्याच्या घरीं असलेला जखमी मनुष्य त्या चोरांपैकींच एक आहे हें स्वप्नांत देखील वाटलें नव्हतें. म्हणून त्यानें कोतवालाला खरें खरें तें सांगून टाकलें.

परंतु त्या गोष्टीवर कोतवालाचा किंवा सावकाराचा विश्वास बसला नाहीं. त्या सावकाराची ५०० मोहरांची पिशवी गोपाळनें आणखी एकाला देऊन टाकली होती. म्हणजे त्यानें चोरीच्या मालाचा






उपयोग केला. त्या अपराधाबद्दल गोपाळला कैद करण्यांत आलें. या शिवाय सावकाराला त्याच्या मोहरा परत मिळेपर्यंत मुलींच्या बापाला पण तुरुंगांत टाकण्यांत आलें. गोपाळानें मध्यें पडून ती रकम सावकाराला देण्याची करण्याची जबाबदारी स्वतःवर घेतली. त्या मुलींच्या बापाला एक चिट्ठी देऊन लक्ष्मीकडे पाठविलें. त्यानें त्याला तोंडीं सांगायला सांगितलें कीं ५०० मोहरांसाठीं मला तुरुंगांत टाकण्यांत आलें आहे. तरी त्या पाठवून द्याव्या व घरांत जो मनुष्य जखमी होऊन पडला आहे त्याच्या औषध पाण्याची कोणत्याहि प्रकारें हयगय होऊं देऊं नये.

मुलींचा बाप गोपाळच्या घरीं धांवत गेला. त्यानें लक्ष्मीला गोपाळनें सांगितलेला निरोप सांगितला. घरांत एक मनुष्य खाटेवर कण्हत पडलेला त्याला दिसला. तो त्याला म्हणाला—"गोपाळ मनुष्य नाहीं, देव आहे. स्वतः एका संकटांत आहे. पण आपल्या घरीं आजारी असलेल्या अनोळखी माणसाची त्याला किती काळजी!"

लक्ष्मी सर्व वृत्त ऐकून त्याला म्हणाली—"तुम्ही जाऊन आपल्या मुलींचीं लग्नें



उरकून घ्या. देवाच्या कृपेनें ५०० मोहरा निघतील कोठून तरी!"

मुलींचा बाप म्हणाला—"गोपाळरावांनीं दिलेल्या पांचशें मोहरांपैकीं तीनशेंच खर्च झाल्या आहेत. बाकी माझ्याजवळच आहेत. हुंड्याची रकम दिली. लग्न होईल सावकाश. तीनशें मोहरा कोठें मिळाल्या तर गोपाळरावांची सुटका होऊं शकेल.

"तुम्ही हें असें कांहीं बोलूं नका. तुम्ही त्यांना सोडविण्यासाठीं मुलींचीं लग्नें थांबविलीत असें त्यांना कळलें तर त्यांना वाईट वाटेल. त्यांनीं आयुष्यभर परक्यांची




सोय पाहिली. स्वतःची सोय कधीं पाहिली नाहीं." लक्ष्मी म्हणाली.

चोर तें सर्व अंथरुणावर पडून ऐकत होता. तो कण्हत कण्हत म्हणाला—"तुम्ही गाडीची व्यवस्था केलीत तर मी घरीं जाऊन तेवढ्या पैशाची व्यवस्था सहजीं करूं शकेन. ज्यानें मला जीवदान दिलें त्याला तुरुंगवास हें नाहीं मला खपणार."

लक्ष्मीनें त्याला समजाऊन सांगितलें कीं आजारांत उठून जाण्याची गरज नाहीं.

"तुम्ही औषध पाणी सर्व कांहीं केलें व मी आतां चांगला बरा आहें. मला जाऊं द्या." चोर म्हणाला.

चोरानें आग्रह केला म्हणून लक्ष्मीनें व मुलींच्या बापानें त्याला गाडींत बसविलें. चोरानें मुलींच्या बापाला बरोबर चलायला सांगितलें. गाडी चोरांच्या गांवीं पोंचली. जखमी चोरानें आपल्या साथीदारांना सांगून पांचशें मोहरा देऊन मुलींच्या बापाला पाठविलें. त्यानें कोतवालाकडे ती रकम जमा केली. सावकाराला रकम मिळतांच त्यानें तक्रार मागें घेतली. अशा तऱ्हेनें गोपाळ कैदेंतून सुटला.

मुलींचा बाप आपल्या उपकारकर्त्याचे आभार मानूं लागला तेव्हां गोपाळ म्हणाला—"या उपकाराबद्दल माझे आभार मानण्या ऐवजीं त्या जखमी माणसाचे मानले पाहिजेत. कारण तो आजारी होता तरी त्या स्थितींत तो तुमच्या व माझ्या मदतीला धांऊन आला हें काय थोडें झालें."

नंतर मुलींचीं लग्नें थाटामाटानें झालीं. मुलींना आशीर्वाद देऊन गोपाळ घरीं परत आला. पतीला सुखरूप घरीं आलेला पाहून लक्ष्मीच्या डोळ्यांत आनंदाश्रु आले.





# युद्ध कांड

सेतुबंध करण्याचें ठरल्यावर श्री रामचंद्रानें आज्ञा केली. त्याबरोबर सर्व वानरसेना सागवान, अशोक, आंबा व इतर मोठमोठे वृक्ष उपटून घेऊन आले व समुद्रांत टाकूं लागले. ताड, माड वगैरे झाडें पण आडवीं उभीं टाकून सपाट व रुंद सेतु बांधण्याचें काम सुरू झालें. हत्तींच्या सहाय्यानें मोठ-मोठ्या शिळा समुद्रांत टाकण्यांत आल्या! दगड पडले कीं समुद्राचे पाणी आकाशा-पर्यंत वर उडे.

नलनील वानर बांधकामांत हुशार होते. त्यांनीं दोऱ्या घेऊन पूल सारखा रुंद व सपाट रहावा म्हणून तो मोजून पाहिला व ज्या ठिकाणी त्यांना उणीव भासली ती त्यांनीं भरून काढविली. अशा तऱ्हेनें पहिल्या दिवशीं चौदा योजन, दुसऱ्या दिवशीं वीस योजन, तिसऱ्या दिवशीं एकवीस योजन, चवथ्या दिवशीं बावीस योजन व पांचव्या दिवशीं उरलेला तेवीस योजन अशा तऱ्हेनें दहा योजन रुंद व शंभर योजन लांब असा पूल वानरांनीं बांधून काढला, एवढेंच नव्हें तर पांचव्या दिवशीं ते सुवेल पर्वतावर येऊन पोंचले. कोट्यावधि वानर पुलावरून समुद्र ओलांडून लंकेच्या समुद्रतीरावर येऊन पोंचले.

बिभीषण आपल्या अनुयायांसह विरोध करणाऱ्या शत्रूचा समाचार घेण्यास पुढें उभा



होता. हनुमान व अंगद रामलक्ष्मणाला खांद्यावर बसवून लंकेच्या समुद्रतीरीं घेऊन आले. वयोवृद्ध वानरांनीं रामलक्ष्मणांस युद्धाचा संकल्प सोडण्यास सांगून त्यांना आशीर्वाद दिला.

राम लक्ष्मणाला म्हणाला—"आतां उशीर कशाला ? सैन्याला कूच करण्यास आज्ञा दे."

राम धनुष्य बाण घेऊन पुढें निघाला व त्याच्या पाठोपाठ सुग्रीवादि वानर सिंहनाद करीत निघाले. वानरसेनेनें इकडे कूच करतांच लंकेंत रणभेरी वाजली. ती ऐकून वानरांनीं आणखी जोरानें रामाचा जयजयकार केला. तो जयघोष राक्षसांनीं ऐकला. निरनिराळ्या तऱ्हेचीं निशाणें व झेंडे लंकेंत दिसूं लागले. तें पाहून रामानें विचार केला, याच लंकेंत सीतेला राक्षसांनीं कैद करून ठेवली आहे आणि लक्ष्मणाला म्हणाला—"लक्ष्मणा, त्रिकूट पर्वतावर विश्वकर्म्यानें स्वतःच्या हातानें निर्मिलेली लंकानगरी पाहिलीस ? गगनचुंबी वाड्यांचे कळस पाहून वाटतें कीं आकाशांतले सोनेरी रंगाचे ढग तर नसतील ? सुंदर उद्यानें व त्यांत पक्ष्यांचा किलकिलाट ऐकून किती आनंद वाटतो मनाला ?"

नंतर रामानें वानरसेनेचा एक गरुड व्यूह रचला. त्या व्यूहाच्या द्वाराशीं स्वतः रामलक्ष्मण उभे राहिले. अंगद व नील आपआपलें सैन्य घेऊन व्यूहाच्या मध्य भागीं उभे राहिले. ऋषभ आपल्या सैन्यासह उजव्या बाजूस, गंधमादन डाव्या बाजूस, जांबवंत, सुषेण, वेगदर्शी पृष्ठ भागीं आणि सुग्रीव अगदीं पाठीमागें उभा राहिला.

व्यूह स्थापन झाल्यावर रामानें शुकाला सोडून देण्यास सांगितलें. तो तेथून उडाला आणि सरळ रावणाकडे आला. रावण त्याला पाहून स्मित करून म्हणाला—"माकडांनीं पुष्कळ पेरू खायला घातलेले दिसताहेत ! पंख कापून पिंजऱ्यांत ठेवलें होतें वाटतें ?"

तो रावणाला म्हणाला—"राक्षसराजा ! मी समुद्र पार करून सुग्रीवाला भेटायला गेलों व आपण सांगितलेला संदेश पोंचता केला. सर्व वानर मला पाहून फार चिडले होते. त्यांनीं आकाशांत उड्या मारून मला जमीनीवर ओढलें व नानाप्रकारें माझे हाल केले. त्यांच्याजवळ मी काय बोलूं ? रागीट व क्रूर वानरांशीं काय बोलायचें ? तूंच सांग ! मग त्यांच्याकडून उत्तर तें काय मिळणार ? त्यांनीं मारहाण करून मला डांबून ठेवलें होतें. रामाच्या आज्ञेनें आज सोडलें. राम समुद्रावर पूल बांधून वानरसेनेसह लंका द्वीपांत आला आहे. त्याच्या बरोबर असंख्य शूर वीर वानर आहेत व ते लंकेच्या सिंहद्वारापर्यंत येऊन थडकले आहेत. आतां तूं काय तो निश्चय कर ! सीतेला सोडून दे किंवा युद्धाला तयार हो !"

रावण शुकाला म्हणाला—"मी युद्ध करण्याचाच निश्चय केला आहे. वानर सैन्यानें जो व्यूह रचला आहे तो पाहून



येण्यासाठीं त्यानें पुन्हां शुक व सारण दोघां राक्षसांना पाठविलें. त्यांनीं वानर रूप धारण केलें आणि वानरांच्या सैन्यांत त्यांनीं प्रवेश केला. परंतु वानरसैन्य कोठवर पसरलें आहे, किती आहे हें त्यांना कळलें नाहीं. कारण पर्वत शिखरावर, वन, उद्यान, पर्वत, समुद्र तट जिकडे पहावें तिकडे त्यांना वानरच वानर दिसले.

बिभीषणानें रावणाच्या या दोघां हेरांना ओळखलें. तो त्यांना पकडून घेऊन आला व रामासमोर त्यांना हजर करून म्हणाला—"हे दोघे रावणाचे मंत्री आहेत व वानररूप



घेऊन आपल्या सैन्यांत हेरगिरी करीत फिरतांना पकडले गेले."

शुक व सारण दोघांनीं कबूल केलें कीं रावणाच्या आज्ञेनें रामाच्या सैन्याचा ठाव घेण्यासाठीं ते आले होते.

राम त्यांना स्मित करून म्हणाला— "पाहिलीत ना माझी सेना? मला पूर्वीं पाहिलें नसेल तुम्हीं. तें काम पण पुरें झालें जा आतां परत लंकेला."

दोघे निशस्त्र होते म्हणून रामानें त्यांचा वध करूं नये अशी आज्ञा केली. नंतर रामानें रावणाकडे जाऊन एक निरोप सांगायला सांगितला. राम म्हणाला— "तुम्हीं माझा निरोप असा सांगा कीं रावणा, तूं दुस्साहस करून सीतेला चोरून घेऊन आलास. तुला तुझ्या ज्या बळाचा व पराक्रमाचा गर्व आहे तो पहायला मी आलों आहें. उद्यां उजाडतांच लंकेचा दुर्ग, त्याचें दुर्जेय द्वार व तुझें राक्षसांचें सैन्य माझ्या बाणांना बळी पडेल. तरी सावध रहा!"

शुक व सारण लंकेला परत आले. त्यांनीं रामाच्या शौर्याची व औदार्याची प्रशंसा केली व म्हणाले—"राजा! आम्ही वानर सैन्यांत प्रवेश करतांच बिभीषणानें आम्हांला ओळखलें. आमच्या हालचालीवर नजर ठेवली व आम्हांला कैद करून रामासमोर हजर केलें. परंतु रामानें आम्हांला जीवदान देऊन सोडून दिलें. वानरांच्या सैन्याचे पुढारी राम, लक्ष्मण, बिभीषण, सुग्रीव इत्यादि वीर राक्षस सैन्याचा ध्वंस करण्यास पुरे आहेत. त्यांचा पराक्रम इंद्राहून कमी नाहीं. लंकेचा नाश करण्यास ते चौघेच पुरे आहेत. बाकी वानर सैन्य अगदीं अनावश्यक वाटतें. रामाचें रूप व त्याचें धनुष्य पाहून वाटतें कीं तो एकटाच लंकेचा नाश करूं शकेल. लक्ष्मण, बिभीषणादिकांची गरजच नाहीं. आणि वानरांचा उत्साह विचारशील तर ते फक्त रामाच्या इंगिताची वाट पहात उभे आहेत. आमच्या मतें या युद्धाचा परिणाम आत्मनाश आहे. त्यापेक्षां सीतेला सोडून देऊन तू लंकेचें रक्षण करावें."

तें ऐकून रावण सारणाला म्हणाला— "अरे एक रामच काय त्रिलोक जरी माझ्या-वर चालून आलें तरी मी सीतेला सोडणार नाहीं. तुम्ही भित्रे, राक्षसकुळांगार आहांत म्हणून वानरांनीं एक थोबाडींत मारल्या-बरोबर सीतेला सोडून देण्यास सांगायला धांवलात." असें सांगून रावणानें त्यांची भर्त्सना केली व त्यांना बरोबर यायला सांगून बर्फाच्या महालासारख्या आपल्या सुंदर श्वेत, व गगनचुंबी वाड्याच्या गच्चीवर गेला. तेथून रावणानें मुंग्यांच्या रांगेसारखें पसरलेलें अफाट वानर सैन्य पाहिलें.

सारणला त्यानें विचारलें—"वानर सैन्यांत शूर व बलवान कोण आहे? त्यांचा नायक कोण व त्यांच्यांत मुख्य कोण आहे?"

"लंकेकडे वळून सिंहनाद करणारा वानर नील होय! वर हात करून उभा



असलेला तो अंगद वानरांचा सेनापति आहे. सुग्रीवानें युवराज म्हणून त्याचा राज्याभिषेक केला आहे. तोच वालीचा मुलगा. मारुतीच्या पराक्रमाचा मासला लंकेला पूर्वींच मिळालेला आहे. अंगदाच्या मागें उभा आहे तोच नल. त्यानेंच समुद्रावर पूल बांधला. सैनिकांना जागोजागीं नेमण्याचें काम करणारा तो वानर श्वेत होय आणि तो कुमुद. तो भयंकर रागीट आहे. तो रंभ व तो शरभ. त्यांना मृत्युभय वाटत नाहीं." अशा तऱ्हेनें सारणानें एका मागून एक सर्व वानर नायकांचा परिचय करून दिला.



शुकनें आणखी कांहीं वानरांचा परिचय करून दिला. त्याच्या अनुयायांनीं त्याच्या समोर शत्रूची स्तुति केलेली रावणाला आवडली नाहीं. म्हणाला—" मूर्खांनो ! तुमचा हा स्वामिद्रोह ! ज्याच्या छत्र छायेंत राहतां त्याच्याच घरचे वासे मोजतां ? आजच युद्ध सुरू होणार आणि तुम्ही शत्रूचें गुणवर्णन माझ्यासमोर करीत आहां ? हेंच का शिकलांत आजपर्यंत ? तुमचा मी शिरच्छेद केला असतां. परंतु तुम्ही पूर्वीं माझी जी चाकरी केली आहे ती आठवून मी तुम्हांला क्षमा करतों. दूर व्हा माझ्या डोळ्यासमोरून !" तें ऐकून दोघे माना खालीं घालून व रावणाचा जय जयकार करीत तेथून निघून गेले.

रावणानें महोदरकडे निरोप पाठवून आपल्या गुप्तचरांना बोलविलें व म्हणाला—"तुम्ही रामाकडे जा, तो काय काय करतो हें मला येऊन कळवीत जा. त्याचे कोण कोण मित्र तेथें जमा आहेत हें देखील मला येऊन सांगा. राम केव्हां झोंपतो, केव्हां उठतो काय काय करतो वगैरे जी जी बातमी काढतां येईल ती सर्व काढून आणा म्हणजे युद्धाची रूपरेषा आखतां येईल."

गुप्तचर हेरगिरी करण्यासाठीं शार्दूलला बरोबर घेऊन वेष पालटून सुवेल पर्वताजवळ राम, लक्ष्मण व बिभीषण होते तेथें येऊन पोंचले. रामलक्ष्मणांना व वानरसैन्या पाहून ते घाबरूनच गेले.

बिभीषणानें त्यांना लगेच ओळखलें. शार्दूल दुष्ट आहे हें बिभीषणाला माहीत होतें. म्हणून त्याला व इतर गुप्तचरांना कैद करून त्यांना वानरसैन्याधिकाऱ्याकडे पाठवून दिलें. वानर त्यांना ठार करण्याच्या बेतांत होते. पण रामानें मध्ये पडून शार्दूल





व इतर गुप्तचरांना सोडून देण्यास सांगितलें. ते लंकेला परत गेले. त्यांनीं रावणाला जाऊन सांगितलें कीं राम ससैन्य सुवेल पर्वतानजीक तळ देऊन बसला आहे.

रावणानें शार्दूलाला विचारलें—"काय रे! तुझें तोंड असें उतरलेलें कां?"

शार्दूल म्हणाला—"राक्षसराज! त्या वानरांच्या सैन्यांतलें गुपित काढून आणणें सोपें नाहीं. कारण मी आंत पाऊल टाकल्यावरोबर मला त्यांनीं ओळखलें व कैद केलें. बिभीषणाच्या मंत्र्यांनीं प्रथम मारहाण केली. नंतर वानरांनीं मारलें. मी बेशुद्ध पडलों होतों व मरणारच होतों. पण ऐन वेळीं रामानें येऊन मला वांचविलें. तो म्हणाला—"मी लंकेला वेढा देण्यासाठीं किंवा लंकेचा ध्वंस करण्यासाठीं आलेला नसून सीतेला सोडवून नेण्यासाठीं आलों आहें." माझ्या मतें तूं सीतेला सोड व सुखपूर्वक राज्य कर.

रावणानें वानर सैन्याच्या प्रमुख नायकांचें वर्णन करायला सांगितलें. नंतर आपल्या मंत्र्यांना बोलावून त्यांच्याशीं मंत्रणा केली व कांहीं गोष्टींचा निर्णय घेऊन त्यांना निरोप दिला. नंतर मायावी विद्युत्‌जिव्ह नांवाच्या राक्षसाला बरोबर घेऊन सीतेकडे निघाला.

तो विद्युत्‌जिव्हेला म्हणाला—"माया करून सीतेला फंसवावयाचें आहे. तूं रामाचें डोकें तयार कर. धनुष्य बाण असले पाहिजेत. तें सर्व घेऊन माझ्याकडे ये."

विद्युत्‌जिव्ह तें कबूल करून रावणानें दिलेलें इनाम वगैरे घेऊन निघून गेला. नंतर रावण अशोकवनांत राक्षसिणींच्या पाहाऱ्यांत बसलेल्या सीतेकडे गेला.





# ध्रुव चरित्र

सर्वांत प्रथम मनूचें नांव स्वयंभू होतें. त्याच्या बायकोचें नांव शतरूपक. त्याला प्रियव्रत व उत्तानपाद नांवाचे दोन मुलगे होते. उत्तानपादच्या मोठ्या बायकोचें नांव सुनीति व धाकटीचें सुरुचि होतें. सुनीतीला ध्रुव व सुरुचीला उत्तम नांवाचा मुलगा होता.

एकदां उत्तादपाद राजा धाकटी राणी सुरुजि हिचा मुलगा उत्तम याला मांडीवर घेऊन त्याच्याशीं गोडगोड गप्पा मारीत असतां ध्रुव धांवत धांवत आपल्या बापाकडे आला व बापाच्या मांडीवर बसायला धांवला. पण उत्तानपाद राजानें आपल्या धाकट्या बायकोच्या रागच्या भयानें त्याला मांडीवर घेतलें नाहीं. त्या वेळीं सुरुचि पण तेथें होती. ती म्हणाली—"बेट्या! बापानें तुला मांडीवर देखील बसूं दिलें नाहीं, मग उद्यां तुला सिंहासनावर कसें बसतां येईल? माझ्या पोटीं जन्माला आला असतास तर हीं दोन्हीं तुझ्या नशिबीं आलीं असतीं. जाऊन तप कर म्हणजे पुढल्या जन्मीं तरी माझ्या पोटीं जन्म घेण्याचें भाग्य लाभेल!"

सावत्र आईचीं हीं कडु वाक्यें ध्रुवाच्या हृदयाला झोंबलीं. बाप देखील सर्व ऐकून गप्प बसलेला पाहून ध्रुवाला फारच वाईट वाटलें. तो रडत आपल्या आईकडे गेला.

दुःखी ध्रुवाला हृदयाशीं कवटाळून ती माउली त्याला म्हणाली—"बाळ, आज आपण दुःखी आहों. पूर्वजन्मीं आपण कोणाला तरी दुःखी केलें असणार. त्या पापाचें फळ देव आपल्याला या जन्मीं देत असेल. सुरुचि तसें म्हणाली हें माझें दुर्भाग्य! या पेक्षां जास्त आतां मी काय सांगूं? तूं

असल्या दुर्दैवी मातेचा मुलगा. तुझ्या नशिबीं देखील पित्याचें प्रेम नसल्यास नवल काय? पण एक गोष्ट खरी. सुरुचीनें तुला तप करायला सांगितलें आहे. अवश्य कर. या पित्याच्या मांडीवर बसण्यापेक्षां त्या परम पित्याच्या मांडीवर बसण्यांतच ज्यास्त भूषण आहे."

आईचा तो उपदेश ध्रुवाच्या हृदयावर बिंबला व तो तपश्चर्या करण्याचें ठरवून घराबाहेर पडला.

त्याला वाटेंत नारद महर्षि भेटले. त्यांनीं त्याला विचारलें—"अरे बाळ! तुझे ओंठ पिळले तर दूध निघेल आणि तुझ्या मनांत इतका राग व रोष? कोठें निघालास? फिर मागें!"

"मुनींद्र! सुरुचि मातेनें जें म्हटलें तो मला उपदेशच झाला आहे. त्यांत राग कसला?" ध्रुव म्हणाला.

"बाळ या पोरवयांत एवढा मान किंवा अपमान मानून मनाला लावून घेणें शोभत नाहीं. तूं तपश्चर्या करून देवाला प्रसन्न करायला निघाला आहेस. कित्येक जन्म तपश्चर्या करून देखील ज्या विष्णूचें दर्शन घडत नाहीं त्याचें दर्शन तुला या एकाच



जन्मांत कसें घडणार? म्हणून हा विचार सोडून दे." नारद म्हणाला.

ध्रुव म्हणाला—"मुनीश्वर! आपण जो उपदेश केलात त्याबद्दल मी आपला आभारी आहें. आपण समर्थ आहां. देवाचें दर्शन घडावें यासाठीं सोपा मार्ग सांगितल्यास मी आपला फार फार आभारी होईन."

ध्रुवाच्या अढळ मनाची स्तुति करून नारद मुनि म्हणाले—"बाळा ध्रुव! यमुनेच्या काठीं मधुवनांत जाऊन तूं रहा. कालिंदी नदींत नित्य स्नान करून द्वादश अक्षरांच्या मंत्राचा एकाग्र चित्तानें जप कर. विष्णु तुझी इच्छा पुरी करण्यास धांवून येईल." त्या प्रमाणें ध्रुव तप करूं लागला आणि इकडे नारदमुनि उत्तानपाद राजाकडे आले. राजानें त्यांची पादपूजा करून त्यांना बसायला सांगितलें. नारदमुनि आशीर्वाद राजाला म्हणाले—"कांहीं दुःख कष्ट नाहीं ना तुला?"

तेव्हां उत्तानपाद राजा म्हणाला—"मुनीश्वर! माझा पांच वर्षांचा मुलगा ध्रुव सावत्र आईच्या कटु वचनानें दुःखी होऊन घरून निघून गेला आहे. त्याच्या जिवाचें कांहीं बरें वाईट होऊं नये व तो घरीं परत



यावा असें मनाला फार वाटतें. माझीच चूक! मी त्याला दूर लोटला."

त्यावर नारद मुनि म्हणाले—"राजा! तुझा मुलगा खुशाल आहे. देवानें त्याचें गाऱ्हाणें ऐकलें आहे. देवाची माया ज्याच्यावर जडली त्याच्या जिवाला कसला धोका? तो तपश्चर्या करून त्यांत मोठें यश मिळवून लवकर परत येईल. तूं अगदीं बेफिकीर रहा!" असें सांगून नारदमुनि निघून गेले.

नारदानें ध्रुवाचा क्षेम समाचार दिल्यावर उत्तानपाद राजाच्या हृदयाचें समाधान झालें. तरी त्यावेळेपासून त्याचें चित्त राज्य कारभारांतून उडालें. नेहमीं आपल्या गुणी-बाळाचाच विचार त्याच्या मनांत येई.

तिकडे ध्रुव मधुवनांत पोंचला. कालिंदी नदींत स्नान करून तो ध्यानमग्न होऊन बसला. ती रात्र त्यानें उपोषण केलें. पहिल्या महिन्यांत दर तीन दिवसांनीं तो फलाहार करी. दुसऱ्या महिन्यांत दर सहा दिवसांनीं तो झाडाचा फक्त पाला खाऊन राहाला. तिसऱ्या महिन्यांत दर नऊ दिवसांनीं त्यानें फक्त एकदां जलपान केलें. चौथ्या महिन्यांत त्यानें प्राणायाम केला. दर बाराव्या दिवशीं फक्त एकदांच वायुभक्षण केलें. पांचव्या महिन्यांत पूर्ण प्राणायाम करून व देवाचें ध्यान धरून तो एकाच पायावर उभा राहून तपश्चर्या करूं लागला.

त्याची खडतर तपश्चर्या पाहून त्रिलोक कंपित झाले. दिक्पालक विष्णूकडे धांवले. विष्णु म्हणाला—"उत्तानपाद राजाच्या मुलाच्या तपश्चर्येमुळें त्रिलोक डोलूं लागले आहेत. तुम्ही घाबरूं नका." असा धीर विष्णूनें त्यांना निरोप दिला. [पुढें चालू]



# ३४. येसिमेटचें खोरें

कॅलिफोर्नियाच्या येसिमेट नॅशनल पार्क मध्यें (११०० वर्ग मैल) हें खोरें आहे. याचें क्षेत्रफळ ८ वर्ग मैल आहे. मेसेर्ड नदीच्या प्रवाहामुळें हें खोरें बनलें आहे. कोठें कोठें या खोऱ्याची खोली ३००० फुट आहे. या खोऱ्यांत अनेक धबधबे आहेत. सर्व धबधबे जोडले तर त्यांची लांबी एकूण सहा मैलांची होईल. त्यांत येसिमेटचा धबधबाच १४३० फुट आहे. जगांतील सुप्रसिद्ध धबधब्यांत तो एक मोडतो.

या पार्क मध्यें मारिपोसा नांवाची एक बाग आहे. त्यांत सिकोइया नांवाचे वृक्ष आहेत. हे वृक्ष फारच मोठे आहेत व जुने पण आहेत. या चित्रांत दाखविलेला वृक्ष चार हजार वर्षें वयाचा आहे. म्हणजे गौतम बुद्धाचा जन्म झाला त्यावेळीं याचें वय १२०० वर्षांचें होतें. या वृक्षाचें खोड ९६ १/२ फुट आहे तर उंची २०९ फुट. वृक्ष समुदायांत हाच वृक्ष सर्वांत जुना आहे.

या जातीच्या वृक्षांची जोपासना 'सिकोइया' पार्क मध्यें फार काळजी पूर्वक केली जाते. हा पार्क म्हणजे एक मोठें अरण्यच आहे. येथील वृक्षांवर १९१६ पूर्वी कांहीं लोकांची मालकी होती. सरकारनें अरण्याच्या रक्षणाची उत्तम व्यवस्था केली आहे.






हिंदुस्तानांत मोगल येण्यापूर्वी अफगाण जातीचें राज्य होतें. दिल्लीच्या अफगाणी सत्तेला उतरती कळा लागली होती. म्हणून जागोजागीं लहान लहान स्वतंत्र राज्यें स्थापन झालीं.

१५२६ सनापूर्वी मोगलांनी उत्तर हिंदुस्तानावर स्वाऱ्या केल्या. तैमूरलंगानें पंजाब व दिल्लीचीं राज्यें हस्तगत करून घेतलीं. त्यामुळें अफगाणांची सत्ता खिळखिळी झाली. तरी मोगलांचें साम्राज्य स्थापन झालें नाहीं. त्या साम्राज्याचा पाया घातला बाबरनें. त्यानंतर देखील ३० वर्षं सतत अफगाण व मोगल यांचें परस्परांशीं युद्ध चालूच होतें. अकबर गादीवर बसल्यावर मात्र मोगल साम्राज्यांत स्थिरता आली.

बाबरचा बाप तैमूरलंगाचा वंशज होता तर आई चंगेजखानाच्या वंशांतली होती. त्याचा जन्म १४८३ सनांत झाला. त्याचें वय ११ वर्षांचें होतें त्या वेळीं त्याच्या बापाला फरगाना प्रांताची जहागीर मिळाली. बाबराला त्याच्या लहानपणीं अनेक कष्ट सहन करावे लागले. तैमूरलंगाची राजधानी समरकंद जिंकण्यासाठीं त्यानें दोनदां, १४९७ व १५०३ मध्यें यत्न केला. पण दोन्ही प्रयत्न अयशस्वी ठरले. एवढेंच नव्हे तर फरगाणाची राजधानी पण त्याच्या हातांतून निघून गेली. एक वर्षभर त्याला रानोमाळ हिंडावें लागलें. त्या स्थितींतहि तो हिंमत हारला नाहीं. त्यानें भारतावर स्वारी करण्याचा विचार केला. त्यानें तैमूरलंगानें हिंदुस्तानावर केलेल्या स्वाऱ्यांचें वर्णन ऐकलें होतें. आपल्या पूर्वजांप्रमाणेंच भारतावर स्वारी करून कीर्ति संपादन करण्याचे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. त्यानें सन १५०४ मध्यें काबूलवर स्वारी केली. उझबेक राज्यांत चालू असलेल्या बंडाळीची त्याला चांगली संधी मिळाली. १५१२ मध्यें त्यानें समरकंदवर पुन्हां स्वारी केली. या खेपेस देखील त्याला अपयश आलें. वायव्य दिशेचा योग आपल्याला नाहीं असा विचार करून त्यानें आग्नेय दिशेकडे आपली दृष्टि वळविली. हिंदुस्तानांत पाऊल टाकायला त्याला आणखी १२ वर्षं लागलीं. दिल्लीचें सिंहासन डळमळूं लागलें होतें. दिल्लीच्या गादीवर ज्यांची वक्रदृष्टि होती त्यांनींच बाबरला निमंत्रण पाठविलें.



बाबर १५२४ मध्यें पंजाबांत आला व त्यानें लाहोरवर स्वारी केली. त्याला निमंत्रण देणारे, तो आपल्या मदतीला आला आहे असें समजून स्वस्थ गंमत पहात बसले. परंतु बाबर त्यांच्या मदतीला आला नसून स्वतःचें राज्य स्थापन करण्यासाठीं आला आहे हें कळल्यावर त्यांनीं त्याच्याशीं युद्ध केलें. त्यामुळें त्याला काबूलला परत जावें लागलें.

पण तो स्वस्थ बसला नाहीं. त्यानें पुन्हां स्वारी करण्याचें ठरवून जय्यत तयारी सुरू केली. १५२५ च्या नोव्हेंबर मध्यें त्यानें पुन्हां पंजाब प्रांतावर स्वारी करून तेथील सुलतान दौलतखान लोदी याला वश करून घेतलें. तेथून तो दिल्लीवर चालून आला. इब्राहिम लोदी नांवापुरता सुलतान होता. २१ एप्रिल १५२६ रोजीं पानीपतच्या मैदानावर त्याचें अफगाण सैन्याशीं युद्ध झालें. बाबरनें फक्त १२ हजार सैन्यानिशीं एक लाख अफगाण सैन्याचा धुव्वा उडविला. वेळ न गमावितां त्यानें दिल्ली व आगरा शहरें हस्तगत करून घेतली.

परंतु पूर्ण यश बाबरच्या पदरांत पडलें नव्हतें. रजपूत राज्यें सावध झालीं. राणा

संग याच्या नेतृत्वाखालीं त्यांनीं एक जुटीनें बाबरशीं युद्ध केलें. रजपुतांचें शौर्य व साहस पाहून मोंगलांचें धैर्य खचलें. परंतु बाबरनें आपल्या छावणींतलीं दारूचीं मडकीं फोडून टाकलीं व आपल्या अनुयायांना धैर्य देऊन त्यांच्याकडून युद्ध जिंकेपर्यंत परत न फिरण्याची प्रतिज्ञा करविली. १६ मार्च १५२७ मध्यें आग्र्याच्या पश्चिम दिशेला खानुवा नामक गांवीं दोन्ही सैन्यांचें युद्ध झालें त्यांत रजपूत सैन्याचा पराभव झाला. राणासंग व त्याचे अनुयायी युद्धभूमि सोडून निघून गेले. दोन वर्षांनंतर राणासंग मरण पावला.

बाबरला शेवटपर्यंत अफगाणांशीं युद्ध करावें लागलें. त्याचें तिसरें व मुख्य युद्ध बिहार व बंगालच्या अफगाणांशीं झालें. ६ मे १५२९ रोजीं गंगेच्या काठीं गोग्रा नदीच्या संगमस्थानीं बाबरचें अफगाणांशीं युद्ध झालें व अफगाणांचा पराभव झाला. बाबरनें स्थापन केलेलें मोंगलांचें राज्य ऑक्सस पासून गोग्रा नदीपर्यंत व हिमालय पर्वतापासून ग्वाल्हेर पर्यंत पसरलें. त्यानंतर कांहीं दिवसांनीं २६ डिसेंबर १५३० रोजीं आग्रा येथें बाबर मरण पावला.

त्याच्या मृत्यूविषयीं एक गोष्ट सांगतात. त्याचा मुलगा हुमायुन फार आजारी होता. म्हणून बाबरनें देवाजवळ प्रार्थना केली कीं मुलाचें दुखणें त्याला यावें व मुलगा त्या आजारांतून बरा व्हावा. त्यानंतर मुलगा खरोखरच बरा झाला व दोन तीन महिन्यांत बाबर स्वतः आजारी पडून त्याच आजारांत मरण पावला. त्याला काबूल येथें पुरण्यांत आलें.



# नेहरू चरित्र

[ ४ ]



मोतीलालजींच्या घरचें वातावरण एकंदरींत इंग्रजांच्या राज्यपद्धती विरुद्धच असे. इंग्रजांनीं भारताचें स्वातंत्र्य हिरावून घेतलें म्हणून त्यांची निंदा झालीच पाहिजे अशी एक समजूत लहानपणापासूनच जवाहरलालजींच्या मनावर बिंबली होती. १८९९-१९०२ च्या दरम्यान ब्रिटीश व बोअर लोकांचें युद्ध झालें तेव्हां त्यांच्या मनांत बोअर लोकांविषयीं सहानुभूति वाटणें साहजिक होतें. दक्षिण आफ्रिकेंत राहणारे डच लोकांचे वंशज बोअर म्हणून प्रसिद्ध होते. या युद्धाचें वर्णन वाचण्यासाठींच प्रथम जवाहरलालजी वर्तमानपत्रें वाचूं लागले.

त्यानंतर १९०४-१९०५ सालांतील रशिया व जपानचें युद्ध झालें. या युद्धाचीं वर्णनें वाचण्यांत जवाहरलालजींना जास्तच मजा वाटूं लागली. जेव्हां जेव्हां जपान देशाच्या जयाची बातमी येई तेव्हां त्यांना फार आनंद होई. याचें मुख्य कारण म्हणजे रशिया हा एक युरोपीय देश होता व जपान आशिया खंडांतील एक राष्ट्र होतें. जपान रशियाचा पराभव करून आशियाची मान वर करीत आहे असें त्यांना वाटलें असावें. त्या आनंदांत जपानमधील जागृतीविषयीं नवीन पुस्तकें वाचण्याचा उत्साह त्यांच्या मनांत जास्त वाढला. हातांत तलवार घेऊन जपानी वीरांप्रमाणेंच आपण भारताच्या स्वातंत्र्य युद्धांत युद्ध करूं अशी स्वप्नें ते पाहूं लागले.

मोतीलालजींना इंग्रजांची शिक्षण पद्धत आवडत असे. म्हणून त्यांनीं जवाहरलालजींना इंग्लंडमधील पब्लिक स्कूलमध्यें घालण्याचें

क्रांतिवीर गॅरीबाल्डी याच्या चरित्राच्या तीन भागपैकीं एक भाग होता तो. बाकी भाग नेहरूनीं स्वतः विकत घेऊन वाचून काढले तेव्हां भारत व इटली देशांत किती साम्य आहे हें त्यांच्या लक्षांत आलें.

स्वदेशांतील बातम्या वाचून व ऐकून नेहरूंचें मन उंचबळून येई व मायदेशाकडे धांव घेई. १८५७ नंतरच्या स्वातंत्र्य-युद्धानंतर याच वेळीं पुन्हां देश खडबडून जागा झाला होता. १९०४ सालीं इंग्रजांनीं बंगाल प्रांताचे दोन तुकडे केले त्याच्या विरुद्ध ही चळवळ होती. महाराष्ट्रांत या चळवळीचे पुढारी लोकमान्य टिळक होते. १९०७ सालीं त्यांनीं हातावर हात धरून बसलेल्या राष्ट्रीय सभेंत चैतन्य उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. त्यांचीं त्या काळचीं व्याख्यानें व केसरींतील लेख यांमुळें देशभर चैतन्याची एक नवीन लाट आली. गांधीजींनी देशाचें नेतृत्व घेतलें त्यापूर्वी तेच देशाचे सर्वांत मोठे पुढारी होते. १८९७ सालींच ते प्रथम तुरुंगवास भोगून आले होते. बिपिन-चंद्रपाल व केंब्रिजचे एक जुने विद्यार्थी अरविंदघोष हे बंगालचे पुढारी होते. टिळ-कांचे किंवा बंगालच्या पुढाऱ्यांचे अनुयायी अहिंसात्मक चळवळीचे पुरस्कर्ते नव्हते.

तशा परिस्थितींत नेहरूंना हॅरोचें स्कूल एका लहानशा डबक्यासारखें वाटल्यास नवल काय? ते केंब्रिज विश्वविद्यालयांत गेले. त्या नंतर कांहीं दिवसांनीं माणिकतला येथें एक बाँबची फॅक्टरी सांपडली. माणिकतला कटाचा खटला सुरू झाला. देशभर खळबळ उडून गेली. त्यावर टीका लिहिल्याबद्दल सरकारनें खटला चालवून लोकमान्यांना ६ वर्षांची शिक्षा केली.






[ ५ ]

[दुर्गेशनंदिनी तिलोत्तमेची व मानसिंहाचा मोठा मुलगा जगतसिंहयाची शैलेश्वराच्या देवळांत अचानक गांठ पडली तेव्हां विमलेला जगतसिंहानें आपला परिचय दिला. परंतु विमलानें आपल्या मालकिणीचा परिचय दिला नाहीं. तिनें एका पंधरवड्याची अवधी मागून घेतला होता. या वेळेस तिला दोन गोष्टींचा उलगडा झाला होता. पहिली गोष्ट म्हणजे तिलोत्तमेनें जगतसिंहाला मनानें वरलें आहे व दुसरी गोष्ट दोघांच्या विवाहास तिलोत्तमेचा बाप वीरेंद्रसिंह तयार नाहीं. तरी वचन दिल्याप्रमाणें विमला शैलेश्वराच्या देवळांत गेली होती.]

विमलानें दोन मिनिटें विसावा घेऊन शैलेश्वराला नमस्कार केला व परत येऊन युवराजाला पण नमस्कार केला.

कांहीं वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. दोघे विचार करीत असावेत. विमलेला अशा प्रसंगीं काय करावें हें माहीत होतें. ती म्हणाली—"युवराज! शैलेश्वराच्या कृपेनें आज आपलें दर्शन घडलें. मी स्वतःच्या जिवावर उदार होऊनच येथवर आलें. तुमची भेट झाली म्हणून जिवांत जीव आला."

श्री बंकिमचंद्र चट्टोपाध्याय



"कसें काय ! मग सर्व क्षेम आहे ना !" त्यानें विचारलें.

त्याचें प्रेम तिलोत्तमेवर आहे की नाहीं हें कळावें म्हणून विमला म्हणाली—"तें सर्व क्षेम आहे म्हणूनच तर मी शैलेश्वराच्या दर्शनाला आलें होतें. शैलेश्वरानें आपली प्रार्थना स्वीकार केली आहे हें मला कळलें. माझ्या मध्यस्थीची गरज उरलेली नाहीं. तर मग मला निरोप द्यावा."

"पण एकटीनें जाणें बरोबर होणार नाहीं. मी बरोबर पोंचवायला येतो." जगतसिंह म्हणाला.

"एकटीनें जाण्यास काय हरकत आहे ?" विमलानें विचारलें.

"वाटेंत कोणत्याहि क्षणाला संकट येण्याची शक्यता आहे." युवराज म्हणाला.

"तर मग मी मानसिंह महाराजांना जाऊन सांगूं का कीं तुम्ही ज्यांना सेनापति म्हणून नेमलें आहे त्यांच्या अमलांत स्त्रियांचें रक्षण होणें कठीण आहे. कारण ते शत्रूला जिंकूं शकले नाहींत."

युवराज स्मित करून म्हणाला—"देवांचे शत्रू देखील या जगांत आहेत मग यःकश्चित मानवांची गोष्ट कशाला ! उदाहरणार्थ स्वतः शंकरालाच पहा. तो तपश्चर्या करीत असतां कामदेवानें विघ्न आणलें म्हणून त्यानें त्याला भस्म करून टाकलें. त्या कामदेवानेंच एका पंचरवर्षापूर्वी याच शंकराच्या देवळांत खळबळ उडवून दिली."

"महाराज असल्या गप्पांवर कोण विश्वास करील ?"

"माझ्याजवळ साक्षीपुरावा आहे."

"माझ्या प्रेमाची साक्ष विमला आहे." युवराज जगतसिंह म्हणाला.

"ओहो ! विमला अशी स्वस्तांत साक्ष थरी देईल !"

"तेंहि शक्य असूं शकेल. बरोबर म्हटलेंस, वचन न पाळणाऱ्या माणसाला साक्ष देण्यास सांगणें पण चूकच !" युवराज म्हणाला.

"मी काय वचन दिलें होतें हें युवराजांनींच आठवून पहावें, अशी माझी हात जोडून विनंति आहे." विमला म्हणाली.

"आपल्या मालकिणीचा परिचय....!"

विमला थोडी गंभीर झाली व म्हणाली—"युवराज ! परिचय देतांना थोडी भीति वाटते. कारण परिचय दिल्यावर कदाचित आपल्याला वाईट वाटेल."

थट्टा सोडून जगतसिंह म्हणाला—"खरी गोष्ट कळल्यावर मनाला वाईट वाटण्यासारखें कांहीं विशेष आहे का ?"

"होय !"

जगतसिंह विचार करून म्हणाला—"कांहीं ही असूं दे. सांग काय सांगावयाचें असेल तें. हल्ली माझ्या मनाची जी स्थिति आहे तीहून जास्त वाईट व मनाला दुःखी करणारी गोष्ट काय असणार ! विमला, मी तुला गमतीखातर नाहीं भेटायला आलों. गेल्या पंधरा दिवसांत एक क्षणभर देखील डोळा लागला असेल तर शपथ !"



विमला तरी हीच गोष्ट ऐकण्यासाठीं इकडच्या तिकडच्या गप्पा करीत होती. तरी ती मुद्यावर यायला तयार नव्हती. म्हणून इतर गोष्टींत त्याला गुंतवून ठेवण्याचा तिनें यत्न केला. तेव्हां जगतसिंहानें तिला स्पष्ट विचारलें—"तुझ्या मैत्रिणीची भेट घ्यायला कोठें जावें लागणार आहे मला ?"

"मंदारणाच्या किल्ल्यांत ! तिलोत्तमा वीरेंद्रसिंहाची मुलगी आहे." विमला म्हणाली.

तें ऐकून जगतसिंहाच्या उत्साहावर अगुंकांहीं पाणीच पडलें. त्याच्या हातांतली

तलवार खालीं गळून पडली. दीर्घ निःश्वास सोडून तो म्हणाला—"तूं म्हणालीस तेंच खरें! या आयुष्यांत तिलोत्तमा माझी होणें शक्य नाहीं. मी फिरतों परत व आपल्या मनांत उद्भवलेली ही इच्छा शत्रूच्या रक्तानें धुवून काढतों."

तो हताश झालेला पाहून विमला म्हणाली—"युवराज! प्रेमाचें प्रतिफळ कांहीं असेल तर तें आपण आपल्या तिलोत्तमेला द्यावें."

तें ऐकून आशेच्या अंकुरावर जणुंकांहीं पाण्याचा थेंब पडला. तो विमलाला म्हणाला—

"आज माझें मन ताब्यावर नाहीं. खळबळ उडून गेली आहे या हृदयांत. मी एक गोष्ट सांगतों, करशील का? तूं जाऊन आपल्या मैत्रिणीला माझ्या मनाची स्थिति जाऊन कळव. एकदां फक्त एकदांच तिच्या दर्शनाचें भाग्य मला लाभेल का!"

"या विषयीं माझ्या मैत्रिणीचें काय मत आहे, हें मी कसें काय सांगूं?"

"प्रत्येक वेळीं तुलाच कष्ट देण्याचा माझा विचार नाहीं व मला तें पसंत पण नाहीं. तरी तूं एकदां तिची व माझी या देवळांत भेट करून देऊं शकलीस तर मी



तुझे उपकार आजन्म विसरणार नाहीं." जगतसिंह म्हणाला.

विमला म्हणाली—"पण हें काम वाटतें तितकें सोपें नाहीं. वाटेंत पावलों पावलीं धोका आहे. मी तरी वचन दिलें होतें म्हणून आलें."

"मंधारण किल्ल्यापर्यंत येण्यांत धोका नसेल तर मी यावयास तयार आहें. मी कोठें तरी वाट पहात उभा राहीन. तूं तिलोत्तमेचें उत्तर घेऊन ये." जगतसिंह म्हणाला.

विमलाला तें ऐकून आनंद झाला. म्हणाली—"तर मग चलाच!" दोघे देवळाबाहेर पडले असतील कीं तेवढ्यांत कोणीतरी बोलत असल्याची किंवा चालत असल्याची चाहूल त्यांना लागली. जगतसिंह चकित होऊन म्हणाला—"आपल्या बरोबर कोणीतरी येत आहे वाटतें!"

"नाहीं तर...." विमला म्हणाली.

"हा आवाज कसला झाला! मला वाटतें कीं बाहेर उभा राहून कोणी तरी आपलें बोलणें ऐकत होता...." त्यानें सशंकपणें चारी बाजूला न्याहाळून पाहिलें. पण कोणी अंधारांत दिसला नाहीं. दोघांनीं शैलेश्वराला भक्तिपूर्वक नमस्कार केला व मंधारणच्या





वाटेनें चालू लागले. वाटेंत युवराज म्हणाला–"मला एक गोष्ट तुला विचारावीशी वाटते. तूं गैरसमज तर करून घेणार नाहीस ना ?"

"थोडा, काय वाटेल तें विचारा. शंका कशाला ?" विमला म्हणाली.

"माझ्या मनाची खात्री झाली आहे कीं तूं दासी किंवा परिचारिका नाहीस !"

"अशी शंका घेण्याचें कारण ?"

"वीरेंद्रसिंहाची मुलगी अंबरराजा मानसिंहाची सून होऊं शकेल ! याचें एक कारण आहे. पण तें एका परिचारिकेला कळणें शक्य नाहीं. तुला कसें काय कळलें ?"

विमला एक दीर्घ श्वास घेऊन दुःखी आवाजांत म्हणाली–"आपली शंका बरोबर आहे. पण परिचारिका म्हणून मला रहावें लागत आहे."

तें उत्तर देतांना विमलाला फार वाईट वाटलें हें ओळखून जगतसिंहानें त्या विषयीं आणखी जास्त कांहीं विचारलें नाहीं. विमलाच म्हणाली–"मी तें सर्व सांगेन पुढें कधीं. आतां नको. हो, पण हा आवाज कसला बरें ! कोणी तरी पाठोपाठ येत आहे असें वाटतें !"

पाठीमागून कोणी तरी येत असल्याचा आवाज खरोखरच येत होता. कोणाला ऐकूं जाऊं नये अशातऱ्हेनें हळूं पुटपुटण्याचा भास झाला. तोंपर्यंत दोघं देवळापासून सुमारें एक मैल येऊन पोंचलीं होतीं.

"कोणीतरी आपला पाठलाग करीत असावें !" असें म्हणत जगतसिंह घाईघाईनें चार पावलें पुढें गेला. हळूहळू बोलत दोघं झपाझप पावलें उचलूं लागलीं. दोघं मंदारण पोंचलीं तोंपर्यंत मध्यरात्र उलटून गेली होती. "इतक्या रात्रीं तूं किल्ल्यांत कशी काय जाणार !" जगतसिंहानें विचारलें.



"तसें भिण्याचें कारण नाहीं. हें सर्व ओळखूनच मी घराबाहेर पडलें होतें." विमला म्हणाली.

दोघं किल्ल्याच्या मागील आमराईंत पोंचलीं होतीं. "ही आमराई पण निर्जन स्थान नाहीं. तुम्ही माझ्याबरोबर किल्ल्यांतच यावें, माझ्या मतें." विमला म्हणाली.

जगतसिंह कांहीं वेळ विचार करून म्हणाला–"तसें करणें बरोबर नाहीं. किल्ल्याच्या अधिकाऱ्याच्या आज्ञेशिवाय किल्ल्यांत कसें पाऊल टाकूं !" त्यानें विचार केला, अकबराच्या राजकुमारानें चोरासारखा किल्ल्यांत प्रवेश केला तसें होईल हें.

"पण मी आहे ना बरोबर !" विमला म्हणाली.

"परंतु मला किल्ल्यांत घेऊन जायला तुला अधिकार कोठें आहे ! तूं परिचारिका आहेस असें समजून मी हा प्रश्न केला, असें नको समजूस." युवराज म्हणाला.

विमला थोडा विचार करून म्हणाली–"मला अधिकार आहे कीं नाहीं हें कळल्याशिवाय किल्ल्यांत प्रवेश करणार नाहीं का ?"

"नाहीं !" तो म्हणाला.



त्यावर विमलानें त्याच्या कानांत कांहीं सांगितलें व म्हणाली–"चला !"

इतक्यांत बागेच्या वाळलेल्या पाचोळ्यावर कोणी चालल्याचा आवाज ऐकूं आला.

"पुन्हां तेंच....." विमला शंकित मुद्रेनें म्हणाली.

"तूं थोडी थांब येथें. मी पाहून येतों." असें सांगून जगतसिंह तलवार उपसून जिकडून आवाज आला तिकडे गेला. पण कोणी दिसलें नाहीं. ती आमराई जोपासना न केल्यामुळें रानासारखी वाटत होती. कोणी लपून बसलें असतें तरी कळणें

शक्य नव्हतें. परंतु जगतसिंहाला एका उंच झाडाच्या टोंकाला चांदण्याच्या उजेडांत दोन पगड्या दिसल्या. झाडावर थोडें वर चढून त्यानें जवळ जाऊन पाहिलें व झाडावरून उतरून विमलाला म्हणाला–"दोन भाले मिळाले तर....!"

"कां?" विमलानें शंकित होऊन विचारलें.

"त्यांच्या पगड्या पाहून ते पठाण असावेत असें वाटतें. आपला पाठलाग करीत ते आले असावेत."

विमलाला वाटेंत तडफडत पडलेला घोडा व पगडी आठवली. तर तुम्ही येथेंच थांबा किल्ल्यांत जाऊन मी दोन भाले घेऊन येतें." असें सांगून विमलानें किल्ली काढून किल्ल्याचा चोर दरवाजा उघडला. आंत गेली. चोर दरवाजा बंद केला आणि शस्त्रानें ठेवली होती त्या जागीं जाऊन तेथील अधिकाऱ्याला दोन भाले द्यावला सांगितलें."

त्यानें विचारलें–"काय करणार?"

ती म्हणाली–"आज वीर पंचमी आहे ना! वीर माता होण्यासाठीं मी व्रत केलें आहे. कोणाजवळ बोलूं नकोस!" विमला म्हणाली.

त्यानें दिलेले दोन भाले घेऊन ती चोर दरवाजा उघडून युवराजाकडे आली. पण घाईत दार बंद करायला विसरली. त्यामुळें एक मोठें संकट ओढवलें. बाहेर उभा असलेला एक सशस्त्र मनुष्य चोर दरवाजा उघडा पाहून आंत शिरला. कोणी जागा नव्हता. घोरत पडले होते सगळे. तो सरळ अंतःपुरांत जाऊन पोंचला.

[पुढें चालू.]



# धार्मी भोग

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं व पुन्हां झाडाजवळ जाऊन प्रेत खांद्यावर काढून घेतलें व नित्याप्रमाणें मौनपणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तुला अवेळीं एक प्रेत खांद्यावर नेतांना पाहून वाटतें कीं तुझा भोग सुटेपर्यंत तुला सुटका नाहीं. तुझ्या सारखाच मागें धनगुप्त होऊन गेला. कित्येक जन्म घेतले तरी त्याचा भोग सुटेना त्याची गोष्ट सांगतों. ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

धनगुप्त काशी येथें व्यापार करीत असे. व्यापारांत त्याचा हात धरणारा कोणी नव्हता. लोक म्हणत, नशीब असावें तर असें. धनार्जन केलें तरी त्याची देवाधर्मावरील भक्ति कमी झाली नाहीं. त्याला तीन मुलगे होते.

वेताळाच्या गोष्टी

       



एकदां हिमालयांतून परमानंद नांवाचा एक सिद्धपुरुष काशीला आला. धनगुप्तानें त्याला बोलावून त्याची पादपूजा केली. त्याची श्रद्धा व भक्ति पाहून त्या सिद्धपुरुषानें त्याला एकांतांत बोलावून विचारलें—"तुला या संसारसागरांतून तरण्याचा मार्ग हवा असेल तर मी सांगतों."

धनगुप्त त्या सिद्धपुरुषाला नमस्कार करून म्हणाला—"बुवा! मी आपला फार आभारी आहें. मला या जगाचा मोह उरला नाहीं. मोक्षाचें दार तुम्ही माझ्यासाठीं उघडलें आहे. पण माझी मुलें लहान आहेत. स्वतःच्या पायावर उभीं राहूं लागलीं कीं मला मोक्षाचा मार्ग दाखविण्याची कृपा करावी. फक्त पांच वर्षांची मुदत मी मागत आहें."

तो सिद्धपुरुष "पुन्हां पांच वर्षांनीं येईन." असें सांगून निघून गेला.

पुढें सहा महिन्यांनीं धनगुप्ताला हृदयाचा विकार जडला व त्याच आजारांत तो मरण पावला. मुलें लहान होतीं म्हणून व्यापार-धंदा संभाळूं शकलीं नाहींत. शेवटीं त्यांना स्वतःचें राहातें घर देखील गहाण टाकावें लागलें. तेव्हांपासून तिघां मुलांनीं बैलाची एक जोडी विकत घेतली व शेतकी करूं लागले. शेतकीच्या कामाची त्यांना माहिती नव्हती. पण नशीब बलवत्तर म्हणून शेतकीच्या धंद्यांत त्यांना पुष्कळ यश मिळालें. पोटापाण्याला तर कधींच उणीव भासली नाहीं.

पांच वर्षें लोटल्यावर तो सिद्धपुरुष वचन दिल्याप्रमाणें धनगुप्ताला भेटायला म्हणून आला. पण धनगुप्त अकालीं मरण पावल्याचें ऐकून तो परत निघाला. तो बाहेर जात असतां त्याची नजर सहज गोठ्याकडे गेली. तेथें त्याला एक बैल





दिसला. जवळ जाऊन त्यानें त्या बैलाच्या अंगावर आपल्या कमंडलूंतलें थोडें पाणी शिंपडलें व म्हणाला—"कायरे बुवा! आतां सांगूं का मोक्षमार्ग?"

तो बैल मनुष्यांच्या भाषेंत म्हणाला—"बुवा! आणखी पांच वर्षांची मुदत द्या. मी नव्हतों म्हणून मुलांच्या हातून बुडीचा धंदा झाला व शेवटीं त्यांची जी दुर्दशा झाली ती तुम्ही पाहतांच आहां. शेतीचा धंदा नुकताच कोठें जमूं लागला आहे. माझ्यामुळें त्यांना या धंद्यांत थोडें फार यश येऊं लागलें आहे. आणखी पांच वर्षें मी मदत केली तर त्यांचा हा धंदा मार्गाला लागेल."

"बरें तर मी पांच वर्षांनीं येईन!" असें सांगून तो सिद्धपुरुष निघून गेला.

तो सिद्धपुरुष निघून गेल्यावर कांहीं दिवसांनीं तो बैल आजारी पडला त्याच आजारांत मेला. मुलांना शेतीच्या धंद्यांत तूट येऊ लागली. शेवटीं शेत जमीन विकून ते गांवाबाहेर एक झोंपडी बांधून राहूं लागले. मोलमजुरी करून उदरनिर्वाह करूं लागले.

पुन्हां पांच वर्षांनीं तो सिद्धपुरुष आला. पण त्या वेळीं तो बैल तेथें नव्हता व धन-गुप्ताचीं मुलें गांवाबाहेर झोंपडी बांधून राहूं लागलीं आहेत हें ऐकून तो त्यांना शोध काढीत त्यांच्या झोंपडीजवळ गेला. त्या वेळीं एक कुत्रा भुंकत त्या सिद्धपुरुषाच्या अंगावर आला. सिद्धपुरुषानें आपल्या कमंडलूंतलें थोडें पाणी त्याच्या अंगावर शिंपडून त्याला विचारलें—"काय रे, निदान आतां तरी मोक्षाचा मार्ग शिकून घ्यायला तयार हो!"

"आणखी पांच वर्षें थांबा! माझीं मुलें कष्ट करून चार पैसे मिळवतात व या झोंपडींत आणून ठेवतात. पांच वर्षें निर्धास्त-पणानें माझीं मुलें येथें राहलीं तर चार पैसे










जमा होईल. कुत्रा मनुष्यांच्या भाषेंत उत्तरला.

"बरें तर मी पांच वर्षांनीं पुन्हां येईन." तो सिद्धपुरुष म्हणाला आणि निघून गेला.

कांहीं दिवसांनीं तो कुत्रा आजारी पडून मेला. धनगुप्ताच्या मुलांनीं जें मिळविलें होतें तें चोर चोरी करून घेऊन गेले. उपाशी मरण्याची वेळ आली बिचाऱ्यांवर.

पांच वर्षांनीं पुन्हां सिद्धपुरुष आला तेव्हां त्याला कळलें कीं पांच वर्षांपूर्वीच कुत्रा मेला. दिव्यदृष्टीनें त्याला कळलें कीं धनगुप्त सर्प योनींत जन्म घेऊन जमिनींत पुरलेल्या धनाचें रक्षण करीत आहे. तो धनगुप्ताच्या मुलांना म्हणाला—"अरे तुम्हांला मी एक जागा दाखवितों. त्या जागीं तुमच्या बापानें सोन्याचीं नाणीं हंड्यांत घालून पुरून ठेवलीं आहेत." त्यानें ती जागा त्यांना दाखविल्यावर त्यांनीं ती जागा खणून काढली. त्यांना तेथें खरोखरच एक हंडा लागला. पण त्या हंड्यावर वेटोळें करून एक सांप बसलेला होता. त्यांनीं सांपाला कुदळ फावड्यांनीं मारलें. तेव्हां सिद्धपुरुषानें त्यांना अडविलें व सांपावर कमंडलूंतलें पाणी शिंपडून तो सिद्धपुरुष त्याला म्हणाला—"काय रे आतां तरी मोक्षाचा मार्ग दाखवूं का?"

अर्ध मृतावस्थेंत तो सांप मनुष्यांच्या भाषेंत म्हणाला—"लवकर दाखवा, महात्मन्!" सिद्धपुरुषानें त्याला मंत्र सांगितला. तो ऐकून सांपानें मान टाकली. धनगुप्ताचे मुलगे तो हंडा उचलून घेऊन गेले व त्यांचें दारिद्र्य त्या दिवसापासून नाहींसें झालें.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! एक शंका आहे माझ्या मनांत. सांपाहून कुत्र्याचा जन्म, कुत्र्याहून बैलाचा

जन्म व बैलाहून मनुष्य जन्म जास्त बरा नाहीं का ! पण त्यानें मनुष्य योनींत मोक्षाचा मार्ग मागून घेण्या ऐवजीं सर्पयोनींत तो मागून घेतला. पण असें का ! पाहून निकृष्ट योनींत कदाचित जन्म मिळेल या भीतीनें ! कीं मुलांना धन मिळालेंच आहे; आतां ते खात्रीनें सुखी होतील, या गोष्टीची खात्री वाटली म्हणून ! या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिलीं नाहींस तर परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"धनगुप्ताचें मन पालटण्याचें कारण सर्पयोनीपेक्षां निकृष्ण योनींत जन्म घ्यावा लागेल ही भीति नव्हती. त्याच प्रमाणें मुलांचें पुढचें आयुष्य सुखाचें होईल म्हणून त्याच्या मनाचें समाधान झालें होतें. मुलांवरील प्रेमामुळें पण त्याच्या मनांत तो बदल झालेला नव्हता. याचें कारण अगदीं निराळें होतें. खालच्या योनींत जन्म घेऊन व जिवाची पर्वा न करितां मुलांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करूनदेखील त्यांची बिघडत चाललेली स्थिति पाहून, मुलांची स्थिति सुधारणें मला शक्य नाहीं या गोष्टीची जाणीव झाल्यामुळें व मोहाचें झांपड बाजूला सरल्यामुळें त्याचें मन पालटलें. मुलांनीं त्याला ठार करण्यासाठीं त्याच्यावर जे प्रहार केले त्यामुळें मोहाचें तें झांपड बाजूला सरून त्याचे डोळे उघडले."

अशातऱ्हेनें मौन भंग झाल्यामुळें वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला लोंबकळूं लागला.

[ जे. युगंधर शर्मा यांनीं लिहिलेल्या गोष्टीच्या आधारें. ]





# मंत्र मुग्ध

एका गांवीं एक गरीब शेतकरी रहात असे. दुष्काळांत त्याचें शेत ओसाड पडलें. पोटापाण्याच्या शोधार्थ तो गांवोगांवीं हिंडूं लागला. पण त्याला मनासारखें काम कोठेंच मिळालें नाहीं. त्यानें विचार केला टीचभर पोटासाठीं इतके कष्ट सहन करण्यापेक्षां साधु व्हावें. वैराग्याचें पोट नेहमीच भरतें. तो वैरागी झाला. तो एकदां हिंडत दुपारीं विश्रांतीसाठीं एका झाडाच्या सांवलींत बसला असतां भीमू नांवाचा एक गरीब तरुण त्याच्या पायां पडून म्हणाला—"आपण सिद्धपुरुष आहां ! मी आपल्या सेवेला हजर झालों आहें."

"तुला पाहिजे काय ! सांगशील की नाहीं !" वैराग्यानें विचारलें.

तो म्हणाला—"कांहीं नाहीं, आपण मला आपला शिष्य करून घ्या. आपल्या संगतींत इह परलोक दोन्ही साध्य होतील."

तें ऐकून वैराग्यानें विचार केला, आपलेंच पोट भरायची मारामार, या शिष्याचें कोठून भरणार ! कांहीं तरी थाप मारून सुटका करून घेतली पाहिजे. दूर त्याला एक हरिण दिसलें. तें हरिण झाडाला अंग घाशीत होतें. त्यानें भीमूला तें हरिण दाखवून विचारलें—"काय करतें आहे तें !"

"आपलें अंग झाडाच्या बुंधाला घाशीत आहे तें." भीमू म्हणाला.

"मला कळलें तूं कां घाशीत आहेस तें, मला कळलें तूं कां घाशीत आहेस तें." असें तीनदां म्हणायला त्यानें भीमूला सांगितलें.

"मला कळलें तूं कां घाशीत आहेस तें." भीमूनें तीनदां म्हटल्यावर त्या

सौ. सरला पाटील












वैराग्यानें त्याला विचारलें—"आतां तें काय करीत आहे?"

"आपल्याकडे पहात आहे." भीमू म्हणाला.

"मला कळलें तूं काय पाहात आहेस!" वैराग्यानें असें तीनदां म्हणायला सांगितलें व भीमूनें तसें म्हटल्यावर वैराग्यानें विचारलें—"आतां हरिण काय करीत आहे?"

"तें झाडाखालून निघून चाललें आहे." भीमू म्हणाला.

वैराग्यानें भीमूला "मला कळलें तूं कोठें जात आहेस तें." असें तीनदां म्हणायला सांगितलें भीमूनें तसें म्हटल्यावर वैरागी म्हणाला—"मंत्रमुग्ध करणारा हा एक मंत्र आहे. याचें नांव मृग मंत्र. याचा जप तूं नित्य करीत राहालास तर तुला मंत्रमुग्ध करण्याची शक्ति प्राप्त होईल. हा मंत्र मी आजवर कोणाला दिला नाहीं. तूं याचा उपयोग केलास तर तुला अलोट संपत्तीचा लाभ होईल."

भीमू भक्तिपूर्वक वैराग्याला नमस्कार करून त्या मंत्राचा जप करीत एका गांवी पोंचला. तें एक राजधानीचें नगर होतें. त्या गांवच्या राजाला कित्येक वर्षें नवस केल्यानंतर पुत्रप्राप्ति झाली होती. त्या राजाच्या मंत्र्याचा डोळा गादीवर होता. राजा निपुत्रिक मेला तर आपल्याच हातीं गादी येईल अशी आशा धरून तो बसला होता. पण त्याला निराश व्हावें लागलें. त्याच्याच हातांत सर्व राज्यसूत्रें होतीं. कारण अपत्य नसल्यामुळें राज्य कारभारांत राजाचें लक्ष नव्हतें. पण आतां युवराजाचा जन्म झाला होता. राजाला व प्रजेला अर्थातच आनंद झाला. त्या दिवसापासून राजाचें लक्ष राज्य कारभारांत लागूं लागलें. म्हणून प्रधानाच्या हातांतली सत्ता निघून गेली. राजा जिवंत असेपर्यंत तो राज्य कारभार पाहाणार व तो मेल्यावर युवराज अशी दुहेरी निराशा वाटल्यामुळें त्यानें तोड म्हणून युवराजाचा कांटाच दूर करण्याचें मनाशीं ठरविलें. त्याहि पुढें जाऊन राजाचा कांटा प्रथम दूर करतां आला तर पहावें असा देखील एक विचार त्याच्या मनांत आला. त्यानें या कामावर राजाच्या न्हाव्यालाच नेमलें. न्हाव्याला वचन दिलें कीं राजा मेल्यावर मीच राजा होईन व तुला एक जहागीर देऊन तुझें दारिद्य कायमचें दूर करीन. त्या मोहाला बळी पडून न्हावी तें घोर कर्म करायला तयार झाला.

न्हावी दुसऱ्या दिवशीं राजवाड्याच्या बाहेर चव्हाट्यांत बसून वस्तरा पाजळ-विण्यासाठीं दगडावर घाशीत असतां नेमका त्याच वेळीं भीमू त्या बाजूला आला. तोंडानें मृग मंत्राचा जप चालू होता—"मला कळलें तूं कां घाशीत आहेस. मला कळलें तूं कां घाशीत आहेस. मला कळलें तूं कां घाशीत आहेस."

न्हाव्यानें तें ऐकलें व घाबरून गेला. तो भीमूकडे पाहूं लागला. भीमू मंत्राचें पुढील वाक्य म्हणूं लागला—"मला कळलें,



तूं काय पाहतो आहेस. मला कळलें।तूं काय पाहतो आहेस. मला कळलें तूं काय पाहतो आहेस."

न्हावी इतका घाबरला कीं त्यानें आपली धोपटी उचलली व तेथून पाय काढण्याचा विचार करून उभा राहिला. भीमूचा मंत्र-जाप चालू होता—"मला कळलें तूं कोठें जात आहेस तें. मला कळलें तूं कोठें जात आहेस तें." तें ऐकून न्हावी घूम पळूं लागला.

त्याच वेळीं राजा दाढी करून घ्यायला म्हणून बाहेर आला. त्यानें न्हाव्याला

पळतांना पाहिलें व त्याला धरून आणायला सांगितलें.

त्या गडबडींत भीमूचा मंत्रजाप बंद पडला व तो राजाकडे व न्हाव्याकडे पहात उभा राहिला. त्यानें न्हाव्याला पळतांना व शिपाई त्याला धरून घेऊन येत होते तेव्हां पाहिलें. भीमूला हें माहीत नव्हतें कीं न्हावी कां पळाला! त्यानें चोरी केली कीं आणखी कांहीं अपराध हें देखील त्याला माहीत नव्हतें.

राजवाड्यासमोर गर्दी जमा झाली. न्हाव्यानें खरें खरें तें सांगून क्षमा मागितली. प्रधानानें अभयदान म्हणून त्याला जें पत्र लिहून दिलें होतें तें देखील न्हाव्यानें दाखविलें व म्हणाला—"महाराज, आज कोठून दुर्बुद्धि झाली कीं मी हें कुकर्म करायला निघालों होतों. पण देवाला तें रुचलें नाहीं व त्यानें या माणसाला पाठविलें माझ्या हालचालीवर पाळत ठेवायला." असें सांगून त्यानें भीमूकडे बोट दाखविलें व पुढें म्हणाला—"राजद्रोहाचा अपराध माझ्या हातून घडला नाहीं याला कारण हाच मनुष्य!"

भीमूला तें सर्व कांहीं कळलें नाहीं. राजानें त्याला जवळ बोलावून चवकशी केली कीं तूं या न्हाव्याच्या मनांतली गोष्ट कशी काय ओळखलीस? पण भीमूला त्यांतलें कांहींच माहीत नव्हतें. तो मृग मंत्र म्हणत होता एवढेंच.

राजा स्मित करून म्हणाला—"कांहीं हरकत नाहीं. तुझा मृगमंत्र राजाचा जीव वांचविण्यास कारण झाला. म्हणून तुला मी एक जहागीर देतों." असें सांगून राजानें भीमूला एक जहागीर लिहून दिली.





# नाग जांवई

एका राजाला मुलगा नव्हता म्हणून तो तपश्चर्या करूं लागला. पण राणीला मुलगी हवी होती. तीदेखील तपश्चर्या करूं लागली. एकदां राणी दुःखी मनानें एकांत स्थानीं हिंडत असतां एका वाळक्या झाडाखालीं बसलेली एक म्हातारी तिला म्हणाली—"महाराणी! इतकी दुःखी कां दिसतेस?" राणीनें आपल्या दुःखाचें कारण निवेदन केलें.

"तुला अपत्यच हवें असेल तर मी सांगतें तसें कर! आज सूर्यास्त होतांच आपल्या बागेच्या ईशान्य दिशेला जमिनीवर सोन्याची एक वाटी उपडी ठेवून दे. उद्यां सूर्योदयानंतर वाटी उचलून पहा. तुला एक लहान रोपटें दिसेल. त्याला दोन डहाळ्या असतील. एका डहाळीला पांढरें व दुसऱ्या डहाळीला तांबडें फूल दिसेल. तूं पांढऱ्या फुलाच्या पाकळ्या खाल्यास तर तुला मुलगा होईल व तांबड्या फुलाच्या पाकळ्या खाल्यास मुलगी होईल. दोन्ही फुलांच्या पाकळ्या मात्र खाऊं नकोस.

राणीनें मूल व्हावें म्हणून म्हातारीनें सांगितल्याप्रमाणें केलें. दुसऱ्या दिवशीं वाटी उचलून पाहाली तेव्हां वाटीखालीं एक रोपटें होतें व त्याला तांबडें व पांढरें अशीं दोन फुलें होतीं. तिला मुलगीच हवी होती, तरी पतीचें मन राखण्यासाठीं तिनें पांढऱ्या फुलाच्या पाकळ्या तोडून खाल्या. पण तिला लाल फुलाच्या पाकळ्या खाण्याचा मोह आवरला नाहीं.

पुढें राणीला दिवस राहाले. तें कळल्या-वर राजवाड्यांत सर्वांस आनंद झाला. नऊ

महिने पुरे झाले. राणी प्रसूत झाली. पण मुलाऐवजीं तिच्या पोटीं एक सांप जन्माला आला. राणी घाबरून गेली. तो सांप तेथून निघून गेला आणि एका बिळांत शिरला. प्रसववेदना थांबल्या नव्हत्या व आश्चर्य म्हणजे राणीला एक मुलगा झाला. सांप जन्मल्याची गोष्ट कोणाला कळलीच नव्हती. सर्वांना वाटलें कीं राणीला एक मुलगाच झाला.

अनेक वर्षे लोटलीं. राजपुत्र लहानाचा मोठा झाला. मुलगा वयांत आलेला पाहून राजा त्याला बोलावून एक दिवशीं म्हणाला— "युवराज! आतां तूं विवाहयोग्य झालास. तूं स्वतःसाठीं योग्य वधू पाहून लग्न करून घे."

त्याप्रमाणें राजकुमार नोकर चाकर बरोबर घेऊन देशाटनास निघाला. तो कांहीं अंतर चालून गेला असेल, त्याला झाडाच्या फांदीला विळखा घालून एक सांप फूत्कार सोडीत वाट अडवून उभा होता. युवराजाचा घोडा बिचकला आणि मागाच्या पायांवर उभा राहून खेंकाळूं लागला. युवराज घोड्यावरून पडला नाहीं, एवढेंच.

"हे पंथ माझा विवाह झाल्यानंतरच तुझा विवाह होईल!" तो सांप मनुष्यांच्या भाषेंत युवराजाला म्हणाला. राजकुमार फारच घाबरून गेला व आपल्या अनुचरांसह राजवाड्यांत परत आला. सांप जें कांहीं म्हणाला होता तें त्यानें राजाला सांगितलें.

राजा तें सर्व ऐकून आपल्या नोकरांना म्हणाला—"तुम्ही हें सर्व स्वतःच्या डोळ्यांनी पहात उभे राहिलात. त्या सांपाला मारून टाकूं नये! जा आणि आतांच्या आतां त्या सांपाला मारून टाका."

पण राणी म्हणाली—"नको नको!" नंतर राणीनें प्रसवसमयीं घडलेलें सर्व वृत्त सांगून त्या म्हातारीनें तिला जें कांहीं सांगितलें होतें तेंदेखील सांगितलें व म्हणाली—"तो सांपच आपला पहिला मुलगा म्हणजे युवराज आहे. त्याचें लग्न करून दिल्याशिवाय धाकट्याचें लग्न करून देणें कसें शोभेल!"

तें ऐकून राजा कपाळ धरून दुःखी मनानें एकांत जागीं जाऊन बसला. दुसऱ्या दिवशीं त्यानें प्रधानाला बोलावून दूर देशाच्या राजाकडे निरोप पाठविला कीं तुमच्या मुलीला आपली सून करून घेण्याचा आमचा विचार आहे.





सर्वांना वाटलें कीं राजाला एकच एक मुलगा आहे. म्हणून त्या देशाचा राजा आपली मुलगी द्यायला कबूल झाला. त्या देशाच्या रीतीप्रमाणें लग्नापूर्वी राजकन्या व युवराज यांची परस्परांशीं भेट करून देण्यासाठीं एका खोलींत राजकन्येला पाठवून देण्यांत आलें. बराच वेळ झाला तरी कोणीच बाहेर येईना हें पाहून दार उघडून पाहिलें तर राजकुमारीचीं फक्त वस्त्रेंच आंत दिसलीं. सांपानें राजकन्येला गिळलें होतें व नाहींसा झाला होता. पुढें कांहीं दिवसांनीं राजकुमार पुन्हां वधूशोधनास निघाला. तेव्हां पुन्हां तो सांप आडवा येऊन त्याला म्हणाला—"हें बघ, मी तुला एकदां सांगितलें. पुन्हां सांगतों. माझ्या विवाहानंतरच तुझें लग्न होईल."

राजकुमार घरीं परतला. राजानें तें ऐकलें व मनाशीं म्हणाला—"हा सांप किती राजकन्यांचा बळी घेणार आहे कोणास ठाऊक! दोन तीन राजकन्यांचे बळी खरोखरच सांपानें घेतले. राजाला कांहीं सुचेना. अगदीं शेवटचा उपाय म्हणून राजा एका शेतकऱ्याकडे गेला व त्याला म्हणाला—"तुला पांच मुली आहेत. एका मुलीचें लग्न तूं माझ्या मुलाशीं करून दे. तुझें सर्व दारिद्र्य मी कायमचें नाहींसें करतों."



तोंपर्यंत राजाचा मुलगा म्हणजे सांप ही गोष्ट जगजाहीर झाली होती. डोळे मिटून कोण आपल्या पोटचा गोळा सांपाच्या पुढें फेंकणार! शेतकरी म्हणाला—"महाराज! मला धनाचा मोह नाहीं. मी गरीब असलों तरी माझी मुलगी मला जड झालेली नाहीं."

पण राजानें शेतकऱ्याचे पायच धरले. तेव्हां शेतकऱ्यानें होकार दिला. शेतकऱ्याच्या मोठ्या मुलीचें लग्न सांपाशीं ठरलें. दुसऱ्याच दिवशीं मुहूर्त पण ठेवण्यांत आला.

शेतकऱ्याच्या मुलीच्या मैत्रिणींनीं दुःखी मनानें तिला निरोप दिला. ती एकटीच एका झाडाखालीं हिंडत असतां एका वाळल्या झाडाखालीं एक म्हातारी बसलेली तिला दिसली. त्या म्हातारीच्या तोंडांत एक देखील दांत नव्हता. तिनें त्या मुलीला विचारलें—"बाळ, तूं इतकी दुःखी कां?"

मुलीनें सर्व खरें खरें सांगून टाकलें.

तें ऐकून म्हातारी म्हणाली—"मी सांगतें तसें कर. तूं राजाला कांहीं अटी घाल.














दहा रेशमी परकर किंवा झगे करून द्यायला सांग. खोलींत एक पिंप भरून चुन्याचें पाणी व एक पिंप भरून दूध व त्यांत दहा काठ्या ठेवायला सांग. तुला खोलींत पाठवल्यावर सांप तुला झगा काढून फेंकून द्यायला सांगेल. तेव्हां तूं त्याला सांग, तूं आपली कात टाकलीस तर मी झगा काढीन. तो कात टाकील व पुन्हां तुला झगा काढायला सांगेल. तूं पुन्हां त्याला कांत टाकायला सांग. असें सहासात वेळ झाल्यावर त्याला कात टाकणें अशक्य होईल. तेव्हां तूं एक काठी घेऊन सांपाला झोडपून काढ. चुन्याच्या पाण्यांत काठी भिजवून तूं सर्व काठ्या पिजून जाईपर्यंत त्या सांपाला बडव. सांपाचा लोळागोळा होऊन गेला म्हणजे तुझी सुटका होईल."

शेतकऱ्याच्या मुलीनें म्हातारीनें सांगितल्याप्रमाणें केलें. सांपाला त्या मुलीच्या सांगण्याप्रमाणें सात वेळ कात टाकावी लागली. शेवटीं त्याला अशक्य झालें तेव्हां मुलीनें काठी घेऊन त्याला खूप झोडपून काढलें. सांपाचा लोळागोळा झाल्यावर तिनें त्याला काठीनें उचलून दुधाच्या पिंपांत टाकलें. त्याबरोबर मदनाच्या पुतळ्यासारखा एक तरुण पुरुष पिंपांत उभा असलेला तिला दिसला. दोघें रात्रभर गप्पा मारीत खोलींत बसून होतीं. शेतकऱ्याच्या मुलीनें घडलेलें सर्व वृत्त सांगितलें. सर्वांना आनंद झाला. राजानें आपल्या मोठ्या मुलाचें लग्न करून दिलें व त्याचाच राज्याभिषेक करून दिला. राजाच्या दुसऱ्या मुलानें आपल्या भावजयीच्या धाकट्या बहिणीशींच लग्न करून घेतलें. सर्व सुखी झाले.





म्हणून समुद्रकाठीं एक निर्जन स्थान निवडून तेथें त्यानें यज्ञ आरंभ केला. जमिनीच्या बाजूनें कोणी येईल कदाचित म्हणून त्या बाजूला त्यानें एका शिष्याला नेमलें. यज्ञाला जरूर असलेलें सर्व साहित्य एकत्र करून त्यानें यज्ञ आरंभिला.

यज्ञ आरंभ करण्यापूर्वी जो दानधर्म करावा लागतो तो त्यानें केला पण तो फक्त आपल्या शिष्यवर्गांतच केला. या यज्ञाचें फळ काय होईल याची माहिती त्याच्या शिष्यवर्गाला पण नव्हती. शिष्यांनीं विचारलें तर तो सांगे, त्याचें फळ प्रत्यक्ष डोळ्यासमोरच तुम्हांला दिसेल. तें पाहाल्या-वर तुम्ही ते जगजाहीर करा."

या यज्ञांत पुरोडाश नांवाचें विशिष्ट पक्वान्न तुपांत भिजवून त्याची आहुती द्यावयाची असते. अंगिरस पुरोडाशाची आहुती देऊं लागला कीं अग्निज्वाळा 'धू....धू' करून आकाशापर्यंत पोंचत. धुराचे लोट असमंतांत पसरले आणि त्या धुराच्या पडद्याआड एक विमान खालीं जमिनीकडे उतरत असल्याचें दिसूं लागलें. यज्ञ संपूर्ण होण्याची वेळ आली तेव्हां तें जमिनीच्या अगदीं जवळ आलेलें दिसलें. शेवटची आहुती देणेंच राहिलें होतें.

नेमकें त्याच वेळीं एक विघ्न आलें. अरण्यांत राहणाऱ्या ऋषींनीं व मुनींनीं आकाशांत पसरलेले धुराचे लोट पाहिले व कोठें तरी यज्ञकार्य चालू असलें पाहिजे असें अनुमान करून ते त्याच अनुरोधानें आले. यज्ञाच्या वेळीं वाटेल त्यानें यावें असा प्रघात होता. यज्ञशेष त्यांच्या वाट्याला येईल अशी त्यांची खात्री होती. त्यासाठीं आमंत्रण वगैरेची जरूर नसते. म्हणून चहूंकडून ऋषी-मुनी आनंदानें यज्ञस्थळीं आले. त्यांना येत असलेले पाहून अंगिरसाच्या शिष्यांनीं ओरडून गुरूला ती वार्ता दिली.

"त्यांना पुढें येऊं देऊं नका! परत जायला सांगा!" अशी गुरूची आज्ञा झाली. परंतु त्या गडबडींत पुरोडाश तुपांत पुरा बुडल्याशिवायच त्याची आहुती अंगिरसानें दिली. त्याशिवाय दुश्चित झाल्या-मुळें आहुती देतांना म्हणावयाचा मंत्र देखील राहून गेला. ती चूक त्याच्या लक्षांत आली नाहीं व विमान परत जाऊं लागलेलें पाहून त्यानें उडी मारून विमानांत शिरण्याचा प्रयत्न केला. तेव्हां विमानाचें एक टोंक त्याच्या हाताला लागलें तेंच त्यानें धरलें. विमान कांहीं अंतर वर उडून आकाशांत घिरट्या घालूं लागलें.

विमानांत बसलेले देव अंगिरसाला म्हणाले—"यज्ञ पुरा झाला नाहीं. म्हणून तुला विमानांत बसण्याचा अधिकार नाहीं."

"मी यज्ञ पुरा केला आहे! वास्तव मला विमानांत बसण्याचा अधिकार पोंचतो." अंगिरस म्हणाला. त्याच वेळीं शेवटच्या पुरोडाशाच्या धुरांतून एक भूत निघालें व तें विमानाच्या चारी बाजूला घिरट्या घालूं लागलें. खालीं यज्ञस्थळीं जमलेल्या ऋषी



व मुनींनी त्याला विचारलें—"तूं कोण?" तें उत्तर दिल्याशिवाय वर आकाशांत जाऊं लागलें. इंद्र व बृहस्पती दोघांचे आवाहन करून मुनींनी त्या भुताला खालीं आणण्याचा यत्न केला. पण तें येईना. पण ज्यावेळीं मुनींनी अग्निदेवाचें स्मरण केलें तेव्हां मात्र तें भूत खालीं आलें.

"मी पुरोडाश आहें. अग्निसाठींच माझा जन्म झाला आहे. मंत्र म्हणून यथाविधि माझी आहुती द्या. अंगिरसानें चूक केली म्हणून मला हें रूप घ्यावें लागलें. अजून कांहीं बिघडलें नाहीं. यथाविधि मंत्र म्हणून आहुती दिल्यास यज्ञाचें फळ मिळूं शकेल." भूत म्हणालें.

पण एका मुनीला देखील तो मंत्र व यज्ञविधि माहीत नव्हता. विमान धरून लोंबकळत असलेला अंगिरस म्हणाला—"मुनिश्रेष्ठहो! मी सदेह मुक्ति मिळावी म्हणून हा यज्ञ केला होता. घाईंत शेवटची पुरोडाशाची आहुती देतांना चूक झाली. पुरोडाशाच्या दोन्ही बाजूला तूप घालून व तो तुपांत बुडवून मी सांगतों तो मंत्र म्हणून आहुती द्या."

ऋषींनीं व मुनींनीं अगदीं तसेंच केलें. अग्निज्वाळा पुन्हां वर आकाशापर्यंत पोंचल्या. विमानांत बसलेल्या देवांनीं अंगिरसाला त्याचा यज्ञ भंग झाला असल्याचें सांगितलें. तुला सदेह मुक्ति मिळणें अशक्य. दिव्य देह धारण कर."

अंगिरसानें अग्नींत उडी टाकली व त्याला दिव्य देह मिळाला. त्याला स्वर्गप्राप्ति झाली. पण त्याच्या चुकीमुळें व स्वार्थीपणामुळें सदेह मुक्ति मिळविण्याच्या मंत्रमासीस मर्त्यलोक कायमचा मुकला.





# अक्कल पदरीं पडली

मद्रदेशाचा राजा धर्मदत्त विद्याप्रेमी, कला-पोषक, बुद्धिमान व मंत्र्याच्या सल्लयानें राज्य करणारा एक प्रजावत्सल राजा होता.

एके दिवशीं शौचमित्र नांवाचा एक चित्रकार त्याच्या दरबारीं आला. त्यानें राजाला उत्तमोत्तम चित्रांचे कांहीं नमुने दाखविले. राजा धर्मदत्त त्याची ती कला पाहून इतका खूष झाला कीं त्यानें पांच हजार वराह देऊन सर्व चित्रें ठेवून घेतलीं.

राजानें आपल्या कलेचा आदर केलेला पाहून शौचमित्राला धन्यता वाटली व आपले आभार व्यक्त करण्याच्या हेतूनें तो म्हणाला—"महाराज, आपण माझ्या कलेचा जो प्रेमादर केलात त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें. आतां आपणांजवळ एकच विनंति आहे. आपलें एक चित्र काढण्याची फार इच्छा आहे." राजानें परवानगी दिली. शौचमित्रानें पंधरा दिवसांत राजाचें चित्र काढून तें सर्वांना दाखविलें. सर्वांनीं त्याच्या कलेची स्तुति केली. धर्मदत्त राजाला तर अनिर्वचनीय आनंद झाला. म्हणाला—"शौचमित्रा! आपला दरबारी चित्रकार म्हणून मी तुला नेमतों व दरमहा दहा हजार वराह तुझा पगार नेमून देतों."

"महाराज मी एक धंदेवाईक चित्रकार आहें. मी आपल्या कलेंत नैपुण्य दाखविलें तर त्यांत नवल नाहीं. याहून जास्त विशेष...." बोलतां बोलतां तो मध्येंच थांबला. राजाला आश्चर्य वाटलें. म्हणाला—"बोल! संकोच कसला? तुला जें कांहीं मागून घ्यावयाचें असेल तें मागून घे." त्यावर चित्रकार म्हणाला—"आपला प्रधान



म्हणून राहण्याची माझी इच्छा आहे." राजानें प्रथम आपल्या प्रधान धीमंत याच्या-कडे पाहिलें व खुणेनें सुचविलें कीं तुम्ही मान्य करा. नंतर मोठ्यानें म्हणाला–"प्रधान! आजपासून प्रधानाच्या जागीं मी शौचमित्राची नेमणूक करीत आहें."

प्रधान धीमंत राजाला नमस्कार करून व राजाज्ञा शिरोधार्य मानून निघून गेला. दुसऱ्या दिवशीं राजा फिरायला निघाला त्या वेळीं त्याच्या बरोबर त्याचा नवीन पंतप्रधान शौचमित्र होता. धर्मदत्त त्याच्या-बरोबर बोलत बोलत एका ओढ्याच्याकाठीं आला. बाजूच्या एका देवळाच्या ओट्यावर एक म्हातारा बसला होता. त्यानें उठून राजाला नमस्कार केला.

तो म्हातारा ओट्यावर बसून कावळ्यांना खायला दाणे टाकीत होता. तें पाहून राजानें त्याला विचारलें–"तुला कावळे आवडतात वाटतें! हंस का नाहीं पाळीत? बरें तर मी तुझ्याकडे एक हंस पाठवून देतों. मग तूं काय करशील त्याला?

"पहिल्यानें तो खरा हंस आहे कीं खोटा हें नीट पाहून घेईन. खोटा निघाला तर नांवापुरता एक पंख सोडून बाकी पंख उपटून त्याला कावळा करून तुझ्याचकडे पाठवून देईन."

"तुला कांहीं दिलें तर तें पचविण्याची शक्ति आहे का?" राजानें विचारलें.

त्यावर तो म्हातारा म्हणाला–"प्रवास लांबचा असेल तरच खाण्या पिण्याच्या पदार्थांचें गाठोडें बांधून न्यावें लागतें."

"मग त्याचें तूं काय करशील?" राजानें विचारलें.

"गाठोड्यांत कांहीं उरेल तर ना! तें तर केव्हांच रिकामें झालें असेल." वृद्ध म्हणाला.

नंतर राजानें पुन्हां प्रश्न केला–"तुझें घर ठीक आहे ना?"

"माझ्या घरच्या भानगडी तुला कशाला? समोरचें घर रिकामें झालें आहे, एवढें लक्षांत ठेव!" वृद्ध म्हणाला.

तेव्हां राजा म्हणाला–"तुम्ही चतुर व सुज्ञ दिसतां! माझ्याजवळ दोन मणी आहेत. ते मला देतां येणार नाहींत कीं काढतां येणार नाहींत. त्या मण्यांनीं दोन्हीं दिशा प्रकाशित मात्र होतात."

त्यावर तो वृद्ध म्हणाला–"तें शक्य नाहीं! एका मण्यामुळें जेवढा प्रकाश होतो दोन्ही मण्यांनीं एकाच दिशेला तो पडतो."

धर्मदत्त आपल्या नव्या मंत्र्याबरोबर घरीं परतला. राजवाडा जवळ येतांच त्यानें आपल्या मंत्र्याकडे वळून विचारलें–"तुम्ही आमचें संभाषण ऐकलेंच आहे. त्याचा काय अर्थ?" त्यावर शौचमित्र म्हणाला–"प्रभो! मला त्याचा अर्थ मुळींच कळला नाहीं. मला वाटलें तुम्ही असेंच कांहीं तरी बोलत असाल."

"तुम्ही पंतप्रधान! तुम्हांला त्याचा अर्थ कळला नाहीं? तुम्हांला पंतप्रधानाच्या जागेवर नेमून फार दिवस झाले नाहींत.





म्हणून विचार करण्यासाठीं एक दिवसाची मुदत देतों. तुम्ही विचार केलात तर कळेल अर्थ." राजा म्हणाला. शौचमित्राला कांहीं कळलें नाहीं. उजाडल्यावर तो त्या म्हाताऱ्याच्याच घरीं गेला. त्याला भेटून त्यानें राजाशीं जें संभाषण झालें होतें त्याचा अर्थ सांगायला विनंति केली.

वृद्ध म्हणाला—"सांगतों ऐक! प्रश्नांचीं उत्तरें देणें व कोडीं सोडविणें हाच माझा धंदा आहे. प्रत्येक प्रश्नाचें उत्तर सांगितल्याबद्दल मोबदला म्हणून मला एक हजार बराह याप्रमाणें पांच हजार बराह समोर काढून ठेव. पाहिजे तर सर्व मिळून एक हजार कमी घेईन." वृद्ध म्हणाला.

शौचमित्र घरीं गेला. चार हजार बराह एका पिशवींत घालून घेऊन आला व त्या वृद्धाला दिले. तेव्हां वृद्ध म्हणाला—"राजाचा पहिला प्रश्न होता, एक हंस पाठविला तर तूं काय करशील त्याला!" मी त्याचें उत्तर दिलें कीं 'खरा आहे कीं खोटा हें मी प्रश्न पाहून घेईन. खरा नसेल तर त्याचे सर्व पंख तोडून टाकीन. नांवापुरता एक राहून देईन.' बरें तें राहूं दे. शेवटीं कळेल.

दुसरा प्रश्न होता, कांहीं दिलें तर पचवूं शकशील का! त्याचें उत्तर मी दिलें, प्रवासांत खाण्याचें पदार्थ बांधून न्यावेच लागतात. तिसरा प्रश्न होता, त्याचें तूं काय करशील! त्याचें उत्तर मी दिलें, गाठोड्यांत कांहीं उरेल तर ना! तें केव्हांच रिकामें होईल. दुसऱ्या व तिसऱ्या प्रश्नांचा व त्यांच्या उत्तरांचा अर्थ असा कीं उधार घेतलेली बुद्धि किती वेळ पुरणार! प्रवासांतल्या फराळाच्या सामानासारखी आहे ती. आतां चवथा प्रश्न 'तुझें घर ठीक आहे ना!' मी उत्तर दिलें—'समोरचें घर रिकामें आहे.' राजासमोरच पेंतप्रधानाची जागा रिकामी



झाली या गोष्टीचा त्यांत संकेत होता. राजाचा पांचवा प्रश्न दोन मण्यांविषयीं होता. दोन मणी दोन डोळ्यांचे सूचक होते.

"आतां पहिला प्रश्न घे. राजा हंस पाठवितो म्हणाला. तो हंस म्हणजे तूं. मी मागितल्याबरोबर तूं चार हजार बराह घेऊन आलास. तुझ्याकडे फक्त एक हजार उरले. हंसाचे पंख तोडून घेण्याचा अर्थ तुझ्या कडून घेतलेले चार हजार बराह व एक हजार तुझ्याकडे उरले तो तुझा नांवापुरता उरलेला पंख." एकूण आपण मूर्ख ठरलों हें ओळखून शौचमित्र राजाकडे गेला व म्हणाला—"महाराज! माझे डोळे उघडले. मी पेंतप्रधानाच्या पदास अयोग्य ठरलों आहें. तें आपण परत घ्यावें. सर्व प्रश्नांचीं जीं उत्तरें त्यानें त्या म्हाताऱ्याकडून विचारून घेतली होतीं तीं त्यानें सांगितलीं.

राजानें विचारलें—"सर्व प्रश्नांचीं उत्तर देणारा तो म्हातारा कोण हें नाहीं का कळलें तुला!" शौचमित्रानें नकार दिला.

राजा म्हणाला—"तें सुद्धां एक कोडेंच ठरलें तर! त्यानें तुला सांगितलें कीं प्रश्नांचीं उत्तरें सांगणें व कोडीं सोडविणें हा त्याचा धंदा आहे. म्हणजे बुद्धिबळावर त्याचें पोट अवलंबून आहे. तुझ्यासाठीं पेंतप्रधानाची जागा रिकामी करणारा तो बुद्धिमान धीमन्तच म्हाताऱ्याचें सोंग घेऊन तेथें बसला होता. हें शेवटचें कोडें मी उलगडलें. म्हणजे तुझ्याजवळ असलेल्या एक हजार बराहांवर माझा अधिकार आहे!"

"होय महाराज! मी अवश्य देईन! कारण पांच हजार बराह खर्च करून एवढी अक्कल पदरीं पडली हें काय थोडें झालं!" शौचमित्र म्हणाला.
















# परीक्षा फल

सिंधु देशांत मलयकेतु नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याला एक मुलगी होती. तिचें नांव विनयमुखी. तिच्या अप्रतिम रूपाची कीर्ति राज्यभर पसरली. कित्येक राजकुमार तिच्याशीं विवाह करण्याच्या हेतूनें येऊं लागले. पण राजकन्येच्या मनासारखा एकदेखील निघाला नाहीं.

राजकुमारीनें आपला पति निवडण्यासाठीं एक परीक्षा ठेवली होती. आपला पति शूर, वीर व बुद्धिमान असावा या हेतूनें तिनें ती परीक्षा ठेवली होती. प्रत्येकाची तिनें परीक्षा घेतलीच असें देखील नाहीं. प्रथम त्यांना बोलवून त्यांचें वय व सौंदर्य कळल्यानंतर पसंत पडल्यास ती त्यांची परीक्षा घेई. तिची ती परीक्षा थोडी विचित्र होती.

राजवाड्याच्या उत्तरेस एक उद्यान व त्याच्या उत्तरेस एक अरण्य होतें. त्यांत एक वाघ होता. तिच्याशीं लग्न करण्याच्या हेतूनें येणाऱ्या प्रत्येक तरुणानें त्या अरण्यांतून यावयाचें व रानांतल्या वाघाला ठार करून त्या उद्यानांत यावयाचें. त्या उद्यानांत एक भयंकर पक्षी होता. तो पक्षी ज्या कोणाला उद्यानांत प्रवेश करतांना पाही त्याचे दोन्हे डोळे फोडी. त्या पक्ष्याच्या हातांतून सुटून राजवाड्यापर्यंत पोंचल्यावर एक चिखली खंदक पार करून यावयाचें. तो खंदक पार करून कोणी आल्यास राजकन्या स्वतःच्या हातानें पेला भरून पाय धुवायला पाणी देणार. तेवढ्या पाण्यांत सर्व चिखल धुवून काढावयाचा. या एवढ्या दिव्यांतून जो सुरक्षित येईल त्याच्याशींच राजकन्या विवाह करण्यास तयार होती.

तिच्याशीं लग्न करण्यासाठीं कित्येक आले. कांहीं वाघाच्या तोंडीं मेले तर कांहींना त्या पक्ष्यानें आंधळे करून सोडलें. त्यांतून स्वतःला वांचवून कोणी आलाच तर एका पेलाभर पाण्यांत चिखलानें बरबटलेलें सर्व अंग तो कसें काय धुणार!

त्या विलक्षण परीक्षेचें वर्णन नगावलीच्या राजकुमारानें ऐकलें. त्याचें नांव प्रताप असें होतें. तो सिंधु देशाच्या राजधानींत आला. राजवाड्याच्या उत्तरेकडील त्या भयंकर अरण्याच्या बाहेर बाहेरूनच तो एक फेरी मारून आला. तेव्हां त्याला कळलें कीं तें अरण्य नैसर्गिक नसून कृत्रिम आहे. कारण अरण्याच्या चारी बाजूला कुंपण होतें. कुंपणाला एकच एक दार होतें. त्याशिवाय तें अरण्य राजवाड्याजवळ होतें. राजवाड्याजवळ कोण अरण्य वाढूं देणार? म्हणून वाघ सुद्धां पाळीव असावा असा त्यानें कयास बांधला.

नंतर तो राजकुमारीला भेटला. त्याचें सौंदर्य व शरीरयष्टी पाहून राजकुमारीनें त्या दिव्यांतून यायला परवानगी दिली. प्रतापनें



मनुष्याच्या आकृतीचें एक लोखंडी कवच तयार केलें. तें घातल्यावर कवच असेल असें देखील वाटत नव्हतें. नाक, कान, डोळे वगैरे हुबेहूब माणसासारखेंच होते. तें कवच घालून व मांस एका गोठोड्यांत बांधून घेऊन प्रताप उत्तरेकडच्या दारानें त्या अरण्यांत शिरला. त्याच्या अंगावर तो वाघ धांवत आला. प्रतापानें मांसाचें तें गांठोडें त्याच्यासमोर टाकलें व कवच घालून पुढें निघाला. वाघ मांस खाण्यांत गर्क होऊन गेला व प्रताप स्वतःचा बचाव करून घेऊन उद्यानांत शिरला. भयंकर पक्ष्यानें झडप मारली व कवचाला लावलेले डोळे काढून घेऊन निघून गेला. त्यानें कवच फेंकून दिलें व खंदकांत उतरून राजवाड्यांत गेला. राजकुमारी घेला भरून पाणी घेऊन आली. तेव्हां प्रताप म्हणाला—"राजकुमारी दोन अटी पुऱ्या केल्या आहेत. म्हणजे दोन तृतीयांश कार्य साधलें आहे आतां उरलेले एक तृतीयांश साधून देण्याची जबाबदारी तुझ्यावर आहे."

"हा घेलाभरून पाण्यांत सर्व चिखल तुलाच धुवून दाखविला पाहिजे." राजकुमारी म्हणाली.

"ठीक, मी तसेंच करतों. पण पाण्याचा एक थेंब देखील जमिनीवर पडतां कामा नये. पाणी तूंच ओतावयाचें आहे. एक थेंबभर पाणी जरी खालीं जमिनीवर पडलें तर प्रत्येक थेंबाबद्दल एक घागरभरून पाणी द्यावें लागेल." तो राजकुमारीला म्हणाला.

"तूं परीक्षेंत उत्तीर्ण झाला आहेस. जा, जाऊन आंघोळ करून ये." ती म्हणाली.

दुसऱ्या दिवशीं थाटामाटानें दोघांचें लग्न झालें.





# परोपकारी गोपाळ

गोपाळ ज्या गांवांत रहात असे त्या गांवच्या पाटलानें आपल्या घराच्या आवारांत एक विहीर खणण्यासाठीं एका माहीतगार मनुष्याला बोलावून विचारलें—"येथें पाणी लागेल का?"

तो मनुष्य त्या जागेची पाहाणी करून म्हणाला—"पाणीच काय विचारतां! येथें चार सहा हात खालीं रत्नभांडार आहे. पण गजलक्ष्मीची व नागाची पूजा करावी लागेल. एक महिना भर उपवास करावा लागेल."

तें ऐकून गांवचा पाटील मनांतल्या मनांत खूष झाला. पण उघडपणें तो त्या तज्ञ माणसाला म्हणाला—"हा उपवास वगैरे कशाला! देवाच्या दयेनें मला जेवढें मिळालें आहे तें मला आयुष्यभर पुरेल. येणाऱ्या पिढीच्या लोकांना पुढें उपयोगी पडेल म्हणून तुम्ही सांगितलें आहे तें ठीकच आहे." असें सांगून पाटलानें त्या तज्ञ माणसाला इनाम देऊन निरोप दिला.

नंतर पाटलानें भटजींना बोलवून म्हटलें—"ज्योतिषी सांगून गेला आहे कीं माझे ग्रह विरुद्ध आहेत. पण गजलक्ष्मी व्रत व नागपूजा केली तर ही आपत्ति टळेल.

"पाटील! गजलक्ष्मी व्रत केल्यास लक्ष्मी प्रसन्न होईल व धनप्राप्ति होईल. पण त्यासाठीं एक महिनाभर अनशन व्रत ठेवावें लागेल. अर्धरात्रीं नागपूजा करावी लागेल. सकाळीं थोडें दूध पिऊन सपत्नीक पूजा करावयाची असते. खर्च म्हणाल तर होईल हजार एक." भटजी म्हणाले.

तें ऐकून पाटलांचें तोंड उतरलें. त्यांनीं कधीं उपवास केला नव्हता. भोजनावर त्यांचें

धर्मनिधि ] [श्री. मा. गो. मोरे



विशेष प्रेम पण होतें. दिवसांतून तीनदां भोजन केल्याशिवाय त्यांचें भागत नसे. म्हणून त्यांनीं विचारलें—"भटजी, हा उपवास माझ्या हातून होईल म्हणतां !"

तें ऐकून भटजींना वाटलें, दक्षिणा बुडणार. पाटलांनीं हें व्रत केलें तर आपलें जन्माचें दारिद्र्य फिटेल. म्हणाले—"पाटील बुवा ! अहो, उपवास तुम्हींच केला पाहिजे असें नाहीं. हें व्रत आणखी कोणी जोडप्यानें केलें तरी चालेल. होय ! त्यासाठीं होणाऱ्या खर्चाचें ओझें मात्र तुम्ही उचललें तर त्याचें फळ तुम्हांलाच मिळेल."

लगेच पाटलांना गोपाळ व त्याची बायको लक्ष्मी यांची आठवण झाली. व्रत झाल्यावर त्यांना कांहीं घावें लागलें तरी विशेष कांहीं बिघडलें नाहीं. असा विचार करून त्यांनीं, काय ती व्यवस्था करून कळवितों असें सांगून भटजींना पाठवून दिलें. नंतर ते स्वतः गोपाळच्या घरीं गेले. म्हणाले—"गोपाळ ! हें बघ मी एका फार अगत्याच्या कामासाठीं तुझ्याकडे आलों आहे. मग करशील ना माझ्यासाठीं !"

"बोला ! अवश्य करीन !" गोपाळ म्हणाला.

"तूं व तुझी बायको दोघांनीं उपवास करावा व माझ्या घरीं येऊन गजलक्ष्मी पूजन व नागपूजा करावी." पाटील म्हणाले.

परोपकारी गोपाळ त्याला कबूल झाला. पुरोहित आले व त्यांनीं मुहूर्त ठरविला. त्या दिवशीं गोपाळ लक्ष्मीबरोबर पाटलांच्या घरीं गेला व उपवास सुरू केला. महिना-भर शास्त्रीबुवांनीं जें कांहीं करायला सांगितलें त्याप्रमाणें दोघांनीं केलें. पाटील रोज तिन्ही वेळ जेवत व शास्त्रीबुवांची चंदी होती. कारण दक्षिणा मिळे. पण लक्ष्मी



व गोपाळ मात्र निराहार व्रत करीत राहल्यानें वाळून गेले. गालफडें बसलीं व डोळे खोल गेले. व्रत संपल्यावर तांबूल दक्षिणा देऊन पाटलांनीं जोडप्याला निरोप दिला.

विहीर खणण्याचें काम सुरू झालें. सहा हात खोल खणण्यासाठीं जितक्या मजुरांची गरज होती तेवढेंच कामावर लावण्यांत आले. त्यानंतर फक्त दोघांना ठेवून बाकीच्यांना काम पुरें झाल्याचें सांगून पाठवून दिलें.

दोघां मजुरांनीं खणण्याचें काम सुरू ठेवलें. हातभर खणल्यानंतर पहार कशाला तरी लागली व 'खणूण' असा आवाज झाला. पाटील मजुरांना म्हणाले—"अरे लागलें बरं का पाणी. आतां तुम्ही गेलांत तरी चालेल." मजूर निघून गेले. नंतर पाटील स्वतः खणूं लागले. आंतून एक लोखंडी पेटी निघाली. ती रात्रीं उचलून घेऊन पाटलांनीं घरांत नेली.

हावऱ्यासारखी त्यांनीं ती उघडून पाहिली तेव्हां डोळे पट्ट पांढरे पडले. कारण पेटी फक्त गोट्यांनीं भरलेली होती. कोणीतरी कोठेंतरी चूक केली दिसते आहे. ही चूक शास्त्रीबुवांची असणें शक्य नाहीं. कारण



जाणून बुजून चूक केल्यानें त्यांना कांहीं फायदा मिळणार नव्हता. गोपाळ व लक्ष्मी दोघांनीच चूक केली असणार. उपास मोडला असेल.

असा विचार करून पाटलानें गोपाळ-कडे बोलावणें पाठविलें व म्हणाले—"तुम्ही उपासाचें नुसतें ढोंग केलें होतें. म्हणूनच सर्वनाश झाला. मी पाण्यासारखे इतके रुपये खर्च केले पण सर्व वाया गेले. तुम्हीं लपून लपून कांहीं तरी खाल्लेंत व तुमचा उपास मोडला त्याचें फळ मला भोगावें लागत आहे."

"तुम्ही हें सर्व काय बोलतां आहां पाटील! शास्त्रीबुवांनीं जें कांहीं सांगितलें तें सर्व आम्ही केलें. त्याचें फळ काय मिळणार होतें व काय मिळालें हें आम्हांला काय ठाऊक!" गोपाळ म्हणाला.

पाटलांनीं जास्त लपवालपवी न करतां घडलेलें सर्व वृत्त सांगितलें. म्हणाले—"या विहिरींत धनाचा अलोट सांठा मिळेल या आशेनें मी एवढा खर्च व खटपट केली. एक पेटी मिळाली पण पहा, हिऱ्या माणकांच्या जागीं फक्त दगड व गारगोट्या मिळाल्या. पहा उघडून पाहिजे तर."

गोपाळनें पेटी उघडून पाहिली तर ती सोन्याच्या नाण्यांनीं भरलेली होती. त्यानें पाटलांना सांगितलें. पाटलांनीं उघडून पाहिली तेव्हां त्यांना आंत दगड दिसले. पाटील रागाच्या भरांत म्हणाले—"लबाडा! तूं उगाच खोटा कोलास आणि वर मला फसवूं पाहातोस! ही पेटी सोन्यांनीं भरलेली आहे तर उचलून घेऊन जा. मला नको ती गारगोट्यांची पेटी."

गोपाळ म्हणाला—"तुम्हांला नको असेल तर मी घेऊन जातो." असें सांगून गोपाळ पेटी उचलून घेऊन गेला. त्यानें राजाला कळविलें कीं त्याला धनाचा एक मोठा सांठा सांपडला आहे तुमच्या राज्यांत सांपडलेलें तें धन आहे म्हणून मी खजिन्यांत पाठवूं इच्छितों. प्रजेच्या हितासाठीं तें धन खर्च करण्यांत यावें.

राजानें गोपाळच्या इच्छेप्रमाणें सर्व धन आपल्या खजिन्यांत ठेवून घेतलें व गोपाळला त्याच्या राज्यभक्तीबद्दल इनाम देऊन त्याचा सत्कार केला.

तें ऐकून पाटलांचे डोळे उघडले.





# युद्ध कांड

रावण अशोक वनांत पोचला तेव्हां सीता रामाचाच विचार करीत बसली होती. तिच्या चारी बाजूला राक्षसिणी बसलेल्या होत्या. रावण जवळ येऊन म्हणाला—"तूं ज्या रामाचा गर्व करून इतका वेळ मला नकार देत राहालीस तो रणांगणावर मरून पडला आहे. बिचारा वानरांचें एवढें मोठें सैन्य घेऊन लंकेच्या उत्तरी किनाऱ्यावर उतरला. सर्व दमून भागून घोरत पडले होते तेव्हां माझा सेनापति प्रहस्त सैन्य घेऊन गेला आणि शत्रुसैन्यावर बाणवृष्टि करून घोरत पडलेल्या रामाचें डोकें कापून घेऊन आला. लक्ष्मण व उरलेले वानर घाबरून पळून गेले. सुग्रीव, हनुमान, जांबवंत, अंगद वगैरे वानरवीर रणांगणावर पडले आहेत."

तो एका राक्षसिणीला म्हणाला—"जा, विद्युत्‌जिव्हाला बोलावून घेऊन ये. येतांना रामाचें डोकें घेऊन यायला सांग." विद्युत्‌जिव्ह रामाचें डोकें व चाप घेऊन आला. रावणाच्या आदेशप्रमाणें त्यानें तें डोकें व चाप सीतेसमोर ठेवलें.

समोर तें डोकें पाहून सीतेला तें रामाचेंच डोकें वाटलें व ती शोकाश्रू ढाळूं लागली. तिनें कैकेयी मातेची निंदा केली. स्वतःची निंदा पण करूं लागली. माझ्याशीं लग्न केल्या-



मुळेंच रामावर इतकीं संकटें ओढवलीं. तिनें रावणाजवळ हात जोडून प्रार्थना केली कीं तिचा शिरच्छेद करून तें रामाच्या डोक्या-जवळ व धड रामाच्या धडाजवळ ठेवावें.

इतक्यांत द्वारपालकानें येऊन निवेदन केलें कीं प्रहस्त वगैरे मंत्री दर्शनासाठीं बाहेर उभे आहेत. रावण सभेंत निघून गेला. रावण निघून गेल्याबरोबर रामाचें तें मायावी डोकें व बाण अदृश्य झाले.

बिभीषणाची बायको सरम हिनें सीते-जवळ येऊन तिला धीर दिला व म्हणाली— "राम वानरसेना घेऊन समुद्र पार करून लंकेच्या दक्षिण तीरावर उतरला आहे. रावण आपल्या मंत्र्यांचा सल्ला घेण्यासाठीं गेला आहे. त्यानें ही सर्व माया केली आहे. ती पाहून उगीच जिवाचें बरें वाईट करून घेऊं नकोस."

तिकडे रावण दरबारांत बसून आपल्या सेनापतींना सांगत होता—"रणवाद्यें वाजवा व राक्षसांचें सैन्य सज्ज करा. त्यांना कारण सांगूं नका."

रणवाद्यें वाजूं लागल्यावर सीतेला ऐकूं आलीं. तेव्हां सरम म्हणाली—"पाहिलीस रावणाची माया! तुला इकडे भय दाखवून कीं राम मेला आहे, तिकडे तो युद्धाची तयारी करीत आहे. सैन्य युद्धाला निघत आहे." तें ऐकून सीतेच्या मनाला धीर आला.

सरम सीतेला पुढें म्हणाली—"तुझी इच्छा असेल तर मी रामाकडे जाऊन तूं येथें सुखरूप असल्याचें त्याला कळवीन. बोल, मग जाऊं का?"

"तूं माझी इच्छाच म्हणशील तर एक सांगतें तें कर. रावण आतां काय करतो आहे तें पाहून ये!" सीता म्हणाली.

सरम जाऊन आली व म्हणाली— "रावणाला त्याच्या आईनें व त्याचा एक मंत्री अविद्ध यानें तुला सोडून द्यायला पुष्कळ समजावून सांगितलें. पण रावणानें त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें. म्हणाला— 'प्राण जाईपर्यंत मी सीतेला सोडण्यास तयार नाहीं.' तो आतां आपल्या मंत्र्यांबरोबर बसून मंत्रणा करीत आहे."

त्याच वेळीं वानरसेना जवळ येत असल्याचा कल्लोळ ऐकूं आला. तो आवाज ऐकून राक्षसांचीं तोंडें फक्त पांढरीं पडलीं. रावणाच्या दरबाऱ्यांनीं पण तो आवाज ऐकला.

रावण आपल्या दरबाऱ्यांना म्हणाला— "राम लंका पार करून आल्याचें व तो फार पराक्रमी असल्याचें ऐकून तुम्ही घाब-रल्यासारखे दिसतां आहां!"

तेव्हां रावणाच्या आजोळच्या माल्यवन्त नांवाच्या एका वृद्ध राक्षसानें रावणाला समजावून सांगण्याचा शेवटचा प्रयत्न करून पाहिला. तो म्हणाला—"राजा! आपल्या-हून जो दुर्बळ असेल त्याला आपल्या शक्तीचें भय दाखवून नमवावें. परंतु आपल्या-हून बलिष्ठशत्रूशीं नमतें घ्यावें अशी राजनीति आहे. आपल्या बाजूनें अधर्म घडला आहे, म्हणून आपला पक्ष निर्बळ झाला आहे. म्हणून रामाशीं संधी करून घेऊन सीतेला



तूं सोडावें यांत शहाणपण आहे. या युद्धाचें कारण सीता आहे. हें युद्ध तुझ्या हिताचें नाहीं. तुला अनेक वर प्राप्त आहेत व त्यांच्या बळानें तुला मरण येणार नाहीं. बराचपूर्वी जन्मलेल्या देवांच्या व मानवांच्या विरुद्ध तुला ते वर मिळाले होते. परंतु त्यानंतर जन्मलेल्या मानवांच्या हातून आणि अस्वलां-माकडांच्या हातून तुला मरण येणार नाहीं कशावरून! लक्षणेंदेखील बरोबर दिसत नाहींत."

तो सल्ला ऐकून रावण जास्तच चिडला. तो म्हणाला—"माकडांबरोबर येणारा राम



माझ्याहून जास्त बलिष्ठ आहे हें तुम्ही कशावरून ठरविलेंत. हा टीचभर समुद्र पार करून आला म्हणून तो पराक्रमी झाला वाटतें ! मी खूप विचार करूनच सीतेला घेऊन आलो आहें. रामाच्या भीतीनें मी तिला सोडून देऊं म्हणतां !"

तें ऐकून माल्यवंत लज्जित होऊन मान खालीं करून उभा राहिला. रावणानें आपल्या मंत्र्यांशीं मंत्रणा करून नगररक्षणाची व्यवस्था केली. दक्षिणी द्वारावर महोदर व पार्श्व यांना व पश्चिमी द्वारावर इंद्रजिताला नेमलें. उत्तर द्वारावर शुक व सारण यांच्याबरोबर स्वतः रावण उभा राहिला. विरूपाक्ष अनेक राक्षस वीरांसमवेत लंकेच्या मध्यभागीं उभा राहिला.

लंका नगरीच्या रक्षणाची ही सर्व व्यवस्था बिभीषणाचे मंत्री पक्षीरूपानें येऊन पाहून गेले. त्यांनीं दिलेली माहिती बिभीषणानें रामाला जाऊन सांगितली. रामानें लक्ष्मण, सुग्रीव, हनुमान, जांबवंत इत्यादि सहकारी वीरांशीं मंत्रणा केली व लंकेवर कोठून व कशातऱ्हेनें हल्ला करावयाचा हें ठरविलें.

नील वानराला पूर्वेकडील द्वारावार प्रहस्त व त्याच्या अनुयायांशीं युद्धाला पाठविण्यांत आलें. अंगदाला महोदर व महापार्श्व यांच्याशीं दक्षिण द्वारावर युद्ध करण्यास रामानें पाठविलें. हनुमान पश्चिमी द्वारावर गेला. उत्तर द्वारावर स्वतः रावण उभा आहे हें कळल्यावरून स्वतः राम लक्ष्मणांनीं तिकडे जाण्याचा विचार केला. लंकेच्या मध्यभागीं असलेल्या सैन्याच्या समाचाराला सुग्रीव, जांबवंत व बिभीषण यांना नेमण्यांत आलें.

रामानें सर्वांना असा नियम करून दिला कीं युद्ध करीत असतां राम, लक्ष्मण, अंगद, मारुती, सुग्रीव आणि बिभीषण यांच्याशिवाय इतर कोणी नररूप घेऊन राहूं नये. सर्वांनी





वानर रूपांतच रहावें म्हणजे ओळखणें कठीण जाणार नाहीं.

असें ठरवून राम सुवेल पर्वतावर चढला. त्याच्या पाठोपाठ लक्ष्मण, सुग्रीव व इतर वानरवीर पण सुवेल पर्वता वर चढले. तेथून त्यांना लंकानगरीचें दृश्य स्पष्ट दिसूं लागलें. लंकेच्या कोटावर राक्षसवीर उभे असलेले दिसत होते. त्यांना पाहून वानर सैन्यानें रामाचा जयजयकार केला. त्याचवेळीं सूर्यास्त झाला व पौर्णिमेचा चंद्र उगवला.

राम वगैरे वीरांनी सुवेल पर्वतावरच ती रात्र काढली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं वानर सुवेल पर्वताच्या अरण्यांत फिरूं लागले. सुवेल पर्वतावरून त्रिकूट पर्वतावर वसलेली लंका-नगरी त्यांनीं पाहिली. राम लक्ष्मण व वानरवीर लंकेचें सौंदर्य पाहून चकित झाले. लंकानगरीच्या गगनचुंबी इमारती, सोन्याचा कोट गोपुर वगैरे पाहून त्यांना आश्चर्य वाटलें.

त्यांना त्याच वेळीं रावण पण दिसला. त्याच्या डोक्यावर श्वेत छत्र होतें. दोन्ही बाजूला चवऱ्या घेऊन दासी उभ्या होत्या. हिऱ्या मोत्यांनीं मढवलेलीं रत्नाभूषणें व जरीचीं वस्त्रें त्याच्या अंगावर होतीं.



इतर सर्वांबरोबर सुग्रीव पण रावणाकडे पहात उभा होता. त्याला एकाएकीं राग आला. एका क्षणांत उडी मारून तो रावण उभा होता त्या गोपुरावर पोंचला. रावणाला त्यानें जवळून कोपित मुद्रेनें पाहिलें. हवेंत पुन्हां उडी मारली आणि रावणाच्या मुकुटा-वर पदप्रहार करून जमिनीवर येऊन उभा राहिला. अर्थात रावणाला तो अपमान असह्य वाटला. त्यानें सुग्रीवाला धरून जमिनीवर चेंडूसारखें फेंकलें. सुग्रीव चेंडू-सारखाच जमिनीवरून वर उडाला व लाथ मारून त्यानें रावणाला जमिनीवर पाडलें.









दोघांचें मल्लयुद्धच सुरू झालें. बराच वेळ हें युद्ध चालू होतें. धर्मयुद्धांत सुग्रीवाला जिंकणें तितकेंसें सोपें नाहीं हें कळल्यावर रावणानें मायायुद्ध करण्यास सुरुवात केली. तें ओळखून सुग्रीवानें पुन्हां आकाशांत उड्डाण केलें. रावणाला वाटलें कीं स्वारी खालीं येईल. परंतु सुग्रीव राम उभा होता तेथें पोंचला.

रामानें सुग्रीवाचें अभिनंदन केलें व म्हणाला—"सुग्रीवा, तूं राजा आहेस. अशी घाई केलीस तर कसें चालेल! तुझ्यावरच तर आम्ही सर्वांची भिस्त आहे. समज तुझ्यावर कांहीं संकट ओढवलें असतें तर आमची सर्वांची जी दुर्गति झाली असती त्याचा विचार तूं करायला हवा होतास."

"तुझ्या बायकोला त्या साध्वीला उचलून नेणाऱ्या त्या आततायी राक्षसाला पाहून मला माझा राग आवरला नाहीं, रामा!" सुग्रीव म्हणाला.

सुवेल पर्वतावरून उतरून ते त्रिकूट पर्वताकडे चालले. वानरांनीं लंकेला वेढा दिला. रामाच्या आज्ञेनें ज्या द्वारावर ज्याला ज्याला नेमलें होतें ते सर्व आपआपल्या जागीं जाऊन उभे राहाले.

तेव्हां राम अंगदाला बोलावून म्हणाला—"अंगदा! तूं धीर आहेस, निर्भीक आहेस. तूं सरळ लंकापुरींत उड्डाण करून जा. रावणाची समक्ष भेट घे व त्याला माझा निरोप सांग. "रावणा! तूं चोरासारखा येऊन सीतेचें हरण केलें आहेस. तुला त्याचा दंड देण्यासाठीं तुझा काळ स्वतः माझ्या रूपानें बाहेर उभा आहे. तूं आपल्या ज्या पराक्रमाच्या जोरावर सीतेला पळवून नेलेंस तो तुझा पराक्रम मी पहायला आलों आहें. तूं स्वतः सीतेला सोंपवून शरण मागायला आलास तर मी उदार मनानें तुला क्षमा करीन. पण तूं आपला हट्ट

सोडला नाहींस, तर मात्र तुझा समूळ नाश करून लंकेचें राज्य बिभीषणाला देऊन टाकीन. तुझे सल्लागार तुझ्या व तुझ्या प्रजेच्या संहाराला कारणीभूत झाले आहेत हें तुला कळत नाहीं. तूं युद्धच करण्याचा निश्चय केला असशील तर युद्धाला तयार रहा."

अंगद शिष्टाईसाठीं रावणाकडे गेला. त्यानें उड्डाण केलें व सरळ लंकानगरींत पोंचला. रावण आपल्या अंतःपुरांत आपल्या मंदोदरी आदि स्त्रियांशीं सल्ला करीत असतां अंगद तेथें गेला व रावणाच्या शेजारी जाऊन उभा राहिला. त्यानें स्वतःची ओळख सांगितली व रामाचा निरोप जशाचा तसाच पोंचता केला.

तो निरोप ऐकून रावणाला अनिवार राग आला. तो ओरडून म्हणाला—"धरा याला आणि करा ठार!" चार राक्षस रावणाच्या आज्ञेनें अंगदाला धरण्यासाठीं धांवले. अंगदानें त्यांना जवळ येऊं दिलें. ते जवळ आल्यावर त्यानें त्यांना आपल्या बगलेंत धरलें व तो रावणाच्या राजवाड्याच्या शिखरावर जाऊन उभा राहिला. त्यानें उड्डाण केलें तेव्हां राक्षस पटापट जमिनीवर आदळले व ठार झाले. अंगदानें शिखराला लाथ मारली. तेव्हां तें शिखर तुटून खालीं पडलें. अंगदानें आपल्या नांवाचा उच्चार सर्व राक्षसांना ऐकूं जाईल इतक्या उच्च स्वरानें केला. नंतर तो रामाकडे गेला.

वानरांनी रावणाला येऊन सांगितलें कीं वानर सैन्यानें लंकेला वेढा घातला आहे. रावण तें वानरसैन्य पाहण्यासाठीं आपल्या वाड्याच्या सर्वोच्च शिखरावर जाऊन उभा राहिला. वानरांचें अफाट सैन्य पाहून तो चकित झाला.





# ध्रुव चरित्र

[२]

नंतर विष्णु आपल्या गरुडवाहनावर बसून मधुवनांत आला. ध्रुवानें त्याला पाहून साष्टांग नमस्कार केला. देवाची पूजा कशी करतात हें त्याला माहीत नव्हतें. तो विचारांत पडला. तें ओळखून विष्णूनें आपला शंख ध्रुवाच्या डोक्यावर ठेवला. त्यामुळें ध्रुवाला अद्भुत वाक्शक्तीचा लाभ झाला व तो विष्णूचें स्तोत्र म्हणूं लागला.

ध्रुवाची तपश्चर्या पाहून विष्णूनें प्रसन्न मुद्रेनें त्याला राज्यप्राप्तीचा वर दिला कि ध्रुव २६ वर्षें राज्य करील व सर्व ऐहिक सुखोपभोग करून नंतर त्रिलोकांत स्थिर अशा स्थानीं नक्षत्ररूपें वास करील. सर्व देव व नक्षत्रमंडळ त्याला प्रदक्षिणा घालून त्याचा गौरव करतील. असा वर देऊन विष्णुनें गरुडावर बसून वैकुंठ लोकीं प्रस्थान केलें. अशा प्रकारें इच्छित फलप्राप्ति करून घेऊन ध्रुव घरीं निघाला.

ती बातमी उत्तानपाद राजाला कळली. ती मंगलवार्ता आणणाऱ्या नोकरास मनमुराद पारितोषिक देऊन उत्तानपाद राजा ध्रुवाच्या स्वागतासाठीं निघाला. त्याच्या दोघी राण्या सुनीति व सुरुचि उत्तमला बरोबर घेऊन निघाल्या.

नगराबाहेर त्यांना समोरून ध्रुव येत असलेला दिसला. उत्तानपाद लगेच रथांतून उतरला. मुलाला मिठी मारून त्यानें आपल्या आनंदाश्रूंनी त्याला जुणुं कांहीं स्नानच घातलें.

ध्रुवानें पित्याला व दोघी मातांना नमस्कार केला. ध्रुवाला हत्तीवर बसून



राजधानींत नेण्यांत आलें. जागोजागीं तोरणें बांधलेलीं होतीं. केळ्याचे खांब पुरलेले होते. सौभाग्यवती स्त्रियांनीं त्याला ओंवाळलें. राजधानीभर दिवाळीसारखी रोशणाई करण्यांत आली. लोक ध्रुवाच्या मिरवणुकीवर पुष्पवृष्टि करीत होते. नागरिक स्त्रियांनीं जागोजागीं ध्रुवाला ओंवाळून त्याला आशीर्वाद दिला. ध्रुवाचा त्यावेळीं जो सत्कार झाला तो पाहून त्याच्या दुःखी मातेच्या डोळ्याचें पारणें फिटलें.

पुढें उत्तानपाद वृद्ध होत गेला तसतसें त्याचें मन ध्रुवाला राज्य देऊन वानप्रस्थाश्रम घेण्यासाठीं उतावीळ होत गेलें. त्यानें त्या प्रमाणें समुहूर्त पाहून ध्रुवाचा राज्याभिषेक केला व स्वतः वानप्रस्थाश्रम ग्रहण केला.

ध्रुवानें राजा शुंशुमार याच्यामुली भ्रमी व इला यांच्याशीं लग्न केलें. भ्रमीपासून त्याला कल्प व वत्सर अशीं दोन मुलें झालीं. इलापासून उत्कल नांवाचा मुलगा व एक मुलगी झाली.

उत्तम विवाह होण्यापूर्वीच रानांत शिकारीला गेला असतां एका यक्षानें त्याचा वध केला. त्याची आई सुरुचि त्याच दुःखानें मरण पावली.

यक्षानें आपल्या भावाचा वध केल्याची वार्ता ऐकून ध्रुवाला राग आला व त्यानें अलकापुरीवर स्वारी केली. नगराबाहेर पोंचतांच त्यानें शंख वाजविला. तो ऐकून यक्ष ससैन्य आपल्या राजधानीबाहेर युद्धास आला. यक्षराजाच्या सैन्यानें बाणवृष्टि केली, परंतु त्याला न जुमानतां ध्रुवानें त्याचें उत्तर म्हणून द्विगुणित उत्साहानें बाणवृष्टि केली. यक्ष टिकाव न धरूं शकल्यामुळें मागें फिरला.

ध्रुवानें नगरांत प्रवेश केला. त्याला त्यावेळीं मनस्वी आनंद झाला. परंतु त्याच वेळीं समुद्राचा आवाज होतो तसा आवाज झाला. पाहतां पाहतां आकाश मेघाच्छादित झालें. विजा चमकूं लागल्या. आकाशांत धुळीचे लोट दिसूं लागले व रक्तवृष्टी होऊं लागली. त्या पाठोपाठ धडें व शस्त्रें आकाशांतून जमिनीवर पडूं लागलीं. आकाशांत पर्वतासारखें कांहीं तरी दिसूं लागलें व प्रस्तरवृष्टी होऊं लागली. हें सर्व शत्रूनें टाकलेलें मायास्त्र आहे असें समजून ध्रुवानें नारायणास्त्राचा प्रयोग केला. त्याबरोबर माया नष्ट झाली व यक्षाचे अनुयायी गुह्य पळूं लागले. परंतु ध्रुवानें त्यांचा क्षणार्धांत संहार केला.

तेव्हां ध्रुवाचा आजा स्वायंभुव यानें येऊन उपदेश केला—" ध्रुवा, बाळा! क्रोध हें पापाचें मूळ होय! म्हणूनच तूं निर्दोष गुह्यांचा संहार चालविला आहेस. तुझ्या भावाचा वध एकानें केला होता. पण तूं अनेकांचा वध केलास. आपल्या वंशाला कलंकित करूं नकोस. जा, कुबेराला भेटून त्याची मैत्री संपादन कर!"

तें कळल्यावर कुबेर स्वतः यक्ष किन्नर आदिकांसह ध्रुवाला भेटावयाला आला. कुबेर म्हणाला—" तूं क्रोधाचा त्याग केला आहेस हें ऐकून आमच्या मनाचें समाधान झालें












आहे. यांनीं तुझ्या भावाचा वध केला ही कल्पना चुकीची आहे. विधिलिखित जसें असतें तेंच घडलें आहे. तूं आतां मनशांत करून घरीं परत जावेंस यांतच सर्वांचें हित आहे."

याप्रमाणें ध्रुव कुबेराशीं सख्य करून घरीं परतला. वीस हजार वर्षें राज्यकरून त्यानें वानप्रस्थ आश्रमांत प्रवेश केला. बद्रि-काश्रमीं मंदाकिनीच्या काठीं आश्रम बांधून तो राहूं लागला. तेथें तो समाधिस्थ असतां आकाशांतून एक दिव्य विमान उतरलें. तें विमान ध्रुवाला घेऊन जाण्यासाठीं विष्णूनें पाठविलें होतें. विष्णूचे नीळशरीरधारी दूत नंद व सुनंद घेऊन आले होते.

ध्रुवानें त्यांना नमस्कार केला. ते ध्रुवाला म्हणाले—"तूं पांच वर्षांचा होतास तेव्हां तूं तपश्चर्या केली होतीस. त्यावेळीं तुला ज्या विष्णूनें वर दिला होता त्याच्याच आज्ञेनें आम्ही आलों आहों. तुला जें स्थान देण्याचें ठरलें आहे तें तुझ्या पूर्वजां-पैकीं किंवा समर्पिकीं एकाला देखील लाभलें नाहीं. तेथून सूर्य, ग्रह व अवघें नक्षत्र मंडळ तुला प्रदक्षिणा घालीत असलेलें तुला दिसेल."

तें ऐकून ध्रुव विमानांत बसला व म्हणाला—"मी आपल्या आईला या दुःख-सागरांत लोटून कसा काय जाऊं?"

तेव्हां विष्णूच्या दूतांनीं त्याला आकाशां-तून एक दिव्य विमान उतरतांना दाखवून त्यांतून त्याची आई स्वर्गलोकीं जात असलेली दाखविली. हें दृश्य पाहून त्याच्या मनाचें समाधान झालें आणि तो त्या दिवसापासून विष्णूनें नेमून दिलेल्या स्थानीं ध्रुवमंडलांत जाऊन वास करूं लागला.



# ३९. कांचन जंगा

नेपाळ व सिक्किम राज्यांच्या सीमेवर कांचन जंगा शिखर आहे. सिक्किमचे लोक त्याला "देवनिवास" म्हणतात. गौरीशंकर म्हणजे एव्हरेस्ट के-२ च्या सर्वोच्च शिखरानंतर याच शिखराचा नंबर लागतो (२८,०४६ फूट). १९५५ मध्ये कांहीं ब्रिटिश गिर्यारोही हे शिखर चढून गेले, तेव्हां सिक्किमच्या महाराजांच्या इच्छेवरून त्यांनी शिखरावर पाय ठेवला नाहीं. फक्त पांच फूट सोडून तेथूनच ते परतले.

